# इलियद

(ग्रीक महाकवी होमर लिखित "इलियद" चा अनुवाद)

भाषांतरकार
**शा. नि. ओक**




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई




# इलियद

(ग्रीक महाकवी होमर लिखित "Illiad"

या ग्रीक महाकाव्याचे

सॅम्युएल बटलर

यांनी केलेल्या इंग्रजी अनुवादाचे मराठी भाषान्तर)

---

(एन्सायक्लोपीडिया ब्रिटॅनिका इन्कॉ. द्वारा प्रकाशित

'ग्रेट बुक्स् ऑफ द वेस्टर्न वर्ल्ड'

या मालिकेतील ग्रंथावरुन)

---

भाषांतरकार

**शा. नि. ओक**



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# निवेदन

होमर म्हणजे प्राचीन ग्रीसचा महाकवी. त्याची "इलियद" व "ओदिसी" ही दोन महाकाव्ये प्रसिद्ध आहेत. एके काळी तर महाभारत व रामायण ही महाकाव्येसुद्धा व्यास, वाल्मिकींनी होमर पासून स्फूर्ती घेऊन केली असा समज प्रसृत करण्यात आला होता. न्यायमूर्ती के. टी. तेलंग यांच्या या विषयावरील ग्रंथाने हा अपसमज दूर झाला. पण होमरची महाकाव्ये मराठी माणसासमोर यावयास पाहिजेतच. साहित्य आणि संस्कृती मंडळाने पूर्वीच "ओदिसी" प्रसिद्ध केले आहे. आता "इलियद" प्रसिद्ध होत आहे.

मंडळास अभिमान वाटावा अशी ही प्रकाशने. मंडळ भाषांतरकर्त्यांचे आभारी आहे.

**सुरेंद्र बारलिंगे,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि
संस्कृती मंडळ.

४२, यशोधन,
मुंबई-४०० ०२०.
दिनांक २ डिसेंबर, १९८५.

## होमर लिखित इलियदच्या भाषांतरातील संदर्भाची सूची व टीपा

### सर्ग १

**एकिआ, एकिअन.**—प्राचीन ग्रीसचा एक भाग होअमर सर्वसाधारणपणे सर्वच ग्रीकांना एकिअन, एकिआचे रहिवाशी असे संबोधिताना आढळतो.

**पेलिअस.**—थेसलीतील मिर्मिडॉनीज लोकांचा राजा इलियदचा वीरनायक ॲकिलीजचा पिता.

**ॲकिलीझ.**—जलदेवता थेटिस हिला पेलिअसपासून झालेला पुत्र. इलियदचा महापराक्रमी वीरनायक.

**ॲत्रिसस.**—ग्रीक सैन्याचा सेनापती ॲगमेम्नॉन याचा पिता.

**जव्ह.**—देवांचा राजा सॅटर्नचा पुत्र याला झ्युस असेही संबोधिले जाते.

**झोतो.**—जव्हची पत्नी ॲपोलोची माता.

**क्रिसिस, क्रिसिइस.**—क्रिसी येथील ॲपोलोच्या देवालयातील पुजारी. त्याची कन्या क्रिसिइस हिला ग्रीकांनी आपल्या विजयानंतरच्या लुटीचा एक भाग म्हणून आपल्या गोटात आणली. तिचा पिता क्रिसिज याने ग्रीक सेनापती ॲगमेम्नॉन याला खंडणी घेऊन तिची सुटका करण्याची विनंती केली. पण ॲगमेम्नॉन याचे तिच्यावर प्रेम जडलेले असल्यामुळे त्याने ती परत देण्याचे नाकारले व पुजाऱ्याला अपमान करून परत पाठविले. ॲपोलोने संतप्त होऊन ग्रीकांच्या गोटात रोगराई पसरविली. तेव्हा नाईलाज होऊन ॲगमेम्नॉनने तिला पित्याकडे पोचती केली.

**ॲपोलो.**—ग्रीकांचा सूर्यदेव. याचा जन्म डेलॉस बेटात झाला. सामर्थ्यवान, दण्ड देणारा व संरक्षण करणारा. ग्रीकांची याच्यावर परमभक्ती याला फीबस ॲपोलो असेही संबोधितात.

**ऑलिम्पस.**—ग्रीक पुराणांप्रमाणे या डोंगरावर सर्व देव व त्यांचा राजा झ्यूस याचे वास्तव्य असते.

**प्राअॅम.**—ट्रॉयचा राजा. याचा पुत्र पॅरिस याने ग्रीक राजा मेनेलॉस याची पत्नी सौंदर्यखनी हेलन हिला पळवून नेले. तिच्या सुटकेसाठी ग्रीकांनी ट्रॉयवर स्वारी केली त्या रणकंदनाचे वर्णन होमरच्या इलिअदमध्ये आहे. ट्रॉयला "इलिअस" असे ही नाव होते म्हणून या काव्याचे नाव "इलिअद" असे पडले. ट्रॉयच्या रहिवाशांना "ट्रोजन" व या युद्धाला "ट्रोजन युद्ध" असे म्हणतात.

**आरगॉस.**—ॲगमेम्नॉनची राजधानी व राज्य.

**क्रिसी, सिल्ला, तेने डॉस, स्मिथे.**—ही ग्रीसमधील स्थाने ॲपोलोच्या चरित्राशी निगडित असून पवित्र मानली जात.

**दॅनाअन्स.**—होमरने ही संज्ञा सर्वच ग्रीकांसाठी, विशेषत: त्रॉयच्या संग्रामात ज्यांनी भाग घेतला त्यांच्याबद्दल वापरली आहे.

**ज्युनो.**—झ्यूस या देवराजाची पत्नी, देवांची महाराणी, हिला "हीरा" असेही संबोधिण्यात येते. ही सर्व स्त्री जातीची संरक्षक देवता असे ग्रीक व रोमन मानीत. ही फार मत्सरी होती व तिचा झ्यूसशी नेहमी झगडा चाले. ही सॅटर्नची मुलगी होती.

**कॅलचास.**—थेस्तारचा पुत्र. त्रॉयच्या रणसंग्रामाच्या वेळी हा प्रज्ञावंत भविष्यवादी संकटाच्या वेळी शकून पाहून सल्ला देई व तो सर्व प्रमाण मानीत.

**ॲगॅमेम्नॉन.**—आरगॉसचा राजा. त्रॉयच्या रणसंग्रामात ग्रीकांचा श्रेष्ठ सेनानी. विजयी होऊन स्वदेशी परतल्यावर त्याचा त्याची पत्नी क्लितेम्नेस्त्रा हिने खून केला.

**ॲजॅक्स.**—सॅलॅमिसचा राजा, तेलेमॉन याचा पुत्र.

**युलिसिस.**—याला "ओदिसस" असेही म्हणत. ग्रीकांचा एक शूर योद्धा. हा कुटील नीतीतही निष्णात होता. त्रॉयवरील विजयानंतर स्वदेशी परतण्यापूर्वी सागरपर्यटनात याच्यावर अनेक संकटे आली पण आपल्या साहसी शौर्याने व चातुर्याने तो बचावला. या त्याच्या साहसाचे रसभरित वर्णन होमरने आपले दुसरे महाकाव्य "ओदिसी" यात केले आहे. युलिसिस हा इथाकाचा राजा लेर्अटिस याचा पुत्र.

**आयदोमेनिअस**—क्रितचा राजा. त्रोजन युद्धातल्या अत्यंत शूर योद्ध्यांपैकी एक.

**थिआ**—थेसलीमधील एक जिल्हा. ॲकिलीजच्या शासनाखाली हा प्रदेश होता.

**मेनेलॉस**—स्पार्टाचा राजा हेलनचा पती, ॲगमेम्नॉनचा धाकटा भाऊ, भव्य शरीरयष्टीचा, शूर बुद्धीमान, मितभाषी ग्रीक योद्धा.

**र्मिमिदॉन्स**—थेसलीतील थिआचे रहिवासी. ॲकिलीजच्या खास दिमतीतले योध्दे ते त्रॉयच्या रणसंग्रामात ॲकिलीज बरोबर भाग घेत होते.

**ब्रिसेइस**—व्रिसिअसची कन्या, युद्धात लूटीचा हिस्सा म्हणून ॲकिलीजच्या वाट्यास आली होती पण ॲगमेम्नॉनला जेव्हा क्रिसिइजला तिच्या पित्याकडे पाठवावयास ॲकिलीजने भाग पाडले, तेव्हा संतप्त होऊन ॲगमेम्नॉनने तिला ॲकिलीजकडून आपल्याकडे आणले यावरून दोन्ही योद्ध्यांत कलहाचे बीज पडले व तोच इलियद या महाकाव्याचा मुख्य विषय आहे..

**मिनर्व्हा :**—प्रज्ञेची ही देवता ग्रीकांमध्ये "पॅलास अँथीनी" या नावाने ओळखली जाई. ही युद्धाची देवताही मानीत व त्यामुळे तिची प्रतिमा चिलखत घातलेली, ढाल व शिरस्त्राण यांनी सज्ज अशी पूजिली जाई. हिचा जन्म झ्यूसच्या मस्तकातून झाला अशी कथा आहे.

**हेक्तर :**—ट्रॉयचा राजा, प्राअॅम याचा ज्येष्ठ पुत्र, ट्रोजन सैन्यातला सर्वात जास्त पराक्रमी योद्धा. याने अॅकिलीजचा परमप्रिय मित्र पेट्रोक्लस याचा युद्धात वध केल्यामुळे क्रुद्ध होऊन अॅकिलीजने आपल्या शस्त्रसंन्यासाचा शेवट करून हेक्तरला युद्धात ठार केले.

**नेस्तॉर :**—पायलॉसचा राजा, नेलिअसचा पुत्र याने युद्धात पुष्कळ पराक्रम केले. आता वृद्धावस्थेत तो अनुभवी, न्यायी, प्रज्ञावंत व संभाषणकुशल म्हणून ग्रीकांकडून फार आदराने वागवला जाई.

**पिरिथोस, द्रायास, सीन्यूस, एक्झादिअस, पॉलिफीमस, इजिअसपुत्र, थीस्यूस**—ग्रीस-मधल्या नगरी राज्यांचे अधिपती. हे सर्व महापराक्रमी असून नेस्तॉरच्या सल्ल्याने वागत.

**पेट्रोक्लस.**—अॅकिलीजचा परमप्रिय मित्र व शूर ग्रीक योद्धा.

**वृद्ध बापाच्या जवळ नसलेली त्याची आई.**—थेटिस ही जलदेवता अॅकिलीजची आई. थेटिस ही जलदेव नीरीअस या इजिअन समुद्राच्या स्वामीची कन्या, ही नेहमी बापाजवळ समुद्राच्या तळाशी वास्तव्य करी.

**थीबसनगरी.**—ग्रीक पुराणात अनेकदा उल्लेखिली जाणारी एक प्रसिद्ध नगरी दिओनायसस व हर्क्युलीस यांची जन्मभूमी, इडिपसची राजधानी.

**नेपच्यून.** —सागराचा अधिष्ठाता देव याला ग्रीक पॉसिदोन म्हणत.

**सॅटर्न.**—नेपच्यून व झ्यूस (ज्युपिटर) (जव्ह) चा पिता.

**सॅटर्नपुत्राला.**—झ्यूसला.

**ब्रायरिअस, इजिऑन.**—शंभर हातांचा राक्षस, त्याने तायतन या राक्षसजमातीशी लढण्यास ऑलिम्पिआवासी देवांना मदत केली.

**ओशिअॅनस.**—पृथ्वीला वेढून असलेल्या जलाशयाचा अधिष्ठाता देव, हा स्वर्ग व पृथ्वी यांचा पुत्र, सर्व जलदेव व जल अप्सरांचा पिता. प्राचीन ग्रीकांची अशी समजूत होती की, पृथ्वी ही सपाट व गोल असून ओशिअॅनसचा तिला वेढा आहे. या सदैव वहात रहाणाऱ्या जलाशयातून सूर्य व तारे उगवत व तिच्यातच मावळत.

**इथिओपिआ.**—आफ्रिकेतील इजिप्तच्या दक्षिणेकडील प्रांत.

**व्हल्कन.**—अग्नीदेव व देवांचा कसबी कारागीर. ग्रीक याला हेफिस्तस म्हणत. झ्यूस व हीराचा पुत्र. तो जन्मतः अशक्त व लंगडा होता. कुणी म्हणतात हीराने त्याला समुद्रात फेकून दिला व जलदेवतांनी त्याला वाढवला. मोठा झाल्यावर तो ऑलिम्पसला परत आला. तो झ्यूस-हीराच्या कलहात आईची बाजू, घई म्हणून झ्यूसन रागान त्याला स्वर्गातून खाली

फेकले. दिवसभर तो पडलाच होता. संध्याकाळी तो लेम्नॉस बेटावर पोचला. नंतर तो पुन्हा ऑलिम्पसला आला व त्याने देवांचे प्रासाद बांधले. त्याची भट्टी नेहमी धगधगलेली असे व त्याचा घण स्वयंचलित असे. ॲकिलीजचे प्रसिद्ध अभेद्य चिलखत थेटिसच्या विनंतीवरून यानेच बनवले होते. नंतर अशी समजूत दृढ झाली की, त्याची भट्टी एका बेटावर होती व तिच्याखाली ज्वालामुखी होता.

**कलांच्या स्फूर्तीदेवता.**—या (Muses म्युजेस) काव्य, गान, नृत्य, वगैरेंच्या अधिष्ठात्या देवता असे ग्रीक मानीत. या झ्यूसच्या नऊ कन्या बिओशिआतील हेलिकॉन पर्वतावर वास्तव्य करीत. महाकवी आपल्या काव्याच्या आरंभी यांना स्फूर्ती देण्यासाठी आवाहन करीत.

## सर्ग २

**दावाग्नीरूप प्रवाद.**—अरण्यातील वणव्याप्रमाणे झपाट्याने पसरणाऱ्या अफवा (Rumour) यांची अधिष्ठात्री एक पिशाच्ची "प्रवाद" असे ग्रीक मानीत.

**मर्क्यूरी, आर्गसान्तक.**—ग्रीकदेव हर्मिज याचे रोमन नाव. हा झ्यूस व माइआ यांचा पुत्र. याला झ्यूसने आपला दूत म्हणून नेमले होते. तो अतिशय द्रुतगतीने झ्यूसचे निरोप सर्वत्र पोचवी. याने वीणेची निर्मिती केली. तो रस्त्यांचा स्वामी वाटसरूंचा रक्षणकर्ता होता. याने ऑर्गस या शंभर डोळ्यांच्या राक्षसाला ठार केले. हीराने आयोवर झ्यूसची प्रीती जडली म्हणून तिचे गाईत रूपांतर करून तिच्यावर पहारा करायला ऑर्गसला नेमले होते. पण हर्मिजने झ्यूसच्या आज्ञेवरून ऑर्गसला आपल्या वीणेच्या मधूर स्वराने निद्रिस्त केले व त्याचा शिरच्छेद केला. मग हीराने त्याचे शंभर डोळे आपले वाहन मयूर याच्या पिसाऱ्यावर लावले.

**पेलॉप्स.**—झ्यूसचा नातू. फ्रिजिआचा राजा टँटलस याचा पुत्र, हा रथ चालवण्यात फार कुशल होता. पिसाचा राजा इनोमॉस याला देवांचा कौल झाला होता की, त्याचा जावई त्याला ठार करील. तेव्हा त्याने पण लावला की, जो मला रथदौडीच्या स्पर्धेत जिंकील त्याला मी माझी कन्या हिपोडॅमिआ देईन, पण जो हरेल त्याला मृत्युदंड देईन. इनोमॉस हा रथ चालवण्यात अत्यंत कुशल असल्यामुळे सर्व स्पर्धक पराभूत होऊन मृत्यूमुखी पडले. पेलॉप्सने इनोमॉसच्या सारथ्याला अर्धे राज्य कबूल करून, रथाचा चाके खिळखिळी करून ठेवण्यास सांगितले. त्यामुळे इनोमॉस रथाबाहेर फेकला गेला व मृत्यू पावला. मग त्याचे राज्य व कन्या पेलॉप्सला मिळाली.

**थिएस्टीस.**—हा पेलॉप्सचा व ॲट्रिअसचा भाऊ. थिएस्टीसने ॲट्रीअसच्या पत्नीशी व्यभिचार केल्यामुळे, ॲट्रीअसने त्याला हद्दपार केले. थिएस्टीसने ॲट्रीअसकडून अजाणता आपल्याच पुत्राचा वध करविला. सूड घेण्यासाठी ॲट्रीअसने सलोख्याचा देखावा करून थिएस्टीसला आपल्या घरी बोलावून त्याच्याच पुत्राचे मांस त्याला खाऊ घातले. सत्य गोष्ट समजल्यावर थिएस्टीस व्यथित होऊन निघून गेला व देवांनी ॲट्रीअस व त्याचा वंश याला

घोर शाप दिला. हा शाप घराण्याला कसा भोवला या कथानकावर अनेक ग्रीक शोकनाट्ये आधारलेली आहेत.

**इकॅरिअन सागर**.—इजिअन समुद्रातल्या इकॅरिअस या बेटाभोवतालचा भाग. या बेटाला व सागराला हे नाव इकॅरिअस या अथेन्सच्या रहिवाशावरून पडले. या इकॅरिअसने वारुणीदेव डिओनायसस याच्याकडून द्राक्षांपासून मद्य करण्याची कृती शिकून घेतली.

**हेलन**.—झ्यूस व लेडा यांची कन्या. हिचे सौंदर्य अप्रतिम होते. तिच्या पाणिग्रहणासाठी ग्रीसचे सर्व राजवंशीय उत्सुक होते, पण तिने मेनलॉस या स्पार्टाच्या राजाला वरिले. तिला पॅरिसने ट्रॉयला पळवून नेल्यावर, सर्व ग्रीक राजवंशीयांनी तिच्या सुटकेसाठी एकजुटीने ट्रॉयवर स्वारी केली. दहा वर्षे ही प्रसिद्ध ट्रोजन लढाई चालली व शेवटी ग्रीकांनी हेलनची सुटका केली. मेनलॉस बरोबर स्पार्टात तिने अनेक वर्षे सुखासमाधानाने संसार केला.

**ऑलिस**.—बिओशिआंतील एक बंदर. ग्रीक आरमार येथून ट्रायला युद्धासाठी निघाले

**दोन ॲजॅक्स**.—**एक ॲजॅक्स**.—तेलेमॉनचा पुत्र, सॅलमिसचा राजा.

**दुसरा ॲजॅक्स**.—ऑइलिसचा पुत्र, हा ॲकिलीजच्या खालोखाल ग्रीक सैन्यातील उत्तम योद्धा. ॲकिलीजच्या प्रसिद्ध चिलखतासाठी त्याने युलिसिसशी द्वंद्वयुद्ध केले. त्यात पराभूत झाल्यामुळे तो भ्रमिष्ट होऊन शेवटी मरण पावला.

**तायादिअसपुत्र**.—द्रायॉमिदिज ग्रीक सैन्यातला महापराक्रमी योद्धा. ॲथीनी देवीची याच्यावर विशेष मर्जी होती.

**सॅटर्नपुत्र**.—देवराजा जव्ह किंवा झ्यूस. हा ट्रोजन पक्षाच्या बाजूला होता. तो ग्रीकांवर संकटे आणी. ग्रीकदेव नेहमीच युद्धामध्ये व मानवांच्या जीवनात आपापल्या भक्तांच्या बाजू घेत व त्यांच्या प्रतिपक्षावर संकटे आणीत. ट्रोजन युद्धात देवराज्ञी हीरा किंवा ज्युनो हिची सहानुभूती ग्रीकांच्या पक्षाला होती.

**स्कॅमॅन्दर**.—ही ट्रॉयजवळची प्रसिद्ध नदी. तिच्या तीरावरचे मैदान याच नावाने प्रसिद्ध होते.

**मेघनादस्वामी**.—जव्ह किंवा झ्यूस याचे अस्त्र अशनी (thunder bolt) असे त्यामुळे त्याला ढगांच्या गडगडाटाचा स्वामी असे म्हटले आहे. ढग एकमेकांवर आदळले की वीज उत्पन्न होते.

**मार्स**.—ग्रीक या देवाला ॲरीज म्हणत. झ्यूसच्या खालोखाल याला ग्रीक मानीत युद्धाचा अधिष्ठाता देव.

**बिओशिअन्स**.—ग्रीसमधला एक विभाग बिओशिया, याचे रहिवासी.

**हेलीनीज**.—युरोपमधील हेलास प्रदेशाचे रहिवासी.

**तिफिअस**.—शंभर मस्तकांचा, भयानक डोळ्यांचा व भयंकर कर्कश आवाजाचा राक्षस. झंझावातांचा जनक. त्याने देवमानवांवर वर्चस्व गाजवण्याचा प्रयत्न केला तेव्हा झ्यूसने

त्याला आपल्या अशनीपाताने जेरीस आणले व एट्ना पर्वताखाली गाडून टाकले. ॲरिमीनामक आशिया मायनरमधील डोंगराळ मुलखात हा झगडा झाला.

**आयरिस.**—देवांची दूती. इंद्रधनुष्यस्थित देवता, खांद्यांवर पंख असलेली व दूताचा दंड हातात घेतलेली, अशी तिची प्रतिमा असते.

**इनिआस.**—त्रोजन सैन्यातील महान योद्धा. ॲफ्रॉडाइटी किंवा व्हीनस या प्रीतीदेवतेला अँकीसीजपासून झालेला पुत्र त्राय पडल्यावर तो फिरत फिरत इटालीला गेला व लेशिअममध्ये त्याने राज्य स्थापले. रोमनांचा तो पूर्वज. व्हर्जिल या लॅटिन महाकविच्या "इनिइड" या महाकाव्याचा इनिआस हा वीर नायक आहे. "इनिइड" मध्ये इनिआसच्या दीर्घ प्रवासाचे रसभरित वर्णन आहे. याच्या अनुयायांना दार्दानिअन्स, दार्दानिआ प्रदेशाचे रहिवासी म्हणत. दार्दानिआचा संस्थापक दारदॅनस याला ग्रोजनांचा पूर्वज मानीत.

**ॲन्तेनॉर.**—त्रायमधील एक अत्यंत शहाणा श्रेष्ठी. हेलनला परत पाठवावी असा सल्ला त्याने त्रोजनांना दिला होता, पण त्यांनी तो मानला नाही. त्राय पडल्यावर ग्रीकांनी त्याला संरक्षण दिले.

**झांथस.**—स्कॅमॅन्दर नदीचे दुसरे नाव. या नदीच्या अधिष्ठात्या देवालाही झांथस असे म्हणत.

## सर्ग ३

**अलेक्झॅंद्रस.**—त्रोजनवीर पॅरिस याचे दुसरे नाव. त्रॉयचा राजा प्राअॅम व राणी हेक्युबा यांचा पुत्र, याच्या जन्मापूर्वी हेक्युबाला स्वप्न पडले की, आपण एका पेटत्या पलित्याला जन्म दिला असून संबंध नगरी त्यामुळे पेटली आहे. या स्वप्नामुळे घाबरून पॅरिसला जन्मल्याबरोबरच इदा पर्वतावर टाकून दिले होते. तिथल्या मेंढपाळांनी या अर्भकाला वाढवले व त्याचे नाव पॅरिस ठेवले. मोठा झाल्यावर पराक्रम केल्यामुळे त्याचे नाव ॲलेक्झॅंडर पडले व प्राअॅमने त्याला पुत्र म्हणून स्वीकारले. एकदा पिलिअस व थेटिस यांच्या विवाहसमारंभास सर्व देवास बोलावले पण कलह देवतेस (strife) बोलावले नाही म्हणून रागावून तिने आमंत्रितांमध्ये एक सुवर्णाचे सफरचंद फेकले. त्यावर "सर्वात सुंदर देवीस" असे कोरले होते, त्यावरून हीरा, ॲफ्रॉडाइटी व ॲथीनी यांच्यात भांडण लागले. झ्यूसने तिन्ही देवतांस इदा पर्वतावर पाठवून भांडणात लवाद म्हणून पॅरिसला नेमले. हीराने पॅरिसला अखिल आशियावर सत्तेचे व ॲथीनीने युद्धात कीर्तीचे विलोभन दाखवले. ॲफ्रॉडाइटीने जगातील सर्वात सुंदर स्त्री पत्नी म्हणून त्याला उपलब्ध करून देण्याचे आश्वासन दिले. त्याला भुलून पॅरिसने ते सुवर्णाचे सफरचंद ॲफ्रॉडाइटीला दिले. त्यामुळे नंतर हीरा व ॲथीनी त्रोजनांवर चिडून, त्रोजन युद्धात ग्रीकांना मदत करू लागल्या. नंतर ॲफ्रॉडाइटीच्या सल्ल्याने, पॅरिस स्पार्टात मेनलॉसकडे पाहुणा म्हणून गेला. हेलन ही जगातील सर्वात सुंदर स्त्री म्हणून प्रसिद्ध होती. पॅरिसने तिचे हरण करून तिला त्रायला आणले व तिच्याशी विवाह केला. त्यावरून त्रोजनयुद्ध झाले. मेनलॉसने युद्धात पॅरिसला गाठून त्याचा पराभव केला,

पण त्याच्या कैवारी ॲफ्रॉडाइटीने त्याचे संरक्षण केले. पुढे पॅरिसने ॲकिलीजला कपटाने ठार केले, पण नंतर तो युद्धात मरण पावला.

**ॲमेझॉन.**—कॉकेशसहून येऊन आशियामायनरमध्ये स्थायिक झालेल्या लढवय्या स्त्रियांची जमात ॲमेझॉन या ग्रीक शब्दाचा अर्थ " स्तन नसलेली " असा आहे. या जमातीवर राणीचे राज्य असे व मुली जन्मल्याबरोबर त्यांचा उजवा स्तन छाटून टाकीत. मोठ्या झाल्यावर धनुष्यबाण चालवण्यास त्याना सोपे जावे म्हणून असे करण्याची प्रथा होती. त्या ग्रीसमधील मुलखांवर अनेकवेळा स्वाऱ्या करीत. ट्रोजन युद्धात राणीच्या अधिपत्याखाली ॲमेझॉन स्त्री सैन्य ट्रोजनांच्या बाजूने लढले. पण शेवटी युद्धात ॲकिलीजने राणीला ठार मारले.

**इदा.**—आशियामायनरमधील थिसिआची पर्वतराजी. या पर्वताच्या शिखरावरून देवराजा जव्ह व इतर देव ट्रोजन युद्ध पहात होते.

**हेदीज.**—(Hades) अधोलोकाच्या अधिपतीचे व अधोलोकाचे नाव. हेदीजच्या अधिपतीला प्लुटो असेही म्हणत. हा झ्यूसचा बंधू. क्रॉनस व ऱ्हीआ यांचे तीन पुत्र. झ्यूस, पॉसिदोन व हेदीज, क्रॉनस याला सॅटर्न असेही म्हणतात. म्हणून जव्ह किंवा झ्यूसला सॅटर्नपुत्र म्हटले आहे. क्रॉनसने आपला पिता युरॅनस याच्यापासून आखिल जगाचे साम्राज्य हिरावून घेतले. नंतर झ्यूसने आपला पिता याच्यापासून साम्राज्य हिरावून घेऊन ते तिघा भावात वाटले. हेदीज हा अधोलोकाचा स्वामी झाला. त्याची सत्ता सर्व मृतात्म्यांवर चाले. पॉसिदोन सागराचा व झ्यूस स्वर्गाचा स्वामी झाला. पृथ्वीवर तिघांची समाईक मालकी.

**व्हीनस.**—ग्रीक या देवतेला ॲफ्रॉडाइटी म्हणत. हिला प्रीतीदेवता व सौंदर्यदेवता असे रोमन व ग्रीक उभयता मानीत. ही झ्यूसची कन्या. ती समुद्राच्या फेसातून प्रकट झाली असाही समज आहे. ही हेफीस्टस या देवांच्या कारागिराची पत्नी. पण ती पतीशी एकनिष्ठ राहीली नाही. ॲरिज, दिओनायसिस, हर्मिज, पॉसिदोन हे देव व ॲंकिसिज व ॲडॉनिस हे मानव तिचे प्रियकर होते. ही सर्व देवतांमध्ये सुंदर म्हणून पॅरिसने तिला सुवर्णाचे सफरचंद दिले होते. ग्रीसमधील सायप्रस व सियीरा या बेटात तिची मंदिरे होती व तेथे ती पूजिली जाई. वैवाहिक जीवनाची अधिष्ठात्री देवी.

**लॅसिदीमॉन.**—स्पार्टाचे दुसरे नाव.

**फिजीआ.**—आशियामायनर मधील एक देश.

## सर्ग ४

**हीबी.**—झ्यूस व हीराची कन्या ही यौवनदेवता असे मानीत. देवांना अमृताचे पेले भरून देण्याचे काम तिच्याकडे होते. नंतर हे काम गॅनिमिदिजकडे आले. हीबीने हर्क्युलिसशी विवाह केला.

**मायसिनी.**—ॲगमेम्नॉनची राजधानी. आरगॉस राज्याचे मुख्य शहर.

**फिरॉन.**—क्रॉनॉसचा पुत्र. याचे वास्तव्य पेलिअॉन पर्वतावर असे. अॅपॉलो व आर्तेमिस या त्यांच्या शिक्षकांनी त्याला वैद्यविद्या शिकवली. हा सेंटॉरांपैकी सर्वात शहाणा व न्यायी. होमरने ही एक रानटी जमात होती असे दाखवले आहे. नंतरचे कवी, सेंटॉर हे अर्धमानवी व अर्धअश्वाच्या शरीराचे असल्याचे वर्णित. फिरॉनने वैद्यविद्या अनेक ग्रीक वीरांना शिकवली होती. अखेरीस हा हर्क्युलीसच्या विषारी बाणाने मारला गेला.

**सेफॅलेनिअन.**—आयोनिअन समुद्रातले सर्वात मोठे बेट, सेफेलेनिआ याचे रहिवासी. इथाका व हे बेट यामध्ये फक्त एक अरुंद खाडी होती. आयोनिअन समुद्र ग्रीसजवळ आहे.

**तेलेमॅकस.**—युलिसिसचा मुलगा.

**तायदिअस**—इंतोलिअचा वीर. मिनर्व्हाने त्याला अनेक युद्धात साह्य केले. हा पॉलिनिसिजचा मित्र. थीब्सचा राजा इडिपस याचे दोन पुत्र एतिओक्लिज व पॉलिनिसिज या दोन्ही भावांनी इडिपिसच्या मृत्यूनंतर राज्यासाठी परस्परात युद्ध केले व ते एकमेकांच्या हाताने मारले गेले.

**कॅडमिअनिस..**—कॅडमिआचे रहिवासी. कॅडमिआचा संस्थापक कॅड्मस. बिओशिआचे मुख्य शहर थीब्स याचा कॅडमिआ एक प्रमुख भाग. या कॅड्मसने एक नागराक्षस मारून त्याचे दात जमिनीत पेरले. त्यांतून शस्त्रसज्ज सैनिक उगवले. त्यांनी परस्परास ठार केले. फक्त पाच बचावले. हे थीब्सवासियांचे पूर्वज. कॅड्मसने थीब्सवर राज्य केले.

**स्थेनेलिअस.**—कॅपॅनिअसपुत्र. कॅपॅनिअस थीब्स घेताना कामी आलेल्या सात वीरांपैकी एक होता. त्यांच्या मृत्यूचा सूड त्यांच्या सात पुत्रांनी थीब्सनगरी जिंकून घेतला· हा दायोमिदच्या हाताखाली ग्रीक सैन्यात लढला.

**परगॅमिस.**—ट्रॉयचा बालेकिल्ला.

**जव्हवी दुर्दम्य कन्या.**—अॅथीनीदेवी ही झ्यूसच्या प्रथम पत्नीच्या गर्भात असता तिचे अपत्य आपल्यापेक्षा प्रबळ होईल या भितीने झ्यूसने पत्नीला गिळून टाकले. नंतर याच्या मस्तकांतून पूर्ण वाढ झालेली अॅथीनी प्रकट झाली.

## सर्ग ५

**दायना.**—या रोमन देवतेला ग्रीक आर्तेमिस म्हणत. ही झ्यूस व लीटो यांची कन्या व अॅपॉलोची जुळी बहीण. हीचा जन्म डेलॉस बेटात झाला. ही धनुर्धारी देवता शिकारीची अधिष्ठात्री आहे. ट्रोजन युद्धात अॅपॉलोप्रमाणे ती ट्रोजनांना ग्रीकांविरुद्ध मदत करीत होती. ही कुमारी देवता आहे तशीच चंद्रदेवता आहे.

**गॅनिमिद.**—ट्रॉसचा पुत्र, हा अत्यंत देखणा असल्यामुळे देवांनी त्याला झ्यूसला मधाचे प्याले भरून देण्यासाठी स्वर्गात नेले व तिथेच ठेवून घेतले. झ्यूसने मग ट्रॉसला दोन दैवी घोडे दिले.

**सिप्रिअनदेवी व्हीनस.**—सायप्रसमध्ये तिचे मदिर होते.

**दायोनी.**—युरॅनस (स्वर्ग) आणि गी (पृथ्वी) यांच्या संगमापासून झालेल्या संततीला 'तायतन' असे म्हणतात. सहा पुत्र व सहा कन्या, या तायतनांपैकी दायोनी ही एक कन्या होती. हिला झ्यूसपासून अॅफ्रॉडाइटी अथवा व्हीनस ही कन्या झाली. तायतनांपैकी क्रॉनस या पुत्राने पित्याचे सिंहासन बळकावले. पुढे क्रॉनसपुत्र झ्यूस याने पित्याला पदच्यूत करून सर्व तायतन्सना अधोलोकात पिटाळून लावले.

**ओतस व एकिॲल्तिस.**—ॲलोईसचे हे पुत्र. हे अत्यंत साहसी व प्रचंड बलाने युक्त होते. अवघ्या नऊ वर्षाचे असताना त्यांनी ऑलिम्पिआनिवासी देवांशी युद्ध आरंभिले. पण ॲपॉलोने ते मोठें होऊन आणखी पराक्रम करण्याआधीच त्यांचा वध केला.

**ॲंकित्रिऑनचा पुत्र हर्क्युलीस.**—हा खरा झ्यूसचा पुत्र. पण तो अँकित्रिऑनचा पुत्र असे म्हणत. कारण त्याचा जन्म अल्कमिनिच्या, अँकित्रिऑनच्या पत्नीच्या उदरी झाला होता.

**लॅतोना.**—रोमन नाव. ग्रीक नाव लेतो. हिला झ्यूसपासून अॅपॉलो व आर्तेमिस ही अपत्ये झाली. डेलॉसमध्ये तिचे तिच्या अपत्यांसह पूजन होई.

**सार्पिडॉन.**—झ्यूसचा पुत्र. लिसिआचा राजा. याने ट्रॉयच्या युद्धात ट्रोजनांच्या बाजूने लढून मोठा पराक्रम केला पण तो शेवटी पेत्रोक्लसकडून मारला गेला.

**बोरिआस.**—उत्तरेच्या वाऱ्याचा अधिष्ठाता देव. तो थ्रेसमध्ये एका गुहेत वास करी. तो अथेन्सवासी ग्रीकांचा मित्र होता. अथेन्समध्ये त्याचे पूजन व त्याच्याप्रित्यर्थ उत्सव होई.

**एन्यो.**—युद्धदेवता. ही नेहमी मार्स अथवा अॅरीज यांच्या बरोबर संचार करी.

**हर्क्युलीस.**—ग्रीक याला हेराक्लीज असेही म्हणत. झ्यूसचा पुत्र. हा अत्यंत बलवान व शूर होता. त्याची अचाट अशी बारा वीरकृत्ये प्रसिद्ध आहेत. (Twelve Labours).

**गॉरगॉन.**—तीन भयानक राक्षसी स्थेनो, युरिअॅली व मेदूसा. त्यांच्या मस्तकावर केसांच्या जागी फुत्कार टाकणारे सर्प होते. त्यांना पंख, पितळेच्या नख्या व अक्राळविक्राळ दात होते. यापैकी मेदूसा ही मर्त्य होती. तिच्याकडे पाहणारा मानव दगड होऊन पडत असे. पुढे पर्सिअस या वीराने तिच्या मस्तकाचे प्रतिबिंब आपल्या ढालीत पाहून तिचा शिरच्छेद केला. मग तिचे शरीर अॅथीनी किंवा मिनर्व्हाने आपल्या ढालीच्या मध्यावर बसवून टाकले.

**स्तेन्तॉर.**—ट्रोजन युद्धातील ग्रीकांच्या सैन्यातील एक घोषक.

**हेडीजचे शिरस्त्राण.**—अधोलोकाचा राजा हेडीज याचे शिरस्त्राण असे होते की, ते घातले की, ती व्यक्ती अदृश्य होई. हेडीज हे शिरस्त्राण कधी कधी इतर देवांना व मानवांना वापरावयास देत असे.

**ॲलाल्कामिनी.**—बिओशिआतीत एक प्राचीन नगर. येथे मिनर्व्हा अथवा ॲथीनीदेवीचे मंदिर आहे.

## सर्ग ६

**ॲड्रस्तस.**—इडिपसचा पुत्र पॉलीनिसिज याला थीब्सचे राज्य त्याचा भाऊ इटिओक्लिज याच्यापासून मिळवून देण्यासाठी मदत करणाऱ्या सहा राजांपैकी हा एक. हा तेवढाच त्यांच्यापैकी जीवंत राहिला. तो ट्रोजनांच्या बाजूने लढला व मारला गेला.

**ॲक्रॉपॉलिस.**—शहरातील उंच भागाला हे नाव असे. ट्रॉयजवळच्या ॲक्रॉपॉलिसवर मिनर्व्हा किंवा पॅलास अथीनीचे मंदिर होते. याला "पॅलॅडिअम" असेही म्हणत. पॅलॅडिअमच्या मिनर्व्हाच्या प्रतिमेच्या सुरक्षिततेवर ट्रॉय नगरीची सुरक्षितता अवलंबून होती असे ट्रोजन मानीत.

**लायकरगस.**—थ्रेसमधल्या एडिनीज लोकांचा राजा ; ड्रायाझचा पुत्र. याने वारुणी-देव बॅक्लसचा व त्याच्या भक्तांचा फार छळ केला. झ्यूसने त्याला आंधळा केल्यावर काही दिवसांनी तो मरण पावला.

**सायडॉन.**—क्रीतमधील एक प्रमुख शहर.

## सर्ग ७

**हेलेस्पॉट.**—हिला आता दार्दानेल्सची सामुद्रधुनी म्हणतात. युरोप व आशियामधली सीमारेषा. ही पन्नास मैल लांब व फक्त सहा मैल व कुठे कुठे तर एकच मैल रुंद आहे. लीॲंडर हेरोला भेटायला ही पोहून आली अशी कथा आहे. हेली व तिची अपत्ये सुवर्णाच्या लोकरीच्या मेंढ्यांवरून हवेत उड्डाण करीत असता, हेली यात पडून बुडाली म्हणून या सामुद्रधुनीला हे नाव पडले.

**लॅओमेडॉन.**—ट्रॉयचा राजा. प्राअॅमचा पिता. नेपच्युन अथवा पासिदोन व अॅपॉलो यांनी झ्यूसची काही आगळीक केल्यामुळे त्या दोघांना लेओमेडॉनचे सेवक म्हणून काही काळ काम करण्याची शिक्षा झ्यूसने त्यांना दिली होती. तेव्हा त्यांनी ट्रॉयभोवती भक्कम भिंत बांधली.

**हिप्सिपिली.**—लेम्नॉसच्या थोॲस राजाची कन्या. थेसलीतील आयॉल्कसचा राजपुत्र जेसन, सुवर्णाची लोकर आणण्याकरता आर्गो जहाजांतून कॉलचिसकडे निघाला असता, वाटेत लेम्नॉस बेटावर उतरला होता. तेव्हा हिप्सिपिलीला जेसनपासून दोन जुळे मुलगे झाले होते.

## सर्ग ८

**तार्तारस.**—हेदीज किंवा अधोलोकाचा खालचा प्रदेश. येथे झ्यूसने तायततांना भिरकावून दिले होते.

**त्यूसर.**—तेलेमॉनचा पुत्र; अॅजॅक्सचा सावत्र भाऊ. हा ग्रीक सैन्यातला सर्वात निष्णात धनुर्धारी होता.

**युरिस्थिअस.**—झ्यूसपुत्र हर्क्युलीस याने डेल्फीच्या देववाणीला भविष्याबद्दल विचारले तेव्हा कौल मिळाला की, त्याने तिरिन्समध्ये युरिस्थिअसची बारा वर्षेपर्यंत सेवा करावी. म्हणजे नंतर त्याला अमरत्व प्राप्त होईल. युरिस्थिअसने त्याला बारा कष्टप्रद कामे सांगितली ती (Twelve labours of Hercules) म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यापैकी एक सर्वात कठीण काम एरेबस या अधोलोकाच्या मार्गावरील तपोमय प्रदेशातून पाताळातील सेरबेरस कुत्रा युरिस्थिअसला आणून देणे हे होते. हर्क्युलीस स्तिक्स ही अधोलोकातील नदी ओलांडून हेडीजमध्ये उतरला; प्लुटो या अधोलोकाच्या स्वामीची परवानगी घेऊन त्याने सेरबेरस–अधोलोकाच्या प्रवेशद्वारावरील तीन शिरांचा, मानेभोवती सर्पांचा वेढा असलेला व सर्पाची शेपटी असलेल्या या राक्षसी कुत्र्याला वर आणले.

**आयापितस.**—युरॅनस (स्वर्ग) व गी (पृथ्वी) यांच्या पुत्रांपैकी, तायतनांपैकी एक झ्यूसने क्रॉनस (सॅटर्न) बरोबर याला तार्तरसमध्ये बद्ध करून ठेवले होते.

## सर्ग ९

**तॅलेंत.**—ग्रीक हा शब्द वजनाला व धनसंख्येला लावीत. ग्रीक तॅलेंत अजमासे ६० पौंड वजन व २४० पौंड दर्शवते.

**ऑतोमेदॉन.**—अॅकिलीजचा सवंगडी व सारथी. तो अत्यंत कुशल सारथी असल्यामुळे, कुशल सारथ्याला 'ऑतोमेदॉन' असे संबोधिण्याची प्रथा होती.

**फीनिक्स.**—अॅकिलीजचा शिक्षक.

**ऑर्कोमेनस.**—बिओशिआतील एक प्राचीन, सधन व भक्कम नगरी.

**अॅमिन्तॉर.**—फीनिक्सचा पिता. अॅमिन्तॉरने फीनिक्सच्या आईला डावलून एका रक्षेशी संबंध ठेवला. फीनिक्सने, आईच्या कैवाऱ्याने, त्या रक्षेचे मन आपल्याकडे आकृष्ट केले. त्यावरून अॅमिन्तॉरने त्याला शापिले की, तो निपुत्रिक राहील. फीनिक्सने पळ काढला व तो पेलिअसकडे थिआला गेला. पेलिअसने त्याला आश्रय देऊन आपला पुत्र अॅकिलीज याचा शिक्षक म्हणून नेमले व डॉलोपीचे राज्य त्याला दिले.

**एरिनीझ.**—सूडदेवता. रोमन यांना फ्युरीज्, क्रोधदेवता असे म्हणत. यांना युमेनाइड्ज, दयादेवता असेही त्या नाराज होऊ नयेत म्हणून संबोधण्यात येते. या निराशेच्या

रौद्रस्वरुपाच्या कन्या. त्यांच्या केशात सर्प गुंफलेले असून खांद्यावर पंख असत व त्यांच्या नेत्रांतून रक्त ठिबकत असे. त्यांचे वास्तव्य तार्तरसमध्ये असे. त्या संख्येने तीन असून मानवांना इहलोकात व मृत्युनंतरही शासन करतात. कौटुंबिक गुन्ह्यांबद्दल, मातापित्यांचा आज्ञाभंग, वृद्धांचा अनादर, खोटी शपथ वहाणे, खून, अतिथी सत्काराच्या नियमांचा भंग, त्या सूड घेत.

**प्रॉजर्पिनी.**—पर्सीफोनीचे रोमन नाव. ही झ्यूस व डीमीटर (धान्य, फळादिकांची अधिष्ठात्री देवता) यांची कन्या. ही फुले तोडीत असता तिला अधोलोकाच्या स्वामीने पळवून नेली. डीमीटर संतप्त होऊन तिला आणायला गेली. झ्यूसच्या रदबदलीने हेडीजने तिला पृथ्वीवर पाठवण्याचे कबूल करून तिला एक डाळींब खायला दिले. हे अधोलोकीचे फळ खाल्यामुळे पर्सीफोनी कायमची वर राहू शकली नाही. ती आठ महिने वर व चार महिने खाली राही.

**मेलीॲगर.**—कॅलीडोनिआचा राजा इमिअस याचा पुत्र. तो ॲकिलीज सारखाच कॅलीडोनिआला क्युरितींचा वेढा पडलेला असताना रुसून लढाईत भाग घेत नव्हता. पुढे त्याला पुष्कळ देणग्या देऊ करून लढायची विनंती त्याच्या नातलगांनी व नागरिकांनी केली. पण त्याने ऐकले नाही. शेवटी लढाईतील जाळपोळ व कत्तल यांनी त्याचे मन द्रवले व त्याने लढाईत भाग घेऊन नगरी वाचवली. पण मग त्या देणग्यांपैकी नंतर त्याला काहीच मिळाले नाही.

## सर्ग १०

**ऑटोलिकस.**—प्राचीन युगातला एक प्रसिद्ध कुशल चोर. हर्मीजचा पुत्र, युलिसिसच्या मातेचा पिता.

**इकसचा वंशज.**—ॲकिलीजचा पिता पिलिअस; पिलिअसचा पिता इकस.

**ऱ्हीसस.**—थ्रेसच्या राजाचा पुत्र. हा त्रोजनांच्या बाजूने लढायला आला होता. देवांचा कौल झाला होता की, जर त्याचे हिमधवल घोडे झँथसचे पाणी प्याले व त्यांनी त्रोजन कुरणातले गवत खाल्ले तर त्रॉय अजिंक्य राहील. पण ऱ्हीससने त्रोजन भूमीवर तळ टाकल्याबरोबर रात्रीच युलिसिस व दायोमिद या ग्रीक वीरांनी लपत छपत त्याच्या तळांत प्रवेश केला, ऱ्हीससला ठार मारले व घोडे पळवले.

## सर्ग ११

**तिथोनस.**—इऑस (रोमन हिला ऑरोरा–डॉना–उषा असे म्हणत) रात्र संपल्यावर आपला पती तिथोनस याच्या शय्येवरून उठून, वेगवान घोड्यांच्या रथावर आरुढ होऊन ओरॉनस नदीतून वर आकाशात चढे व सूर्याच्या आगामी प्रकाशाची ग्वाही देई. तिथोनस हा प्राअॅमचा भाऊ. इऑसच्या विनंतीवरून देवांनी त्याला अमरत्व प्रदान केले. पण त्याबरोबर चिरयौवन न मिळाल्यामुळे, वार्धक्यात त्याची अगदी केविलवाणी दशा झाली.

**चंडिका विग्रहा.**—फ्युरीज्पैकी एक -कलह देवता (Strife)

**ऐलेथिई.**—या ज्युनो अथवा हीराच्या कन्यका. या स्त्रियांना प्रसूतीकाळी मदत करणाऱ्या देवता आहेत असे ग्रीक मानीत. ज्युनो ही स्त्रियांची संरक्षक देवता, कौमार्यापासून वैवाहिक जीवनाची अधिष्ठात्री.

## सर्ग १२

**अॅगेनॉर.**—अँतेनॉरचा पुत्र. त्रोजन सैन्यातल्या महापराक्रमी वीरांपैकी हा एक होता.

## सर्ग १३

**सॅमोथ्रेस.**—इजिअन समुद्रातल्या उत्तरभागातील एक लहान बेट. कॅनिरी नावाच्या देवतांप्रित्यर्थ यज्ञयाग वगैरे गुप्त विधी इथे होत. या देवता समुद्रपर्यटनातील विघ्नांपासून संरक्षण करीत.

**इजी.**—ॲकिआमधील एक शहर. येथे नेपच्यून अथवा पॉसिदोनचे मंदिर आहे.

**सिरिझ.**—रोमनांचे "डिमीटर" या ग्रीक शेतीफळे यांच्या अधिष्ठात्या देवतेचे नाव. ही झ्यूसची बहीण. पर्सीफोनिची माता.

## सर्ग १४

**मॅकॅआन.**—त्रोजन युद्धातील ग्रीकांचा शस्त्रवैद्य. तो त्रिका, ऑकॅलिआ व इथॉपीहून सैन्य घेऊन आला होता. शेवटी युरीपायलस या त्रोजन वीराने त्याला युद्धात ठार केले.

## सर्ग १५

**थेमिस.**—युरॅनस व गी यांची कन्या. झ्यूसची पत्नी. पण हीरा तिचा मत्सर न करता तिच्याशी प्रेमाने वागे. ती मंत्रणेची अधिष्ठात्री देवता असून, झ्यूसच्या आज्ञेवरून देवसभेच्या निमंत्रकाचे कार्य करी.

## सर्ग १६

**आरगस.**—शंभर डोळ्यांचा राक्षस. हीराने त्याला धेनू आयोवर पहारा करण्यासाठी नेमले होते. पण झ्यूसच्या आज्ञेने हर्मीज अथवा मर्क्युरीने त्याला आपल्या बासरीवादनाने निद्रिस्त केले व नंतर त्याचा शिरच्छेद केला.

**दोदोना.**—झ्यूसचे एक पवित्र स्थान. देववाणीसाठी प्रसिद्ध. पेलॅस्गीच्या रहिवाशांनी हे एपिरस प्रदेशात वसवले. डेल्फीची देववाणी पुढे आल्यावर, दोदोनाचे महत्त्व कमी झाले.

**प्रॉतेसिलॉज.**—ईफिक्लसचा पुत्र. थेसिलीहून सैन्य घेऊन त्रॉयला तो आला होता. त्रॉयच्या रणकंदनात कामी आलेला पहिला ग्रीक वीर. हेक्तरने त्याला ठार केले.

**किमिरा.**—आग ओकणारी राक्षसी. तिच्या देहाचा पुढला भाग सिंहाचा, मागचा नागाचा आणि मधला भाग बकऱ्याचा होता. लिसिआत याच नावाचा एक ज्वालामुखी आहे. तिने लिसिआत व भोवतालच्या प्रदेशात हाहाःकार माजवला होता. अखेरीस तिला बेलेफेरॉन या कॉरिंथच्या राजपुत्राने मारले.

**ॲम्ब्रोसिआ.**—देवांचे खाद्य. अमृत हे त्यांचे पेय.

## सर्ग १७

**पॅन्थॉस.**—त्रॉयमधील ॲपॉलोच्या मंदिराचा पुजारी. युफॉर्बसचा पिता. युफॉर्बस हा त्रोजनांचा महापराक्रमी वीर. याला मेनेलॉसने मारले. युफॉर्बसने आपली ढाल मायसिनीजवळच्या हीराच्या मंदिराला अर्पण केली. पायथागोरस या इ. स. पूर्वी सहाव्या शतकात होऊन गेलेला प्रसिद्ध ग्रीक तत्त्ववेत्ता म्हणत असे की, तो पूर्वजन्मी युफॉर्बस होता. हे सिद्ध करण्यासाठी त्याने हीराच्या मंदिरातील युफॉर्बसची ढाल भिंतीवरून काढून दाखवली.

**ॲन्ड्रोमेकी.**—हेक्तरची पत्नी.

## सर्ग १८

**नेरिअस कन्या.**—नेरिअस हा पाँतस व गीआ यांचा पुत्र. याला "सागरातील शहाणा वृद्ध" म्हणत. याला त्याची पत्नी दॉरीस हिच्यापासून पन्नास कन्या झाल्या. त्यांना "नेरेइडीज" असे संबोधण्यात येते. या भूमध्य समुद्रातील जलाप्सरा. गोड्या पाण्यातील जलाप्सरांना "नेइॲडीज" असे म्हणतात. ॲकिलिझची माता थेटिस ही नेरिअसची कन्या होती. या सर्वच कन्या सुंदर असून पित्यासह समुद्रतळी रहात व खलाशांना मदत करीत. ग्रीसमध्ये, विशेषतः बंदरात यांची पूजा होई.

**मर्त्याशी एकशय्या.**—थेटिसशी विवाह करण्याची झ्यूसची इच्छा होती. पण भविष्य-वाणी अशी होती की, थेटिसचा पुत्र पित्याच्या वरचढ होईल. तेव्हा झ्यूसने थेटिसचा विवाह पीलीअसशी करून दिला. विवाहसमयी सर्व देव हजर होते. त्यांनी वधूवराना मोठ्या देणग्या दिल्या. पण "कलहदेवतेस" बोलावले नव्हते म्हणून तिने देवादिकात कलह माजविण्यासाठी सोन्याचे सफरचंद "सर्वात देखण्या देवीला" असे कोरून फेकले. ते ॲफ्रॉडायटीला पॅरिसने दिले व त्याबद्दल तिने त्याला भुवनसुंदरी मिळवून देण्याचे वचन दिले, वगैरे कथा सर्वश्रुतच आहे. थेटिसला पीलीमसपासून ॲकिलीज झाला.

**ज्यूनोचा हर्क्युलिसवर उग्रकोप.**—झ्यूसचे अनेक मर्त्य स्त्रियांशी प्रेमसंबंध होते व त्यांच्या-पासून त्याला संतती झाली होती. हीरा अथवा ज्यूनो त्या सर्वांचा द्वेष करी. ॲल्कमिनी,

अॅम्फीमिऑन, थीब्सचा राजा, याची पत्नी. तिचा झ्यूसशी संबंध येऊन तिला हर्क्युलीस झाला. हीराने एकदा सूडभावनेने हर्क्युलीसला वेड लावले व त्या उन्मादाच्या भरात त्याने पत्नी व मुलांना ठार केले होते. ट्रॉयच्या युद्धात ती ग्रीकाना मदत करीत होती. कारण पॅरिसने तिला सुवर्ण फळ न दिल्यामुळे त्याचा व सर्वच ट्रोजनांचा ती राग करी.

**निष्ठुर मातेच्या कोपामुळे.**—हीराला हेफीस्टीस किंवा व्हल्कन झाला, तेव्हा तो जन्मतःच लंगडा व दुबळा होता. म्हणून तिरस्काराने त्याला हीराने ऑलिम्पसवरुन भिरकावून दिले. तो समुद्रात पडला व तिथे थेटिसने त्याचा प्रेमाने सांभाळ केला.

**डीडॅलस.**—शिल्प व कोरीव कामाचा ग्रीकांचा पौराणिक पुरुष. तो आपल्या व आपल्या मुलाच्या खांद्याला पंख जडवून हवेत उडत असे. असा उडत तो ग्रीस सोडून सिसिलीला गेला. ॲरिॲदनी ही मिनॉसची कन्या. मिनॉसचा डिडॅलस हा मित्र होता. डीडॅलसने नॉससमध्ये (क्रीतचा राजा मिनॉस याची राजधानी) ॲरिॲदनी व तिची आई पॅसिफी यांच्यासाठी प्रसिद्ध चक्रव्यूह (लॅबिरिंथ) बांधला होता.

## सर्ग १९

**ॲल्कमेनी.**—अॅम्फीट्रीऑनची पत्नी. झ्यूसने अॅम्फीट्रीऑनचे रूप घेऊन तिच्याशी संग केला व तिच्या उदरी हर्क्युलीस जन्मला. हा विशिष्ट दिवशी जन्माला आला तर तो सर्व जगाला भारी होईल असे भविष्य होते. हीराला या गोष्टीचा मत्सर वाटून तिने हर्क्युलीसचा जन्म लांबवला व त्या विशिष्ट दिवशी स्थेनेलॉसचा पुत्र युरिस्थिअस जन्मला. "मूर्खते'' मुळे हे घडल्यामुळे व पुढे युरिस्थिअसने हर्क्युलीसवर "बारा कष्टकारी कृत्ये" लादल्यामुळे झ्यूस "मूर्खतेवर" संतापला.

**तॅल्थिबिअस.**—ट्रॉयच्या स्वारीत ॲगमेम्नॉनचा घोषक व अग्रदूत. स्पार्ट व आरगॉसमध्ये एक वीर पुरुष म्हणून त्याचे पूजन होई व त्याच्याप्रीत्यर्थ यज्ञयाग केले जात.

**निऑप्तॉलेमस.**—ॲकिलीजचा पुत्र. याला 'पिऱ्हस' असेही म्हणत. ट्रॉयचे पतन त्याने युद्धात भाग घेतल्याशिवाय होणार नाही असे भाकित असल्यामुळे युलिसीस त्याला लिकॉमिडिजमधून–जिथे स्किरॉसने त्याला वाढवले होते–ट्रॉयला घेऊन आला. ट्रॉयच्या युद्धात मग त्याने शूर पित्याला साजेसा पराक्रम केला. प्रसिद्ध लाकडी घोड्यात छपून त्याने ट्रॉयमध्ये प्रवेश केला होता. त्याने ट्रॉयचा राजा प्राॲम याचा वध केला व राजकन्या पॉलीकझेनाला मृत ॲकिलीझच्या समाधीसमोर त्याच्या मागणीवरून, बळी दिले. ट्रोजन बंदी स्त्रिया ग्रीक वीरात वाटल्या गेल्या, तेव्हा मृत हेक्तरची पत्नी अँद्रोमॅकी याच्या वाटयास आली.

**हायपेरिऑन.**—सूर्यदेव.

**पेलिऑन.**—थेसलीमधील एक ऊंच पर्वतराजी. त्याच्यावर दाट झाडी असून माथ्यावर झ्यूसचे मंदिर होते. या डोंगरावरील वृक्ष तोडूनच 'आरगो' गलबत बांधले होते.

**कायरॉन.**—क्रॉनॉसचा पुत्र. सेंटॉर्सपैकी सर्वात शहाणा व न्यायी. याची वस्ती पेलिऑन पर्वतावर असे. हा हर्क्युलीसचा मित्र होता. पण हर्क्युलीस सेंटॉरांशी लढत असताना त्याचा विषारी बाण कायरॉनला लागला. त्यामुळे अमर असूनही त्याचे आयुष्य संपुष्टात आले. झ्यूसने त्याचा समावेश नक्षत्रांगणात "धनु" म्हणून केला. सेंटॉर्सपासून त्याने पीलिअसचे रक्षण केले होते.

**लेतो.**—एका तायतनाची मुलगी. (किअस तायतन व फीबी हिचे मातापिता) हिला झ्यूसपासून ॲपॉलो व आर्तेमिस झाले. हीराने मत्सराने लेतोचा छळ केला. भटकत भटकत ती देलॉसला आली. तेथे जन्मले---तिचा पुत्र सूर्यदेव–ॲपॉलो व कन्या आर्तेमिस. (रोमन हिला दायाना म्हणतात. ही शिकारीची धनुर्धारी देवता) हीरा ही ग्रीकांच्या पक्षाची. तेव्हा ॲपॉलो त्रोजनांना सहाय्य करी. त्याने हेक्तरला पेत्रोक्लसला मारण्यात सहाय्य केले.

**पोर्दाजी.**—या पिशाच्चीला (हार्पी) झेफिरस या पश्चिम वायुपासून, झँथस व बॅलिअस हे दोन अश्व झाले. ते ॲकिलीज आपल्या रथाला जोडी.

## सर्ग २०

**हर्क्युलिसचा उन्नत भूभाग.**—ॲटलांटिक व भूमध्य समुद्र यांना जोडणाऱ्या सामुद्रधुनी-जवळील एक पर्वत "कॅल्पे" व त्याच्या समोरील आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील पर्वत "ॲबिला" या दोघांना मिळून हर्क्युलिसचे स्तंभ (उन्नत भूभाग) अशी संज्ञा आहे. हर्क्युलीसने एकदा त्रॉयवर स्वारी करून, शहर काबीज करून तेथील राजाला, लॅओमेदॉनला ठार केले होते. लॅओमेदॉनने ॲपॉलो व पॉसिदोनकडून त्रॉयची तटबंदी बांधून घेतली; पण नंतर त्याबद्दलचा मोबदला त्यांना नाकारला. तेव्हा पॉसिदोनने एक सागरवासी राक्षस शहर उध्वस्त करण्यासाठी पाठवला. त्याला शांत करण्यासाठी एका कुमारीचा वरचेवर बळी द्यावा लागे. एकदा राजकन्या देसिऑनीची (लॅओमेदॉनची कन्या) पाळी आली. तिला हर्क्युलीसने, राक्षसाला मारून बचावले. पण लॅओमेदॉनने त्याला देऊ केलेले पारितोषिक—त्रॉसचे प्रसिद्ध घोडे नाकारले; तेव्हा त्रॉयवर स्वारी करून हर्क्युलीसने त्याला ठार केले व देसिऑनीचा विवाह तेलेमॉनशी करून दिला. प्राअॅम—त्रॉयचा राजा—हा लॅओमेदॉनचा मुलगा. बाकीच्या पुत्रांना ठार मारून हर्क्युलीसने प्राअॅमला जीवदान दिले होते.

## सर्ग २१

**आरगसचा अंतक.**—हर्मीज्, रोमन याला मर्क्युरी म्हणतात. हा झ्यूस व माइआचा पुत्र. याला झ्यूसने आपला दूत केले. हा घोषक असल्यामुळे वक्तृत्वात कुशल. तो प्रवाशांचा रक्षणकर्ता असे. अनेक कलात निपूण म्हणून तो देवांना व मानवांना वेळोवेळी उपयोगी पडे. याने आरगॅस या राक्षसाला ठार मारले.

## सर्ग २२

**त्रितोपुत्री.**—त्रितो हे अँथीनीचे (मिनर्व्हाचे) कुल नाव होते.

**अॅस्तिअॅनॅकस.**—हेक्तरचा व अॅन्द्रोमॅकीचा पुत्र. त्रॉय पडल्यावर ग्रीकांनी त्याला तटबंदीवरून खाली भिरकावून ठार मारले; कारण त्याना भिती वाटली की, मोठा झाल्यावर तो त्रॉयचे राज्य पुनः प्रस्थापित करील.

## सर्ग २३

**स्पर्केअस.**—दक्षिण थेसलीतील एक नद. या नदाचा अधिष्ठाता देव हा ओशिअॅनस नद व गी यांचा पुत्र. पिलिअसची कन्या पॉलीदोरा ही त्याची पत्नी. त्या उभयताना मेनेस्थिअस नावाचा पुत्र झाला. याने दायामिदचे सारथ्य केले.

**बोरिआज व झेफिरस.**—बोरिआज हा उत्तरेकडील वारा व झेफिरस हा पश्चिम वारा हे दोघे बंधू. हे दोघे थ्रेसमध्ये एका गुहेत रहात. बोरिआज हा ग्रीकांच्या पक्षाचा होता त्याची पूजा व उत्सव अथेन्समध्ये होई.

**थॉअॅस.**—कॅलिदॉनचा राजा. हा चाळीस जहाजे घेऊन त्रॉयच्या रणसंग्रामात भाग घ्यायला आला होता.

**त्यूसर.**—तेलेमॉनचा पुत्र. अॅपॅक्सचा सावत्र भाऊ. ग्रीकांमधला सर्वांत कुशल धनुर्धारी.

## सर्ग २४

**अलेक्झँद्रस.**—पॅरिसचे दुसरे नाव. त्रॉयचा राजा प्राअॅम व राणी हेक्यूबा यांचा दुसरा पुत्र. हा गर्भात असताना हेक्यूबाला स्वप्न पडले की, तिच्या उदरी एका जळत्या पलित्याने जन्म घेतला व सर्व नगरी जाळून टाकली. या दुःस्वप्नामुळे पॅरिस जन्मल्याबरोबर त्याला इदा पर्वतावर टाकून देण्यात आले. एका मेंढपाळाने त्याला वाढवले व त्याचे नाव पॅरिस ठेवले. तो मोठा झाल्यावर मोठा कुशल मेंढपाळ व मेंढपाळांचा संरक्षक झाला. म्हणून त्याला "अलेक्झँदर" मानवांचा समर्थ संरक्षक म्हणू लागले. पुढे त्याचा प्राअॅमने राजपुत्र म्हणून स्वीकार केला. सुवर्णाच्या सफरचंदाची, अॅफ्रोदायतीला ते सफरचंद पॅरिसने दिल्यामुळे त्याला त्या देवतेने त्रैलोक्यसुंदरी हेलन मिळवून दिली व त्यामुळे त्रॉयचा रणसंग्राम पेटून त्रॉय जळून खाक झाले. ही कथा प्रसिद्धच आहे.

**ज्यूनो.**—अॅकिलीजची माता थेटिस या समुद्रदेवीला ज्यूनो अथवा हीराने वाढवले होते व मग तिचा पिलिअसशी विवाह करून दिला होता. या लग्नातच "कलहदेवतेला" आमंत्रण न गेल्यामुळे तिने सुवर्ण सफरचंद अमरांत फेकले व पुढे हेलनचे हरण व त्रॉयचे युद्ध झाले.

**नायोबी.**—टँटॅलसची मुलगी. थीब्सच्या ॲम्फिअन राजाची पत्नी. आपल्या बारा अपत्यांबद्दल तिने लेतोपाशी बढाई मारली. कारण लेतोला ॲपॉलो व आर्तेमिस अशी दोनच अपत्ये होती. शिक्षा म्हणून ॲपॉलोने नायोबीच्या सहा पुत्रांना व आर्तेमिसने (दायानाने) सहा मुलींना ठार केले. नायोबीने अपार शोक केल्यावर झ्यूसने तिचे पाषाणात रूपांतर केले. सिपिलिस डोंगरावरील या पाषाणातून सतत पाणी वहाते—–जणू नायोबी अजूनही अपत्यशोकाने अश्रू ढाळीत आहे.

**परगॅमस.**—ट्रॉयचा बालेकिल्ला.

**कॅसॅन्ड्रा.**—प्राअॅमची कन्या. हिला ॲपॉलोने भविष्यज्ञानाची विद्या शिकवली. कारण तो तिच्या सौंदर्यावर लुब्ध होता. पण नंतर तिने त्याला वश होण्याचे नाकारले तेव्हा तुझ्या भाकितावर कुणीही विश्वास ठेवणार नाही असा त्याने तिला शाप दिला. ट्रॉयच्या पतनानंतर, लुटीच्या वाटणीत कॅसॅन्ड्रा ॲगमेम्नॉनच्या वाट्यास आली. त्याने सन्मानाने तिला आपल्या राजधानीला त्रायसिनीला नेले. तिथे मत्सराने क्लितेम्नेस्त्राने, ॲगमेम्नॉनच्या पत्नीने त्याच्याबरोबर तिचाही वध केला.

**हेक्यूबा.**—प्राअॅमची पत्नी. हेक्तर, पॅरिस वगैरेंची माता. ट्रॉयच्या पतनानंतर तिला ग्रीकांनी गुलाम करून स्वगृही नेले. वाटेत, थ्रेसच्या किनाऱ्यावर, आपला पुत्र पॉलीडॉरस याची हत्या केल्याबद्दल तिने पॉलिमेस्टरच्या मुलांना ठार करून त्याला आंधळा केले. त्याने शाप दिल्यावरून तिचे कुत्रीत रूपांतर झाले व सिनोसेमाजवळ सागरात तिने उडी टाकली. त्या जागेला "कुत्र्याची कबर" असे म्हणतात.

## कवीविषयी

'इलियद आणि ओदिसी' ही महाकाव्ये निर्माण करणारी अशी होमर नामक कोणी व्यक्ती होऊन गेली यावद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाही. 'होमरिक काव्यांचे' अस्तित्व व त्यांचा उच्च दर्जा यावरून ती रचणारा होमर नावाचा एक कवी असावा असे गृहीत धरले जाते.

प्राचीन काळी होमरची कित्येक चरित्रे लिहिली गेली होती. त्यांचे काळ अनिश्चित आहेत, पण त्यांनी उभा केलेला होमर नक्कीच कल्पनारचित आणि तर्कनिर्मित आहे. सात वेगवेगळ्या शहरात आणि सहा निरनिराळ्या शतकांत होमरचा जन्म झाल्याचे दावे करण्यात आले आहेत. 'इलियद व ओदिसी'च्या उपलब्ध प्रतींसंबंधाने जी वस्तुस्थिती ज्ञात आहे त्यावरच होमरविषयक अभ्यास आधारलेला आहे. प्राचीन ग्रीसच्या पॅनॅथेनैक उत्सवांच्या प्रसंगी "दुसऱ्या कोणत्याही कवीच्या नव्हेत" तर होमरच्याच कृती म्हटल्या जात आणि त्याही एका ठराविक अनुक्रमाने, हे आता मान्य झाले आहे. तद्नुसार असे अनुमान निघते की ख्रि. पू. सहाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यन्त होमरच्या काव्याची कोणती तरी प्रमाणभूत अथीनिअन हस्तलिखित प्रत उपलब्ध असावी. तशी प्रत उपलब्ध असली तरी ती नंतर टिकली नसावी. कारण ख्रि. पू. चौथ्या व तिसऱ्या शतकातली होमरमधली अवतरणे दर्शवतात की, ही ज्यातून घेतली ते पाठ अगदी विभिन्न होते. ख्रि. पू. सुमारे १५० पर्यन्त या पाठभेदांची विसंगती मिटली नव्हती, पण त्यासुमारास अॅलेक्झॅन्ड्रियन ग्रन्थपाल सॅमोअेसचा अॅरिस्तार्क याने ज्या आवृत्त्या प्रकाशित केल्या त्या मात्र नंतर प्रमाणभूत मानण्यात आल्या. त्याने आपली आवृत्ती वेगवेगळे पाठभेद असलेल्या अनेक हस्त-लिखितांवरून तयार केली, की त्याने जुन्या काळातील एकाच प्रभावशाली पाठाचा आधार घेतला, यावद्दल माहिती उपलब्ध नाही. आधुनिक ('व्हल्गेट' अथवा चौथ्या शतकातील लॅतिनमध्ये अनुवादित) पाठ अॅरिस्तार्कसच्याच प्रतीवरून निघाल्याचे मानण्यात येते. ख्रि. पू. ५५० च्या आधी सध्याच्या स्वरूपात 'इलियद' किंवा 'ओदिसी' ही लिखित काव्ये होती असे दर्शवणारा बाह्य पुरावा नाही. तथापि, अन्तर्गत पुराव्यावरून अभ्यासकांची खात्री पटते की तो काळ 'होमरिक' काव्याच्या इतिहासातील उत्तर अवस्थेचा होता. त्या इतिहासाचे पुन:प्रकल्पन हीच होमरविषयक सदाची समस्या राहिली आहे.

प्रस्तुतच्या कवितांच्या पाठातून युक्तिवादाने त्या इतिहासाची फेरजुळणी केली तर कधीकधी या काव्याचे कलात्मक ऐक्य अमान्य केल्यासारखे होईल. काही अभ्यासकांना ही महाकाव्ये पूर्णपणे एकीकृत नाहीत तसे वाटते. एका कल्पित लहानशा मूळ काव्यात भर पडून फुगलेले काव्य किंवा आठवणीतल्या गीतांची केलेली गुंफण असे काव्यांचे स्वरूप असावे असे त्यांना वाटते. पुन्हा, सर्व कविता एकाच काळातल्या किंवा एकाच कवीच्या नसाव्यात अशीही मते आहेत. सॅम्युएल बटलरने तर प्रतिपादन केले आहे की 'ओदिसी' ही कृती एका स्त्रीची आहे.

अलीकडे मात्र परंपरागत सामग्रीचा समावेश आणि नंतरचे प्रक्षेपित भाग मान्य करून ही बहुसंख्य अभ्यासकांनी 'इलिअद' व 'ओदिसी' या स्वतंत्र काव्यकृती असून त्यांचा काळ अज्ञात आहे व होमर या कवीनेच ही दोन्ही काव्ये रचली असली पाहिजेत हे मत मान्य केले आहे.

# होमरचे इलियद

## सर्ग १

हे देवी, एकिआच्या रहिवाश्यांवर असंख्य आपत्ती आणणाऱ्या, पेलिअसचा पुत्र अॅकिलिझ याच्या कोपाचे गाणे गा. त्या कोपामुळे अनेक शूर जीव त्वरेने पाताळलोकी पाठवले गेले आणि अनेक वीर कुत्र्या-गिधाडांचे भक्ष्य बनले; कारण मानवांचा राजा अॅत्रिअस याचा पुत्र आणि महान अॅकिलिझ यांच्यात प्रथम वितुष्ट आलेल्या दिवसापासून (देवराज) जव्हच्या योजना या अशा फलद्रूप होऊ लागल्या होत्या.

आणि त्यांना भांडणास प्रवृत्त करणारा देवांपैकी कोण होता? तो होता जव्ह आणि लीतोचा पुत्र; तो राजावर रागावला होता आणि त्याने सैन्यावर, प्रजेला पीडण्यासाठी घातक रोगांची साथ धाडली, कारण अॅत्रिअसच्या पुत्राने त्याचा पुरोहित क्रिसिझ याचा अवमान केला होता. त्याचे असे झाले होते की आपल्या कन्येला मुक्त करण्यासाठी क्रिसिझ अॅकिअन्सच्या नौकांपाशी आला होता आणि त्याने बरोबर मोठी खंडणी आणली होती; शिवाय आपल्या हातात त्याने अभ्यर्थकाने गुंडाळावयाची माला ज्याच्याभोवती गुंडाळली आहे असा अॅपोलोचा राजदंड धारण केला होता, आणि त्याने अॅकिअनांना, पण विशेषत: त्यांचे प्रमुख असलेल्या अॅत्रिअसच्या दोन पुत्रांना विनवण्या केल्या.

"अॅत्रिअस-पुत्रहो" तो उद्गारला, "आणि इतर सर्व अॅकिअनांनो, ऑलिम्पसनिवासी देव तुम्हाला प्राअॅमची नगरी लूटून नंतर सुखरुप स्वगृही परतण्याचा वर देवोत. पण जव्हपुत्र अॅपोलोचा मान राखण्यासाठी माझ्या कन्येला मुक्त करा आणि तिच्या खातर खंडणी स्वीकारा."

हे ऐकून बाकीचे सर्व अॅकिअन त्या पुरोहिताच्या शब्दांना मान देऊन त्याने देऊ केलेली खंडणी स्वीकारण्यास एकमताने अनुकूल होते, पण अॅगॅमेम्नॉन त्याला तयार नव्हता. पुरोहितावर खेंकसून त्याने त्याला आडदांडपणे घालवले. अॅगॅमेम्नॉन म्हणाला, "म्हाताऱ्या, आमच्या नौकांजवळ तू घोटाळता कामा नयेस, आणि पुन्हा येथे आलास तर ते चालणार नाही. तुझा तो देवाचा राजदण्ड आणि ती माळ यांनी तुला काही फायदा होणार नाही. मी तुझ्या कन्येला मुक्त करणार नाही. ती आपल्या हात मागावर काम करीत आणि

मला शय्यासोबत करीत, स्वतःच्या घरापासून दूर माझ्या आरगॉसच्या घरात म्हातारी होईल. तेव्हा येथून निघून जा आणि मला चिडवू नकोस, नाही तर तुला ते जास्त जड जाईल. "

त्याच्या भीतीने म्हाताऱ्याने त्याची आज्ञा मानली. एक शब्दही न बोलता तो गर्जणाऱ्या समुद्रकाठावरून चालू लागला आणि एकीकडे त्याने सुंदर लीताने जन्म दिलेल्या अॅपोलो राजाची प्रार्थना केली. तो म्हणाला, " क्रिसी आणि पवित्र सिल्लाच्या रक्षणकर्त्या, तेनेदॉसच्या शक्तिशाली राज्यकर्त्या, हे रौप्यधनुर्धारी देवा, ऐक, हे तू स्मिन्थेच्या देवा, (माझी हाक) ऐक. जर मी कधी पुष्पहारांनी तुझे मंदिर सजवले असेल, अथवा बैलांच्या किंवा बकऱ्यांच्या चरबीत गुंडाळलेली त्यांच्या मांड्यांची हाडे तुझ्या प्रीत्यर्थ आहूती म्हणून यज्ञाग्नीवर शेकली असतील तर माझी मागणी पुरी कर व या माझ्या अश्रूंना कारण झालेल्या त्या दॅनाअनांवर तुझे बाण सूड उगवू देत. "

याप्रमाणे त्याने प्रार्थना केली आणि अॅपोलोने त्याची प्रार्थना ऐकली. ऑलिम्पसच्या शिखरांवरून क्रोधाविष्ट होऊन तो हाती धनुष्य व खांद्यावर भाता धारण करून खाली आला आणि त्याच्या अंगात थरथरणाऱ्या कोपाने भात्यातले बाण त्याच्या पाठीवर खडखड करू लागले. त्या नौकांपासून दूर तो खाली बसला; त्याची मुद्रा रात्रीसारखी तामसी होती, आणि त्या नौकांच्यामध्ये त्याने आपला बाण मारला तेव्हा त्याच्या रौप्य धनुष्यातून मृत्यूचा झंकार उठला. प्रथम त्याने त्यांची खेचरे आणि शिकारी कुत्री यांच्यावर आघात केला पण लौकरच त्या लोकांवरच प्रत्यक्ष नेम धरून त्याने बाण मारले आणि सारा दिवसभर मृतांच्या चिता जळत राहिल्या.

त्या लोकांमध्ये पुरे नऊ दिवस त्याने आपले बाण मारले, पण दहाव्या दिवशी अॅकिलिझने आपल्या लोकांची सभा बोलावली; हे करण्यास देवराज्ञी ज्यूनोने त्याला प्रवृत्त केले, कारण अॅकिअनांना मृत्युयातना भोगीत असलेले तिने पाहिले आणि त्यांची तिला दया आली. मग ते सगळे एकत्र आणवल्यानंतर तो (अॅकिलिझ) उठला आणि त्यांना उद्देशून बोलला.

तो म्हणाला, " अत्रिअसपुत्रा, आपल्याला जर विनाशापासून सुटका करून घ्यावयाची असेल, तर मला वाटते आपण आता स्वदेशाकडे वळून फिरत फिरत मार्गी लागावे; कारण युद्ध आणि रोगाची साथ यांनी एकाचवेळी आपण मारले जात आहोत. एकाद्या पुरोहिताला वा भविष्य सांगणाऱ्याला किंवा स्वप्नांचे फल वर्तवणाऱ्याला (कारण स्वप्नेही देवराज जव्ह प्रेरितच असतात.) आपण विचारु या; फीबस अॅपोलो आपल्यावर इतका का रागावला आहे ? आमचा

एकादा नवस फेडायचा राहून गेल्यामुळे, किंवा आम्ही एकादा महायज्ञ करण्याचे न योजल्यामुळे असे झाले का हे ते आपल्याला सांगू शकतील, आणि आमच्यावरचे अरिष्ट निवारून टाकण्यासाठी तो निरोगी कोकरांचा नी बकऱ्यांचा नैवेद्य स्वीकारील का हेही त्याना विचारून घेऊ."

हे बोलून तो खाली बसला आणि भूत, वर्तमान व भावी गोष्टी जाणणारा सर्व-शकुनज्ञात शहाणा थेस्तॉरपुत्र कॅलचास बोलण्यासाठी उभा राहिला. फीवस ॲपोलोने त्याच्या ठायी स्फुरविलेल्या भविष्य वचनाद्वारा एकिअनांचे नौकादल इलिअमकडे नेण्यासाठी त्यानेच मार्ग दर्शन केले होते. अगदी कळकळीने आणि सद्हेतूने तो त्यांना उद्देशून म्हणाला.

"देवांच्या आवडत्या ॲकिलिझ, राजा ॲपोलो याच्या कोपाविषयी बोलण्यास तू मला सांगतो आहेस म्हणून मी बोलतो, पण आधी विचार कर व शपथ घे की, शब्दाने व कृतीने मनापासून तू माझ्या पाठीशी उभा राहशील, कारण ऑर्गास-वासीयांवर जो बलाने सत्ता गाजवीत आहे आणि सगळे ॲकिअन ज्याच्या आधीन आहेत त्याला मी दुखवीन हे मला माहीत आहे. स्वत:ची नाराजी त्यावेळेपुरती जरी दाबून ठेवली, तरी सूड उगवीपर्यंत तो आकस मनात बाळगून ठेवणाऱ्या राजाच्या कोपापुढे सामान्य मनुष्य टिकत नाही. तेव्हा तू मला संरक्षण देऊ शकशील की नाही याचा विचार कर."

आणि ॲकिलिझने उत्तर दिले, "भिऊ नकोस, आणि देवांकडून तुला जशी स्फूर्ती होईल तसे बोल. कारण कॅलचास तू ज्याला प्रार्थितोस नी ज्याचे कौल आमच्यापुढे प्रकट करतोस त्या ॲपोलोशपथ मी सांगतो की जोवर ही सृष्टी डोळे भरून पहाण्यास मी जिवन्त आहे तोवर आमच्या नौकांवरचा एकही दॅनाअन तुझ्यावर हात टाकणार नाही. अगदी खासच नाही, जरी ॲकिअनांमध्ये सर्वात पुष्कळच अग्रस्थानी असलेल्या खुद्द ॲगॅमेम्नॉनचे नाव तू घेतलेस तरी तुला भिण्याचे कारण नाही."

त्यावर भविष्यद्रष्टा धीटपणे बोलला, "देव रागावला आहे तो नवस चुकला किंवा महायज्ञ झाला नाही म्हणून नाही तर त्याच्या पुरोहिताचा अपमान ॲगॅमेम्नॉनकडून झाला म्हणून; कारण त्याच्या मुलीला ॲगॅमेम्नॉन मुक्तही करीत नाही किंवा तिच्यासाठी खंडणीही घेण्यास तो तयार नाही; म्हणून देवाने या आपत्ती आपल्याकडे धाडल्या आहेत आणि तो अजूनही आणखी आपत्ती धाडील; जोपर्यंत ॲगॅमेम्नॉन खंडणी किंवा शुल्क न घेता मुलगी बापाला परत देऊन, क्रिसीक्षेत्री एक पवित्र महाबळी पाठवीत नाही तोपर्यंत

देव दॅनाअनांची या पीडेतून सुटका करणार नाही. त्याच्या क्रोधाचा उपशम कदाचित अशाप्रकारेच आपल्याला करता येईल."

हे सांगून तो खाली बसला, आणि ॲगॅमेम्नॉन रागाने उठला. त्याच्या हृदयात काळा भीषण क्रोध दाटला होता आणि त्याचे नेत्र अंगार ओकित होते. कपाळाला रागाने आठ्या घालून तो कॅलचासला म्हणाला, "अभद्र भविष्यच तेवढे पाहणाऱ्या, माझ्याबाबतीत अजून कधीच सुरळीत गोष्टी तू वर्तवल्या नाहीस. माझ्याविषयी वाईट असेल तेच भविष्य सांगण्याची तुला नेहमी हौस. तुझ्याकडून मला कधी दिलासा मिळाला नाही की तुझ्याकडून माझे कधी काही चांगले झाले नाही; आणि आता तू दॅनाअन लोकात येऊन द्रष्टेपणाने सांगत सुटला आहेस की क्रिसीसच्या मुलीसाठी खंडणी घ्यायला मी कबूल नाही म्हणून ॲपोलो आम्हाला पीडा देत आहे. त्या मुलीला माझ्या स्वतःच्या घरात ठेऊन घेण्याचे माझ्या मनाने घेतले आहे, कारण बांधा, रुप, समज आणि कलागुण याबाबतीत ती माझी स्वतःची पत्नी क्लितेम्नेस्त्रा हिच्या तोडीची आहे, नी माझ्या बायकोपेक्षाही तिच्यावर माझे अधिक प्रेम बसले आहे. तरीही मला भागच पडले तर मी तिला सोडीन, कारण लोक मरू नयेत, जगावेत ही माझी इच्छा आहे; पण तिच्याबदली मला दुसरी एखादी लढाईतली लूट किंवा बक्षीस म्हणून तू मिळवून दिले पाहिजेस; कारण नाही तर साऱ्या आर्गासच्या लोकांमध्ये एकटा मीच काय तो बक्षिसाशिवाय राहीन हे बरे नव्हे, तुम्हा सर्वांना दिसतेच आहे की माझे जे बक्षीस आहे ते दुसरीकडे कोठे तरी जाऊ पहात आहे."

आणि ॲकिलिझने उत्तर दिले, "अतिधीरोदात्त ॲत्रिअसपुत्रा, साऱ्या मानवजातीमध्ये तुझ्यासारखा कुणी लोभी नाही! तुझ्यासाठी ॲकिअन दुसरे बक्षीस कसे शोधून काढणार? ज्यातून ते निवडून काढता येईल असे सामाईक भांडार आपल्याकडे सध्या उपलब्ध नाही. आपण नगरीमधून जिंकून घेतलेल्या साऱ्या वस्तु वाटल्या गेल्या आहेत. अगोदरच देण्यात आलेल्या वस्तु आता आपल्याला परत घेता येणार नाहीत. म्हणून ही मुलगी तू त्या देवाला दे, आणि जर कधी देवराज जव्ह ट्रॉयनगरी लुटण्याची संधि आपल्याला देईल तर आम्ही तुझी तिप्पट चौपट भरपाई करू."

तेव्हा ॲगॅमेम्नॉन म्हणाला, "ॲकिलिझ, तू शूर असलास तरी तुझी अशी चलाखी मी चालू देणार नाही. तू माझ्यावर कुरघोडी करू शकणार नाहीस किंवा तुझी मनधरणीही माझ्यापुढे चालणार नाही. तू स्वतःची लूट ठेवून

घ्यायचीस आणि मी मात्र निमूटपणे नुकसान सोसून तू सांगतोस म्हणून ती मुलगी देऊन टाकायची होय ? वाजवी बदल्यात माझ्या पसंतीला उतरेल अशी लूट माझ्यासाठी अॅकिअन्स निवडून काढू देत, नाही तर मी येऊन तुझी स्वतःची, नाही तर अॅजॅक्स किंवा युलिसिसची लूट ताब्यात घेईन, आणि या कामासाठी मी ज्याच्याकडे जाईन त्याला ते माझे जाणे दुःखदायक होईल. पण याबद्दल आपण नंतर विचार करू; तूर्त एक नौका समुद्रात लोटू या आणि खास तिच्यासाठी तावडतोब नावाडी निवडू या. तिच्यावर महायज्ञाची सामग्री चढवू आणि क्रिसिइसलाही पाठवून देऊ. आपल्यापैकी कोणी मुख्य मनुष्य नौकेचा अधिकारी होऊ दे, अॅजॅक्स किंवा आयदोमेनिअस, नाही तर पेलिअसपुत्रा तू; महान योद्धा आहेस ना तू ! म्हणजे यज्ञ करण्याची तयारी दाखवून आपल्यास देवाचा कोप शांत करता येईल."

अॅकिलिझने त्याच्याकडे संतप्त मुद्रेने पाहून म्हटले, "तू उद्धटपणाने व लाभ-तृष्णेने लडबडला आहेस. लुटीसाठी हल्ला करताना किंवा खुल्या लढाईत, अॅकिअनांपैकी कोण तुझी आज्ञा उत्साहाने पाळू शकतील रे ? मी लढाईसाठी येथे आलो तो त्रोजनांनी खुद्द माझे काही वाईट केले होते म्हणून नव्हे. त्यांच्याशी माझे काही भांडण नाही. त्यांनी माझी गुरेढोरे पळविली नाहीत, ना घोडे ; किंवा थिआच्या सुपीक मैदानावरची माझी पिकेही त्यांनी कापून नेलेली नाहीत. कारण त्यांच्या माझ्या दरम्यान डोंगर आणि गरजणारा समुद्र दोन्ही मिळून खूप मोठी मोकळी जागा आहे. उद्धट महाशय, तुमच्यामागे आम्ही आलो ते आमच्या खुषीखातर नव्हे, तर तुमच्या, खुद्द तुमच्या निर्लज्ज स्वारीची व मेनेलॉसची, त्रोजनांकडून झालेल्या प्रमादाबद्दल जाब मागण्याची इच्छा तृप्त करण्यासाठी म्हणूनच ! ही गोष्ट तू विसरतोस आणि ज्या लुटीसाठी मी कष्ट केले नी जी अॅकिअनांनी मला दिली आहे ती माझ्याकडून लुबाडून घेण्याची धमकी देतोस. अॅकिअन जेव्हा त्रोजनांच्या एखाद्या संपन्न नगरीची लूट करतात तेव्हा जरी युद्धात माझ्या बाहूंचा पराक्रम अधिक असला तरी तुझ्याइतका चांगला लुटीचा भाग मला कधीही मिळत नाही. जेव्हा लुटीच्या वाटणीची वेळ येते तेव्हा तुझा भाग सर्वांपेक्षा कितीतरी मोठा असतो, आणि प्रत्यक्षात मला मात्र लढाईचे कष्ट सोसल्यानंतर काय मिळेल तेवढे घेऊन त्यातच धन्यता मानून माझ्या नौकांकडे परत जावे लागते. म्हणून आता मी थिआला परत जाणार ; माझ्या नौका घेऊन स्वगृही परतणे मला जास्त श्रेयस्कर वाटते ; कारण येथे अवमानित अवस्थेत तुझ्यासाठी सोने नि संपत्ती गोळा करायला मला रहावेसे वाटत नाही."

आणि ॲगमेम्नॉन उत्तरला, "तुझी इच्छा असेल तर काढ पळ ; तुला थांबवण्यासाठी मी विनवण्या मुळीच करणार नाही. इथे मला लढाईत मान मिळवून देतील असे इतर पुष्कळ आहेत, आणि विशेषतः (देवराज) मंत्रणाधिप जव्ह तर आहेच ना ! तुझ्या इतका मला घृणास्पद वाटणारा असा दुसरा राजा येथे नाही ; कारण तू नेहमीच भांडण उकरुन काढतोस आणि मला कधीच बरे पहात नाहीस. तू शूर असलास तरी त्यात एवढे मोठेसे काय आहे ? तुला तसा देवानीच नाही का घडवला ? तेव्हा जा तर घरी तुझ्या नौका आणि तुझे सवंगडी घेऊन तिथे मिर्मिदॉन्सवर अम्मल गाजवायला. मला ना तुझी पर्वा ना तुझ्या रागाची ; आणि मी आता असेच करीन ; ज्याअर्थी फीबस ॲपॉलोला क्रिसिइसला माझ्याकडून काढून घ्यायची आहे, त्याअर्थी माझ्या नौकेवर माझ्या अनुयायांसह तिला मी पाठवून देईन, पण मी तुझ्या तंबूत येईन नंतर आणि लूटीत मिळालेली ब्रिसेइस तुझ्याकडून घेऊन जाईन ; म्हणजे मग तुला कळून येईल की तुझ्यापेक्षा मी किती अधिक प्रवळ आहे ते ; आणि माझ्या बरोबरीचा किंवा तुल्यबळ म्हणून उभा राहण्यास दुसऱ्या कोणालाही धास्ती पण वाटेल."

हे ऐकून पेलिअसपुत्र अत्यंत कोपाविष्ट झाला आणि त्याच्या केसाळ छातीच्या आत त्याची चित्तवृत्ती द्विधा झाली. तलवार उपसून इतरांना बाजूला ढकलून अत्रेअसपुत्राला ठार मारावे की, स्वतःवर नियंत्रण ठेवून संताप आवरावा? याप्रमाणे तो दोन्ही पर्याय मनात घोळवीत आपली प्रभावी तलवार म्यानातून काढीत होता, तोच स्वर्गातून देवी मिनर्व्हा खाली उतरली (कारण उभय वीरांवर माया करणाऱ्या देवराज्ञी ज्यूनोने तिला धाडले होते), आणि तिने पेलिअसपुत्राचे पिवळे केस घट्ट धरले ; त्यालाच तेवढी ती दिसत होती, इतरांपैकी कोणाच्याही नजरेस ती पडली नाही. ॲकिलिझने विस्मयाने वळून पाहिले आणि तिच्या डोळ्यातून झळकणाऱ्या तेजावरून तात्काळ ही मिनर्व्हा म्हणून ओळखले. "ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्ये, तू येथे का आलीस ?" त्याने विचारले, "अत्रेअसपुत्र ॲगॅमेम्नॉनचे औद्धत्य पाहण्यासाठी ? तुला मी सांगतो—आणि ते नक्कीच खरे होणार—या उर्मटपणाचा दंड त्याला त्याच्या प्राणाने भरावा लागेल."

आणि मिनर्व्हा म्हणाली, "तू ऐकणार असशील तर तुला आपला राग आवर म्हणून सांगायला मी स्वर्गातून आले आहे. तुम्हा दोघांवर सारखाच लोभ करणाऱ्या ज्यूनोने मला पाठवले आहे. तेव्हा हा कलह थांबव आणि तलवार उपसू नकोस ; हवे तर त्याला रागावून टाकून बोल, आणि तुझे

तसे बोलणे व्यर्थ जाणार नाही, कारण मी तुला सांगते---आणि तसे नक्की घडेल---की अतःपर, आता तू सोसलेल्या या अपमानाची भरपाई म्हणून तुला तिप्पट उत्कृष्ट देणग्या मिळतील. तेव्हा आवरते घे आणि मी सांगते ते ऐक."

"देवी" ॲकिलिझने उत्तर दिले, "माणूस कितीही रागावला असला तरी तुम्ही दोघी आज्ञा कराल त्याप्रमाणे त्याने केलेच पाहिजे. असेच करणे सर्वोत्तम आहे, कारण ज्यांनी देवांच्या आज्ञा पाळलेल्या असतात त्यांच्याच प्रार्थना देव सदैव ऐकतात."

त्याने आपल्या तलवारीच्या रूपेरी मुठीवरचा हात थोपवला आणि मिनर्व्हाने सांगितल्याप्रमाणे ती परत म्यानात खुपसली. मग ती ऑलिम्पसला इतर देवांकडे आणि ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या घरी परत गेली.

पण पेलिअसपुत्र अजून संतप्तच असल्याने त्याने अत्रेअसपुत्राला उद्देशून क्रोधयुक्त भाषणे करण्यास पुन्हा सुरवात केली. "कुतरतोंडचा आणि हरीण-काळजाच्या दारुडचा, तू सेनेबरोबर युद्धात आघाडीवर जाण्यास कधी धजत नाहीस, किंवा आपल्या निवडक लोकांबरोबर दवा धरून एकदम छापा घालण्या-तही सामील होण्याची तुझी हिम्मत नाही. प्रत्यक्ष मरण टाळतोस, तशा या कामगिऱ्या तू टाळतोस. त्यापेक्षा तुझ्याविरुद्ध बोलणाऱ्याच्या लुटीचा हिस्सा त्याच्याकडे जाऊन लुबाडणे तुला अधिक फावते. स्वतःच्या प्रजेचे तू शोषण करतोस कारण दुबळ्या लोकांवर तुझे राज्य आहे. पण, अत्रिअस-पुत्रा, यापुढे माझा अपमान तू करणार नाहीस. कारण मी म्हणतो आणि अशी महाप्रतिज्ञा करतो---नव्हे, जो हा माझा राजदण्ड, पर्वतातल्या जनक-वृक्षाच्या खोडापासून कुऱ्हाडीने तोडून, साल सोलून नी पाने छाटून टाकल्या दिवसापासून कधीही पालवणार नाही, किंवा त्याला फाटे वा पाने वा कळ्या फुटणार नाहीत आणि जो स्वर्गाच्या अध्यादेशांचा निर्णायक व रक्षक म्हणून सारे ॲकिअनपुत्र मानतात, त्याची शपथ घेऊन मी निश्चयाने व गंभीरपणे प्रतिज्ञा करतो की यानंतर ॲकिअन स्नेहपूर्वक ॲकिलिझचा शोध करतील तेव्हा तो त्यांना सापडणार नाही. तुझ्या संकटकाळी हेक्तरच्या घातकी हाताने जेव्हा तुझे लोक मरणोन्मुख होऊन पडतील तेव्हा त्यांना मदत कशी करावी हे तुला कळणार नाही आणि ज्या घटकेला सर्वात शूर अशा ॲकिअनचा तू अपमान केलास ती आठवून तू संतापाने छाती फोडून घेशील."

या शब्दांबरोबरच पेलिअसपुत्राने त्याचा सुवर्णजडित राजदण्ड भूमीवर आपटला आणि तो जागेवर बसला, त्यावेळी दुसऱ्या बाजूने ॲत्रिअसपुत्र आपल्या स्थानावरून तावातावाने बोलण्यास सुरवात करीत होता. तेव्हा पायलासवासी

यांचा सफाईदार वक्ता मृदुभाषी नेस्तॉर उठला आणि त्याच्या ओठातून मधाहून मधुर शब्द बाहेर पडले. पायलॉसमध्ये जन्मलेल्या आणि वाढलेल्या लोकांच्या दोन पिढ्या त्याच्या कारकिर्दीत होऊन गेल्या होत्या नी आता तिसऱ्या पिढीवर तो हुकमत गाजवीत होता. तेव्हा अत्यंत कळकळीने, निष्ठेने आणि सदिच्छेने येथील लोकांना उद्देशून तो असे म्हणाला :—

"ॲकिअन भूमीवर खरोखर मोठे दुःख कोसळले आहे. युद्धात आणि सल्लामसलतीत इतके निपूण असणाऱ्या तुम्हा दोघातले हे भांडण ते ऐकू शकले असते, तर प्राॲम आणि त्याचे पुत्र आनंदित नी त्रोजन लोक मनातून प्रसन्न झाले असते ! तुम्हा दोघांपेक्षाही मी वयाने मोठा आहे, म्हणून माझे मार्ग-दर्शन स्वीकारा. शिवाय तुमच्यापेक्षाही थोर पुरुषांचा सलगीचा मित्र मी होतो आणि त्यांनी माझा सल्ला कधीही उपेक्षिला नाही. पिरियोस आणि प्रजापालक द्रायाझ, किंवा सीन्यूस, एकझादिअस, देवांसारखा पॉलिफिमस आणि ईजिअसपुत्र देवतुल्य थिस्यूस यांच्यासारखे लोक माझ्या पुन्हा कधी दृष्टीस पडणार नाहीत. पृथ्वीच्या पाठीवर जन्माला आलेल्यात हे लोक महाप्रबळ होते. महाशक्तिशाली होते ते ; आणि जेव्हा त्यांनी महाक्रूर अशा गिरीजनांच्या रानटी जमातींशी युद्ध केले तेव्हा त्यांना त्यांनी पुरते उलथून टाकले. मी दूरच्या पायलॉसमधून आलो, त्यांच्यामध्ये हिंडू फिरू लागलो कारण त्यांनी मला बोलावून घेतले होते, आणि माझ्या कुवतीप्रमाणे मी लढलो. आज जिवंत असणाऱ्यांपैकी एक माणूसही त्यांच्यापुढे टिकला नसता, पण ते माझे बोलणे ऐकत, माझ्या सांगण्याप्रमाणे वागत, तसेच तुमच्या बाबतीतही घडू दे. कारण हाच जास्त उत्तम मार्ग आहे. म्हणून म्हणतो, ॲगॅमेम्नॉन जरी तू बलवान असलास तरी ही कन्या तू घेऊन जाऊ नकोस, कारण ॲकिअन-पुत्रांनी ती आधीच ॲकिलिझला दिलेली आहे ; आणि ॲकिलिझ तुही राजाशी यापुढे झगडू नकोस, कारण जव्हच्या कृपेने राजदण्ड धारण करणाऱ्या कोणाही मनुष्याला ॲगॅमेम्नॉनच्या बरोबरीचा मान नाही. तू बलशाली आहेस, आणि तुझी आई एक देवी आहे ; पण ॲगॅमेम्नॉन तुझ्याहून प्रबळ आहे कारण त्याच्या अधिकाराखाली जास्त लोक आहेत. ॲत्रिअसपुत्रा, मी तुला आग्रहाची विनंती करतो की आपला राग आवर, ॲकिलिझबरोबरचे हे भांडण मिटवून टाक, कारण युद्धाच्या काळात तो ॲकिअनांच्या लेखी एक भक्कम आधारस्तंभ आहे."

आणि ॲगॅमेम्नॉनने उत्तर दिले, "महाशय, आपण म्हणता ते सारे खरे आहे, पण आमचा अधिपती आणि स्वामी व्हायचा या माणसाचा हट्ट आहे, सगळ्यांचा प्रभु, साऱ्यांचा राजा, सर्वांचा नायक होणारच असा त्याचा अट्टाहास आहे,

आणि ते होणे कठीण आहे. देवांनी त्याला महान योद्धा केले आहे हे मान्य, पण त्यांनी त्याला टाकून बोलण्याचा हक्कही दिला आहे की काय ?"

ॲकिलिझने त्याच्या बोलण्यात व्यत्यय आणला, "साऱ्याच गोष्टीत मी तुझ्यापुढे हार खाल्ली तर मी एक भेकड ठरेन. दुसऱ्या लोकांना तू हुकूम सोड, मला नको, कारण यापुढे मी ते पाळणार नाही. आणखी एक गोष्ट मी तुला सांगतो---आणि ते सांगणे नीट मनावर बिंबवून घे---की या मुलीसाठी मी तुझ्याशी किंवा कोणाशीही तंटा करणार नाही, कारण जे घेणारे तेच देणारेही होते. पण माझ्या नौकेवरच्या बाकी सर्व गोष्टींपैकी कुठलीही मी तुला बळाने घेऊन जाऊ देणार नाही. प्रयत्न तर करून पहा म्हणजे इतरांना गंमत पहायला मिळेल. जर तसे तू करशील तर माझा भाला तुझ्या रक्ताने लाल होईल."

असे त्यांचे संतापून भांडण झाल्यावर ते उठले आणि त्यांनी ॲकिअनांच्या नौकांवरील सभा मोडली. मेनितिअस पुत्र आणि त्याचा परिवार यांसह पेलियसपुत्र परत आपल्या तंबूकडे नी नौकांकडे गेला, आणि ॲगॅमेम्नॉनने एक नौका पाण्यात लोटली व वीस नावाड्यांना तिच्यासाठी निवडले. क्रिसेइसला त्याने नौकेवर पोहोचवली आणि शिवाय देवाप्रीत्यर्थ एका महायज्ञाची सिद्धता करून दिली. नौकाधिप म्हणून युलिसिस बरोबर गेला.

तेव्हा हे सगळे याप्रमाणे नौकेवर चढले आणि त्यांचा सागर प्रवास सुरू झाला. पण ॲत्रिअसपुत्राने आपल्या लोकांना स्वत:ला शुद्ध करण्यास सांगितले तेव्हा त्यांनी स्वत: शुद्ध होऊन आपले मालीन्य समुद्रात टाकले. मग त्यांनी सागरतीरावर महायज्ञ करून बैल व निरोगी बकरे बळी दिले आणि त्यांच्या यज्ञाच्या स्वादिष्ट धुराची वलये स्वर्गारोहण करू लागली.

या प्रकारे सर्व सैन्यसंभार कार्यमग्न राहिला. पण, ॲगॅमेम्नॉन त्याने ॲकिलिझला दिलेली धमकी विसरला नाही ; आणि आपले विश्वासू दूत नी शिलेदार नॅल्थिबिअस आणि युरिबॅतिझ यांना बोलावून तो म्हणाला, "पेलिअस-पुत्र ॲकिलिझच्या तंबूत जा; आणि ब्रिसीइसला हात धरून इकडे घेऊन या; त्याने तिला तुमच्या स्वाधीन केली नाही तर आणखी लोक घेऊन मी येईन आणि तिला हस्तगत करीन---त्यामुळे तो अधिकच डिवचला जाईल."

त्याने त्यांना तडक आणखी आज्ञा दिल्या आणि रजा दिली. त्यावर ते खेदपूर्वक आपली वाट चालत समुद्रकाठाने मिर्मिदॉन्सच्या तंबूपर्यंत नी नौकांपाशी आले. त्यांना ॲकिलिझ आपल्या तंबू नी नौकांजवळ बसलेला दिसला, आणि त्यांना पाहून तो नाराज झाला. भीतीग्रस्त असे ते आदराने त्याच्यापुढे उभे राहिले पण ते एकही शब्द बोलेनात. पण त्याने त्यांना ओळखले व तो म्हणाला,

" स्वागत, घोषकहो, देवांच्या नी मानवांच्या दूतांनो, असे जवळ या, माझे भांडण तुमच्याशी नाही, तुम्हाला ब्रिसिइस या मुलीसाठी पाठवणाऱ्या ॲगॅमेम्नॉनशी आहे. तर मग पॅत्रोक्लस, तिला आण इकडे नी त्यांच्या स्वाधीन कर; पण धन्य देवांशपथ, मर्त्य मानवांशपथ आणि ॲगॅमेम्नॉनच्या कोपाच्या क्रूरतेशपथ त्यांना साक्षी होऊ दे, की पुन्हा कधी जर लोकांना विनाशापासून बचावण्यासाठी माझी गरज पडली तर ते माझा शोध करतील पण तेव्हा त्यांना मी मिळणार नाही. ॲगॅमेम्नॉन संतापाने वेडा झाला आहे, आणि ॲकिअनांना सुरक्षितपणे आपल्या नौकांसह कसे लढता येईल याचा मागचा पुढचा विचार करण्याची त्याला शुद्ध राहिलेली नाही. "

प्रिय सहकाऱ्यांनो सांगितल्याप्रमाणे पॅत्रोक्लसने केले. त्याने ब्रिसिइसला तंबुतून आणले आणि दूतांच्या स्वाधीन केले, त्यांनी तिला अकिअनांच्या नौकांकडे नेले. पण ती स्त्री जाण्यास नाखुष दिसली. मग ॲकिलिझ एकटाच अश्रू गाळीत आणि असीम, शून्य जलप्रदेशावरून दूरवर नजर टाकीत त्या पुरातन सागराच्या कडेने गेला. त्याने आपल्या अमर मातेच्या प्रार्थनेसाठी हात उंचावले ; तो उद्गारला, " माते, केवळ एका लहानशा कालखंडात जीवन जगण्यासाठी तू मला जन्म दिलास; खरोखर ऑलिम्पसवरून गर्जणाऱ्या देवराज जव्हला तो अल्पकाळ यशोदायी करता आला असता. पण तसे होणे नाही. ॲत्रिअस पुत्र ॲगॅमेम्नॉनने माझा मानभंग केला आहे, आणि माझे पारितोषक बळाने लुबाडून घेतले आहे. "

हे बोलत असतानाच तो मोठ्याने आक्रंदत होता; आणि खोल समुदात आपल्या वृद्ध बापाच्या जवळच बसलेल्या त्याच्या आईने ते ऐकले. तात्काल लाटांमधून धूसर धुके निघावे तशी ती वर आली, रडत उभ्या असलेल्या पुत्रापुढे बसली, आणि हाताने कुरवाळून त्याला तिने विचारले, " माझ्या मुला, तू का रडतो आहेस ? तुला कशाचे दु:ख होत आहे ? माझ्यापासून लपवू नकोस ते आणि मला सारे सांग म्हणजे आपणा दोघांना ते समजेल. "

एक दीर्घ श्वास घेऊन ॲकिलिस म्हणाला, " तुला ते सारे माहितच आहे. जे तुला आधीच नीट ठाऊक आहे ते तुला कशाला आणखी सांगायचे ? आम्ही ईशनच्या भक्कम थीब नगरीवर चालून गेलो, ती लुटली आणि लुटीत मिळालेले सारे इथे आणले. ॲकिअनपुत्रांनी लुटीची रीतसर आपापसात वाटणी केली आणि ॲगॅमेम्नानचे पारितोषिक म्हणून सुंदरी क्रिसिइसची निवड केली; पण ॲपॉलोचा पुजारी क्रिसिझ ॲकिअन नौकांवर मोठी खंडणी बरोबर

घेऊन कन्येला सोडवायला आला; शिवाय त्याने अभ्यर्थकाची माला गुंडाळलेला अॅपॉलोचा राजदण्ड हातात धरला होता, आणि त्याने अॅकिअनांपुढे विनवण्या केल्या; त्यांचे प्रमुख असलेले अॅत्रिअसचे दोन पुत्र यांच्यापुढे सर्वात जास्त अजीजीने विनवण्या केल्या."

"यावर बाकीच्या अॅकिअनांचे एकमत होते की पुजाऱ्याचा मान ठेवावा आणि त्याने देऊ केलेली खंडणी घ्यावी; पण अॅगॅमेम्नॉनला ते मान्य नव्हते, तो पुजाऱ्याशी भयंकर चिडून बोलला आणि त्याला त्याने आडदांडपणे हाकलून दिले. तेव्हा पुजारी रागावून परत गेला आणि त्याची प्रार्थना त्याच्यावर लोभ करणाऱ्या अॅपॉलोने ऐकली. मग त्या देवाने आर्गासनिवासीयांवर घातक शरसंधान केले, आणि ते लोक मोठ्या संख्येने मरून एकमेकांवर कोसळले, कारण त्याचे बाण अॅकिअन्सच्या विस्तृत सेनासंभारात चारी बाजूनी फैलावले. अखेर पूर्ण ज्ञान असलेल्या एका भविष्यद्रष्टयाने अॅपोलोचे कौल आम्हाला सांगितले; आणि त्या देवाचा क्रोध शांत करावा असे म्हणणारा पहिला मी होतो. त्यावर अॅत्रिअसपुत्र रागावून उठला आणि त्याने नंतर जे केले ते करण्याची धमकी दिली. त्या मुलीला आता एका नौकेतून अॅकिअन्स क्रिसीला नेत आहेत आणि देवासाठी यज्ञाचे उपाहार धाडीत आहेत; पण आता इतक्यातच दूतांनी माझ्या तंबूतून ब्रिसयुसच्या मुलीला नेले, अॅकिअन्सनी ती मला बक्षीस दिली होती."

"म्हणून तुझ्या शूर पुत्राला शक्य असेल तर मदत कर. ऑलिम्पसला जा, आणि जर कधी शब्दाने वा कृतीने तू जव्हची कामगिरी बजावली असशील तर त्याच्या साह्याची याचना कर. माझ्या पित्याच्या घरात पुष्कळदा तू स्वतःला धन्य मानून घेताना मी ऐकले आहे. कारण ज्यूनो, नेपच्यून व पॅलास मिनर्व्हासह इतर जेव्हा सॅटर्नच्या पुत्राला बन्दीवान करणार होते, तेव्हा त्याला विनाशातून वाचवणारी अमरांपैकी तूच एकटी होतीस. देव ज्याला ब्रायरिअस पण मानव ईजिऑन म्हणतात त्या शंभर हातांच्या राक्षसाला ऑलिम्पसवर बोलावून, देवी, तूच सॅटर्नपुत्राची सुटका केलीस; कारण तो राक्षस त्याच्या पित्यापेक्षाही बलवान आहे, म्हणून जेव्हा तो आपल्या प्रतापी तेजात झळकत सॅटर्न पुत्राशेजारी स्थानापन्न झाला, तेव्हा दुसरे देव भ्याले. आणि त्यांनी सॅटर्न पुत्राला बांधले नाही. तेव्हा त्या देवराजाकडे जा, या सर्व प्रकरणाची त्याला आठवण दे, त्याचे गुडघे कवटाळ आणि ट्रोजनांना साह्य करण्यास त्याला सांग. नौकांच्या पिछाडयांच्या भागात अॅकिअनांची कोंडी होऊ दे आणि त्यांना किनाऱ्यावर मरू दे, म्हणजे त्यांच्या राजाकडून काय मिळायचे ते

आनंदाचे फळ त्यांना मिळेल, आणि ॲकिअनांमधल्या सर्व प्रमुख पुरुषाचा अपमान करण्याच्या अविचारीपणाबद्दल ॲगॅमेम्नॉन पस्तावा करील."

थेतिस रडू लागली आणि म्हणाली, "माझ्या मुला, हाय ! तुला जन्म देणारी आणि अंगावर पाजून तुला वाढवणारी केवढी अभागी ठरले मी ! तुझ्या नौकांवरच, सर्व दुःखापासून मुक्त राहून, तुझा जीवितावधि गुजरला असता तर खरोखर बरे झाले असते; कारण तुझ्या वाट्याचे आयुष्यच अगदी थोडे आहे; अरेरे ! तुझ्या बरोबरीच्या माणसांपेक्षा तू अल्पायुषी आणि दीर्घदुःखी दोन्ही असावास ना ! तू मला झालास ती घटका करंटी ठरली खरी ! तरीही मी ऑलिम्पसच्या हिमावृत्त उच्च शिखरावर जाईन, आणि हा वृत्तांत जव्हला सांगेन; पाहूया तो आपली प्रार्थना ऐकतो का ! दरम्यान तू आपल्या नौकांसह आहेस तेथेच रहा, ॲकिअनांविरुद्धचा तुझा राग तुझ्या मनात धुमसत राहू दे आणि युद्धापासून अगदी दूर रहा. कारण काल जव्ह ओशिॲनसकडे इथिओपियामध्ये साजऱ्या होणाऱ्या मेजवानीसाठी गेला आहे आणि इतर देवही त्याच्यासह गेले आहेत. तो ऑलिम्पसला आजपासून बारा दिवसांनी परत येईल; मग त्याच्या ब्राँझची फरसबंदी असलेल्या प्रासादात मी जाईन आणि त्याची विनवणी करीन; त्याचे मन वळवणे मला जमेल याबद्दल मला खात्री वाटते."

यानंतर ती त्याला सोडून गेली, तेव्हा त्याच्याकडून काढून घेतलेली मुलगी गमावल्यामुळे तो क्रुद्धच होता. दरम्यान महायज्ञाची सिद्धता घेऊन युलिसिस क्रिसीला पोहोचला. बंदराच्या आत आल्यावर त्याच्या नाविकांनी शिडे गुंडाळून नौकेच्या अन्तर्भागी ठेवली; पुढच्या बाजूचे तणावे ढिले करून डोलकाठी खाली आणून तिच्या जागी ठेवली आणि नौका वल्हवून ती त्यांना हव्या त्या ठिकाणी आणली. तेथे त्यांनी ती नांगरून ठेवण्यासाठी वापरावयाचे दगड पाण्यात टाकले आणि त्यांना नावेचे जाड दोर घट्ट बांधले. मग ते समुद्रकिनाऱ्यावर उतरले, आणि ॲपॉलोच्या महायज्ञाची सामग्री त्यांनी खाली उतरवली. क्रिसेइसही नौकेवरून उतरली व युलिसिस तिला घेऊन यज्ञवेदीपाशी तिला तिच्या पित्याच्या स्वाधीन करण्यास गेला. तो म्हणाला, "क्रिसीझ, तुझी मुलगी तुझ्याकडे परत आणण्यास आणि ज्या देवाने ऑगासवासीयांना नुकतेच परम दुःख भोगण्यास लावले, त्या ॲपॉलोच्या शांत्यर्थ दॅनाअनांच्या वतीने यज्ञ करण्यास राजा ॲगॅमेम्नॉनने मला पाठवले आहे."

असे म्हणून त्याने ती मुलगी तिच्या पित्याच्या स्वाधीन केली, पित्याने तिचा सानंद स्वीकार केला आणि त्यांनी पवित्र महायज्ञाची सामग्री व्यवस्थितपणे

देवाच्या यज्ञवेदी भोवताली मांडली. त्यांनी हात धुतले आणि बळी देण्याच्या पशूंवर शिंपडण्यासाठी जवांचे पीठ उचलले. त्यावेळी क्रिसिझने हात उंचावून उच्च स्वरात त्यांच्यावतीने प्रार्थना केली; तो म्हणाला," हे क्रिसी आणि पवित्र सिल्लाच्या रक्षका आणि आपल्या शक्तीने तेनेदॉसवर हुकमत चालवणाऱ्या रौप्यधनुर्धर देवा, माझे बोलणे ऐक. जशी तू माझी पूर्वीची प्रार्थना ऐकलीस आणि ॲकिअनांना घोर संकटात घातलेस तशीच पुन्हा एकदा माझी ही प्रार्थना ऐक नी दॅनाअनांवरची ही भयंकर आपत्ती थांबव."

अशी त्याने प्रार्थना केली आणि ॲपॉलोने ती ऐकली. त्यांची प्रार्थना आणि जवांचे पीठ शिंपडणे झाल्यावर त्यांनी यज्ञीय पशूंची डोकी मागे ओढून धरली आणि त्यांना ठार मारून त्यांची चामडी सोलून काढली. त्यांनी त्यांची मांड्यांची हाडे कापून काढली. चरबीच्या दोन थरात ती गुंडाळली. त्यांच्यावरती थोडे कच्च्या मांसाचे तुकडे ठेवले आणि मग क्रिसिझने ते पेटवलेल्या लाकडांच्या विस्तवावर ठेवून वरती मद्य ओतले. तेव्हा त्याच्याजवळ तरुण पुरुष पाच काट्यांचे शूळ हातात घेऊन उभे राहिले. जेव्हा ती मांड्यांची हाडे भाजून निघाली नी अंतर्भागातले मांसल भाग त्यांनी चाखून पाहिले, तेव्हा त्यांनी बाकीच्या भागांचे लहान लहान तुकडे करून ते शूळांवर घेऊन ते चांगले शिजून मऊ होईपर्यंत भाजून उपसून काढले; मग आपले काम पुरे केल्यावर भोजनाची सिद्धता होताच त्यांनी ते मांस खाल्ले आणि प्रत्येक माणसाला त्याचा पुरा वाटा मिळाल्यामुळे ते सर्व संतुष्ट झाले. त्यांचे खाणेपिणे पोटभर झाल्यावर सेवकांनी मिश्रणवाडग्यात मद्य व पाणी योग्य प्रमाणात मिसळून, प्रत्येक माणसाला त्यातून अर्घ्यप्रदान करू देऊन, नंतर तो वाडगा सर्वांच्या हाती पाळीपाळीने प्राशन करण्यासाठी दिला.

याप्रमाणे दिवसभर त्या तरुणांनी गाण्यांनी, स्तोत्रांनी आणि जयघोषाच्या हर्षभरित सूक्तांच्या पठणाने त्या देवाची आराधना केली आणि देवाला त्यांच्या स्वरांनी सुख झाले; पण जेव्हा सूर्य मावळला आणि अंधार पडला, तेव्हा नौकेच्या मागच्या भागातील दोरांपाशी ते झोपले आणि जेव्हा प्रभातकन्या, अरुणांगुली उषा उदयास आली, तेव्हा त्यांनी पुन्हा ॲकिअनांच्या सेनेकडे परतण्यासाठी नौकांची शिडे उभारली. ॲपॉलोने त्यांना अनुकूल वारे पाठविले, तेव्हा त्यांनी डोलकाठी वर चढवली, आणि आपली पांढरी शिडे उंचावर फडकावली. जशी ती शिडे वाऱ्याने फुगली तशी ती नौका खोल निळ्या पाण्यातून धावू लागली आणि ती वेगाने पुढे जात असता तिच्या अग्रभागापाशी फेसाचा सीत्कार होऊं लागला. जेव्हा ते ॲकियनांच्या विस्तीर्ण पसरलेल्या सेनासंभारापाशी

पोहोचले, तेव्हा त्यांनी नौका किनाऱ्याला वाळूवर उंच कोरड्या जागी ओढून घेतली, तिच्या खाली मजबूत टेकणे दिली आणि ते आपापल्या तंबूकडे आणि नौकांकडे निघून गेले.

पण ॲकिलिझ आपल्या नौकांतच राहिला होता आणि त्याचा कोप धुमसतच होता. तो मान्यवरांच्या सभेला गेला नाही आणि लढाईलाही बाहेरही पडला नाही, पण युद्धासाठी आणि युद्ध गर्जनेसाठी आतुर असा तो मनात कुढत असता, आतल्या आत त्याचे काळीज तिळतिळ तुटत होते.

मग बारा दिवसानंतर अमर देव सारेच्या सारे बरोबरच ऑलिम्पसला परत आले आणि त्यांच्या अग्रभागी जव्ह होता. थेतिसच्या पुत्राने ज्या कामाची जबाबदारी तिच्यावर टाकली होती त्याची आठवण ती विसरली नव्हती; तेव्हा ती सागराच्या तळातून वर आली आणि प्रात:कालाबरोबरच विस्तृत आकाशातून ऑलिम्पसला गेली, तेथे तिला सॅटर्नचा बलिष्ट पुत्र पर्वताच्या अत्युच्च शिखरांवर एकटाच बसलेला आढळला. ती त्याच्यापुढे बसली, डाव्या हाताने तिने त्याचे गुडघे धरले आणि उजव्या हाताने त्याची हनुवटी धरून तिने त्याला विनवले, ती म्हणाली, "तात जव्ह, साऱ्या अमर देवांच्या समुदायात जर मी कधी शब्दाने वा कृतीने तुझी कामगिरी बजावली असेल तर माझी प्रार्थना ऐक, आणि माझ्या पुत्राचा बहुमान होईल असे कर, कारण त्याच्या आयुष्याची दोरी फार लवकर तुटणार आहे. ॲगॅमेम्नॉन राजाने त्याच्याकडून लुटीत त्याच्या वाट्याला पारितोषक म्हणून आलेली मुलगी काढून घेऊन स्वत:कडे ठेवली आहे. तेव्हा हे ऑलिम्पिआवासी मंत्रणाधिपा, माझ्या पुत्राचा मान आता तूच राख आणि ॲकिअन्स त्याचे उचित देय देऊन बदला म्हणून स्वत: भरपूर संपत्तीचा त्याच्यावर वर्षाव करीपर्यंत ट्रोजनांना जय मिळत राहू दे."

जव्ह काही वेळ एकही शब्द न बोलता स्तब्ध बसला पण थेतिसने त्याचे गुडघे घट्ट धरून ठेवलेच होते; आणि तिने पुन्हा एकदा त्याची विनवणी केली, ती म्हणाली, "तू होकारार्थी मस्तक नमव आणि मला निश्चित वचन दे, नाही तर नकार दे---कारण तुला त्यात भिण्यासारखे काही नाही---म्हणजे मग मला कळेल तरी की तू मला किती तीव्रपणे तुच्छ मानतोस!"

हे ऐकून जव्ह फार अस्वस्थ झाला आणि त्याने उत्तर दिले, "तू ज्यूनोशी माझे भांडण लावून दिलेस तर मला पीडा होईल, कारण ती हिणवणाऱ्या शब्दांनी माझे माथे भडकवून देईल; आता देखील ती मला सदैव इतर देवांसमोर वाक्ताडन करीत असते आणि ट्रोजनांना मी साह्य करीत असल्याचा आरोप माझ्यावर करीत असते. आता तू परत जा, नाही तर तिला पत्ता लागेल.

मी या गोष्टीचा विचार करीन आणि तुझ्या इच्छेनुसार सारे काही घडवून आणीन. पहा, तुझा विश्वास बसावा म्हणून मी मान झुकवतो आहे, माझी ही अत्यंत गंभीर अशी विशेष खूण आहे आणि कुठल्याही देवांच्याबाबतीत मी तिचा वापर करतो. मी अशी मान हलवली म्हणजे मी कधीही माझा शब्द मागे घेत नाही, फसवीत नाही, किंवा बोलतो ते करण्यास चुकत नाही."

याप्रमाणे बोलत असताना सॅटर्नपुत्राने आपल्या काळ्या भुवया खाली झुकवल्या आणि त्याच्या अमर मस्तकावरील दिव्य केशवलये इतकी हेलकावली की विशाल ऑलिम्पस डळमळू लागला.

जेव्हा त्या दोघांचे असे बेत ठरले तेव्हा ती दोघे आपापल्या दिशेने गेली ; जव्ह आपल्या निवासाकडे वळला आणि देवीने तेजोमय ऑलिम्पस सोडून सागराच्या खोल उदरात बुडी मारली. देवांचा प्रभू स्वस्थानी येऊन पोहोचण्याच्या आधी देव आपापल्या आसनांवरून उठले. त्यांच्यातल्या एकाचीही बसून राहण्याची छाती नव्हती, आणि तो त्यांच्याकडे आला तेव्हा ते सगळे उभे राहिले. मग तेथे तो स्वस्थानापन्न झाला. पण ज्यूनोने त्याला पाहिले, पाहिल्यावरोबर तिला समजून चुकले की तो आणि वृद्ध मत्स्यपुरुषाची कन्या रौप्यचरणा थेतिस ही दोघे काही खोडसाळ कारस्थान रचीत होती ; तेव्हा लगेच ती त्याला खडसावू लागली. "वंचका", ती ओरडली, "देवांपैकी कोणाला तू आता आपल्या मसलतीत घेत आहेस ? माझ्या अपरोक्ष तू नेहमी गुप्तपणे नाना गोष्टींची ठरवाठरव करीत असतोस आणि होताहोईस्तोवर आजवर कधीच आपल्या हेतूबद्दल तू मला एका शब्दानेही सांगितलेले नाहीस."

त्यावर देवांचा आणि मानवांचा पिता म्हणाला, "ज्यूनो, माझ्या सर्व मसलतींची माहिती मी तुला द्यावी अशी अपेक्षा तू ठेवता कामा नयेस. तू माझी पत्नी आहेस, पण त्या साऱ्या मसलती समजणे तुला जड जाईल. जेव्हा त्या तुझ्या कानावर घालणे मला योग्य वाटेल, तेव्हा तुझ्याआधी दुसऱ्या कोणाही देवाला वा माणसाला त्या सांगण्यात येणार नाहीत. पण जेव्हा एकादे प्रकरण मी आपल्यापाशीच ठेवण्याचे ठरवतो तेव्हा त्याबद्दल चौकशा किंवा खोदून प्रश्न तू करू नयेस."

ज्यूनोने उत्तर दिले, "लोकांच्या मनात भिती उत्पन्न करणाऱ्या सॅटर्नच्या पुत्रा, कशाविषयी बोलतो आहेस तू ? मी ? चौकशा करते आणि खोदून विचारते ? छे ! ! कधीच नाही. प्रत्येक गोष्टीत तुझ्या मनासारखेच मी तुला करू देते. तरी पण मला दाट संशय आहे की ती वृद्ध मत्स्यपुरुषाची

कन्या थेतिस आपल्या बोलण्याने तुझे मन वळवीत होती, कारण ती तुझ्याजवळ बसली होती आणि तिने तुझे गुडघे कवळले होते ; ही आज सकाळचीच गोष्ट. म्हणून मला वाटते की अॅकिलिझला यशश्री देण्याचे आणि अॅकिअनांच्या नौकांवरचे पुष्कळ लोक मारण्याचे तू तिला वचन देत होतास."

जव्ह म्हणाला, "भार्ये, तुला संशय येऊन तू तिचा छडा लावीत नाहीस अशी एकही गोष्ट करणे मला शक्य होत नाही ; पण अशाने तुझा काही लाभ होणार नाही ; कारण उलट त्यामुळे तू मला अधिकच नावडती होशील, आणि ते तुला जड जाईल. तू म्हणतेस तसे आहे हे मी मान्य करतो, पण तसे व्हावे हाच माझा हेतू आहे ; तेव्हा खाली बैस आणि मी आज्ञा करतो त्याप्रमाणे गप्प रहा, कारण एकदा मी तुझ्यावर हात टाकण्यास सुरवात केली की सारा देवलोक तुझ्या बाजूचा असला तरी तुला त्याचा काही उपयोग होणार नाही."

हे ऐकून ज्यूनो भ्याली म्हणून तिने आपली हटवादी चित्तवृत्ती आवरून धरली आणि ती गप्प बसली. पण जव्हच्या गृहातील सारी देवमंडळी अस्वस्थ झाली. शेवटी कसबी कारागीर व्हल्कन आपल्या आईला, ज्यूनोला शांत करण्याचा प्रयत्न करू लागला. तो म्हणाला, "मर्त्य मानवांच्या एका टोळक्याखातर जर तुम्ही दोघे वाद घालून स्वर्गात कल्लोळ माजवणार असलात तर ते असह्य होईल सर्वानाच. जर असे कुविचार वळावणार असतील तर आपल्या भोजनसमारंभात काही गोडी राहणार नाही. म्हणून माझ्या मातेला मी सल्ला देतो––आणि तिला स्वतःलाही कल्पना आहे की तसे करणे बरे होईल––की तिने माझ्या प्रिय पित्याशी, जव्हशी समेट करावा ; नाहीतर तो पुन्हा तिला रागे भरील व आपल्या भोजनोत्सवाची गोडी घालवील. मेघनाद करणाऱ्या ऑलिम्पिकवासी महाश्रेष्ठाला जर आम्हा सर्वांना स्थानावरून फेकूनच द्यायचे असेल तर तसे तो करू शकतो ; कारण तो सर्वांपेक्षा कितीतरी बलवान आहे. तेव्हा त्याच्याशी मृदु भाषण करावे म्हणजे लौकरच तो आपल्याशी खुषीत येईल."

हे बोलता बोलता त्याने अमृताचा एक दुप्पट आकाराचा पेला घेतला आणि तो आपल्या आईच्या हाती देऊन तो बोलला, "माझ्या प्रिय माते, उल्हसित हो, आणि जे आहे ते गोड मान. मी तुझ्यावर मनापासून माया करतो आणि तुला मारझोड झालेली पाहून मला फार वाईट वाटेल. पण मला कितीही दुःख झाले तरी तुला मदत करता येणार नाही मला ; कारण जव्हला विरोध करणे अशक्य आहे. पूर्वी एकदा मी तुला साह्य करण्याचा प्रयत्न करीत असता त्याने मला तंगडी पकडून स्वर्गाच्या उंबरठ्यावरून भिरकावून दिले.

सकाळपासून संध्याकाळपर्यंत दिवसभर मी पडतच होतो, अखेर सूर्यास्ताला लेम्नॉस बेटात मी भूमीवर पडलो, आणि तेथे अंगात थोडीशीच धुगधुगी असलेल्या अवस्थेत सिंशिअनांनी येऊन माझी देखभाल करीपर्यंत मी पडूनच होतो.

हे ऐकून ज्यूनोने स्मित केले व तिने पुत्राच्या हातातून तो पेला स्मितपूर्वक घेतला. मग व्हल्कनने मिश्रणपात्रातून मधुर अमृत काढून ते भोवताली असलेल्या देवांना डावीकडून उजवीकडे फिरत वाटले ; आणि त्याला स्वर्गप्रासादात लगबगीने फिरताना पाहून त्या धन्य देवांनी हसतहसत, उच्च स्वराने त्याची प्रशंसा केली.

याप्रमाणे सूर्य मावळेपर्यंत दिवसभर त्यांनी भोजनप्रबंधाचा यथेच्छ उपभोग घेतला आणि प्रत्येकाला त्याचा भाग पूर्णपणे मिळाल्यामुळे सर्वजण संतुष्ट झाले. ॲपॉलोने आपली वीणा छेडली आणि कलांच्या स्फूर्तिदेवतांनी आपले मधुर स्वर उंचावून परस्पर सवालजवाब केले, एकमेकींना आवाहन नी प्रतिसाद दिले. पण जेव्हा सूर्याचा कान्तिमान प्रकाश म्लान झाला तेव्हा लंगड्या व्हल्कनने परम कौशल्याने घडवलेल्या आपापल्या निवासस्थानी जाऊन ते झोपले. तेव्हाच मेघगर्जनेचा ऑलिम्पसनिवासी स्वामी जव्हही त्याच्या नित्याच्या निद्रामंचकाकडे त्वरेने गेला, आणि त्याच्यावर सुवर्णसिंहासनसम्राज्ञी ज्यूनोसमवेत झोपी गेला.



## सर्ग २

यावेळी इतर देव आणि मैदानावरील सशस्त्र योद्धे गाढ झोपले होते. पण जव्ह जागा होता, कारण ॲकिलिझला मान कसा मिळवून द्यावा नी ॲकिअनांच्या नौकांवरील पुष्कळ लोकांचा नाश कसा करावा याचा तो विचार करीत होता. अखेरीस त्याने ठरवले की ॲगॅमेम्नॉन राजाला एक फसवे स्वप्न पाडणे हे सर्वात उत्तम होईल ; तेव्हा त्याने तशा एका स्वप्नाला बोलावून म्हटले, "फसव्या स्वप्ना, ॲकिअनांच्या नौकांकडे ॲगॅमेम्नॉनच्या तंबूत जा, आणि आता मी सांगेन तसे शब्दशः त्याच्याशी बोल. ॲकिअनांना तात्काळ सशस्त्र होण्याची आज्ञा करायला त्याला सांग, कारण यावेळी तो ट्रॉय जिंकून घेऊ शकेल हे नक्की. म्हणावे, "देवांमध्ये आता मतभेद राहिले नाहीत, ज्यूनोने त्यांना तिच्या स्वतःच्या मताकडे वळवून घेतले आहे, आणि ट्रोजनांवर अरिष्ट कोसळणार आहे."

हा संदेश ऐकल्यावर ते स्वप्न गेले आणि लौकरच ॲकिअनांच्या नौकांपाशी पोहोचले. त्याने ॲट्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉनला शोधून काढले. तो आपल्या तंबूत गाढ झोपेत असलेला दिसला. त्याच्या डोक्यावरती त्याने नेलिअसपुत्र नेस्तॉरच्या रूपाने अधांतरी घिरट्या घातल्या, कारण सर्व सल्लागारात नेस्तॉरलाच ॲगॅमेम्नॉन विशेष मानीत असे. त्याला ते स्वप्न म्हणाले,

"अट्रिअसपुत्रा, तू तर निद्रिस्त आहेस ; ज्याला आपल्या सेनासंभाराचे हित पहावयाचे आहे आणि दुसऱ्या अनेक चिन्ता आपल्या शिरावर वाहायच्या आहेत त्याने आपली झोप कमी केली पाहिजे. मी काय सांगतो त्याप्रमाणे तावडतोब कर ; कारण तुझ्या निकट नसला तरी तुझी काळजी वहाणाऱ्या आणि तुझ्यावद्दल दयाबुद्धी ठेवणाऱ्या जव्हकडून दूत म्हणून मी आलो आहे. ॲकिअन्सना तात्काल शस्त्रसज्ज करण्यास त्याने तुला सांगितले आहे, कारण तू आज ट्रॉय नक्कीच जिंकशील. देवांमध्ये आता मतभेद उरले नाहीत. ज्यूनोने सर्वांना आपल्या मताकडे वळवून घेतले आहे. आणि जव्हच्याहस्ते ट्रोजनांवर आरिष्ट कोसळणार आहे. हे सारे लक्षात राहू दे, आणि जागा होशील तेव्हा हे विसरणार नाहीस याबद्दल काळजी घे."

नंतर स्वप्न त्याच्यापासून निघून गेले आणि खरोखर ज्या गोष्टी साध्य होणार नव्हत्या त्याबद्दल तो विचार करू लागला. त्याला असे वाटले की,

त्याचदिवशी प्राॲमची नगरी तो जिंकून घेणार होता ; पण दॅनाअन नी त्रोजन या दोघांच्यामध्ये अनेक निकराच्या लढाया जव्हच्या मनात अजून लढवायच्या होत्या. याची ॲगॅमेम्नॉनला मुळीच कल्पना नव्हती. मग लौकरच तो जागा झाला तेव्हा तो दैवी संदेश त्याच्या कानात अद्यापि निनादतच होता ; म्हणून तो उठून ताठ बसला व आपला सुंदर, नवा मऊ अंगरखा अंगात घालून त्यावर त्याने जाडजुड झगा चढवला. त्याच्या सुभग पायांवर त्याने बंदांच्या चर्मपादुका बांधल्या आणि चांदीच्या टिकल्या बसवलेली तलवार खांद्याभोवती अडकवली ; मग त्याने आपल्या पित्याचा अविनाशी दण्ड हातात घेतला आणि तो ॲकिअन्सच्या नौकांकडे तडक जाण्यास निघाला.

आता उषादेवीने जव्ह आणि इतर अमर देवगणांना दिवस उजाडल्याची घोषणा देण्यासाठी विशाल ऑलिम्पसकडे मार्गक्रमण केले, आणि ॲगॅमेम्नॉनने लोकांना सभेसाठी बोलावण्यास चौफेर घोषक पाठवले. त्याप्रमाणे त्यांनी आमंत्रण केले आणि लोक जमा झाले. पण अगोदर राजाने पायलॉसचा राजा नेस्तॉर याच्या नौकेवर ज्येष्ठांची परिषद बोलावली, आणि ते एकत्र आल्यावर त्यांच्यापुढे एक धूर्त बेत ठेवला.

तो म्हणाला, "मित्रहो, ऐन मध्यरात्री मी देवलोकातून आलेले एक स्वप्न-पाहिले आणि त्याची मुद्रा आणि आकृती अन्य कोणासारखी नसून नेस्तॉरसारखी होती. माझ्या डोक्यावर अधांतरी घिरट्या घालून ते म्हणाले, "ॲत्रिअस पुत्रा, तू निद्रिस्त आहेस, पण ज्याला आपल्या सेनासंभाराचे हित पहावयाचे आहे आणि इतर अनेक चिंता आपल्या शिरावर वहायच्या आहेत, त्याने आपली झोप कमी केली पाहिजे. मी काय सांगतो त्याप्रमाणे तावडतोब कर. कारण तुझ्या निकट नसला तरी तुझी काळजी वहाणाऱ्या आणि तुझ्यावद्दल दयाबुद्धी ठेवणाऱ्या जव्हकडून दूत म्हणून मी आलो आहे. ॲकिअनांना तात्काल शस्त्रसज्ज करण्यास त्याने तुला सांगितले आहे, कारण तू आज त्रॉय नक्कीच जिंकशील. देवांमध्ये आता मतभेद राहिले नाहीत ; ज्यूनोने त्यांना आपल्या मताकडे वळवून घेतले आहे, आणि जव्हच्या हस्ते त्रोजनांवर विनाश कोसळ-णार आहे ; हे सारे लक्षात ठेव—मग ते स्वप्न अदृश्य झाले व मी जागा झालो. तेव्हा आता ॲकिअनपुत्रांना आपण शस्त्रसज्ज करू या. पण प्रथम त्यांच्या मनाचा कल पाहणे वरे पडेल ; त्यासाठी त्यांनी नौकांसह वेगाने निघून जावे असे त्यांना मी सांगेन ; पण तुम्ही इतरांनी सेनादलात इतस्ततः जाऊन त्यांना तसे करण्यापासून निवृत्त करावे."

मग तो खाली बसला आणि पायलॉसचा अधिपती नेस्तॉर अत्यंत कळकळीने आणि सदिच्छेने त्यांना उद्देशून म्हणाला, " माझ्या मित्रांनो, व ऑर्गासवासीयांचे अधिपती व मंत्रिमंडळाचे सदस्यहो, ॲकिअनांपैकी दुसऱ्या कोणी माणसाने या अशा स्वप्नाबद्दल आपल्याला सांगितले असते तर आपण ते फसवे आहे म्हटले असते आणि त्याबाबत प्रत्यक्षात काहीही केले नसते. पण ज्याने ते स्वप्न पाहिले तो आपल्यातला अग्रेसर पुरुष आहे ; म्हणून लोकांना शस्त्रसज्ज करण्याच्या कामी आपण लागले पाहिजे. "

असे म्हणून तो सभेतून पुढे निघाला आणि दुसरे राजदण्डधारी नृपती ॲगॅमेम्नॉनच्या आज्ञेप्रमाणे त्याच्याबरोबर उठले ; पण लोक काय घडले ते ऐकण्यासाठी पुढे लोटले. एखाद्या पोकळ गुहेमधून मधमाशा ज्याप्रमाणे घोळक्याने बाहेर पडतात आणि लहानमोठे गट करून प्रचंड संख्येने वसंतपुष्पातून द्रुतगतीने संचार करतात, तसा तो प्रचंड जनसमुदाय नौकांवरून आणि तंबूंमधून भराभर बाहेर पडत सभेकडे आला व विस्तीर्ण सागराच्या किनाऱ्यावर लहान मोठे गट करून उभा ठाकला. पण मग त्यांना सारखे पुढे सरकण्यास चिथावीत जव्हचा दूत दावाग्नीरूप प्रवाद त्यांच्यामधून धावत होता. त्यामुळे त्यांच्यात भयंकर गोंधळ माजला, पिसाटासारखे गडबड करीत ते आपापल्या जागा शोधू लागले आणि त्या लोकांच्या पदाघातांनी भूमी विव्हळू लागली. त्यांनी आरडाओरडा थांबवावा व राजाच्या बोलण्याकडे लक्ष द्यावे असे सांगत त्यांच्यामधून नऊ दूत घोषणा करीत फिरले ; अखेर लोकांना त्यांच्या त्यांच्या वेगवेगळ्या ठिकाणी आणून नीट बसवण्यात आले, आणि त्यांनी आपला कोलाहल थांबवला. मग ॲगॅमेम्नॉन राजा आपला राजदण्ड हातात धरून उठला. हा राजदण्ड व्हल्कनने बनविला होता व त्याने तो सॅटर्नपुत्र जव्हला दिला होता ; त्याने तो मार्गदर्शक व पालक आर्गसान्तक मर्क्युरीला दिला. राजा मर्क्युरीने तो महान सारथी पेलॉप्सला आणि त्याने प्रजापालक ॲत्रिअसला दिला. मृत्युसमयी ॲत्रिअसने तो मेषयूथ संपन्न थिएस्तिझच्या नावाने ठेवला आणि त्याने त्याच्यावर वेळ आली तेव्हा तो राजदण्ड ॲगॅमेम्नॉनने धारण करून साऱ्या आरगॉसचा व द्वीपांचा स्वामी व्हावे म्हणून त्याच्यासाठी मागे ठेवला. त्या राजदण्डावर भार देऊन ॲगॅमेम्नॉन ऑर्गासिवासीयांना उद्देशून म्हणाला,

" माझ्या मित्रांनो, वीरांनो, मार्सच्या सेवकांनो, स्वर्गस्थ देवांचा माझ्यावर कोप झाला आहे. निष्ठुर जव्हने मला गंभीरपणे वचन दिले होते की, परत फिरण्यापूर्वी माझ्याकडून प्राॲमची नगरी लुटली जाईल ; पण त्याने

मला फसवले आहे, आणि आता अनेक लोक गमावल्यानंतर अपकिर्ती पदरी घेऊन मला आरगॉसला माघारा जाण्यास तो सांगत आहे. अनेक अभिमानी नगरींना ज्याने धुळीला मिळवले आहे आणि त्याचे बल सर्वाधिक असल्याने अजूनही अनेकांना जो धुळीला मिळवील त्या जव्हची अशी इच्छा आहे. यापुढे आपल्याला कमीपणा आणणारी अशी गोष्ट जिकडे तिकडे फैलावेल की एक महान तसेच शूर ॲकिअनांचे सेनादल, त्याच्यापेक्षा संख्येने कमी असलेल्या लोकांशी व्यर्थ झगडले ; तथापि त्या युद्धाचा शेवट अजूनही नजरेच्या टप्प्यात येत नाही. ध्यानात घ्या की ॲकिअन आणि त्रोजन यांनी शपथेवर गंभीरपणे करार केलेला आहे, आणि त्या दोघांचीही मोजणी झालेली आहे——कुटुम्ब प्रमुखांच्या यादीप्रमाणे त्रोजनांची, आणि दहादहांच्या गटानुसार आपली ; आणि पुढे असा विचार करा की आपल्या प्रत्येक गटाला पेल्यात मद्य ओतून देणारा एक त्रोजन कुटुम्बप्रमुख हवा होता ; आपण संख्येने इतके अधिक आहोत की, आपल्यापैकी पुष्कळ गटांच्या वाट्याला मद्यचषक भरून देणारा येणार नाही. तथापि त्या नगरीत अन्य ठिकाणांहून आलेले सहकारी आहेत आणि इलिअमच्या त्या संपन्न नगरीची लूट करण्यात मला त्यांचाच अडथळा होत आहे. जव्हच्या कालगणनेप्रमाणे नऊ वर्षे उलटून गेली, आपल्या नौकांची लाकडे कुजली आहेत, त्यांचे दोर-अवजार मजबूत राहिलेले नाहीत, घरी आपल्या बायका नी लहान मुले सचिंतपणे आपली वाट पाहात आहेत, पण जे काम करण्यासाठी आपण इकडे आलो ते झालेले नाही. म्हणून आता मी म्हणतो तसे आपण सगळे करू या, नौका परत आपल्या देशाकडे हाकारू या, कारण आपल्याकडून त्रॉय घेणे होणार नाही.

या त्याच्या शब्दांनी जनसमुदायाची हृदये हेलावली. त्यातल्या पुष्कळांना ॲगॅमेम्नॉनचा धूर्त बेत ठाऊक नव्हता. आकाशातील मेघातून फुटून पूर्व व दक्षिण वायूनी फटके दिल्यावर इकॅरिअन सागराच्या लाटा जशा इकडून तिकडे उसळतात तसे ते लोक चळवळ करू लागले ; किंवा शेतातील धान्याच्या पिकावरून पश्चिम वायू सोसाट्याने वहाताना त्या फटकाऱ्यांखाली कणसे जशी वाकतात, तसे ते मोठ्याने ओरडा करीत नौकांकडे वाकत झुलत धावले, आणि त्यांच्या पायांखालून उडालेली धूळ आकाशात वरपर्यंत गेली. त्यांनी नौका समुद्रात ओढण्यास एकमेकांना उत्साहपूर्ण प्रोत्साहन दिले ; नौकांपुढल्या पाण्यातल्या वाटा साफ केल्या, नौकांखालचे टेकू काढण्यास आरंभ केला, आणि त्यांच्या आनंदी आरोळ्यांनी आकाश दुमदुमले, इतके ते परत जाण्यास उत्सुक झाले होते. त्यावेळी ते ऑर्गावासीय खरोखरच दैवाने योजिली नव्हती अशा

पद्धतीने माघारी गेले असते. पण ज्यूनो मिनर्व्हाला म्हणाली, "हाय, ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्ये, ज्या हेलनसाठी स्वदेशापासून दूर, ट्रॉयला, ॲकिअनांपैकी इतके जण मेले तिला अद्यापीही आपल्या ताब्यात ठेवण्याची ऐट मिरवण्याची प्रॲमला आणि ट्रोजनांना संधि मिळू देऊन, कधी न थकणारे आर्गासवासीय विस्तीर्ण सागरावरून आपल्या स्वतःच्या देशाला घाईघाईने परत जाणार का? तात्काल त्या सेनादलामध्ये तू जा आणि त्यांच्यातल्या एकेका माणसाशी यथायोग्य बोल; म्हणावं की त्यांनी आपल्या नौका सागरावर सोडता कामा नये."

मिनर्व्हाने आज्ञापालनात कसूर केली नाही. ऑलिम्पसच्या सर्वोच्च शिखरावरून ती तीरासारखी खाली गेली आणि निमिषातच ॲकिअनांच्या नौकांपाशी आली. तेथे तिला सल्लामसलतीत जव्हशी तुल्यगुण असा युलिसिस एकटा उभा दिसला. त्याने अजून आपल्या नौकेला हात घातला नव्हता, कारण त्याला दुःख झाले होते, खेद वाटत होता. दुःखाने त्याचे मन भरून आले होते. ती त्याच्याजवळ जाऊन म्हणाली, "लेर्एतिझच्या थोर पुत्रा, तुम्ही स्वतःला आपल्या नौकात झुगारून देऊन अशाप्रकारे स्वदेशी परत निघून जाणार आहात? स्वदेशापासून दूर ॲकिअन्सपैकी इतके जण जिच्यासाठी मेले, त्या हेलनला अद्यापीही ताब्यात ठेवल्याची शेखी प्रॲमला आणि ट्रोजनांना तुम्ही मिरवू देणार? तात्काल सेनादलामध्ये जा आणि त्यांच्यातल्या एकेका माणसाशी यथायोग्य बोल; म्हणावं की त्यांनी आपल्या नौका समुद्रात ढकलता कामा नयेत."

तो आवाज देवीचा आहे हे युलिसिसने ओळखले; अंगावरचा झगा फेकून देऊन तो पळत निघाला. त्याची परिचर्या करणारा सेवक इथॅकाचा युरिबॅतिज याने त्या झग्याचा तावा घेतला; त्यानंतर युलिसिस थेट ॲगॅमेम्नॉनपर्यंत गेला आणि त्याच्याकडून त्याचा वंशपरंपरागत अविनाशी दण्ड त्याने घेतला. तो घेऊन ॲकिअनांच्या नौकांमधून तो फिरू लागला.

जिथेजिथे त्याला कोणी राजा किंवा नायक भेटला तेव्हा तिथेतिथे त्याच्या जवळ उभा राहून युलिसिसने यथायोग्य युक्तिवाद केला. "महाशय," तो म्हणाला, "हे असे पळून जाणे भ्याडपणाचे आणि न शोभणारे आहे. तुम्ही आपल्या स्थानांवर रहा, आणि आपल्या लोकांनाही आपापल्या जागांवर थांबण्यास सांगा. अजून तुम्हाला ॲगॅमेम्नॉनच्या मनात काय होते ते पुरते कळलेले नाही; तो आपले मत अजमावीत होता, आणि आता तो ॲकिअनांना आपल्या नाराजीचा प्रभाव दाखवण्यास विलंब लावणार नाही. ज्येष्ठांच्या सभेत

तो जे बोलला ते ऐकायला तेव्हा आपण सगळे तेथे नव्हतो ; तो रागावू नये आणि आपल्याला अपाय करू नये याबद्दल खबरदारी घ्या ; कारण राजांना अभिमान फार असतो आणि जव्हचा हात त्यांच्या साह्याला तयार असतो."

पण जेव्हा एकादा सामान्य मनुष्य गडबड करीत असलेला त्याला दिसे तेव्हा आपल्या दंडाचा तडाखा देऊन युलिसिस त्याला धमकावणीच्या स्वरात म्हणे : "बेटचा, चूप रहा आणि तुझ्यापेक्षा श्रेष्ठ आहेत त्यांचे ऐक. तू भ्याड आहेस, शिपाईगडी नव्हेसच, लढाईत काय किंवा मसलतीत काय तुला काहीच महत्त्व नाही ; आपणा साऱ्यानाच काही राजे होता येत नाही. स्वामी पुष्कळ असणेही वरें नसते, सर्वश्रेष्ठ असा एकच पुरुष असावा. ज्याला कारस्थानी सॅटर्नपुत्राने तुम्हा सर्वांवरच्या सार्वभौमत्वाचा राजदण्ड दिला आहे असा एकच राजा असला पाहिजे."

याप्रमाणे स्वामित्व गाजवीत तो सैन्यामधून फिरला आणि सारा समुद्र खवळला असता किनाऱ्यावर येऊन आपटणाऱ्या फेसाळ लाटांसारखा कल्लोळ करीत लोक आपल्या तंबूतून आणि नौकांमधून घाईघाईने सभास्थानी परत फिरले.

आता बाकीचे आपल्या जागांवर बसले आणि आपल्या वेगवेगळ्या ठिकाणी स्थिर झाले पण थेर्सायिटीज मात्र आपल्या बेलगाम जिभेने वडवडतच राहिला होता. तो म्हणजे एक शब्दांचे चऱ्हाट वळणारा आणि तेही अमंगल शब्दांचे. सत्ताधाऱ्यांविरुद्ध असंतोष पसरवणारा, अधिकारावर असणाऱ्या साऱ्यांविरुद्ध तोंड टाकणारा असा माणूस होता. आपण काय बोलतो त्याविषयी तो बेपर्वा असायचा. ॲकिअनांना हसवायला मिळाले म्हणजे झाले. ट्रॉयकडे आलेल्या माणसात तो सर्वांपेक्षा कुरुप होता, फेंगडा, एका पायाने लंगडा होता. त्याचे दोन्ही खांदे पडलेले असे छातीवर कुवडासारखे लोंबत होते. त्याचे डोळे निमुळते होत गेलेले असे होते आणि टाळूवर अगदी तुरळक असे केस होते. ॲकिलिझ आणि युलिसिस यांना त्याचा सर्वांत जास्त तिटकारा वाटत असे. कारण सगळ्यांपेक्षा त्यांच्याशीच हुज्जत घालण्याची त्याला संवय होती. तथापि यावेळी मात्र त्याने कर्कश चिरक्या आवाजात ॲगॅमेम्नॉनवर शिव्यांचा वर्षाव करण्यास आरंभ केला. ॲकिअन रागावले आणि त्यांना त्याचा तिटकारा आला, तरीही त्याने ॲत्रिअसपुत्राला उद्देशून तंडणे आणि ओरडणे चालूच ठेवले.

तो ओरडला "ॲगॅमेम्नॉन, आता काय झाले आहे तुला, आणि तुला आणखी काय पाहिजे आहे ? ब्राँझ (धातूंच्या वस्तू) ने नी सुरेख बायकांनी तुझे तंबू भरले आहेत. कारण जेव्हा जेव्हा आम्ही एकादी नगरी जिंकतो तेव्हा

त्यातल्या सर्वोत्तम ब्रॉंझ वस्तू नी बायका निवडून तुला देतो. अजूनही मी नाही तर दुसऱ्या कोणा ॲकिअनने एखाद्या त्रोजनच्या मुलाला कैद केल्यावर त्याच्यासाठी त्याच्या बापाने द्यायच्या खंडणीचे आणखी सोने पाहिजे आहे का तुला ? का कोणी एकादी तरुण मुलगी लपवून ठेवून तिच्याशी प्रणयक्रिडा करायची आहे ? तुझ्यासारख्या ॲकिअनांच्या राजानेच त्यांना अशा हाल-अपेष्टात टाकणे योग्य नव्हे. दुबळ्या भेकडांनो, मला वाटते तुम्ही पुरुष नाही, बायकाच आहात. चला आता आपल्या नौका हाकारून आपल्या देशाला जाउया, आणि या माणसाला इथे त्रॉयमध्येच आपण मिळवलेल्या मानाच्या बक्षिसात खितपत पडू दे आणि म्हणजे आम्ही त्याच्या काही उपयोगी पडलो की नाही हे कळेल त्याला. त्याच्यापेक्षा ॲकिलिझ हा पुष्कळच चांगला माणूस, पण त्याला याने कसे वागवले पहा.––त्याचे बक्षीस लुबाडून आपल्याकडे ठेवले. ॲकिलिझ हे, निमूटपणे सहन करतो आणि तो झगडायला तयार नाही. एकदा जर का त्याने लढायची तयारी केली, तर ॲत्रिअसपुत्रा, पुन्हा कधी तू त्याचा अपमान करायला उद्युक्त होणार नाहीस! ”

थेर्सॉयिटीज अशी दुरुत्तरे बोलला पण युलिसिसने लगेच त्याच्यापाशी जाऊन त्याची कठोरपणे कानउघाडणी केली. तो म्हणाला, “ तुझी वळवळणारी जीभ आवर, थेर्सॉयिटीज ; अधिक एक शब्द सुद्धा बडबडू नकोस. तुला पाठिराखा कोणी नसताना राज पुरुषांना दूषणे द्यायच्या भानगडीत पडत जाऊ नकोस. ॲत्रिअसपुत्रावरोबर त्रॉयपुढे आलेला तुझ्याहून नीच प्राणी दुसरा कोणी दिसत नाही. राजे लोकांबद्दलची ही वटवट बंद कर, आणि त्यांची निंदाही करू नकोस, आणि स्वदेशी परतण्याचे तुणतुणेही लावू नकोस. काय घडामोडी यापुढे होणार आहेत त्या आम्हाला अजून ठाऊक नाहीत; तसेच ॲकिअन्स उत्तम विजय मिळवून परत जाणार का अपेशी होऊन, याचीही कल्पना नाही. दॅनाअनांनी ॲगॅमेम्नॉनला इतकी बक्षिसे दिली याबद्दल त्याची कुचेष्टा करण्याची छाती कशी होते तुझी ? म्हणून मी तुला सांगतो––आणि नक्कीं तसे होईलच––की पुन्हा कधी जर असली निरर्थक बडबड करताना तू मला सापडलास तर एक तर मी स्वतःचे शिर कापून घेईन आणि यापुढे तेलेमॅकसचा पिता म्हणवून घेणार नाही ; नाही तर तुला पकडून पुरा नागडा करून सभेतून चाबूक मारीत मारीत बाहेर काढून तुला तुझ्या नौकांकडे रडत भेकत जायला लावीन. ” असे म्हणून त्याच्या पाठीवर व खांद्यावर हातातल्या दण्डाने युलिसिसने तो खाली पडून रडू लागेपर्यन्त मारले. त्या सुवर्णदण्डाचा रक्तबंबाळ वळ त्याच्या पाठीवर उठला. तेव्हा भेदरलेला आणि वेदनाग्रस्त

थेर्सायिटीज खाली बसला, तो डोळ्यातली आसवे पुसत असता त्याचा तो मूर्ख अवतार पाहून लोकांना त्याची दया आली. पण ते मनापासून हसलेही आणि त्यांच्यापैकी प्रत्येक आपल्या शेजाऱ्याकडे वळून म्हणू लागला, "आतापर्यंत लढाईत आणि सभात युलिसिसने पुष्कळ चांगल्या गोष्टी केल्या आहेत पण या बेटयाने जास्त बडबड करण्यापूर्वीच त्याचे तोंड बंद करून, आजपर्यंत आॅरगाॅसवासीयांच्या हिताच्या ज्या गोष्टी त्याने केल्या त्यापेक्षाही जास्त चांगली अशी गोष्ट आज त्याने केली आहे. अतःपर हा प्राणी राजांशी पुन्हा अशा उद्धटपणे वागणार नाही."

याप्रमाणे लोक बोलत होते. मग राजदण्ड घेऊन युलिसिस उठला, आणि घोषकाचे रुप घेऊन मिनर्व्हा देवीने जे दूर असतील त्यांना त्याचे बोलणे ऐकू जावे, व त्याच्या सूचनांचा त्यांना विचार करता यावा म्हणून सर्व लोकांस स्तब्ध राहण्यास सांगितले. नंतर अत्यंत कळकळीने आणि सद्भावनेने तो लोकांसमोर बोलू लागला.

"राजा ॲगॅमेम्नाॅन, हे ॲकिअन लोक साऱ्या मानव जातीत तुझे नाव 'कचखाऊ' म्हणून कुप्रसिद्ध करू पहात आहेत. त्यांनी आरगाॅसहून निघताना तुला जे वचन दिले होते की, ट्राॅयनगरी जिंकून लुटल्याशिवाय परत फिरायचे नाही, ते वचन ते विसरले आहेत आणि लहान पोरांसारखे किंवा विधवांसारखे कुरकुरत ते स्वदेशी जायला निघाले आहेत. नाउमेद होण्याइतके कष्ट त्यांना पडले आहेत खरेच; वाऱ्याच्या आणि सागराच्या आधीन असे नौकेवर असताना, एक महिना देखील वायकोपासून दूर रहायला लागले तर माणूस अस्वस्थ होतो; पण आता तर नऊ वर्षांचा दीर्घकाल आम्हाला इथे अडकून पडावे लागले आहे; तेव्हा ॲकिअन जर बंडखोर झाले तर मी त्यांना दोष देऊ शकत नाही; तरीही इतक्या दीर्घ मुक्कामानंतर आपण जर रिकाम्या हातीच घरी परत गेलो तर आपली छी थू होईल—म्हणून माझ्या मित्रांनो, कॅलचासची भविष्ये खोटी होती का खरी ते ताडून पहाता यावे यासाठी अजूनही आणखी थोडे दिवस धीर धरा.

"आतापावेतो जे धारातीर्थी पडले नाहीत, त्यांना कालच किंवा परवा घडल्याप्रमाणे आठवायला हवे की, प्रायॅम व त्रोजनाविरुद्ध युद्ध करण्याकरिता इकडे येण्याच्या मार्गावर आपण असता, ॲकिअन्सच्या नौका ऑलिस येथे कशा अडकवल्या गेल्या होत्या; एका झऱ्याच्या भोवताली आपण गोळा झालो होतो, देवांच्या पवित्र यज्ञवेदीवर महायज्ञात त्यांना आहुती अर्पण करीत होतो. तिथल्याच एका प्लेन वृक्षाखालून स्वच्छ पाण्याचा एक प्रवाह उफाळत होता. मग आपण एक चमत्कार पाहिला; जव्हने भूमीमधून बाहेर एक भयानक सर्प पाठवला, त्याच्या पाठीवर रक्तासारखे लाल डाग होते; वेदीखालून

निघून तो सर्प त्वरेने प्लेन-वृक्षावर गेला. आता त्या झाडाच्या अगदी वरच्या फांदीवर पानांखालून डोकावणारी एकूण आठ अगदी चिमुकली पिले आणि नववी त्यांची आई चिमणी होती. त्या सापाने ती बिचारी चिवचिवणारी पिल्ले खाल्ली तेव्हा ती मोठी चिमणी आपल्या पिलांसाठी शोक करीत इकडे तिकडे घिरट्या घालीत होती; पण सर्पाने तिच्या भोवतीही विळखे टाकून ती किंकाळ्या फोडीत असताच तिचा पंख पकडला, मग चिमणी आणि तिची पिल्ले दोघांनाही सर्पाने खाल्ल्यावर, ज्या देवाने त्याला पाठवले होते त्याने त्याचे एका सूचक चिन्हात रुपान्तर केले; त्या कारस्थानी सॅटर्नच्या पुत्राने सर्पाचे एका दगडात रुपान्तर केले, आणि झालेल्या प्रकाराबद्दल विस्मय करीत आपण तेथे उभे राहिलो. तेव्हा आपल्या महायज्ञात मध्येच असा सूचक, अचाट चमत्कार झालेला पाहून कॅलचासने तात्काल स्वर्गाचा कौल आपल्यापुढे घोषित केला. तो म्हणाला, 'ॲकिअन्सहो, अरे, तुम्ही असे अवाक् का झालात ? उशिराने आलेले आणि दीर्घ कालानंतर फलद्रूप होणार असलेले हे सूचक चिन्ह जव्हने आपल्याकडे पाठवले आहे, पण याची किर्ती मात्र निरंतर टिकेल. ज्याप्रमाणे त्या सापाने चिमणीची आठ कोवळी पिले आणि नववी त्यांची आई चिमणी यांना खाल्ले, त्याप्रमाणे नऊ वर्षे ट्रॉयमध्ये आपण युद्ध करू पण दहाव्या वर्षी ती नगरी घेऊ.' असे तो म्हणाला होता, आणि आता ते सगळे खरे होत आहे. म्हणून आपण प्राॲमची नगरी जिंकून घेईपर्यन्त तुम्ही सर्व येथेच रहा."

हे ऐकून आरगॉसवासीयांनी असा प्रचंड घोष केला की, नौकातून त्याचा प्रतिध्वनी पुन्हा पुन्हा उमटू लागला. नंतर जेरीनीचा योद्धा नेस्तॉर त्यांना उद्देशून म्हणाला, "पुरुषासारखे लढण्याऐवजी पोरांसारखे तुम्ही येथे बडबडत रहावे ही तुम्हास अगदी लाजिरवाणी गोष्ट आहे. आपले ते करारनामे कोठे आहेत, आणि आपण घेतलेल्या त्या शपथा ? आपली मद्यार्घ्ये आणि ज्यांच्यावर आम्ही विश्वासून राहिलो ते मैत्रीचे उजवे हात—आपल्या मसलतीं-बरोबरच भस्मीभूत करायचे की काय ? इथे बोलत राहून आपण वेळ फुकट घालवीत आहोत, आणि या साऱ्या बोलण्याने आपण एक पाऊलभरही पुढे जाणार नाही. म्हणून ॲत्रिअसपुत्रा, तुझ्या अढळ संकल्पाला तू दृढ धरून रहा. युद्धासाठी आरगॉसवासी याना पुढे घेऊन चल, आणि जव्ह खरे बोलतो की खोटे हे कळण्यापूर्वीच आरगॉसला परतण्यासाठी व्यर्थ बेत करणाऱ्या या मूठभर लोकांना येथेच कुजत पडू दे. कारण बलशाली सॅटर्नपुत्राने आपण आरगॉसवासी त्रोजन्सना मारण्यास व नष्ट करण्यास नौका हाकारु तेव्हा यशस्वी

होऊ असे वचन नक्कीच दिले आहे. आपल्या उजव्या बाजूकडे त्याच्या वीजा चमकवून त्याने आपल्याला अनुकूल शकून केले; म्हणून हेलनच्या खातर भोगलेले कष्ट नी दुःख यांचा सूड म्हणून प्रथम एकाद्या त्रोजनाच्या वायकोशी शय्यासोबत करीपर्यन्त कोणीही परत जाण्याची घाई करू नये. तरीसुद्धा एकाद्या माणसाला पुन्हा आपल्या घरी जाण्याची जर इतकी घाईच असेल तर त्याने आपल्या नौकेला हात घालावा म्हणजे सर्वासमक्ष दुर्दैवाशी त्याची गाठ पडेल. परंतु हे राजा, विचार कर आणि माझा सल्ला ऐक, कारण मी बोललेला शब्द सहज झिडकारून चालणार नाही. ॲगॅमेम्नॉन, तुझ्या सैनिकांची विभागणी त्यांच्या विविध जमाती आणि घराणी यांच्या अनुसार कर म्हणजे जमाती आणि घराणी एक जुटीने राहून एकमेकांना मदत करतील. हे तू केलेस आणि जर ॲकिअनांनी तुझ्या आज्ञा पाळल्या, तर तुला कळून येईल की कोणते नायक आणि लोक शूर आहेत आणि कोणते भ्याड आहेत; कारण त्यांची एकमेकांशी स्पर्धा चालेल. याप्रमाणे तुला हेही समजेल की स्वर्गाच्या सूचनेमुळे तू त्रॉय जिंकण्यात अपेशी होणार आहेस का मानवाच्या भ्याडपणामुळे."

आणि ॲगॅमेम्नॉनने उत्तर दिले, "नेस्तॉर, सल्लामसलत देण्यात तू पुन्हा ॲकिअनांच्या पुत्रांवर कडी केली आहेस. पिताजव्ह, मिनर्व्हा नी ॲपॉलो यांच्याशपथ सांगतो की ॲकिअनांमधून असे आणखी दहा सल्लागार मला मिळायला हवे होते म्हणजे मग प्राॲम राजाची नगरी त्वरित आपल्या हाती पडून आम्ही ती लुटली असती. पण सॅटर्नपुत्र निरर्थक वितंडवाद आणि झगडे माजवून मला पीडा देत आहे. ॲकिलिझ आणि मी या पोरीबाबत भांडत आहोत——जिच्या प्रकरणी पहिल्याने अपराध माझाच होता; आम्ही दोघे पुन्हा जर एकचित्त होऊ शकलो तर त्रोजन एक दिवस देखील विनाश टाळू शकणार नाहीत. तेव्हा लोकहो, आता तुमचे सकाळचे भोजन करून घ्या म्हणजे आपल्या सेनादलांना युद्ध सुरू करता येईल. तुमच्या भाल्यांना चांगली धार लावा, तुमच्या ढालींची नीट देखभाल करा, तुमच्या घोड्यांना भरपूर चंदीवैरण द्या, तुमच्या रथांची बारकाईने तपासणी करा, म्हणजे आपल्याला दिवसभर लढाई करता येईल, कारण आज आपल्याला विश्रांती मिळणार नाही, रात्र पडल्यामुळे शत्रू व आपण एकमेकांपासून दूर होईपर्यन्त मध्यंतरी निमिषाचीही उसंत राहणार नाही. तुमच्या ढालींचे पट्टे तुमच्या खांद्यावरच्या घामाने भिजतील, भाल्यांवरचे हात थकतील, तुमच्या रथांपुढील घोड्यांच्या अंगातून वाफा निघतील आणि जर मला कोणी मनुष्य लढाईत चुकारपणा करताना

किंवा नौकेवर राहून लढाई टाळू पहाताना सापडला, तर त्याची धडगत नाही, तो कुत्र्या-गिधाडांचे भक्ष्य होईल."

असे तो बोलला आणि ॲकिअनांनी पसंती दर्शवणारी गर्जना केली. सर्व दिशांकडून वादळे लाटांना हाकलीत असता, दक्षिणवायूच्या झोताच्या झपाट्याने त्या उंच उसळून एकाद्या उत्तुंग भूशिरावर आपटून त्यावर अविरत आघात करतात, त्याप्रमाणे ॲकिअन उठून सर्व दिशांना आपापल्या नौकांकडे घाई-घाईने गेले. तेथे आपापल्या तंबूतून त्यांनी चुले पेटवून भोजन सिद्ध केले, आणि प्रत्येकाने युद्धातून जिवानिशी वाचावे म्हणून कोणा ना कोणा तरी देवाला यज्ञाहुती देऊन प्रार्थना केली. नरेश ॲगॅमेम्नॉनने प्रबळ सॅटर्नपुत्रापुढे पाच वर्षांचा एक पुष्ट बैल बळी देऊन सैन्यातील राजपुरुषांना नी ज्येष्ठांना आमंत्रण दिले. प्रथम त्याने नेस्तॉर आणि आयदोमेनिअस राजाला बोलावले, मग दोन अजॅक्सांना नी तायादिअस पुत्राला आणि सहावा होता सल्लामसलतीत देवांना तुल्यगुण युलिसिस; पण मेनेलॉस आपण होऊन आला कारण आपला भाऊ यावेळी किती कार्यव्यग्र आहे हे त्याला माहीत होते. यज्ञबली बैलाभोवती जवाचे पीठ हातात घेऊन ते उभे राहिले, आणि ॲगॅमेम्नॉनने प्रार्थना केली, "महा कीर्तिमान, सर्वश्रेष्ठ, स्वर्गनिवासी, झंझावात-मेघारुढ देवा जव्ह, हे वरदान कर की प्राअॅमचा प्रासाद उद्ध्वस्त होऊन त्याचे दरवाजे आगीत खाक होईपर्यन्त सूर्य अस्तास न जावो व रात्र न पडो. हे माझे मागणे पुरे कर की हेक्तरच्या अंगरख्यातून त्याच्या हृदयात माझी तलवार घुसेल आणि त्याचे साथीदार त्याच्याभोवताली मरणोन्मुख होऊन पडत धुळीला मिळतील."

अशी प्रार्थना त्याने केली पण तो सॅटर्नपुत्र त्याच्या प्रार्थनेला साद देणार नव्हता. त्याने यज्ञाहुती स्वीकारल्या पण तरीही तो त्यांच्या आपत्तीसारख्या वाढवीतच राहिला. जेव्हा त्या वीरांनी प्रार्थना पुरी केली आणि यज्ञबलीवर जवाचे पीठ शिंपडले तेव्हा त्या पशूचे डोके मागे खेचून त्यांनी त्याला ठार मारले आणि सोलून काढले. त्यानी बळीच्या मांड्यांची हाडे कापून काढली, ती चरबीच्या दोन थरात गुंडाळली आणि त्यावर कच्च्या मांसाचे तुकडे ठेवले. फोडलेल्या ओंडक्यांच्या जळणावर एवढा भाग त्यांनी जाळला, पण आतल्या मांसाचे तुकडे शूळावर जाळात धरून तयार होईपर्यन्त भाजले आणि खाली काढून घेतले. जेव्हा मांड्यांची हाडे जळाली व आतले मांसखंड त्यांनी चाखून पाहिले, तेव्हा त्यांनी बाकीच्या मांसाचे बारीक तुकडे करून ते शूळावर खोचले व पक्के भाजून शूळावरून काढून घेतले. मग जेव्हा त्यांचे काम पुरे झाले आणि महाभोजनाची सिद्धता झाली तेव्हा त्यांनी ते मांसखंड खाल्ले

आणि प्रत्येकाला त्याचा पुरा वाटा मिळाला त्यामुळे सर्व संतुष्ट झाले. त्यांचे पुरेसे खाणेपिणे झाल्यावर जेरीनचा वीर नेस्टॉर बोलू लागला, "राजा अॅगॅमेम्नॉन, आपण आता येथे बोलत थांबू नये आणि स्वर्गस्थ देवांनी जे काम आपल्या हाती दिले आहे, त्यात ढिलाई करू नये. दूतांना आज्ञेची घोषणा करू दे की सर्वांनी आपल्या वेगवेगळ्या नौकांपाशी जमावे; मग सेनादलात आपण सर्वत्र फिरू म्हणजे आपल्याला तात्काळ युद्धाची सुरवात करता येईल."

याप्रमाणे तो बोलला आणि अॅगॅमेम्नॉनने त्याचे सांगणे मानले. त्याने लगेच लोकांना एकत्र होण्यासाठी पाचारण करण्यास चौफेर घोषक धाडले. तेव्हा त्यांनी लोकांना बोलावल्यावरून लोक जमा झाले. अॅत्रिअसपुत्रा भोवतालच्या सेनानायकांनी आपले लोक निवडून त्यांना व्यवस्थित रीतीने सभास्थानी मैदानात आले. त्यावेळी मिनर्व्हा आपली अजरामर अमूल्य ढाल घेऊन त्यांच्यामधून संचार करीत होती. त्या ढालीवरून कौशल्याने विणलेले शुद्ध सुवर्णाचे शंभर गोंडे डुलत होते; आणि प्रत्येक गोंड्याचे मोल शंभर बैलांइतके होते. ती ढाल धारण करून ती अॅकिअनांच्या सेनासंभारात इकडे तिकडे द्रुतगतीने आवेशाने फिरत होती. त्यांना पुढे सरकण्याची निकड लावत होती, आणि प्रत्येकाच्या हृदयात धैर्याचा प्रादुर्भाव करून त्याला लढण्यास आणि न थांबता झगडण्यास प्रवृत्त करीत होती. याप्रमाणे त्यांच्या दृष्टीने नौकांतून घरी परतण्यापेक्षाही युद्ध अधिक गोड वाटू लागले. ज्याप्रमाणे डोंगरमाथ्यावर पेटलेल्या मोठ्या वणव्याचा उजेड दूरवर दिसतो त्याप्रमाणे ते कूच करीत असता त्यांच्या शस्त्रास्त्रांची चमक आकाशाच्या नक्षत्रमंडळापर्यंत पोचत होती.

करकोच्यांचे, कलहंसांचे किंवा राजहंसांचे मोठमोठे कळप केस्तर जलाशयाच्या आसपासच्या मैदानावर तोऱ्यात उड्डाण करून स्वतःला धन्य मानीत, आणि पाणथळ प्रदेशावर उतरताना तो आपल्या किंकाळ्यांनी गजवजून टाकीत इतस्ततः संचार करतात, तसेच त्यांचे गणसमूह नौकांवरून आणि तंबूमधून स्कॅमॅन्दरच्या मैदानावर एकाद्या धबधब्यासारखे बाहेर पडले आणि सैनिकांच्या नी घोड्यांच्या पदाघातांनी भूमी पितळेच्या पात्रासारखी खणखणली. वसंतऋतूत फुटणाऱ्या दाट पालवीसारखे ते त्या पुष्पभरित क्षेत्रावर दाटीने उभे राहिले.

ज्याप्रमाणे एकाद्या गोपालाच्या वस्तीवर चरव्या दुधाने माखलेल्या असता वसन्तऋतूत असंख्य माशांचे थवे घोंघावत फिरतात, त्याप्रमाणे त्या समरभूमीवर त्रोजनांवर हल्ला करून त्यांचा निःपात करण्यासाठी अॅकिअनांच्या झुंडीच्या झुंडी आल्या. चारा खाताना एकमेकात मिसळलेले बकऱ्यांचे कळप जसे

अजपाल सहज वेगवेगळे करून घेतात, तसे आपापल्या सैनिकांना चटकन निवडून बाजूला काढून त्यांच्या नायकांनी त्यांना लढाई सुरू होण्यापूर्वी जुळवून त्यांच्या त्यांच्या जागांवर उभे केले आणि मेघनाद स्वामी जव्हसारखे मस्तक नी मुद्रा, मार्ससारखी कंबर आणि नेपच्यूनसारखा वक्षप्रदेश असलेला ॲगॅमेम्नॉन त्यांच्यामधून फिरला. मैदानावरच्या कळपांवर सत्ता गाजवणाऱ्या एकाद्या प्रचण्ड वृषभाप्रमाणे त्या वीरांच्या समुदायात ॲत्रिअसपुत्र जव्हच्या योजनेप्रमाणे अजोड असा उठून दिसत होता.

आणि आता हे, ऑलिम्पसवरील प्रासादात वास करणाऱ्या कलादेवताहो, मला सांगा––कारण तुम्ही देवता आहात आणि सर्वत्र संचार करता व त्यामुळे सर्व गोष्टी प्रत्यक्ष पाहता,––पण आम्हाला मात्र दुसऱ्यांच्या वृत्तांतावर अवलंबून रहावे लागते. दॅनाअनांचे सेनानायक आणि राजे कोण होते ते मला सांगा. सामान्य सैनिकांबद्दल म्हणाल तर, तुम्ही, ऑलिम्पिअन कलादेवतांनी, चिलखतधारी, ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्यकांनी, मला निवेदित केल्याखेरीज जरी मला दहा जिभा असत्या, आवाजाने दगा दिला नसता आणि छाती ब्रॉंझ धातूची असती, तरी मला प्रत्येकाचे नाव सांगता आले नसते. तरीही मी नौकाधिपती आणि नौकादल प्रमुख कोण होते ते सांगेन.

बीओशिअन्सचे प्रमुख होते पेनेलेओस, लैतस, ॲर्सेसिलॉस, प्रोथीनॉर आणि क्लोनिअस. हे होते हायरिआ नी खडकाळ ऑलिसचे रहिवासी, आणि स्कीनस, स्कोलस, एतिओनसचे उंच प्रदेश, थेस्पेइआ, ग्रॅइआ, नी शोभिवन्त मायकॅलेसस नगरी––इतक्या भागांवर त्यांचे राज्य होते. शिवाय हारमा, आयलेसिह्यम नी एरिथरी त्यांचेकडे होती आणि एलेऑन, हाइल नी पेतिऑन ; ओकॅलिआ आणि मी दिऑनचा प्रबळ दुर्ग ; कोपी, युत्रेसिस नी कबुतरांचे आवडते स्थान थिस्बी ; कॉरोनिआ नी हेलिआर्तसची कुरणे ; प्लॅतिआ नी ग्लिसॅस ; छोटचा थीब्सची गढी ; नेपच्यूनची विख्यात वृक्षवाटिका असलेले पवित्र ऑंचेस्तस ; द्राक्षमळ्यांनी समृद्ध आर्ने ; मिदिआ, पवित्र तिसा आणि सागरतीरावरचे ॲन्थेदॉन ही सगळी त्यांच्या ताब्यात होती. याठिकाणाहून पन्नास नौका आल्या होत्या आणि प्रत्येकीवर बिओशिअनांचे एकशेवीस तरुण होते.

ॲस्प्लेदॉन आणि मिन्यासचे राज्य ऑर्कोमेनस येथील रहिवाशांचे नेते मार्सपुत्र ॲस्कॅलॅफस नी आयाल्मेनस होते. ॲझिअसपुत्र ॲक्तर याच्या घरात ॲस्तिऑची या उच्चकुलीन युवतीच्या पोटी ते जन्मले होते ; कारण मार्सबरोबर गुप्तपणे ती वरच्या महालात गेली होती आणि त्याने तिच्याशी समागम केला होता. तिच्या या पुत्रासमवेत तीस नौका आल्या होत्या.

फोसिअन्सचे नेतृत्व होते नॉबोलसपुत्र प्रतापी इफितसचे पुत्र स्केदिअस नी एपिस्त्रोफस यांच्याकडे. सिपॅरिसस, खडकाळ पायथो, पवित्र क्रिसा, दॉलिस आणि पॅनोज्यूस प्रदेशावर त्यांचे राज्य होते ; अॅनेमोरिआ आणि हाअॅम्पोलिस-मधले रहिवासी, सेफिसस नदीजलाभोवतालचे आणि सेफिससच्या उगमा-जवळच्या लिलिआचे लोकही त्यांच्याच राज्यात होते. त्यांच्या नायका-समवेत चाळीस नौका आल्या. आणि नायकांनी विओशिअनांच्या डावीकडे शेजारीच उभे राहिलेल्या फोसिअन सैनिकांची नीट रचना केली.

ऑइलेअसचा वेगवान पुत्र अॅजॅक्स लॉक्रिअन्सवर मुख्य अधिकारी होता. तो तेलॅमॉनपुत्र अॅजॅक्सइतका कर्तबगार किंवहुना त्याच्या जवळजवळ येईल इतकासुद्धा थोर नव्हता. तो लहान खुरा होता आणि त्याचे वक्षकवच तागाचे होते ; पण भाला चालवण्यात तो साऱ्या हेलीनीज नी अॅकिअन्सपेक्षा निपुण होता. हे लोक सायनस, ऑपोडस, कॅलिअॅरस, बेसा, स्कार्फी, सुंदर ऑजिई, तार्फी आणि बोगॅरिअस नदीनजीकच्या थ्रोनिअम प्रदेशातले होते. या अॅजॅक्स-बरोबर युबिआपार राहणाऱ्या लॉक्रिअन्सच्या चाळीस नौका होत्या.

कॅल्सिस, एरित्रिआ, द्राक्षवाटिकासंपन्न हिस्तिइआ, सागरावरील सेरिन्थस आणि उंच खडकावरती वसलेले दिअम या नगरींसह युबिआचे स्वामी उग्र अॅबॉन्तिझ होते ; त्यांच्याबरोबर कॅरिस्तस नी स्तिराचेही लोक होते, त्यांचा अधिपति मार्सच्या वंशातील एलेफेनॉर होता ; तो कॅल्कोदॉनचा पुत्र आणि समस्त अॅबॅन्तिझ लोकांवरचा प्रमुख होता. त्याच्यासमवेत जलद धावणारे, लांब केस ठेवणारे, शत्रूंची वक्षकवचे आपल्या लांब अॅशकाष्ठाच्या भाल्यांनी सतत फाडू पाहणारे ते शूर लढवय्ये आले होते. त्यांच्या पन्नास नौका आल्या होत्या.

आणि प्रत्यक्ष भूमीतून जन्मलेला, पण जव्ह कन्या मिनर्व्हाने पालनपोषण करून स्वतःच्या वैभवशाली पुण्यालयात, अॅथेन्सला, प्रस्थापित केलेला जोमहान एरेक्थिअस, त्याच्या बलिष्ठ अथेन्सनगरीचे सत्ताधारीही त्याच्याबरोबर आले होते. त्या नगरीत वर्षानुवर्षे अॅथिनिअन युवक बैल व मेंढे बळी देऊन त्याची पूजा करतात. यांचा मुख्याधिकारी पेतिओसपुत्र मेनेस्थिअस होता. रथ आणि पदातीयांचा व्यूह रचण्यात याच्या तोडीचा कोणीही पृथ्वीतली पुरुष नव्हता. एकटा नेस्तॉर याच्या बरोबरीचा ठरला असता कारण तो वयाने वडील होता. याच्याबरोबर पन्नास नौका आल्या.

अॅजॅक्सने सॅलॅमिसहून बारा नौका आणल्या आणि त्या अॅथेनिअन्सच्या नौकांच्या ओळीत उभ्या केल्या.

शिवाय आरगॉसचे लोक, आणि हर्मिऑन नी अखातावरील ॲसीनीसह तिरिन्सचे तट ताब्यात ठेवणारे ; त्रिझीनी, इऑनी आणि द्राक्षमळ्यांचा प्रदेश एपिदॉरस ; शिवाय ईजिना नी मॅसिझहून आलेले ॲकिअन युवक ; यांचे नेते होते उच्चरवाने युद्धघोष करणारा दायोमिद आणि विख्यात कॅपॅनिअसचा पुत्र स्थेनेलस ; त्यांच्याबरोबर मेसिस्तिअस राजाचा पुत्र युरिॲलस हा अधिपती होता. पण सर्वांवर दायोमिद प्रमुख होता. यांच्याबरोबर ऐंशी नौका आल्या.

मायसिनिआ या मजबूत नगरीचे संपन्न कॉरिन्थ व क्लिऑनीचे सत्ताधारी ; ऑर्नेई, ॲरिथिरिआ आणि प्राचीन काळी ॲद्रॅस्तस ज्यावर राज्य करीत होता ते लिसिऑन ; हायपरेसिआ, उंच गॉनीसा व पेलीनी ; ईजिअम आणि हेलिसीभोवतालचा सर्व तटवर्ती प्रदेश यांचेही स्वामी ; यासर्वांनी ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉन याच्या अधिपत्याखाली शंभर नौका पाठवल्या होत्या. त्याचे सैन्य सर्वोत्तम आणि संख्येनेही सर्वांपेक्षा जास्त होते आणि चकाकणाऱ्या ब्राँझ धातूचे कवच धारण करणारा, अत्यंत शोभून दिसणारा असा नृपती त्यांच्या मध्यभागी होता––तो सर्व वीरात प्रमुख होता कारण तो सर्वश्रेष्ठ राजा होता व सर्वांपेक्षा अधिक सैनिक त्याच्या दलात होते.

आणि डोंगराळ प्रदेशात सखलभागी वसलेल्या लॅसिदीमॉनचे रहिवासी, तसेच फॅरिस, स्पार्ता, कबुतरांचे आवडते आश्रयस्थान मेसी ; ब्रिसेई, ऑजिई, ॲमिक्की आणि सागराकाठचे हेलॉस ; शिवाय लाआस नी ईतिलस या सर्वत्र देशांतील लोकांचा नेता ॲगॅमेम्नॉनचा भाऊ, उच्चस्वराने युद्धगर्जना करणारा मेनेलॉस होता, आणि त्यांच्या साठ नौका इतरांपासून दूर ओळीने उभ्या होत्या. त्यांच्यामधून स्वतः मेनेलॉस मोठ्या उत्साहाने सैनिकांना लढण्यास प्रोत्साहन देत फिरत होता, कारण हेलनखातर स्वतः भोगलेल्या कष्टांचा आणि दुःखाचा सूड उगवण्याची त्याला उत्कट आकांक्षा होती.

पायलॉस आणि ॲरेनीचे लोक, आणि ॲल्फिअस नदीला जेथे उतार आहे त्या थ्रिअमचे, बळकट ऐपी, सिपॅरिसीझ नी ॲम्फिजेनिआ ; तेलिअम, हेलॉस आणि दोरिअम, जेथे कलादेवता थॅमिरिसला भेटल्या व त्याची शायरी त्यांनी कायमची बंद करून टाकली होती. जेथे युरितस राहात व राज्य करीत होता त्या इकॅलिआहून थॅमिरिस परत येत होता आणि त्याने बढाई मारली की ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्यका कलादेवता आपल्याविरुद्ध स्पर्धेत गायल्या तर त्यांनाही आपण सवाई ठरू ; त्यामुळे त्या रागावल्या आणि त्यांनी त्याला पंगू केले; त्याची गायनाची दिव्यशक्ती त्यांनी छिनावून घेतली आणि त्यानंतर

त्याला वीणा छेडणे अशक्य झाले. या ठिकाणांच्या लोकांचा अधिपती जेरीनचा वीर नेस्तॉर होता आणि त्याच्यासमवेत नव्वद नौका आल्या.

आणि सिलीनीच्या उंच पर्वताच्या पायथ्याशी ईपितसच्या समाधीजवळच्या आर्केदिआच्या प्रदेशावर तावा ठेवणारे, समोरासमोर लढाई करणारे लोक, तसेच फिनिअसचे आणि अनेक कळप पाळणारे ऑर्कोमिनसचे संपन्न लोक, ऱ्हिपी, स्त्रॅती आणि उजाड एनिस्पीचे तेजिआ आणि मनोहारी मंतिनिआचे स्तिम्फेलस आणि पॅऱ्हासिआचे ; या सर्वांचे अधिपत्य अॅन्सिअसपुत्र राजा अॅगॅपेनॉर याजकडे होते ; आणि त्यांच्या साठ नौका होत्या. उत्तम लढवय्ये असे पुष्कळ आर्केदिअन या सर्व नौकांतून आले, पण समुद्र ओलांडण्यासाठी नौका त्यांना अॅगॅमेम्नॉनने निवडून उपलब्ध करून दिल्या होत्या, कारण जल-पृष्ठावरचे व्यवहार करणारे ते लोक नव्हते.

शिवाय ब्युप्रॅसिअमचे लोक आणि ह्यार्मिन, सागरतीरावरचे मार्यासिनस, ओलीनी खडक आणि अॅलेसिअम या स्थळांनी परिवेष्टित असलेल्या एलिसच्या भागातले ; यांचे चार नेते होते. आणि प्रत्येकाच्या दहा-दहा नौकांवर पुष्कळ एपिअन्स होते. त्यांचे अधिकारी होते तीतसपुत्र अॅम्फिमॅकस नी युरितमपुत्र थॅल्पिअस—दोघेही अॅक्तरच्या वंशाचे, आणि दुसरे दोघे होते अॅमॅरिन्सिझपुत्र दायोरीझ नी ऑजिअसपुत्र अॅगॅस्नेनिझ राजाचा मुलगा पॉलिकझेनस.

आणि शिवाय एलिसकडील समुद्रापलीकडे राहणारे पवित्र एकिनिअन द्वीपांसह दयुलिशिअमचे लोक होते. जव्हला प्रिय असलेल्या शूर फिलिअसचा पुत्र, मार्सशी तुल्य असा मेगिझ, जो पित्याशी भांडून दयुलिशिअममध्ये स्थायिक होण्यास गेला होता, तो या लोकांच्या नेतृपदी होता. त्याच्याबरोबर चाळीस नौका आल्या.

इथाका, अंतर्गत वनांसह नेरितम, क्रोसिलिआ, खडवडीत इजिलिप्स, सॅमॉझ आणि द्वीपांजवळच असणाऱ्या भूमिभागासह झॅसिन्थस, या प्रदेशांवर तावा असलेल्या शूर सेफॅलेनिअन्सना युलिसिसचें नेतृत्व होते. हा त्यांचा नेता सल्लामसलतीच्याबाबतीत जव्हच्या समान होता, आणि त्याच्यासमवेत बारा नौका आल्या.

प्ल्यूरॉन, ऑलेनस, पायलीनी, सागरनिकटची कॅल्सिस नी खडकाळ कॅलिदॉन या प्रदेशाचे निवासी ईतोलिअन्स अॅन्ड्रीमॉनपुत्र थोआस याच्या अधिपत्याखाली होते, कारण महान राजा ईनिअस याचे कोणीच पुत्र हयात नव्हते. आणि तो स्वतःही मरण पावला होता ; तसाच सोनेरी केसांचा मेलीगरही, ज्याला

ईतोलिअन्सवर राजा म्हणून नेमण्यात आले होते, मरण पावला होता. आणि थोआससह चाळीस नौका आल्या. नॉसस, उत्तम बांधणीच्या तटांची नगरी गॉर्तिझ, शिवाय लिक्तस, मायलेतस नी चुनखडीवर वसलेली लायकॅस्तस, फीस्तस आणि ऱ्हिशिअम या प्रजाबहुल नगरी, यांचे शासक क्रीतचे लोक व क्रीतच्या शंभर नगरीत राहणारे इतर विविध लोक हे सर्व विख्यात भालाईत आयदोमिनिअस आणि संहारक मार्सशी तुल्यबल मेरिओनिस यांच्या नेतृत्वाखाली आले होते आणि त्यांच्याबरोबर ऐंशी नौका आल्या होत्या.

हर्क्युलिझपुत्र, शूर तसाच महाकाय लेपॉलिमस याने ऱ्होड्सहून भव्य योद्धयांनी भरलेल्या नऊ नौका आणल्या होत्या. चुनखडीवर वसलेल्या कॅमेइरस, आरलिसस व लिडस या तीन नगरीत विभागलेल्या ऱ्होड्समध्ये हे योद्धे रहात होते. या लोकांचा अधिपती लेपॉलेमस हा हर्क्युलिझपासून ॲस्तिऑकिया हिला झालेला पुत्र ; शूर लढवय्यांच्या अनेक नगरी लुटल्यावर सेलेइस नदीवरच्या एफिराहून या ॲस्तिओकिआला हर्क्युलिझने पळवून नेले होते. लेपॉलिमस जेव्हा मोठा झाला तेव्हा त्याने आपल्या उमेदीच्या काळात प्रसिद्ध ठरलेला लढवय्या पण यासुमारास वृद्ध झालेला असा आपल्या पित्याचा चुलता लिसिनिअस याला ठार मारले. त्यानंतर त्याने स्वत:साठी एक नौका-दल बांधून सिद्ध केले. अनुयायांचा मोठा जमाव गोळा केला नी समुद्रपार पोबारा केला, कारण हर्क्युलिझच्या इतर पुत्रांची व नातवांची त्याला दहशत होती. पुष्कळ हालअपेष्टात आपली सफर पुरी करून तो ऱ्होड्सला आला ; तेथे जमातींनुसार लोकांचे तीन विभाग झाले ; त्यांच्यावर देवांचा व माणसांचा स्वामी जव्ह याचे फार प्रेम होते ; म्हणून त्या सॅटर्नपुत्राने त्यांच्यावर विपुल संपत्तीचा वर्षाव केला.

इलिअमपाशी आलेल्या सर्व*दॅनाअन्समध्ये, पेलिअसच्या खालोखाल देखणा पुरुष नायरेअस याने सायमीहून तीन नौका आणल्या ; कारण तो फारसा संपन्न नव्हता आणि त्याचे अनुयायी फारच थोडे होते.

आणि निसिरस, क्रॅपॅथस नी युरिफिसच्या कॉस नगरीसह कॅसस, तशीच कॅलिदनिअन द्वीपे, या प्रदेशांचे जे शासक होते त्यांच्यावर हर्क्युलिझपुत्र राजा थ्रेस्सॅलसचे दोन मुलगे फीदिपस नी ॲन्तिफस यांचे आधिपत्य होते व त्यांच्या-बरोबर तीस नौका आल्या.

शिवाय पेलॅस्जिक आरगॉस, ॲलॉस, ॲलोपी व ॲकिसचे लोक आणि थिआचे व सुंदर स्त्रियांबद्दल विख्यात असलेले हेलासचे लोक—ज्यांना मिर्मिडॉन म्हणत

व हेलीनीज आणि ॲकिअन्स हे होते व यांच्या पन्नास नौका होत्या व त्यांच्यावर आधिपत्य ॲकिलिझचे होते ; पण त्यांची व्यूहरचना करणारा कोणी नसल्यामुळे यावेळी युद्धात ते लोक काहीच भाग घेत नव्हते ; कारण ॲकिलिझ आपल्या नौकांपाशीच थांबून राहिला होता ; सेलेपसपुत्र एव्हेनॉर राजाच्या मायनिझ व एपिस्त्रोफस या मुलांचा पाडाव करून, व लॅर्नेसस व थीबीनगरी लुटल्या तेव्हा स्वतःचा जीव धोक्यात घालून लैर्नेससमधून जिंकून आणलेली कन्या ब्रिसेइस हातून गेल्यामुळे ॲकिलिझ संतप्त झाला होता. तिच्याप्रीत्यर्थ अजूनही तो हळहळत होता, पण लौकरच त्याला इतर लढवय्यात सामील व्हावे लागणार होते हे पुढे दिसून येईल.

आणि फैलेसी व सेरीस देवीचे पुण्य स्थान असलेल्या पायरॅससच्या पुष्पमंडित कुरणातील लोक, मेंढ्यांची मातृभूमी आइतॉन, सागरतीराची ॲन्त्रम आणि गवताळ क्षेत्रावरची तेलिअम येथील लोक; जिवंत होता तोवर शूर प्रॉतेसिलॉस यांचा अधिपती होता. पण आता तो भूमीखाली चिरनिद्रिस्त होता. फिलॅसी येथे त्याच्यामागे राहिलेली त्याची पत्नी दुःखाने गाल ओरबाडून घेत होती. आणि त्याचे घर अर्धेच बांधून झाले होते, कारण त्रॉयच्या भूमीवर ॲकिअनाच्या अग्रभागी युद्धात उडी घेतानाच त्याला एका दार्देनिअन योद्ध्याने ठार मारले होते. ते लोक आपल्या नेत्यासाठी शोक करीत असता देखील त्यांना नायक नाही असे झाले नव्हते, कारण मार्सकुळाचा पॉर्दॅसिझ याने त्यांची व्यूहरचना केली. मेंढ्याच्या कळपानी संपन्न अशा इफिक्लसचा तो मुलगा; इफिक्लस स्वतः फिलॅकसचा मुलगा; पॉर्दॅसिझ प्रॉतेसिलॉसचा सख्खा पण धाकटा भाऊ; युद्धात पडलेला थोरला भाऊ प्रॉतेसिलॉस जास्त पराक्रमी होता; तथापि त्याच्या-अभावी त्याचे लोक नेत्याविना राहिले नव्हते ; ते जरी तो गमावल्याचे दुःख करीत होते तरी पॉर्दॅसिझ त्याच्या जागी होता, त्याच्याबरोबर चाळीस नौका आल्या.

आणि नेबीअन सरोवराकडेची फेरीनगरी, त्याबरोबरच बीबी, ग्लॅफिरी आणि प्रजाबहुलनगरी आयोल्कस यांच्यावर ताबा असणारांच्या अकरा नौकांसह त्यांचा पुढारी होता युमेलस; तो ॲद्मेतसला, पेलिआसच्या सर्वात सुंदर ॲल्सेस्तिस नामक कन्येपोटी झालेला पुत्र होता.

आणि मेथोनी नी थॉमेसिआ, त्याबरोबरच मेलिबीआ, खडबडीत ऑलिझॉन या नगरींचे जे सत्ताधारी होते त्यांना निष्णात धनुर्धर फिलोक्तेतिझचे नेतृत्व लाभले होते आणि त्यांच्याकडे प्रत्येकी पन्नास वल्हेकरी-जे उत्तम तिरंदाजही होते-असलेल्या सात नौका होत्या; पण स्वतः फिलोक्तेतस तीव्र यातना भोगीत

लेम्नॉस बेटावर पडला होता. कारण त्याला एक विषारी जल सर्प चावल्यामुळे ॲकिअन्सपुत्रांनी त्याला तेथे सोडून दिले होते; तेथे तो रुग्ण नी कष्टमय अवस्थेत होता आणि लौकरच आरगॉसवासीयांना तो सोडून गेला. त्याच्या लोकांना ही हानी फार जाणवली पण ते निर्णायक राहिले नाहीत. कारण ऑइलिअसला र्‍हीनीपोटी झालेला अनौरस पुत्र मेदॉन त्यांची मांडणी करीत होता.

शिवाय त्रिक्काचे आणि इथोमीच्या दगडाधोंड्यांच्या प्रदेशाचे; तसेच इकॅलिअन युरितसची नगरी इकॅलिआनचे या लोकांवर व्याधिशमवात निष्णात अशा इस्क्युलॅपिअरचे दोन पुत्र, पोदॅलिरिअस व मॅकॲऑन यांचे आधिपत्य असून त्यांच्याबरोबर तीस नौका आल्या होत्या.

शिवाय ऑर्मेनिअसचे नी हैपेरिआ झर्‍याजवळचे लोक; यांच्याबरोबरच ॲस्तेरिअस व तायतॅनसची शुभ्र शिखरे ताब्यात ठेवणारे लोक यांचा युइमॉनपुत्र युरिफिलस हा नेता होता. आणि त्यांच्याबरोबर चाळीस नौका आल्या होत्या.

आर्गिसा नी गिर्तोनी, ओर्थी, इलोनी आणि शुभ्रनगरी ओलोसॉन, येथील लोकांचा पॉलिपितिझ हा शूर वीर पुढारी होता. तो खुद्द जव्हचा पुत्र पिरिथॉउसचा मुलगा; ज्यादिवशी पिरिथॉउसने केसाळ पर्वतवासी वन्यजनांवर सूड उगवून त्यांना पेलिऑन गिरीवरून ऐथिसिझला हाकलून लावले, त्याच दिवशी त्याला हिप्पोदॅमैआच्या पोटी झालेला हा मुलगा. पण पॉलिपीतिझ हा एकटाच पुढारी नव्हता, कारण त्याच्या जोडीला मार्सकुळीचा सीनिअससुत कॉरॉनसपुत्र लेऑन्तिअस होता. आणि यांच्याबरोबर चाळीस नौका आल्या होत्या. सायफसहून गनिअसने बावीस नौका आणल्या, आणि त्याच्यामागून आले एनिअनीज आणि पेनिअसमध्ये आपले पाणी सोडणार्‍या तितॅरेसिअस या सुंदर नदी भोवतालच्या भूमीचे धारक आणि शीत हवेच्या दो दोना परिसराचे रहिवासी शूर पेरीबी. तितॅरेसिअसचे पाणी पेनिअसच्या चंदेरी भोवर्‍यात मिसळत नाही, तर तेलासारखे त्यांच्यावरूनच वाहत राहते, कारण तितॅरेसिअस ही भयावह ऑर्कसची तशीच स्तिक्सचीही शाखा आहे.

तेन्थ्रेद्रॉनपुत्र प्रोथोडस हा मॅग्नेतीझांचा अधिपती होता. पेनिअस नदी आणि पेलिअन गिरी यांच्या आसमंतात वसणारे ते लोक; जलद धावणारा प्रोथोडस त्यांचा अग्रणी होता आणि त्याच्यासमवेत चाळीस नौका आल्या.

याप्रमाणे दॅनाअन्सचे सेनानायक आणि राजे होते. मग हे कलादेवते, ॲत्रेअसपुत्रांच्या अनुयायांपैकी, मनुष्य असो वा अश्व, अग्रेसर असा कोण होता?

घोड्यांपैकी फेरेझ पुत्राचे घोडे इतरांपेक्षा फारच उत्कृष्ट होते. युमेलस त्यांना चालवित असे. ते अश्व पक्ष्यांसारखे वेगवान होते. ते एका वयाचे

आणि रंगाचे तसेच पूर्णतः एकसारख्या उंचीचे होते. रौप्य धनुर्धारी अॅपॉलोने पेरिआत त्यांचे पालनपोषण संवर्धन केले होते-दोन्ही घोडया होत्या नी युद्धात मार्ससारख्या भयंकर. वीर पुरुषात तेलॅमॉनपुत्र अॅजॅक्स इतरांच्यात बराच श्रेष्ठ होता; पण तो अॅकिलिझचा राग टिकून राहील तोपर्यंतच, कारण अॅकिलिझ त्याच्यापेक्षा पुष्कळच श्रेष्ठ होता आणि त्याचे घोडेही जास्त चांगले होते; पण अॅगॅमेम्नॉन बरोबरच्या भांडणामुळे यावेळी अॅकिलिझ आपल्या नौकांवर तुटकपणे दूर राहिला होता, आणि त्याचे लोक समुद्रकिनाऱ्यावर थाळीफेक, भाल्याने नेमबाजी आणि शरसंधान अशा क्रीडात वेळ घालवित होते. त्यांचे घोडे आपापल्या रथांपाशी कमळाचे देठ आणि वन्य सेलेरी वनस्पती चघळत उभे होते. रथ सुरक्षित घरात ठेवलेले होते; पण त्यांचे धनी कोणी नेता नसल्यामुळे सेनादलात इकडून तिकडे हिंडत होते आणि युद्धात लढण्यास जात नव्हते.

याप्रमाणे तो सेनासंभार एकाद्या सर्वभक्षक वणव्यासारखा पुढे कूच करू लागला, आणि जेथे तिफिअस जमिनीखाली पडलेला आहे म्हणतात त्याच्या भोवतालच्या अॅरिमीमधील भूमीवर क्रुद्ध झंझावात-प्रति फटके मारीत असता भूमी जशी विव्हळली तशी सपाटीवरून वेगाने चालणाऱ्या त्या सैन्याच्या पदाघातांखाली धरणी विवळू लागली.

आणि मग जव्हने वायुगती आयरिसला त्रोजन्सकडे ही वाईट वार्ता सांगण्यास पाठवले. ते सारे तरुण व वृद्ध लोक प्राअॅमच्या दरवाजांपाशी सभेसाठी जमले होते. प्राअॅमचा पॉलितिझ हा पुत्र जलद धावणारा असल्यामुळे अॅकिअन्सचा एकादा हल्ला झाल्यास लक्ष ठेवण्यासाठी वृद्ध इसायतिझच्या समाधीवर टेहळचा म्हणून त्याला ठेवले होते. त्याच्या आवाजात बोलत आयरिस प्राअॅमच्या अगदी जवळ आली. त्याच्या पुत्राचे रूप घेऊन ती म्हणाली, "वृद्ध माणसा, युद्ध हाताशी आले असता तू शांततेच्या काळातल्यासारखा उगाच बोलत बसला आहेस. मी पुष्कळ लढायात होतो पण आता पुढे येत असलेल्या सेनेसारखा सेनासंभार अद्यापि कधीच पाहिला नव्हता. पानासारख्या किंवा समुद्राच्या वाळूसारखा गर्द जमाव नगरीवर हल्ला करायला मैदान ओलांडीत आहे. हेक्तर, सर्वांच्याहून जास्त तुझ्यावर मी ही जबाबदारी टाकतो, मी सांगतो तसे कर. दूरदूरच्या ठिकाणांचे आणि विविध भाषा बोलणारे पुष्कळ मित्रपक्षीय प्राअॅमच्या नगरीत विखुरलेले आहेत. तेव्हा प्रत्येक नायकाला स्वतःच्या लोकांस आज्ञा करू दे, त्यांचे वेगवेगळे व्यूह रचू दे आणि युद्धभूमीवर त्यांना घेऊन जाऊ दे."

असे ती बोलली पण हेक्तरने ती देवी होती हे ओळखले व तात्काल सभा विसर्जित केली. लोक शस्त्रास्त्रांकडे धावले, सगळया वेशी उघडण्यात आल्या आणि त्यांमधून, घोडयावरून व पायी मोठया जमावाच्या पदाघातांसारखा आवाज करीत लोक गर्दी करीत बाहेर पडले.

आता नगरीपुढच्या मैदानावर एक सुटाच असा उंचवटा आहे; लोक त्याला बॅतिसिआ म्हणतात, पण देवांना माहीत आहे की ती चपळ मैरिनीची समाधी आहे. येथे त्रोजनांनी आणि त्यांच्या मित्रपक्षीयांनी आपापल्या सैन्यांची विभागणी केली.

प्राअॅमपुत्र, चमकदार शिरस्त्राणधारी महान हेक्तर त्रोजन्सचा सेनापती होता आणि त्याच्यासमवेत लढाईसाठी उत्सुक असे बऱ्याच अधिक संख्येचे आणि सर्वात शूर सैनिक सेनारचना करून तयार होते.

देवी असूनही इदा पर्वताच्या उतारावर अँकिसिझशी समागम केल्यामुळे व्हीनसला झालेला पुत्र शूर ईनिअस हा दार्दानिअन्सचा नेता होता. तो एकटा नव्हता कारण त्याच्यासमवेत आर्किलोकस व अॅकॅमास हे दोघेही युद्ध कलाप्रवीण अॅन्तेनॉर पुत्र होते.

इदा पर्वताच्या सर्वात ठेंगण्या निमुळत्या टोकाखाली ते लिआत वस्ती करणारे, वैभवसंपन्न, ईसिपस नदीचे स्वच्छ पाणी पिणारे, त्रोजन रक्ताचे लोक, अॅपॉलोने ज्याला धनुर्विद्या शिकवली त्या लायकॅओनचा पुत्र पॅन्दॅरस, याच्या नेतृत्वाखाली होते.

अॅद्रेस्तआ व अॅपीससची पित्येइआसकरची भूमी आणि तेरैआचा उंच पर्वत, या भागांचा ताबा ठेवणाऱ्यांचे नेते अॅद्रेस्तस, नी तागाच्या वस्त्राचे वक्ष कवच घालणाऱ्या अॅम्फिअस कडे होते. सर्व प्रकारच्या शकुन परीक्षणात प्रवीण अशा पेरकोतच्या मेरॉप्सचे हे पुत्र. त्याने युद्धात भाग घेऊ नका म्हणून त्यांना सांगितले होते पण त्यांनी त्याच्याकडे दुर्लक्ष केले कारण दैवाने भूल पाडून त्यांना विनाशाकडे चालवले होते.

पेरकोत आणि प्रॅक्तिअसच्या, तसेच सेस्तॉस, अॅबिदॉसनी अॅरिस्बीच्या आसमंतात राहणाऱ्यांचे नेतृत्व अॅसिअसकडे होते; हा अॅसिअस शूर सेनापती हिर्तॅकसचा पुत्र; सेलेइस नदीच्या आसपासच्या भागातल्या पैदाशीचा गर्द लाल-तांबिरी रंगाच्या त्याच्या प्रबळ अश्वांनी त्याला अॅरिस्बीहून आणले होते.

सुपीक लारिसात राहणाऱ्या पेलॅस्गिअन भालाईत जमातींचे पुढारी मार्स-वंशीय, त्यूतॅमसपुत्र पेलॅस्गिअन लेथसचे मुलगे-हिप्पोथॉउस आणि त्याचा भाऊ पायलिअस हे होते.

थ्रेसिअन्स नी हेलेस्पाँन्तच्या प्रचंड प्रवाहापलीकडील लोकांचे अधिपत्य ॲकॅमास आणि वीर पैरुस याजकडे होते.

सिकोनिअन भालाइतांचा प्रमुख सीऑसपुत्र त्रीझेनस याचा मुलगा युफीमस होता.

पृथ्वीवर वाहणाऱ्यांपैकी सर्वात सुंदर ॲक्सिअस नदीच्या रुंद पात्राकाठी वसलेल्या दूरच्या ॲमिदॉनचे पीऑनिअन तिरंदाज पिरिक्मिझच्या नेतृत्वाखाली आले होते.

जेथे खेचरे कळपाकळपांनी अनियंत्रित संचार करतात त्या एनेतीचा निधडच्या छातीचा पायलिमिनिझ पॅफ्लॅगॉनिअन्सचा अधिपती होता. सायतोरस, सेसामस भोवतालचा प्रदेश, पार्थोनिअस नदीकाठच्या नगरी क्रॉम्ना, इजिॲलस आणि उंचावर वसलेली एरिथिनी हा त्या लोकांच्या ताब्यातला प्रदेश.

चांदीच्या खाणी असलेल्या दूरच्या ॲलायबीच्या हॅलिझोनीवर प्रमुख ओदिअस आणि एपिस्त्रोफस होते.

मायसिअन्सचे पुढारी होते क्रोमिस आणि शकुनज्ञ एन्नॉमस; पण एन्नॉमसला त्याचे शकुनज्ञान नाशापासून बचावू शकले नाही, कारण इॲकसच्या चपळ वंशजाच्या हातून तो नदीत मारला गेला व त्रोजन्सपैकी इतरही तेथे मारले गेले. शिवाय ॲस्कॅनिआ या दूर देशाच्या फ्रिजिन्सचे नेते फोर्सिझ नी उच्चकुलीन अस्कनिअस हे होते, आणि दोघेही युद्धासाठी उत्सुक होते.

त्मोलस पर्वताखाली राहणाऱ्या मिऑनिअन्सचे अधिपत्य तॅलिमेनिझच्या जिगिअन सरोवरातून जन्मलेल्या मेस्थलिझ व ॲन्तिफस या पुत्रांकडे होते.

विचित्र भाषा बोलणाऱ्या कॅरिअन लोकांचा नेता नॅस्तिझ होता. त्या लोकांकडे मायलेतस व थायरिझच्या वनविभूषित पर्वताप्रमाणेच मिॲन्दर नदी आणि मायकॅली पर्वताच्या उत्तुंग शिखरांचा ताबा होता. त्यांचे अधिपती नॅस्तिझ नी ॲम्फिमॅकस हे नॉमिअनचे शूर पुत्र होते. तो मूर्ख असल्यामुळे अंगावर मुलीसारखे सोने घालून लढाईला आला. जीव वचावण्यास त्या सोन्याचा त्याला काही उपयोग झाला नाही. कारण इॲकसच्या चपळ वंशजाच्या हातांनी तो नदीत मारला गेला, आणि त्याचे सोने ॲकिलिझ घेऊन गेला.

झांथस नदीच्या भोवरे असलेल्या पाण्याभोवतींच्या दूरदेशीय लिसिअन्सचे नेतृत्व सर्पेडॉन नी ग्लॉकस यांच्याकडे होते.

● ● ●

## सर्ग ३

प्रत्येकाची आपल्या प्रमुखाखाली, याप्रमाणे सेनासमूहांची व्यवस्थित रचना झाल्यानंतर, वर्षा आणि शीतऋतूंनी हाकलल्यामुळे ओशॅनसच्या वाहत्या पाण्यावरून उडणारे रानटी पक्षी किंवा बगळे जसे आकाशात किंचाळत, भांडत उडत जातात तसे पिग्मी जमातींचा मृत्यू आणि विनाश घडविण्यास ट्रोजन्स पुढे चालले; पण ॲकिअन्स मोठ्या उमेदीत, एकमेकांना मदत करण्याच्या निश्चयाने मूकपणे चालले होते.

जेव्हा दक्षिणेचा वारा मेंढपाळांना प्रतिकूल पण चोरांना रात्रीपेक्षा अनुकूल असा धुक्याचा पडदा डोंगरमाथ्यावर पसरतो, आणि माणसाला फेकलेल्या दगडाच्या टप्प्या पलीकडचे काही दिसत नाही, त्याप्रमाणेच ते पुऱ्या वेगाने त्या सपाट भूमीवरून मजल मारीत असता त्यांच्या पायाखालची धूळ आकाशात वर उडून पडद्यासारखी त्यांच्या सभोवार पसरत होती.

ते जेव्हा एकमेकांसमीप आले तेव्हा ट्रोजनांच्या बाजूचा प्रातिनिधिक वीर म्हणून अलेक्झँड्रस पुढे आला. त्याने खांद्यावर चित्त्याचे कातडे, धनुष्य आणि तलवार धारण केली होती; नी सर्वात शूर अशा ॲकिअनाला एकाकी द्वंद्वयुद्धास भिडण्यासाठी आव्हान या अर्थी ब्रॉझने मढवलेले दोन भाले तो परजीत होता. त्याला याप्रमाणे टांगा टाकीत शिपायांच्या ओळीपुढे येताना मेनेलॉसने पाहिले आणि एकाद्या बोकडाचा अथवा शिंगाड्या काळविटाचा मृतदेह अचानक आढळताच, कुत्री आणि तरूण शिकारी यांचा हल्ला न जुमानता तेथल्या तेथेच भक्ष्याचा फडशा पाडणाऱ्या भुकेल्या सिंहासारखा मेनेलॉसला आनंद झाला. अलेक्झँड्रसला पाहताच मेनेलॉस अगदी तसाच आनंदला कारण त्याला वाटले की आता आपल्याला सूड घेता येईल. म्हणून कवच धारण करणाऱ्या त्या वीराने रथावरून खाली उडी टाकली.

मेनेलॉसला समोरून येतांना पाहून ॲलेक्झँड्रस कचरला, आणि, जिवाच्या भयाने अंग चोरून त्याने आपल्या सैनिकांचा आडोसा घेतला. एकाद्या डोंगरदरीतून चालताना एकाएकी पुढे साप आल्यावर दचकून घाबरगुंडी वळून, कापत, चेहरा फिक्का पडून जसा एकादा मागे होतो, तसा ॲत्रियसपुत्र दिसताच अलेक्झँड्रिनस भयग्रस्त होऊन ट्रोजन योद्ध्यांच्या गर्दीत घुसला.

तेव्हा हेक्तरने त्याची कानउघाडणी केली, तो म्हणाला, "पॅरीस, अरे दुरात्म्या, दिसायला देखणा पण बाईलवेडा, खोटे बोलणारा, तू कधी जन्मलाच नसतास किंवा लग्नाआधीच मेला असतास तर बरे झाले असते; जिवन्त राहून अपमान सोसण्यापेक्षा व तुच्छतादर्शक कटाक्षांचे लक्ष्य होण्यापेक्षा मेलेले बरे. तसे झाले असते तर फार बरे झाले असते. अकिअन्स आपली हेटाळणी करून म्हणणार नाहीत का की आम्ही त्यांना जो कैवारी वीर म्हणून आमच्याकडून पाठवला तो दिसायला गोरागोमटा, पण त्याला बुद्धीही नाही नी हिंमतही नाही! असा तू असलास तरी, तू आपले अनुयायी गोळा करून नौकांतून समुद्रपार गेला होतास की नाहीस? दूर देशाहून लढवय्ये लोकांतली लग्न, झालेली एक सुंदर स्त्री पळवलीस की नाहीस? आणि त्यामुळे आपल्या वडिलांवर, स्वतःच्या नगरीवर व तुझ्या साऱ्या देशावर दुःख ओढवायला, पण शत्रूंना आनंद द्यायला नी स्वतःला खजील, लाजिरवाणेपणा आणायला, कारण झालास की नाहीस? आणि आता मेनेलॉसला समोरासमोर तोंड द्यायला कातर झालास! ज्याची बायको तू चोरली आहेस तो मनुष्य कशा प्रकारचा आहे हे जाणून घ्यायला हिंमत का होत नाही तुला? त्याच्यापुढे तू धुळीत पडशील तेव्हा तुझी वीणा नी तुझ्या प्रेमाच्या लटपटी, तुझी सुरेख केसांची झुलपे आणि गोंडस चेहरा हे सगळे खरोखर कोठे असेल? खरोखर त्रोजन्स हे ढिले, खंबीरपणा नसलेले लोक आहेत; नाही तर त्यांना तू जो त्रास दिला आहेस, त्यांचे जे अपराध तू केले आहेस त्याबद्दल त्यांनी तुझ्यावर दगडफेक करून तुला दगडांनी झाकून टाकले असते."

आणि अॅलेक्झँद्रसने उत्तर दिले, "हेक्तर, तू दिलेस ते दूषण न्याय्य आहे. नौका घडवणारा कारागीर आपल्या कामासाठी हवे तसे लाकूड चिरण्यासाठी जी कुऱ्हाड चालवतो, तिच्यासारखा तू कठोर आहेस. त्या नौका घडवणाऱ्याच्या हातातील कुऱ्हाडीच्या धारेसारखी तुझ्या तिरस्काराची धार आहे. तरीपण हिरण्मयी व्हीनसने मला दिलेल्या देणग्यांबद्दल मला टोमणे मारू नको; कारण त्या बहुमोल आहेत. कोणीही मानवाने त्यांची अवहेलना करू नये, कारण देव त्यांना इच्छा होईल तेथेच ती उपायने प्रदान करतात, आणि कोणालाही नुसते मागून ते उपाहार मिळत नाहीत. मेनेलॉसशी मी लढावे असे तुला वाटत असले तर त्रोजन्स आणि अॅकिअन्स आपापल्या स्थानीं बसू देत, आणि त्यांच्यासमोर तो आणि मी हेलनच्या आणि तिच्या सर्व संपत्तीच्या प्रित्यर्थ लढा करू. विजयी होऊन जो अधिक योग्य मनुष्य ठरेल त्याने ती स्त्री आणि तिचे सर्वस्व घेऊन स्वगृही जावे; पण बाकीच्यांनी असा संधी करण्याच्या

करारावद्दल गंभीर शपथ घ्यावी की ज्यामुळे तुम्ही त्रोजन येथे त्रॉयमध्ये रहाल आणि बाकीचे स्वदेशी आरगॉसला आणि ॲकिअन्सच्या भूमीला परत जातील."

हे हेक्तरने ऐकले तेव्हा त्याला बरे वाटले, आणि त्रोजनांच्या सैन्यामधून, भाला मध्ये आडवा धरून त्याने त्यांना मागे सारीत तो फिरला. आणि त्याच्या आज्ञेवरून ते सगळे खाली बसले; पण दगडांनी आणि बाणांनी त्यांच्यावर अजून ॲकिअन्स नेम धरीत होते; शेवटी त्यांच्यावर ॲगॅमेम्नॉन ओरडला, "थांबा ॲकिअन्स पुत्रांनो, बाण सोडू नका; हेक्तरला काहीतरी बोलण्याची इच्छा आहे असे दिसते."

नेम धरून बाण व दगड फेकणे बंद करून ते स्तब्ध राहिले; नंतर त्यावर हेक्तर बोलू लागला, "माझ्या तोंडून ऐका, त्रोजन्स आणि ॲकिअन्सहो, ज्याच्यामुळे हे भांडण घडून आले त्या ॲलेक्झँद्रसचे म्हणणे. तो सांगतोय की त्रोजन्स नी ॲकिअन्सनी आपापली शस्त्रास्त्रे खाली ठेवावी, आणि तुमच्यासमोर हेलनसाठी आणि तिच्या साऱ्या संपत्तीसाठी त्याचे नी मेनेलॉसचे युद्ध होईल. जो विजयी होऊन अधिक श्रेष्ठ पुरुष ठरेल त्याला ती स्त्री नी तिचे सर्वस्व घेऊन स्वगृही जाऊ द्या, पण बाकीच्यांनी शांतता पाळण्याच्या करारावद्दल शपथ घ्यावी."

याप्रमाणे तो बोलला आणि सारे शांत राहिले. मग उच्च रवाने रणगर्जना करणारा मेनेलॉस त्यांना उद्देशून म्हणाला, "आणि आता माझेही ऐका, कारण अधिक अन्याय झाला आहे तो माझ्यावर. माझ्या ॲलेक्झँद्रसशी झालेल्या कलहामुळे आणि त्याने माझ्यावर केलेल्या अन्यायामुळे तुम्हाला कितीतरी कष्ट भोगावे लागले आहेत ते पाहता, मला वाटू लागले आहे की ॲकिअन्सनी त्रोजन्स या दोघांनी एकमेकांची संगत सोडून निघून जाण्याचा क्षण जवळ आला आहे हे फार बरे झाले आहे. जो मरणार असेल त्याला मरू द्या, पण बाकीच्यांनी पुढे लढू नये. तर मग आणा पृथ्वी आणि सूर्या प्रीत्यर्थ दोन कोकरें एक पांढरा मेंढा नी एक काळी मेंढी आणि तिसरी आम्ही जव्ह प्रीत्यर्थ आणू. त्याशिवाय तुम्ही प्राअॅमला इथे यायला सांगितले पाहिजे म्हणजे संधीच्या कराराची तो स्वतः शपथ घेईल. कारण त्याचे पुत्र मनस्वी उद्दाम आणि विश्वासास अपात्र आहेत, आणि जव्हच्या नावाने घेण्याच्या शपथांचे उल्लंघन होता कामा नये आणि त्या उच्छृंखलपणेही घेतल्या जाऊ नयेत. तरुण पुरुषांची मने वायूसारखी थिल्लर असतात पण वृद्ध मनुष्य विचार करतो. तेव्हा तो मागचे पुढचे पाहून दोन्ही पक्षांना सर्वोत्कृष्ट न्याय मिळेल तसेच करायचे ठरवतो."

त्रोजन्स व ॲकिअन्सना हे ऐकून आनंद झाला, कारण त्यांना वाटले की आता आपल्याला विश्रांती मिळणार. त्यांनी आपापले रथ मागे, सैनिकांच्या रांगांजवळ घेतले ; त्यातून उतरून अंगावरची चिलखतेही उतरली व ती खाली भूमीवर ठेवली, आणि उभय सेना एकमेकींच्या समीप येऊन मध्ये अगदी थोडे अंतर ठेवले. कोंकरे आणायला व प्रॲमला येण्यासाठी निरोप पाठवण्यास नगरीत दोन दूत पाठवले, आणि नौकांवरून तिसरे कोकरू आणण्यास ॲगॅमेम्नॉनने तॅल्थिविअसला सांगितले, आणि तद्नुसार त्याने केले.

दरम्यान हेलनकडे तिच्या नणंदेच्यारूपाने आयरिस गेली ; ही ॲन्तेनॉर पुत्राची पत्नी ; कारण ॲन्तेनॉर पुत्र हेलिकॲऑन याने प्राॲमच्या सर्वात सुंदर मुलीशी, लॅओडिसीशी लग्न केले होते. तिला हेलन स्वतःच्या महालात एका मोठ्या जांभळ्या तागाच्या कापडावर भरतकाम करीत असताना दिसली ; तिच्याखातर त्रोजन्सना व ॲकिअन्सना ज्या लढाया करण्यास मार्सने उद्युक्त केले होते त्यांचे देखावे ती भरीत होती. तेव्हा आयरिस तिच्याजवळ गेली व म्हणाली, "इकडे ये बाळे, आणि बघ ती त्रोजन्स नी ॲकिअन्सची विचित्र कर्मे ; युद्धमदाने वेडे होऊन आतापर्यंत रणक्षेत्रावर ते झुंजत होते ; आता त्यांनी लढाई सोडून दिली आहे आणि ते ढालीवर रेलून स्वस्थ बसले आहेत व त्यांनी आपले भाले शेजारी जमिनीत खुपसून ठेवले आहेत. तुझ्यासाठी ॲलेक्झँद्रस नी मेनेलॉस आता लढणार आहेत. आणि जो विजयी होईल त्याची तू बायको होणार आहेस."

देवी असे बोलली आणि हेलनला तिचा पूर्वीचा पती, तिची नगरी नी आईबाप यांच्याबद्दल विलक्षण ओढ वाटू लागली. तिने मस्तकावर एक शुभ्र अवगुंठन घेतले व महालातून ती रडत घाईने बाहेर पडली ; एकटी नव्हे तर पिथेअसपुत्री ईथरी, नी क्लिमिनी या परिचारिकांना दिमतीला घेऊन. आणि त्या थेट स्कीअन दरवाजांशी आल्या.

स्कीअन दरवाजांपाशी युकॅलेगॉन व ॲन्तेनॉर हे दोन लोकांतले ज्येष्ठ नागरिक, राजा प्राॲम, पॅन्थोउस, थिमितिझ, लॅम्पस, क्लितिअस आणि मार्सवंशीय हिकेतॅऑन यांच्यासह बसले होते. या दोघांचे आता लढाईत भाग घेण्याचे वय राहिले नव्हते, पण ते अस्खलित बोलण्यात पटाईत होते, आणि रानांतील एखाद्या उंच झाडाच्या फांद्यांवरून मृदु, सौम्य स्वरात चिवचिवणाऱ्या रातकिडयांसारखे ते हळुहळू बोलत बुरुजावर बसले होते. बुरुजाकडे हेलन येत असलेली पाहून ते हलकेच एकमेकांना म्हणाले, "इतक्या विलक्षण नी दिव्य सौंदर्यशालिनीखातर त्रोजन्स नी ॲकिअन्सनी इतके नी इतक्या

दीर्घकाळपर्यंत कष्ट सोसावे यात काहीच नवल नाही. तथापि, ती लावण्य-संपन्न असली तरी तिला घेऊन जाऊ द्या त्यांना, नाहीतर ती आपल्या व आपल्या-मागून आपल्या पोरावाळांच्या दुःखाला कारणीभूत होईल."

पण प्रायमने तिला जवळ बोलावले, व तो म्हणाला, "बाळे, माझ्यापुढच्या बाजूला बैस, म्हणजे तुला तुझा पूर्वीचा पति, तुझे गणगोत व तुझे मित्र दिसतील. मी तुला काही दोष देत नाही, तू दोषी नाहीस तर देव दोषास्पद आहेत. ॲकिअन्सबरोबरचे हे भयंकर युद्ध त्यांनी घडवून आणले आहे. मग आता मला सांग, तो तिकडचा इतका भव्य नी देखणा महाकाय वीर कोण आहे ? याच्याहून वीतदीडवीत उंच पुरुष मी पाहिले आहेत पण त्यापैकी इतका देखणा नी राजबिंडा कोणीही नव्हता. खात्रीने तो कुणीतरी राजाच असला पाहिजे."

हेलनने उत्तर दिले. "महाराज, तुम्ही माझ्या पतीचे पिताश्री आहात, मला प्रिय आणि पूज्य आहात. माझे सुखशय्येचे शेजघर, स्नेहीसोबती, माझी लाडकी कन्या आणि बाळपणच्या माझ्या साऱ्या सख्या यांच्यापासून दूर तुमच्या पुत्राबरोबर येथे येण्यापेक्षा मी मरण पत्करले असते तर बरे झाले असते. पण तसे व्हायचे नव्हते आणि आता अश्रू आणि दुःख माझ्या नशिबी आले आहे. तुमच्या प्रश्नाबद्दल म्हणाल तर तुम्ही ज्याच्याबद्दल विचारता तो वीर ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉन आहे. तो एक भला राजा आणि शूर लढवय्या आहे आणि त्याचे अस्तित्व जितके संशयातीत आहे तितकेच हे त्याचे माझ्याशी नातेही. तो या तिरस्कृत अभागिनीचा दीर आहे."

त्याच्याकडे सकौतुक आश्चर्याने पाहात ती वृद्ध व्यक्ती बोलली, "ॲत्रिअस-च्या सुखी मुला, सद्भाग्याच्या संताना, असंख्य ॲकिअन्स तुझ्या सत्तेखाली आहेत हे मला दिसत आहे. मी फ्रिजिआत होतो तेव्हा सँगॅरिअस नदीच्या तीरांवर छावण्या टाकलेले ॲत्रिअस नी मिग्डॉनचे पुष्कळ घोडेस्वार मी पाहिले ; मी त्यांच्या मित्रपक्षापैकी होतो. जेव्हा, ते पुरुषांशी तुल्यबळ अशा ॲमेझॉन म्हणून ओळखल्या जाणाऱ्या स्त्रिया, त्यांच्याशी लढायला आल्या तेव्हा मी त्यांच्याबरोबर होतो. पण ते सुद्धा संख्येने या ॲकिअनांइतके नव्हते."

त्यानंतर त्या वृद्धाने युलिसिसकडे पाहिले; तो म्हणाला, "ॲगॅमेम्नॉनपेक्षा वीतदीडवीत कमी उंचीचा, पण छाती नी खांदे अधिक रुंद असलेला तो दुसरा कोण आहे ते मला सांग. त्याचे चिलखत त्याने जमिनीवर ठेवले आहे आणि सैनिकांच्या रांगांपुढून आपल्या मेंढ्यांना शिस्तीत ठेवणाऱ्या दांडग्या केसाळ एडक्यासारखा तो डौलात फिरत आहे."

आणि हेलनने उत्तर दिले, "तो लेर्एतिझपुत्र युलिसिस आहे ; तो मोठा धूर्त आहे. इथाकाच्या खडबडीत प्रदेशात त्याचा जन्म झाला व सर्व प्रकारच्या कारस्थानात आणि अतिसूक्ष्म छद्‌मी कारवायात तो प्रवीण आहे.

यावर अॅन्तेनॉर म्हणाला, "श्रीमतीजी, आपण अगदी खरे बोललात, एकदा तुमच्याबाबतीत वाटाघाटी करण्यासाठी राजदूत म्हणून युलिसिस येथे आला होता व त्याच्याबरोबर मेनेलॉस होता. मी माझ्या स्वतःच्या घरी त्यांचे स्वागत केले आणि म्हणून त्यांच्या रंगरूपाशी व चालण्याबोलण्याशी मी चांगलाच परिचित आहे. एकत्र जमलेल्या त्रोजन्सपुढे ते जेव्हा उभे राहिले, तेव्हा मेनेलॉसचे खांदे जास्त रुंद दिसले, पण जेव्हा ते दोघे बसले तेव्हा युलिसिसचे व्यक्तीमत्व अधिक राजबिंडे वाटले, थोड्या वेळाने त्यांनी आपण आणलेला संदेश सांगितला, आणि मेनेलॉसने अस्खलित वाणीने भाषण केले ; तो अल्प-भाषी असल्यामुळे जास्त बोलला नाही. दोघातला धाकटा असूनही तो स्पष्ट व मुद्याला धरून बोलला ; उलट युलिसिस बोलायला उठला तेव्हा पहिल्याने स्तब्ध असा जमिनीवर नजर खिळवून राहिला. राजदंडाशी त्याचा काही चाळा किंवा हालचाल होत नव्हती. त्याने तो सरळ आणि निश्चल असा धरलेला होता. आपल्या हातातील दंडाची तो अजिबात चाळवाचाळव करीत नव्हता किंवा डौलदार रीतीने तो फिरवीतही नव्हता. सभेत भाषण करण्याची सवय नसलेल्या एकाद्या माणसासारखा त्याने तो सरळ व निश्चल असा धरून ठेवला होता. एकाद्याला वाटले असते की हा एक निव्वळ गावंढळ माणूस आहे किंवा खुळचट तरी आहे. पण जेव्हा त्याने आवाज चढवला आणि वाऱ्यावर उडणाऱ्या शिशिरकालीन हिमवर्षावासारखे भराभर त्याच्या भरदार छातीमधून शब्द बाहेर पडू लागले, तेव्हा त्याच्या तोडीचा तेथे कोणी राहिला नाही आणि तो कसा दिसतो या बद्दल त्यानंतर कोणीही माणसाने विचारसुद्धा केला नाही."

मग अॅजॅक्स प्राअॅमच्या नजरेस पडला आणि त्याने विचारले, "बाकीच्या आरगॉसवासीयांच्यावरती ज्याचे मस्तक नी रुंद खांदे उठून दिसत आहेत तो महान आणि उमदा योद्धा कोण आहे ?"

हेलनने उत्तर दिले, "तो प्रचंड अॅजॅक्स, अॅकिअन्सचा आधारस्तंभ आहे व त्याच्या दुसऱ्याबाजूस भोवतालच्या क्रीतनप्रमुखांसह क्रीतन्समध्ये उभा आहे. तो देवासारखा दिसणारा आयदोमेनिअस––क्रीतहून तो आमच्याकडे भेटायला येत असे तेव्हा मेनेलॉसने पुष्कळदा त्याचे अतिथी म्हणून स्वागत केले होते. शिवाय ज्यांची नावे मला तुम्हाला सांगता येतील असे दुसरे पुष्कळ अॅकिअन्स

मला दिसत आहेत. पण अश्वशिक्षक कॅस्तॉर नी प्रबळ मुष्ठियोद्धा पॉलक्स हे दोघेजण मला कोठेही आढळत नाहीत. ते माझ्या आईचे पुत्र नी माझे सख्खे भाऊ. एकतर त्यांनी लॅसेदीमॉन सोडलेच नसेल किंवा आपल्या नौका घेऊन ते आले असले तरी माझ्यामुळे त्यांना जी लाज आली व नाचक्की सोसावी लागली तिच्यामुळे ते पुढे होऊन लढणार नसावेत."

तिला माहीत नव्हते की ते दोघेही वीर त्यांच्या स्वतःच्या लॅसेदीमॉन देशातच अगोदरच भूमीखाली चिरनिद्रा घेत होते.

दरम्यान दूत शपथविधीच्या पवित्र आहूतीसाठी दोन कोकरे आणि पृथ्वीला द्यावयाच्या देणगीसाठी मद्याने भरलेली बकऱ्याच्या चामड्याची एक बुधली नगरीतून आणीत होते; आणि इदिअसने मद्यमिश्रणपात्र व सुवर्णचषक आणले. मग तो प्राअॅमपाशी जाऊन म्हणाला, "लॅओमेदॉनपुत्रा, त्रोजन्स नी अॅकिअन्सचे नृपती तुला खाली मैदानावर येऊन गंभीर कराराची शपथ घेण्यास बोलावीत आहेत. अॅलेक्झँद्रस आणि मेनेलॉस हे दोघेही हेलनसाठी निर्णायक द्वंद्वयुद्ध खेळणार आहेत. कारण या द्वंद्वयुद्धात जो जिंकेल त्याला हेलन व तिची सारी संपत्ती मिळणार आहे. शांततेचा गंभीर करार करून आपण शपथा घ्यायच्या आहेत. त्याअन्वये आपण इतरांनी येथे त्रॉयमध्ये राहायचे आणि अॅकिअन्सनी आरगॉसला आणि अॅकिअन्सच्या देशी परत जायचे."

हे ऐकत असता तो वृद्ध पुरुष थरथर कापत होता, पण त्याने आपल्या अनुयायांना रथाला घोडे जोडायला सांगितले आणि त्यांनी त्वरेने ते काम केले. राजा रथावर चढला, त्याने लगामांच्या वाद्या हाती घेतल्या आणि त्याच्या बाजूला अॅन्तेनॉर बसला. नंतर रथ हाकीत स्कीअन दरवाजातून ते मैदानावर गेले. त्रोजन्स व अॅकिअन्स सैनिकांच्या रांगापर्यंत येताच ते रथातून उतरले आणि उभय सैन्यांच्यामधील जागेकडे ते धीमी पावले टाकीत पुढे निघाले.

अॅगॅमेम्नॉन नी युलिसिस दोघेही त्यांच्या स्वागतार्थ उठले. सेवकांनी शपथविधीच्या आहुति आणल्या आणि मिश्रणपात्रात मद्यपाणी मिसळले. त्या प्रमुखांच्या हातावर त्यांनी पाणी घातले आणि अॅत्रिअसपुत्राने त्याच्या तलवारी शेजारी अडकवलेला खंजिर उपसून कोकरांच्या डोक्यावरची लोकर कापली; ती सेवकांनी त्रोजन नी अॅकिअन्स राजपुरुषांत वाटून दिली. आणि अॅत्रिअसपुत्राने प्रार्थनेसाठी हात उंचावले. तो मोठ्याने म्हणाला, "सर्वशक्तिमान, अति तेजस्वी, इदाच्या राज्यकर्त्या पित्या जव्ह, आणि हे सर्वसाक्षी, सर्वश्रुत सूर्या, हे भूमि नी नद्यांनो, आणि शपथ मोडणाराच्या जीवात्म्यास शिक्षा करणाऱ्या अधोलोकातील शक्तींनो, या विधींचे साक्षी तुम्ही रहा व ते व्यर्थ

न व्हावे म्हणून त्यांच्या सामर्थ्याचे रक्षण करा. जर ॲलेक्झँड्रसने मेनेलॉसला मारले, तर तिच्या सर्व संपत्तीसह हेलनला त्याला ठेवून घेऊ द्या. मग नौकांसह आम्ही स्वदेशी जाऊ ; पण जर मेनेलॉसने ॲलेक्झँड्रसला मारले तर त्रोजन्सनी हेलनला तिच्या सर्वस्वासह परत करावे. शिवाय यानंतर जन्माला येतील त्यांना या घटनेची साक्ष राहावी म्हणून उभयतात मान्य होईल तो दण्ड त्यांनी ॲकिअन्सना द्यावा. आणि जर ॲलेक्झँड्रस पडल्यावर प्राॲमने नी त्याच्या पुत्रांनी असा दण्ड देणे नाकारले, तर मी येथे राहीन नी मला भरपाई झाल्याचे समाधान मिळेपर्यंत लढाई चालू ठेवीन."

असे बोलत असता त्याने आपली सुरी बळींच्या गळ्यावरून फिरवली आणि श्वास लागून मरणोन्मुख झालेल्या त्यांना जमिनीवर ठेवले, कारण त्या प्राण्यांची शक्ति सुरीच्या घावाने नाहीशी केली होती. मग त्यांनी मिश्रणपात्रातून पेल्यात मद्य ओतले आणि शाश्वत देवतांची प्रार्थना केली. त्रोजन्स व ॲकिअन्स एकमेकात आवाज मिसळून म्हणाले, "महाश्रेष्ठ आणि तेजोमय जव्ह देवा, व तुम्ही इतर चिरंजीवी देवहो, वरदान द्या की आपल्या शपथां-विरुद्ध प्रथम पाप करणारांची आणि त्यांच्या संततीची मस्तके फुटून त्यांचे मस्तिष्क या मद्यासारखे भूमीवर विखरून पडेल, आणि त्यांच्या बायका पर-क्यांच्या दासी होतील."

अशी त्यांनी प्रार्थना केली पण जव्हने त्यांच्या प्रार्थनेला साद देण्याची वेळ अजून आली नव्हती. तेव्हा दार्दानसचा वंशज प्राॲम बोलला, "त्रोजन्स आणि ॲकिअन्सहो, मी काय सांगतो ते ऐका, मी आता वाऱ्याचा मार बसणाऱ्या इलियम नगरीला परत जातो आहे. माझा मुलगा नी मेनेलॉस यांच्यातले युद्ध आपल्या डोळ्यांनी पहायची माझी छाती होत नाही, कारण त्यातला कोण पडेल ते केवळ जव्ह नी इतर अमर देवच जाणतात."

असे म्हणून ती दोन कोकरे रथावर ठेवून तो स्थानापन्न झाला. त्याने डाव्या हातात लगामांच्या वाद्या एकत्र धरल्या, त्याच्याशेजारी ॲन्तेनॉर बसला. मग ते दोघे इलिअमला परत गेले. हेक्तर आणि युलिसिस यांनी भूमीवरील अंतर मोजले. आणि द्वंद्वातल्या दोघांपैकी आधी कोणी नेम धरून घाव मारावा ते ठरवण्यासाठी ब्राँझच्या शिरस्त्राणातून चिठ्ठ्या टाकल्या. दरम्यान उभय सैन्यांनी हात उंचावून प्रार्थना केली, "इदाहून सत्ता गाजवणाऱ्या महा-प्रतापी पिताश्री जव्ह, वरदान दे की जो प्रथम आमच्यातले हे युद्ध घडवून आणण्यास कारणीभूत झाला तो मरावा नी अधोलोकी हेदिजगृही जावा, आणि आम्ही इतर लोक परस्पर शांतता राखून आपल्या शपथा पाळाव्या."

थोर हेक्तरने चिठ्ठ्या ठेवलेले शिरस्त्राण हलवीत असता तोंड दुसरीकडे फिरवले आणि पॅरिसच्या नावाची चिठ्ठी उडून बाहेर आली. इतर आपापल्या स्थानी गेले, प्रत्येकजण आपल्या घोडयांपाशी व स्वतःची शस्त्रास्त्रे ठेवली होती त्या जागेवर गेला ; आणि लावण्यवती हेलनचा पती अलेक्झँद्रस आपले सुरेख चिलखत अंगावर चढवू लागला. प्रथम त्याने नडग्यावर चांगल्या बनावटीची, घोटयांवर चांदीचे चाप असलेली नडगीकवचें बांधली ; नंतर त्याने आपला भाऊ लायकॅऑन याचे वक्ष-कवच चढवून ते आपल्या अंगावर ठाकठीक बसवले, मग खांद्यावर चांदीच्या फुल्या बसवलेली आपली ब्राँझची तलवार आणि आपली जंगी ढाल अडकवली. धाक दाखवीत डोलणारा असा घोडयांचा केसांचा तुरा वरती असलेला उत्तम कारागिरीचा जिरेटोप त्याने आपल्या देखण्या शिरावर ठेवला, आणि आपल्या हातांना साजेल, पेलेल असा एक दुर्दम्य भाला दातात घट्ट धरला. याचप्रकारे मेनेलॉसनेही आपले चिलखत चढवले.

याप्रमाणे आपापल्या लोकात दोघे शस्त्रास्त्रसज्ज झाल्यावर रौद्रस्वरूपात ते खुल्या प्रांगणात मोठे उग्र रूप धारण करून जोराने पदक्षेप करीत गेले आणि त्यांना पाहून त्रोजन्स व ॲकिअन्स भयचकित होऊन गेले. मोजलेल्या अंतरावर दोघे योद्धे एकमेकांसमोर भाले परजीत उभे राहिले आणि दोघेही एकमेकांकडे प्रक्षुब्ध होऊन पहात होते. ॲलेक्झँद्रसने प्रथम नेम धरून ॲत्रिअसपुत्राच्या गोल ढालीवर घाव घातला, पण भाला ढालीपार गेला नाही कारण त्याचे टोक ढालीवर आपटून बाजूला वळले. मग मेनेलॉसने नेम धरताना पिताश्री ज्व्हची प्रार्थना केली, "राजा ज्व्ह, माझा अपराधी असलेल्या, अपकार करणाऱ्या ॲलेक्झँद्रसवर सूड उगवण्याचे वरदान मला दे. माझ्या हस्ते त्याचे दमन कर. म्हणजे मग आगामी युगात स्वतःच्या यजमानाच्या घरात दुष्कृत्यें करण्यास पाहुणा माणूस धजावणार नाही."

हे बोलत असता त्याने भाला समतोल धरला आणि ॲलेक्झँद्रसच्या ढालीकडे फेकला. तो भाला ढालीच्या आणि वक्ष-कवचाच्या आरपार जाऊन त्याच्या टोकाने ॲलेक्झँद्रसच्या कुशीवरचा अंगरखा फाटला. पण ॲलेक्झँद्रस बाजूला झुकला नी त्याने आपला प्राण वाचवला. मग ॲत्रिअसपुत्राने आपली तलवार उपसली आणि ती प्रतिपक्ष्याच्या शिरस्त्राणाच्या पुढे आलेल्या भागी खुपसली, पण तलवार मोडून तिचे तीन चार तुकडे होऊन ती त्याच्या हातातून पडली ; आणि तो आकाशाकडे पाहून उच्च स्वराने म्हणाला, "तात ज्व्ह देवा, सगळ्या देवात सर्वात खुनशी वृत्तीचा तू आहेस ; माझा सूड मी माझ्या

तलवारीने नक्कीच केला होता, पण तलवार माझ्या हातात तुटली, माझी भालाफेक फुकट गेली, व मी त्याला मारण्यात यशस्वी झालो नाही."

असे म्हणून तो अलेक्झँद्रसच्या अंगावर धावून गेला व त्याच्या शिरस्त्राणाच्या अश्वकेशाच्या तुऱ्याने त्याला पकडून फरफटत ॲकिअन्सकडे त्याला नेऊ लागला. शिरस्त्राणाच्या हनुवटीखालच्या पट्ट्याने ॲलेक्झँद्रसचा गळा दाबला जाऊ लागला. आणि जर जव्हकन्या व्हीनसने त्वरित काय झाले ते लक्षात घेऊन बैलाच्या चामड्याचा तो पट्टा तोडून मेनेलॉसच्या हाती नुसतेच रिकामे शिरस्त्राण राहू दिले नसते तर मेनेलॉसने त्याला तसेच खेचून नेऊन परम यश मिळविले असते. हाती आलेले ते शिरस्त्राण मेनेलॉसने ॲकिअन्समधल्या आपल्या सहकाऱ्यांकडे फेकले आणि भाल्याने भोकसण्यास तो ॲलेक्झँद्रसवर पुन्हा उडी घेत होता पण व्हीनसने त्याला निमिषात वर उचलले--(कोणाही देवाला असे सहज करता येते.) अंधाराच्या दाट पडद्यामागे त्याला लपवले व त्याच्या स्वतःच्या शय्यागारात त्याला नेऊन पोहोचविले.

मग ती हेलनला बोलावण्यास गेली. हेलन तिला एका उंच बुरुजावर त्रोजन स्त्रियांच्या जमावाने वेढलेली आढळली. हेलन लॅसिदीमॉनमध्ये असताना तिच्यासाठी लोकर कातून देणारी तिच्या विशेष आवडीची एक म्हातारी स्त्री होती. तिचे रूप घेऊन व्हीनसने हेलनचे सुगंधित वस्त्र ओढून म्हटले, "इकडे ये, ॲलेक्झँद्रसने सांगितले आहे की तू घरी जावेस. तो स्वतःच्या महालात सुंदर रूपाने तळपत आणि भपकेदार पोषाखात शय्येवर पहुडला आहे. तो लढाईतून नुकताच आला आहे असे कोणाला वाटणारसुद्धा नाही. असेच वाटेल की तो एकाद्या नृत्योत्सवासाठी निघाला आहे किंवा नुकतेच नृत्य पुरे करून विश्रांती घेत बसला आहे."

या शब्दांनी तिने हेलनच्या हृदयात कोप उत्पन्न केला. हेलनने जेव्हा देवीची सुंदर मान, रमणीय वक्षस्थळ नी चमकदार डोळे पाहिले तेव्हा ती नवल करीत म्हणाली, "देवी, तू याप्रमाणे मला का फसवीत आहेस? फ्रिजिआतील किंवा रम्य मिओनिआतील आपल्या मर्जीत घेतलेल्या एकाद्या पुरुषाकडे तू मला आणखी दूरवर भटकत पाठवणार आहेस का? मेनेलॉसने आताच तर ॲलेक्झँद्रसला जिंकले आहे व द्वेषपात्र असलेल्या मला तो आपल्याबरोबर परत घेऊन जाणार आहे. माझा विश्वासघात करण्यास तू येथे आली आहेस. जा, स्वतःच जाऊन ॲलेक्झँद्रसजवळ बैस. यापुढे देवी स्वरूपात राहू नकोस. तुझ्या पायांना परत ऑलिम्पसला तुला घेऊन जायला लावू नकोस. त्याच्यासाठी काळजी करीत बैस आणि तो तुला आपली बायको

करून घेईपर्यंत त्याची देखभाल कर. किंवा इतकेच कशाला तो तुला आपली दासीसुद्धा बनवील. पण माझ्याबद्दल म्हणशील तर मी जाणार नाही. त्याची शेज सजवणे आता यानंतर मला शक्य नाही. तसे केले तर त्रॉयच्या साऱ्या बायकात 'बदचालीची' असे माझे नाव पडेल. शिवाय माझ्या मनावर दुसऱ्या चिन्तेचे ओझे आहे."

हे ऐकून व्हीनसला फार राग आला व ती म्हणाली, "उद्धट, कुलक्षणी कार्टे, माझ्यावर चिडण्याची वेळ आणू नकोस. जर तसे केलेस तर तुझ्या नशिबात असेल ते होईल म्हणून तुला अशीच वाऱ्यावर सोडून देईन, आणि जेवढे आजपर्यंत तुझ्यावर प्रेम केले तेवढाच तुझा द्वेष यापुढे करीन. त्रोजन्स व ॲकिअन्स यांच्यात भयंकर द्वेष चेतवीन आणि तुझी अखेर वाईट होईल."

हे ऐकून हेलन भ्याली व आपले उत्तरीय गुरफटून घेऊन मग निमूटपणे ती देवीमागे गेली. त्रोजन स्त्रियांचे तिच्याकडे लक्ष गेले नाही.

जेव्हा त्या ॲलेक्झँद्रसच्या घरी आल्या तेव्हा सेविका आपापल्या कामाना लागल्या पण हेलन स्वतःच्या महालात गेली आणि देवीने एक आसन घेऊन ते ॲलेक्झँद्रसच्या सन्मुख हेलनसाठी ठेवले. त्यावर ढाल धारण करणाऱ्या जव्हची कन्या हेलन बसली, व तिरप्या नजरेने आमोदप्रमोदात गोडी घेणाऱ्या त्या आपल्या पतीची खरडपट्टी काढू लागली. ती म्हणाली,

"तेव्हा तुम्ही लढाईतून परत आलात तर? यापेक्षा जो माझा एकेकाळी पती होता त्या शूर पुरुषाच्या हातून तुम्ही पडला असतात तर बरे झाले असते. तुम्ही वढाई मारीत होतात की बाहुबलाने व भाल्याने लढण्यात तुम्ही मेनेलॉस-पेक्षा अधिक कुशल आहात म्हणून; मग जा ना, आणि त्याला पुन्हा आव्हान द्या, पण तसे न करण्याचा सल्ला मी तुम्हाला दिलेला बरा; कारण द्वंद्वयुद्धात त्याच्याशी भिडण्याचा मूर्खपणा तुम्ही केलात तर लौकरच त्याच्या भाल्याला बळी पडाल."

आणि पॅरिसने उत्तर दिले, "भार्ये, तुझ्या दुषणांनी मला त्रस्त करू नकोस; यावेळी मिनर्व्हा देवीच्या साह्याने मेनेलॉसने माझ्यावर जय मिळवला आहे; पुन्हा वेळ येईल तेव्हा कदाचित मी जेता होईन. कारण माझ्याबाजूला उभे राहतील असे देव माझ्याकडेही आहेत. ये, आपण एकत्र शय्येवर पडू या व मित्रत्वाने वागू या. या क्षणाइतका तुझ्यावर उत्कटपणे प्रेमासक्त आजवर मी कधीच झालो नव्हतो—जेव्हा तुला मी प्रथम लॅसिदीमॉनहून पळवून नौकेतून पसार झालो तेव्हादेखील—माझी आसक्ती एवढी प्रबळ नव्हती. जेव्हा क्रॅनॅई द्वीपात प्रीतिशय्येवर तुझ्याशी संभाषण करीत होतो तेव्हासुद्धा

तुजविषयक लालसेचा आतासारखा मी गुलाम झालो नव्हतो." असे म्हणून त्याने तिला शय्येकडे नेले आणि ती त्याची पत्नी त्याच्याबरोबर गेली.

याप्रमाणे ते एकत्र शय्येवर पहुडले ; पण ॲत्रिअसपुत्र गर्दीतून दीर्घ पदन्यास करीत, सगळीकडे ॲलेक्झँद्रसला शोधीत फिरत होता ; पण त्रोजन्स किंवा ॲकिअन्सपैकी एकाही माणसाला ॲलेक्झँद्रस कुठे आढळला नाही. त्यांना तो दिसला असता तर त्याला लपविण्याचा विचारसुद्धा त्यांच्या मनात आला नसता ; कारण प्रत्यक्ष मृत्यु इतकाच त्या सर्वांना त्याच्याबद्दलही द्वेष वाढत होता. मग नृपाल ॲगॅमेम्नॉन म्हणाला, "मी काय म्हणतो ते ऐका, त्रोजन्स दार्दानिअन्स आणि मित्रपक्षीयहो, विजय मेनेलॉसला मिळाला आहे ; तेव्हा यापुढे जन्माला येतील त्यांच्यामध्ये साक्षी किंवा प्रमाणचिन्ह रहावे म्हणून सर्व संपत्तीसह हेलनला परत पाठवा आणि वाटाघाटींनी ठरेल तो दण्ड भरा."

याप्रमाणे ॲत्रिअसपुत्र बोलला आणि ॲकिअन्सनी--पसंतीच्या आरोळ्या दिल्या.

● ● ●

## सर्ग ४

यावेळी सर्वदेव (ऑलिम्पसच्या स्वर्गलोकी) देवराज जव्हसमवेत सुवर्ण-भूमीवर सल्लामसलत करीत बसले होते; व (यौवन देवता) हीबी त्यांच्या पेल्यात अमृत ओतीत त्यांच्यात फिरत होती, आपापल्या सुवर्ण चषकातून अमृत पीत ते एकमेकांचे अभिष्टचिंतन करीत असता त्यांनी खाली त्रॉय नगरीवर दृष्टी टाकली. तेव्हा सॅटर्न पुत्र (जव्ह) ज्यूनोची चेष्टा करू लागला व तिला चिडवण्यासाठी टोमणे मारीत म्हणाला, "मेनेलॉसशी चांगला मित्रभाव असलेल्या दोघीजणी या देवतांमध्ये आहेत, आरगॉसची ज्यूनो नी ॲलॉल्कॉ-मिनीची मिनर्व्हा; पण त्या नुसत्या स्थिर बसून पाहात राहतात, पण व्हीनस सदैव ॲलेक्झँद्रसच्या नजीक राहून, कुठल्याही संकटापासून त्याला वाचवायला तयार असते. खरोखरी आताच त्याची सारी इतिश्री नक्की झाल्यावरही तिने त्याची सुटका केली आहे. कारण वस्तुत: विजय मेनेलॉसचाच होता. आता या सगळ्या घटनांबद्दल आपण काय करणार आहोत याचा विचार केला पाहिजे. आपण त्यांना पुन्हा लढायला लावू या, का त्यांच्यात संधी घडवून आणू या? हा दुसरा पर्याय तुम्हाला मान्य असेल तर मेनेलॉस हेलनला परत घेऊन जाऊ शकेल व प्राअॅमच्या नगरीत अजूनही लोक सुखाने नांदतील".

मिनर्व्हा व ज्यूनो शेजारी शेजारी बसून त्रोजन्सना अपकार करण्याचे कारस्थान रचीत असता जव्हचे भाषण ऐकून असंतुष्टपणे पुटपुटू लागल्या. बापाचा विलक्षण संताप आल्यामुळे मिनर्व्हाने त्याच्याकडे कपाळाला आठ्या घालून पाहिले; ती काही बोलली नाही, पण ज्यूनोला राहवेना, ती म्हणाली, "भयप्रद सॅटर्नपुत्रा, कृपा करून सांग की या सगळ्याचा अर्थ काय? माझे प्रयत्न व्यर्थच होणार काय? आणि मी व माझ्या घोड्यांनीही प्राअॅम आणि त्याच्या संततीविरुद्ध लोक एकत्र आणण्यासाठी घेतलेले कष्ट व गाळलेला घामही फुकट जाणार का? तुझ्या इच्छेप्रमाणे तू कर, पण आम्ही इतर देवदेवता मात्र सगळेच काही तुझ्या निर्णयाशी संमत होणार नाही".

जव्ह रागावला व त्याने उत्तर दिले, "लाडके, प्राअॅम आणि त्याच्या मुलांनी तुझे काय नुकसान केले आहे की ज्यासाठी इलिअमच्या नगरीचा पाडाव करण्याचा तुझा इतका उग्र निर्धार झाला आहे? त्यांच्या तटातून आत जाऊन प्राअॅमला, त्याच्या मुलांसह व शिवाय दुसऱ्याही साऱ्या त्रोजन्ससकट कच्चा खाण्याशिवाय

दुसऱ्या कशाने तुझे समाधान होणार नाही का? मग होऊ दे तुला हवे तसे; कारण या प्रकरणामुळे आपल्यामध्ये वादावादी उद्भवायला नको आहे मला. यापुढेही जाऊन मी असे म्हणतो व हे माझे म्हणणे मनात पक्के बिंबवून ठेव, की, जर कधी तुझ्या मित्रांची एकादी नगरी नष्ट करावीशी मला वाटली, तर मला प्रतिबंध करण्याचा प्रयत्न तू करता कामा नयेस. मला ते करण्याची मुभा द्यावी लागेल तुला, कारण यावेळी अगदी माझ्या इच्छेविरुद्ध तुझ्या म्हणण्याला मी कबूल होतो आहे. आकाशातल्या सूर्य नी तारकांखालील लोकवस्ती असणाऱ्या साऱ्या नगरीत, प्राअॅम नी त्यांची सर्व प्रजा रहात असलेल्या इलिअम इतका आदर कोणाबद्दल मला नव्हता. तेथे माझ्या यज्ञवेदीपाशी यथायोग्य मिष्टान्न भोजांची कमतरता मला कधीच भासली नाही, किंवा जळणाऱ्या चरबीच्या सुंदर वासाचीही; आम्हा देवांच्या हक्काचे हे मान मला इलिअमध्ये कधी कमी पडले नाहीत ".

ज्यूनो म्हणाली, " माझ्या स्वतःच्या आवडत्या तीन नगरी आरगॉस, स्पार्ता नी मायसिनी आहेत; त्यांच्यावर जेव्हा जेव्हा तुझी अवकृपा होईल तेव्हा त्या तू खुशाल लुटल्यास तरी त्यांचे रक्षण करायला मी येणार नाही व त्याबद्दल क्षितीही बाळगणार नाही. जरी मी तसे काही केले नी तुला थोपवण्याचा प्रयत्न केला तरी त्यामुळे माझे काहीच साधणार नाही. कारण तू माझ्यापेक्षा पुष्कळच प्रबळ आहेस; पण यावेळी मी माझे कार्य साधणार, विफल होऊ देणार नाही. मीही तुझ्याच जातकुळीची देवी आहे आणि मी सॅटर्नची ज्येष्ठ कन्या आहे आणि केवळ याच कारणास्तव नव्हे तर तुझी पत्नी आहे आणि तू देवांवरचा अधिपती आहेस म्हणूनही मी मानार्ह आहे. तेव्हा हे प्रकरण आपापसातल्या देवघेवीचे एक उदाहरण होऊ दे, म्हणजे इतर देव आपले अनुकरण करतील. मिनर्व्हाला सांग की तात्काल जाऊन युद्ध सुरु करण्याच्या कामाला लाग. आणि तिला अशीही युक्ति योजायला सांग की जिच्यामुळे त्रोजन्सच आधी शपथा मोडून अॅकिअन्सवर हल्ला करतील ".

देवा मानवांच्या पित्याने तिचे शब्द मानले मिनर्व्हाला सांगितले, " तात्काल त्रोजन्सच्या नी अॅकिअन्सच्या सेनादलात जा आणि अशी युक्ति कर की ज्यायोगे त्रोजन्स अगोदर शपथा मोडून अॅकिअन्सवर हल्ला करतील ".

हे करण्यास मिनर्व्हा आधीपासूनच उत्सुक होती, तेव्हा ती तीरासारखी ऑलिम्पसच्या उत्तुंग शिखरावरून खाली आली. कारस्थानी सॅटर्नच्या-पुत्राने सागरसंचारकांना किंवा एकाद्या महान सेनेला सूचकचिन्ह म्हणन एकादा तेजस्वी धूमकेतु धाडावा नी प्रज्ज्वलित प्रकाशाचा झोत त्याच्यामागे तळपावा

त्याप्रमाणे झळकत आकाशातून ती वेगाने जात होती. ते दृश्य पाहून त्रोजन्स व ॲकिअन्स भयग्रस्त झाले, आणि प्रत्येक जण आपल्या शेजाऱ्याकडे वळून म्हणू लागला, "एक तर आपल्यामध्ये पुन्हा युद्ध व लढाईचा कोलाहल माजणार किंवा युद्ध देव जव्ह आता आपणात संधी घडवून आणणार".

याप्रमाणे ते आपापसात संभाषण करू लागले. मग मिनर्व्हाने ॲन्तेनॉरपुत्र लॅओदोकसचे रुप घेतले, नी ती त्रोजन सैनिकांच्या रांगामधून लायकॲऑनपुत्र दुर्दम्य पॅन्दॅरस याच्या शोधार्थ जाऊ लागली. ईसॉपच्या तीरावरून अनुयायी म्हणून आलेल्या धिप्पाड वीरांमध्ये उभा असलेला तो तिला दिसला. तेव्हा ती त्याच्याजवळ जाऊन त्याला म्हणाली, "शूर लायकॲऑनपुत्रा, मी सांगेन तसे तू करशील का? तू मेनेलॉसला एक बाण मारण्याचे धाडस करशील तर तुला सगळ्या त्रोजनांकडून बहुमान व धन्यवाद मिळतील. विशेषत: राजपुत्र ॲलेक्झँद्रसकडून, कारण तुझ्या हातून सुटलेल्या बाणाने मेलेला मेनेलॉस चितेवर चढताना दिसला तर तो राजपुत्र तुला कृतज्ञतेने अगदी भरपूर पारितोषक देईल. तेव्हा नेम धर, विख्यात धनुर्धर लिसिअन ॲपोलोची प्रार्थना कर, नवस कर की तुझ्या झेलिआ या मजबूत नगरीला गेल्यावर तू त्याच्या प्रीत्यर्थ मोसमातील प्रथमजात कोकरांचा महाबळी देशील".

त्या मूर्खाचे मन चटकन् वळले आणि त्याने धनुष्य त्याच्या पेटीतून काढले. इबेक्स जातीच्या एका डोंगरी रानबकऱ्याच्या मागावर असता खडकावरून तो उडी मारतानाच त्याचा बाण काळजात घुसून त्या बकऱ्याची शिकार झाली होती. त्याची शिंगे सोळा विती लांबीची होती, आणि शिंग काम करणाऱ्या एका कारागिराने ती घासून अगदी गुळगुळीत करून टोकांना सोन्याची टोपणे बसवून त्यांचे एक धनुष्य तयार केले होते, पॅन्दॅरसने त्या धनुष्यावर दोरी ताणून ते सज्ज केल्यावर ते जपून खाली ठेवले आणि त्याच्या शूर अनुयायांनी, मेने-लॉसवर बाण सोडण्याच्या आधीच ॲकिअन्सनी त्याच्यावर हल्ला करू नये म्हणून आपल्या ढाली पॅन्दॅरसपुढे धरल्या होत्या. मग त्याने आपल्या भात्याचे झाकण काढले आणि पिसे लावलेला नी अजून कधीही धनुष्यातून न सुटलेला, मरणांतिक यातना देणारा एक बाण बाहेर आणला. तो त्याने धनुष्याच्या दोरीवर ठेवला व विख्यात धनुर्धर लिसिअन ॲपोलोची प्रार्थना करून नवस केला की स्वदेशीं, मजबूत झेलिआ नगरीला आपण जेव्हा परत जाऊ तेव्हा त्या देवापुढे मोसमातील प्रथमजात कोकरांचा महाबळी देऊ. बाणाची खाच बलीवर्द चामड्याच्या धनुष्यरज्जूवर ठेवली आणि खांच नी दोरी दोन्ही, बाणाचे टोक धनुष्याजवळ येईपर्यन्त छातीजवळ ओढली. नंतर जेव्हा

धनुष्याची अर्धवर्तुळाकार कमान झाली तेव्हा त्याने बाण सोडला आणि जसा धनुष्याचा टणत्कार झाला व दोरीचे गीत लहरले तसा तो बाण जन समुदायाच्या डोक्यांवरून आनंदाने उडत गेला.

पण हे मेनेलॉस, पुण्य श्लोक देव तुला विसरले नाहीत आणि ती जव्हकन्या बाण येण्याआधीच तुझ्यासमोर उभी राहून त्या भेदक बाणाचे निवारण करण्यास सज्ज झाली होती. मूल मधुर निद्रेत मग्न असता त्याच्यावरून आईने माशी चटकन उडवावी तसा तो बाण मेनेलॉसच्या कातडीवरून देवीने उडवून त्याची दिशा मेनेलॉसच्या दुहेरी वक्षकवचावरून बांधलेल्या पट्टयाच्या सोनेरी कोशांकडे वळविली; त्यामुळे तो बाण त्याच्या भोवतालच्या घट्ट पट्टयातून आरपार गेला, तसाच कुशल कारागिरीच्या वक्षकवचातूनही पलीकडे जाऊन त्या खालच्या पट्टयातही तो बाण शिरला. हा पट्टा भाल्याची शल्ये किंवा बाण आत शिरू नयेत म्हणून अंगासरसाच तो बांधीत असे. या पट्टयाचाच संरक्षणासाठी त्याला सर्वांत जास्त उपयोग झाला; तथापि त्या पट्टयातूनही शिरून बाणाने त्याच्या कातडीवर ओरखाडा काढला त्यामुळे जखमेतून रक्त वाहू लागले.

घोडयाच्या शृंगारसाजात गालावरच्या आच्छादनाचा भाग जो होणार आहे व ज्याचे कोषागारात जतन होणार आहे व जो धारण करण्याची ईर्ष्या अनेक कुलीन वीरांना आहे, पण घोडा आणि त्याचा स्वार दोघांनाही अभिमान वाटावासा अलंकार म्हणून राजा जो आपल्यापाशीच ठेवतो असा अलंकार घडविण्यासाठी एखादी मिओनिआ किंवा कॅरिआतली स्त्री हस्तिदंताच्या तुकडयावर जांभळा रंग चढवते-त्याप्रमाणेच हे मेनेलॉस, तुझ्या सुडौल मांडया व तुझ्या सुभग घोटयांपर्यन्तच्या तुझ्या पोटऱ्या काळसर रक्ताने माखल्या गेल्या.

जेव्हा ॲगेमेम्नॉन राजाने जखमेतून रक्त वहातांना पाहिले तेव्हा त्याला भय वाटले नी स्वतः शूर मेनेलॉसही भ्याला, पण मग बाणाची टोके आणि टोक दांडयाला बांधणारा दोरा जखमेबाहेरच आहेत हे पाहिल्यावर त्याला धीर आला; तथापि ॲगॅमेम्नॉनने मेनेलॉसचा हात हातात धरून दीर्घ निश्वास सोडला आणि त्याच्या सोबत्यांनी एक सुरात व्यथित स्वर काढले. ॲगॅमेम्नॉन म्हणाला, "प्रिय बंधो, या संधि करारावद्दल शपथ घेण्याने व आमचा कैवारी वीर म्हणून तुला पुढे येऊ देण्याने मी तुझ्या मरणाला कारण झालो आहे. त्रोजनांनी शपथ पाया खाली तुडवून तुला जखमी केले; -तरीही ती शपथ, कोकराचे सांडलेले रक्त, पेयांचे अर्घ्यप्रदान आणि ज्यावर आपण विश्वास ठेवला आहे ते मैत्रीचे उजवे हात व्यर्थ होणार नाहीत. ऑलिम्पसचा राज्यकर्ता

त्या सर्वांची फलश्रुती येथे व आता करीत बसला तरी अजूनही यानंतर तो ती करील व त्यांना आपल्या प्राणांचे व आपल्या बायकांचे आणि मुलांचे भारी मोल या अपराधाच्या भरपाईसाठी द्यावे लागेल. जेव्हा सॅटर्नपुत्र त्यांच्या प्रस्तुत विश्वासघाताची शिक्षा म्हणून उत्तुंग सिंहासनावरून आपल्या भयानक ढालीची छाया त्यांच्यावर पाडील तेव्हा प्राअॅम व त्याच्या प्रजेसह, प्रबळ इलिअम भुईसपाट होण्याचा दिवस नक्की येईल. हे सारे निश्चितच घडेल, पण तुझ्या नशिबी जर आता मृत्यू असला, तर मेनेलॉस, मी तुझ्यासाठी कसा शोक करू? मी आरगॉसला, नाव बट्ट करून, दुष्कीर्ती घेऊन परत जाईन, कारण ॲकिअन्स तात्काळ स्वदेशाला जातील. प्राअॅमला आणि ट्रोजन्सना हेलनला ठेऊन घेण्याची यशश्री आम्ही मिळू देऊ आणि तुझा हेतू साध्य झालेला नसतानाच तू येथे ट्रॉयमध्ये पडलेला असता भूमीत तुझ्या अस्थी कुजत राहतील. मग एकादा बढाईखोर ट्रोजन तुझ्या थडग्यावर उडी मारील. आणि म्हणेल, "सदैव असाच ॲगॅमेम्नॉन सूड उगवो! त्याने व्यर्थच आपली सेना इथे आणली, तो परत स्वदेशाला रिकाम्या नौका घेऊन गेला व त्याने मेनेलॉसला मागे ठेवले. असे त्यांच्यापैकी एकजण म्हणेल नी मग पृथ्वी मला पोटात घेईल तर बरे होईल!"

पण मेनेलॉसने त्याला आश्वासन दिले. तो म्हणाला, "धैर्य धर आणि लोकांना घाबरवू नको. बाण माझ्या वर्मी लागलेला नाही, कारण घासून चकचकीत केलेल्या धातूच्या माझ्या बाहेरच्या पट्ट्याने प्रथम तो अडवला, आणि त्याच्याखाली माझ्या वक्षकवचाने व माझ्यासाठी ब्रॉंझकाम करणाऱ्या कारागिरांनी घडवलेल्या चिलखताच्या पट्ट्याने तो थांबवला".

आणि ॲगॅमेम्नॉनने उत्तर दिले, "प्रिय मेनेलॉस, तू म्हणतोस तसे असेल असा मी भरवसा बाळगतो; पण शल्य वैद्य तुझ्या जखमेची परीक्षा करील नी तुझ्या वेदनापरिहारार्थ त्याच्यावर औषधी वनस्पती लावील".

मग तो टॅल्थिबिअसला म्हणाला, "टॅल्थिबिअस, भिषग् ईस्क्युलॅपिअसचा पुत्र मॅकॲॉन याला सांग की त्याने त्वरित येऊन मेनेलॉसला पाहावे. कोणा ट्रोजन वा लिसिअन धनुर्धराने बाणाने त्याला जखमी करून आम्हाला उद्वेगात पाडले आहे व स्वतःसाठी मात्र मोठे श्रेय संपादले आहे!"

सांगितल्याप्रमाणे टॅल्थिबिअसने केले नी मॅकॲॉनचा शोध करीत तो सैन्यात फिरू लागला. लवकरच ट्रिक्काहून त्याच्यासमवेत आलेल्या शूर योद्ध्यांमध्ये उभा असलेला मॅकॲॉन त्याला दिसला; तेव्हा त्याच्यापाशी जाऊन टॅल्थिबिअस म्हणाला, "ईस्क्युलॅपिअसपुत्रा, राजा ॲगॅमेम्नॉनचा निरोप आहे की तू तात्काल

येऊन मेनेलॉसला पहावेस. कोणा त्रोजन वा लिसिअन धनुर्धराने त्याला बाणाने जखमी करून आम्हाला उद्वेग आणला आहे आणि स्वत:साठी मोठे श्रेय संपादले आहे !"

असे तो बोलला आणि मॅकॅऑन जाण्यास प्रवृत्त झाला. ॲकिअन्सच्या विस्तीर्ण सैन्यामधून पुढे जात, जेथे मेनेलॉस जखमी होऊन भोवताली गोळा झालेल्या सेनानायकांच्यामध्ये पडला होता तेथे ते पोहोचले. मॅकॅऑन लगेच त्या वर्तुळाच्या मध्यभागी गेला नी त्याने इतक्या जोराने पट्ट्यातला बाण उपटून काढला की बाणाची टोके वाकडी झाली. घासून चकचकीत केलेला तो पट्टा त्याने सोडवला, तसेच त्याच्या खालचे वक्षकवच व ब्राँझकाम करणाऱ्या कारागिरांनी घडवलेला चिलखताचा पट्टाही सोडवला. मग त्या जखमेची पाहणी केल्यानंतर त्याने रक्त पुसून काढले आणि किरॉनने ईस्क्युलॅपिअसला, त्याच्याविषयी तो बाळगीत असलेल्या सद्भावनाखातर दिलेल्या काही उप-शमकारी औषधी जखमेवर लावल्या.

याप्रमाणे ते मेनेलॉसभोवती कामात गुंतलेले असता त्यांच्याविरुद्ध त्रोजन्स चाल करून पुढे आले, कारण त्यांनी आपली चिलखते चढवली होती आणि आता पुन्हा युद्ध चालू केले होते.

त्यावेळी ॲगॅमेम्नॉन काही झोपलेला किंवा भ्यालेला किंवा लढण्यास नाखुष असा तुम्हाला दिसला नसता; उलट लढाईत उडी घेण्यास तो उत्सुकच होता. त्याने ब्राँझकामाने संपन्न असा आपला रथ आणि आपले धापा टाकणारे घोडे पीरिअसपुत्र तॉलेमिअसचा मुलगा युरिमेदॉन याजकडे सोपवले, आणि इतक्या अनेक लोकांना आज्ञा देत फिरून आपले हातपाय थकल्यावर, त्यावेळी आपल्यासाठी ते तयार ठेवण्यास सांगितले; कारण सैनिकांच्या रांगांमधून तो पायीच हिंडणार होता. आघाडीकडे त्वरेने जाणारे लोक त्याला दिसले तेव्हा त्यांच्याजवळ उभा राहून त्याने त्यांना पुढे जाण्यास प्रोत्साहन दिले; तो म्हणाला, "ऑरगॉसवासीयांनो, हल्ला चढवण्यात थोडी देखील ढिलाई करू नका; पिता जव्ह, मिथ्या शपथ वहाणारांचा सहाय्यक कधीही होणार नाही. शपथा मोडून आपल्यावर चढाई त्रोजनांनी प्रथम केली आहे. म्हणून त्यांना गिधाडे फाडून खातील; आपण त्यांची नगरी जिंकून त्यांच्या बायका-मुलांना आपल्या नौकांतून घेऊन जाणार".

पण जे टाळाटाळ करीत लढण्यास नाराज दिसले त्यांची त्याने रागाने निर्भत्सना केली; तो ओरडला, ऑरगॉसवासीयांनो, भेकड, क्षुद्र प्राण्यांनो, मैदानांवरून धावत, निसटून जाणे शक्य नाही म्हणून घोळका करून, एकमेकांना

चिकटून उभ्या रहाणाऱ्या भयभीत हरिण शावकांसारखे इथे उभे राहण्याची आणि मर्दुमकी न दाखवण्याची लाज नाही वाटत तुम्हाला? हरणासारखे भांबावलेले आणि निर्वीर्य आहात तुम्ही. "तुमचे संरक्षण करण्यास सॅटर्नपुत्र तुमच्यावर आपल्या हाताचे छत्र धरतो की काय हे पाहण्यासाठी त्रोजन्स, किनाऱ्यावरच्या आपल्या नौकांच्या पिछाडयांना पोहोचेपर्यन्त तुम्ही वाट पहात बसणार आहात की काय? "

असा तो सैनिकांच्या रांगांमधून आज्ञा देत इकडून तिकडे फिरला. गर्दीतून पुढे जाता जाता, वनवराहासारखा भयंकर जो आयदोमिनिअस त्याला आपल्या प्रमुखाभोवती शस्त्रसज्ज होत असलेले क्रीसचे लोक त्याला दिसले; त्याचवेळी मेरिऑनिझ पिछाडीकडील सेनादले पुढे आणीत होता. त्याला पाहून ॲगॅमेम्नॉनला बरे वाटले व तो स्नेहपूर्वक बोलला, "आयदोमेनिअस, दुसऱ्या कोणाही ॲकिअनपेक्षा, युद्धात, इतर गोष्टीत वा भोजनप्रसंगी मी तुला विशेष मानतो. त्यांचे राजपुरुष जेव्हा मिश्रणपात्रात माझ्या निवडक मद्याचे मिश्रण करीत असतात तेव्हा त्यातल्या प्रत्येकाच्या वाटयाला मद्याचा एक ठराविक भाग येतो पण इच्छा होईल तेव्हा तुला पिता यावे यासाठी तुझा पेला नेहमी माझ्या पेल्याप्रमाणेच पूर्ण भरलेला ठेवण्यात येतो. तेव्हा युद्धात पुढे जा व जसा वीर पुरुष असण्याबद्दल तू सदा अभिमान बाळगतोस तसा तू असल्याचे प्रत्यक्ष दाखवून दे ".

आयदोमिनिअसने उत्तर दिले, "पहिल्यापासून मी तुला वचन दिल्याप्रमाणे मी तुझा विश्वासू सोबतीच राहीन. इतर ॲकिअन्सना निकड लाव म्हणजे आम्हाला लगेच लढाईस तोंड लावता येईल. कारण त्रोजन्सनी संधिकरार पायाखाली तुडवला आहे. ज्याअर्थी त्यांनी अगोदर शपथ मोडून आमच्यावर हल्ला केला आहे त्याअर्थी मरण आणि विनाश त्यांच्या वाटयाला नक्कीच येईल ".

ॲत्रिअसपुत्र प्रमुदित मनाने पुढे चालला. पुढे पदातींच्या एका मोठ्या समूहात शस्त्रसज्ज होत असलेले दोन ॲजॅक्स त्याच्या दृष्टीस पडले. पश्चिम वायूच्या सोसाटयाबरोबर दौडणारे वादळ आपल्या उंचठिकाणाहून एखादा अजपाल पहातो, दूरचे आकाश काळेकभिन्न झाले आहे व एक प्रचंड चक्रवात आपल्याकडे येत आहे हे पाहून तो अजपाल जसा भिऊन आपल्या बकऱ्यांचा कळप एखाद्या गुहेत हाकारून नेतो अगदी तशाच दणकट तरुणांच्या त्या रांगा कृष्णघन अशा समूहाने, ढाल व भाला धारण केलेल्या, भयंकर दिसणाऱ्या ॲजॅक्स द्वयामागे लढाईस निघाल्या. त्यांना पाहून ॲगॅमेम्नॉनला आनंद झाला. "तुझ्यासारख्या ऑरगॉसच्या पुढाऱ्यांना कर्तव्याबद्दल आज्ञा देण्याची

जरूरच नाही. कारण तुम्ही आपण होऊनच सर्व शक्ति सामर्थ्यानिशी युद्ध करण्यास आपल्या लोकांना हिरिरीने प्रवृत्त करीत आहात. पिता जव्ह, मिनर्व्हा आणि ॲपोलो शपथ जर तुमच्या वृत्ती सर्वांच्या अंगी बाणतील तर किती बरे होईल! कारण मग प्राॲमची नगरी आपल्या बाहुबलाने तात्काळच पडेल व मग ती आपल्याला लुटता येईल ".

इतके बोलून त्यांना सोडून पुढे तो नेस्तॉरपाशी गेला. पायलॉसमधील लोकांचा हा वाक्चतुर नेता आपल्या सैनिकांची नीटनेटकी रचना करून त्यांना पुढे सरकण्यास प्रोत्साहन देत होता. त्याच्यासह पेलॅगॉन, ॲलॅस्तॉर, क्रोमिअस, हीमॉन आणि प्रजापालक बायस हे होते. नेस्तॉरने आपले वीर त्यांच्या रथांसह व अश्वांसह पुढच्या श्रेणीत ठेवले आणि शूर नी बहुसंख्य असे त्याच्या खास विश्वासातले पायदळाचे लोक पिछाडीला होते. इच्छा असो वा नसो जेथे लढणे भागच पडते अशा सैन्याच्या मध्यभागी नेस्तॉरने भेकड लोक हाकलले. त्याने घोडदळातील वीरांना प्रथम आज्ञा दिल्या की, त्यांनी आपले घोडे भक्कम काबूत ठेवावे. म्हणजे उगाच गोंधळ माजणार नाही. तो म्हणाला, "स्वतःच्या बळावर किंवा आपल्या अश्वरोहणाच्या कौशल्यावर भरंवसा ठेवून कोणीही माणसाने इतरांच्या पुढे होऊन ट्रोजन्सशी एकट्याने भिडू नये, किंवा कोणी मागेही रेंगाळू नये कारण तसे केल्यास तुमचा हल्ला कमकुवत होईल; पण जेव्हा शत्रूचा रथ समोर येईल तेव्हा मात्र प्रत्येकाने आपल्या रथातून आपला भाला फेकावा, ते सर्वात चांगले होईल; जुन्या काळच्या लोकांनी नगरी आणि किल्ले जिंकले ते असेच; अशाच प्रकारची त्यांची विचारसरणी होती ".

त्यावृद्धाने अशाप्रकारे त्यांना सूचना दिल्या. कारण त्याने पुष्कळ लढायात भाग घेतला होता. आणि ॲगॅमेम्नॉन राजाला त्याच्या वर्तनाने संतोष झाला. तो नेस्तॉरला म्हणाला, "तुझी निर्णायक बुद्धी जशी अचूक आहे तशीच तुझी शक्ती भरपूर असती व तुझे हातपाय चपळ असते तर अगदी माझ्या मनासारखे झाले असते. पण मनुष्यजातीचा सामाईक शत्रू जे वार्धक्य त्याने आपला हात तुझ्यावर ठेवला आहे; दुसऱ्या कोणावर तो हात पडता व तू अजून तरुणच राहिला असतास तर किती बरे झाले असते ! "

आणि जेरिनीचा वीर नेस्तॉर उत्तरार्थी म्हणाला, "ॲत्रिअसपुत्रा, बलिष्ट एऱ्युथॅलिअनला मी ठार मारले तेव्हा जसा मी सामर्थ्यवान पुरुष होतो तसा आताही असतो तर मला आनंदच होता. पण देव आपल्याला सर्व काही एकाचवेळी देत नाहीत. तेव्हा मी तरुण होतो आणि आता म्हातारा आहे.

तरी पण माझ्या वीरांबरोबर जाऊन, वृद्धांचा जो सल्ला देण्याचा अधिकार आहे तो गाजवून मी त्या वीरांना सल्ला देऊ शकतो. माझ्यापेक्षा जे तरुण जास्त बलशाली आहेत त्यांच्याकडे भाला चालवण्याची कामगिरी मी सोपवतो ".

प्रमुदित होऊन ॲगॅमेम्नॉन पुढे चालला व लौकरच त्याला जागच्याजागीच घोटाळणारा पेतिऑसपुत्र मेनेस्थ्यूस आढळला, आणि त्याच्यासमवेत लढाईत आरडाओरडा करणारे ॲथीनिअन होते. तिथे जवळच, त्याच्या ताब्यातील दणकट सैफॅलेनिअननी वेढलेला धूर्त युलिसिस घुटमळत होता. लढाईला तोंड लागल्याच्या आरोळ्या त्यांनी अजून ऐकल्या नव्हत्या, कारण त्रोजन्सच्या व ॲकिअन्सच्या श्रेणी नुकत्याच हालचाल करू लागल्या होत्या, म्हणून हे लोक जागच्याजागी उभे राहून ॲकिअन्सच्या दुसऱ्या एखाद्या सेनाविभागाने त्रोजन्सवर हल्ला चढवून लढाईची सुरवात होण्याची वाट पाहात होते. हे पाहून ॲगॅमेम्नॉनने त्यांना दूषण दिले, तो म्हणाला, "पेतिऑसपुत्रा आणि दुसरा तू, धूर्ततेत मुरलेला, फसव्या वृत्तीचा, दुसऱ्यांची वाट पाहात, दबकत इथे उभे का तुम्ही? जेव्हा निकराची लढाई करायची असेल तेव्हा सर्व लोकांच्या अग्रभागी तुम्ही दोघे असायला हवे, कारण आपण ॲकिअन्सच्या सल्लागार मंडळाचे सदस्य जेव्हा मेजवानी योजतो, तेव्हा माझ्या आमंत्रणाचा स्वीकार करण्यात तुम्ही सदा सर्वांच्या पुढे असता. तेव्हा भाजलेले मांस पोटभर खाण्यास नी मद्य मनमानेतो दीर्घकाळ प्राशन करण्यास मात्र तुम्ही खुषीने तयार असता व आता डोळ्यांसमोर ॲकिअन्सचे दहा सेना विभाग शत्रूशी भिडले तरी तुम्हाला काही फिकीर वाटत नाही."

क्रुद्धदृष्टीने त्याच्याकडे पाहून युलिसिसने उत्तर दिले, "ॲत्रिअसपुत्रा, कशाविषयी बोलतो आहेस तू? आम्ही शिथिल राहिलो आहोत असे तू कसे म्हणू शकतोस? त्रोजन्सबरोबर ॲकिअन्सची जेव्हा तुंबळ लढाई जुंपेल तेव्हा, तुला दिसेल की––अर्थात तुला ते पाहण्याइतकी आस्था असेल तर––तेलेमॅकसचा पिता तेथे सर्वात पुढे जे असतील त्यांच्याबरोबर लढत असेल. तू उगीच वायफळ बोलतो आहेस."

युलिसिस संतापला आहे हे जेव्हा ॲगॅमेम्नॉनने पाहिले, तेव्हा त्याच्याकडे पाहून स्नेहपूर्ण स्मित करून त्याने आपले शब्द मागे घेतले, तो म्हणाला, "युलिसिस, लेअर्तिझच्या थोरपुत्रा, यथायोग्य सल्ला देण्यात सदैव उत्तम वीरा, तुझा दोषही मला दाखवावयाचा नाही किंवा तुला कर्तव्याबद्दल आज्ञाही करायच्या नाहीत, कारण मला माहीत आहे की तुझे मन शुद्ध आहे व तू आणि मी एका मताचे आहोत. आता याविषयी बोलणे पुरे––मी जे बोललो त्याबद्दल पुढेमागे

तुझी भरपाई करीन आणि आता जर बोलण्यात काही वाईट आले असेल तर देव ते फलद्रुप न करोत."

मग त्यांना तेथे सोडून तो पुढे इतरांकडे गेला. लौकरच त्याला तायदिअस-पुत्र उमदा दायोमिद आपल्या रथ नी अश्वांजवळ उभा दिसला. त्याच्या बाजूला कॅपॅनिअसपुत्र स्थेनेलिअस होता; त्यावर त्यांना ॲगॅमेम्नॉन रागे भरू लागला. तो म्हणाला, "तायदिअसपुत्रा, इथे लढाईच्या काठावर असा दबून तू उभा का? तायदिअस असा कधी कचरत नव्हता, तर युद्धात शत्रू-विरुद्ध आपल्या लोकांचे नेतृत्व करीत तो सदैव अग्रभागी राही—निदान ज्यांनी त्याला युद्धात लढताना पाहिले ते असे म्हणतात, कारण मी स्वत: त्याला कधी पाहिला नाही. असे म्हणतात की त्याच्यासारखा वीर दुसरा कोणी नव्हता. एकदा तो मिसेबीला आला होता. शत्रू म्हणून नव्हे, तर पाहुणा म्हणून; त्याच्याबरोबर पॉलिनिसिझ होता. आपल्या सैन्यात भरती करायची होती त्यांना, कारण थीब्ज या मजबूत नगरीविरुद्ध युद्ध करण्यासाठी ते जुळवाजुळव करीत होते. त्यांनी मदतीसाठी निवडक लोकांचे एक पथक आम्ही द्यावे म्हणून आमच्या जनतेकडे विनंती केली. मिसेनीचे लोक तसे पथक द्यायला तयार होते, पण अपशकुन दाखवून जव्हने त्यांना परावृत्त केले. तेव्हा तायदिअसनी पॉलिनिसिझ यांनी आपली वाट धरली. ते इसॉपस नदीच्या दाट गवताळ नी लव्हाळ्यांनी व्यापलेल्या काठापर्यंत जेव्हा गेले तेव्हा ॲकिअन्सनी आपला राजदूत म्हणून तायदिअसला पुढे पाठवले. त्याला आढळले, की एतिओक्लिझच्या घरी मोठ्या संख्येने कॅदमिअन्स मेजवानीसाठी गोळा झाले आहेत. तेथे तो जरी परका होता तरी इतक्या लोकात एकटा म्हणून त्याला मुळीच भय वाटले नाही; उलट त्याने त्यांना सर्व प्रकारच्या स्पर्धांना आव्हान दिले आणि प्रत्येकीत तो पटापट यशस्वी झाला. इतक्या भक्कमपणे मिनर्व्हाने त्याला साह्य केले. त्याच्या यशामुळे कॅदमिअन्स चिडले आणि त्यांनी देवतुल्य वीर हीमॉनपुत्र मीऑन व ऑतोफॉनसपुत्र पॉलिफॉतिझ यांच्या नेतृत्वाखाली पन्नास तरुणांचे एक पथक तायदिअसच्या परतण्याच्या मार्गावर दबा धरून बसवले. तथापि स्वर्गातून मिळालेल्या कौलांची आज्ञा पाळून सोडून दिलेल्या मिऑनखेरीज, बाकी प्रत्येकाला तायदिअसने ठार मारले. असा होता ईतोलिआचा तायदिअस. त्याचा पुत्र बोलतो जास्त चुरचुरीत, पण पित्या-सारखे त्याला लढता मात्र येत नाही."

दायोमिदने उत्तर दिले नाही, कारण ॲगॅमेम्नॉनच्या दूषणाने त्याला लज्जित केले होते; पण कॅपॅनिअसच्या पुत्राने ॲगॅमेम्नॉनच्या शब्दांना आक्षेप घेऊन

म्हटले, "ॲत्रिअसपुत्रा, काही तरी खोटया गोष्टी सांगू नकोस. कारण मनात आणलेस तर खरे काय ते तुला सांगता येईल. आमच्या पित्यापेक्षाही आम्ही भारी आहोत अशी आम्ही प्रौढी मिरवतो. जरी तिचे तट अत्यंत मजबूत होते आणि आमचे सैनिक त्यामानाने संख्येने कमी होते तरी सातवेशींची थीब्जनगरी आम्ही जिंकली, कारण देवांच्या कौलांवरच तसाच जव्हच्या साह्यावर आम्ही विश्वास ठेवला होता. आणि ते नष्ट झाले त्यांच्याच मूर्ख-पणामुळे ; तेव्हा आमच्या इतके आमचे पिते आदर्शही होते असे समजू नको."

दायोमिदने कठोरपणे त्याच्याकडे पाहून म्हटले, "माझ्या मित्रा, चूप बैस. निक्षून सांगतोय मी. ॲकिअन्सना प्रोत्साहन देण्यात ॲगॅमेम्नॉन गैर असे काहीच करीत नाही, कारण ही नगरी आपण जिंकली तर यशश्री जशी त्याला लाभेल तशीच आपला पराभव झाला तर दुष्कीर्तीही त्याच्याच पदरी येईल. म्हणून आपण शौर्याने आपली जबाबदारी पार पाडू या."

हे बोलत असता त्याने आपल्या रथावरून उडी मारली आणि त्याच्या देहा-वरच्या चिलखताचा असा खणखणीत व उग्र आवाज झाला की ते ऐकून शूर मनुष्यही घाबरला असता.

ज्याप्रमाणे पश्चिम वायूच्या फटकाऱ्यानी बेफाम झालेली एकादी प्रचंड लाट दूर समुद्रात मस्तक उंचावून नंतर किनाऱ्यावर येऊन कोसळते, परंतु खडकांच्यावरती तिच्या शिखराची उंच कमान होते आणि तिचा खारा फेस चौफेर उधळतो, त्याप्रमाणे दॅनाअन सेनेच्या तुकडया दाटीगर्दीने, नेटाने युद्धा-साठी कूच करीत होत्या. प्रत्येक तुकडीचा नायक आपापल्या सैनिकांना आज्ञा करीत होता. पण त्या सैनिकांकडून एक शब्दही ऐकू येत नव्हता. असे कोणाला वाटलेही नसते की इतके प्रचंड सेनादल चालले आहे कारण जणू त्यांच्यापैकी एकालाही जीभ नसावी असे दिसत होते––इतक्या निमूटपणे ते आज्ञापालन करीत होते. ते पुढेपुढे कूच करीत असता सूर्यप्रकाशात त्यांच्या देहावरची चिलखते चमकत होती. पण त्रोजन्सच्या सैनिकश्रेणींमधून मात्र असा गोंगाट होत होता की जणु एकाद्या संपन्न धनगराच्या आवारात कित्येक हजार मेंढया दूध दोहनासाठी थांबल्या आहेत नी कोकरांच्या बें बें स्वराला एकसारखा स्वतः बें बें करून प्रतिसाद देत आहेत. कारण त्या लोकांची भाषा एक नव्हती ; त्यांच्या बोली वेगवेगळया, बोलायच्या तऱ्हा भिन्नभिन्न आणि ते अनेक निरनिराळया ठिकाणांहून आलेले होते. एका सैन्याला मार्सने उत्स्फूर्त केले होते तर दुसऱ्याला मिनर्व्हाने आणि शिवाय त्यांच्याबरोबर घबराट, बेशिस्त पळापळ आणि भांडखोरपणा अशा अवदसा होत्या.

कलहदेवतेच्या प्रकोपाचा पारा तर कधी उतरतच नाही. ती प्राणघातकी मार्सची बहीण व मैत्रीण प्रथम ठेंगणी पण मग इतकी उंच होत जाणारी की तिचे पाय पृथ्वीवरच असले तरी डोके स्वर्गापर्यंत पोहोचेलेले,—तीच त्रोजन सैन्यात सर्वत्र फिरून दुःख वाढवणारा बेबनाव अगदी सारख्या प्रमाणात सर्वत्र पसरवीत होती.

त्या दोन्ही सेना एकत्र आल्या तेव्हा युद्धाच्या धुमश्चक्रीत ढाल ढालीवर आपटली आणि भाला भाल्यावर खणखणला. ढालींच्या मध्यावरचे टणक उंचवटे एकमेकांशी टकरा देऊ लागले आणि महान जनसमूहाच्या पदन्यासा-सारखा ध्वनी घुमू लागला. मरणारांच्या किंकाळ्या व मारणारांच्या विजयी गर्जना ऐकू येऊ लागल्या. आणि भूमीवर रक्ताचे लाल पाट वाहू लागले. पावसामुळे पूर आलेले जलप्रवाह आपापल्या खोल घळीतून वेड्या वेगाने वाहात येऊन शेवटी त्यांचे खवळलेले लोंढे एकाद्या खोल दरीत एकमेकात मिळावेत आणि डोंगरावरच्या मेंढपाळाने दुरून ती गर्जना ऐकावी तद्वतच उभय सेनासमूह एकमेकांशी भिडले तेव्हा तीव्र संग्रामाचा कोलाहल उठला.

मग प्रथम सेनेच्या सर्वात पुढच्या रांगांत लढतांना त्रोजन्सचा एक शस्त्रधारी लढवैय्या थॅलिसिअसपुत्र एकेपोलस याला अँन्तिलोकसने ठार केले. त्याच्या शिरस्त्राणाच्या पुढे आलेल्या भागावर घाव घालून भाला त्याच्या कपाळात घुसवला. भाल्याचे ब्रॉन्झ धातूचे तीक्ष्णाग्र त्याच्या कवटीच्या हाडापर्यंत पोचले. त्याच्या डोळ्यांपुढे काळोखी आली. एकाद्या कोसळणाऱ्या मनोऱ्या-सारखा तो लढाईच्या ऐन गर्दीत सपशेल खाली पडला आणि तो पडल्यावर कॅल्कॉदॉनपुत्र आणि अभिमानी अॅबॅन्तिझ लोकांचा प्रमुख एलेफेनॉर राजा त्याला त्याच्याभोवती होणाऱ्या बाणांच्या वर्षावातून बाजूला ओढून नेऊ लागला. कारण त्याचे चिलखत काढून घेण्याची त्याला घाई झाली होती. पण त्याचा तो प्रयत्न फार वेळ टिकला नाही. कारण अॅगेनॉरने त्याला तो देह ओढून नेताना पाहिले, आणि देह ओढताना वाकल्याने त्याची जी बगल ढालीविना उघडी पडली होती, तिच्यावर ब्राँझ धातूने दांडा मढवलेल्या भाल्याचा घाव घातला. आणि असा तोही नाश पावला. मग त्याच्या मृतदेहाभोवती त्रोजन्स आणि अॅकिअन्सची बेफाम हाणामारी जुंपली. एकमेकांना रेटीत लांडग्यासारखी माणसावर माणुस तुटून पडला.

तत्क्षणी तेलेमॉनपुत्र अॅजॅक्सने सिमॉइसिअस या देखण्या तरुणाचा वध केला, तो होता अन्थीमिऑनपुत्र ; त्याची आई मातापित्यांबरोबर आपल्या मेंढ्यांचे कळप पाहून इदा पर्वतावरून परत येतांना सिमॉइसच्या काठी प्रसूत झाल्यामुळे

तिच्या अपत्याला सिमॉइसिअस हे नाव दिले होते ; पण आपल्या मातापित्यांनी केलेल्या आपल्या संगोपनाची परतफेड करायला तो जगला नाही ; कारण अगदी आघाडीच्या योद्धयांसमवेत तो पुढे चाल करून येत असता प्रबळ अॅजॅक्स-च्या भाल्याने त्याची जीवनयात्रा अकाली संपुष्टात आली. त्याच्या उजव्या स्तनाग्रापाशी भाला छातीत घुसला तो थेट खांद्यातून निघाला आणि एकाद्या तळ्याजवळच्या कुरणात सरळ उंच वाढलेल्या, माथ्याला घनदाट फांद्या असलेल्या पॉपलर वृक्षासारखा तो कोसळला. असा वृक्ष पाडल्यावर मग रथाची चाके बनवणारा कारागीर वृक्षाच्या मुळांवर कुऱ्हाड घालतो, एकाद्या उत्तम रथाच्या चाकाचे परिघचक्र घडवण्यासाठी त्याला त्याचे लाकूड हवे असते आणि तोडल्यावर ते लाकूड मुरण्यासाठी वारा ऊन खात पाण्याकाठी पडून राहते ; तशाप्रकारे अॅन्थिमिऑनपुत्र सिमोईसिअस अॅजॅक्सने भूमीवर पाडला. त्यावर प्राअॅमपुत्र चकाकत्या कवचाचा अॅन्तिफस याने गर्दीमधून अॅजॅक्सवर एक भाला भिरकावला पण त्याचा नेम चुकून तो युलिसिसचा शूर सोबती लिल्युकस याला जांघेत लागला, त्यावेळी तो सिमोइसिअसचा देह ओढून दुसऱ्या बाजूला नेत होता, त्यामुळे तो त्या देहावर पडला आणि त्यावरची त्याची पकड ढिली पडली. लिल्युकस मारला गेल्याचे पाहून युलिसिसला त्वेष आला आणि संपूर्ण चिलखत घातलेला असा तो लांब टांगा टाकीत पुढच्या रांगातून शत्रूच्या अगदी जवळून गेला ; मग त्याने उग्र नजरेने आजुबाजूस पाहून नेम धरला आणि त्याने तसे करताच त्रोजन्स मागे हटले ; त्याची भालाफेक वाया गेली नाही. पित्याच्या घोड्या अॅबिडॉसमध्ये सांभाळणारा व नंतर पित्याकडे आलेला प्राअॅमचा अनौरस पुत्र देमोकन याला तो भाला लागला. सोबत्याच्या मरणाने खवळलेल्या युलिसिसने तो भाला त्याच्या एका कानशिलावर मारला, व त्याचे टोक कपाळापलीकडे दुसऱ्याबाजूला निघाले. तेव्हा त्याच्या डोळ्यापुढे अंधेरी आली आणि तो चिलखताच्या खडखडाटात जोराने भूमीवर आपटला. तेव्हा हेक्तरने व आघाडीवरच्या इतरांनी थोडी माघार घेतली आणि आरगॉसचे सैन्य मोठा आरडाओरडा करीत, पुढेपुढे नेट लावीत आपले मृतवीर दूर नेऊ लागले. पण पर्गमसवरून अॅपॉलोने खाली पाहिले व नाराज होऊन त्रोजनांना ओरडून म्हटले, "त्रोजनांनो, शत्रूवर पुढे चाल करून जा आणि आरगॉसवासीयांकडून असे मार खाऊ नका. तुम्ही प्रहार केला तर त्यांना काही दुखापत होणार नाही अशी त्यांची कातडी काही दगडाची किंवा लोखंडाची नाही ! शिवाय, सुंदरी थेतिसचा पुत्र अॅकिलिझ हा युद्ध करीत नाहीय्, तर आपला राग कुरवाळीत नौकांवर बसला आहे."

तो वलाढचदेव त्या नगरवासियांवर ओरडून असे बोलला आणि त्याचवेळी त्रितोच्या पोटी आलेली जव्हची दुर्दम्य कन्या ॲकिअनांच्या सेनासंभारात संचार करीत जिथे जिथे तिला शैथिल्य आढळले तिथे तिथे सैनिकांना पुढे होण्यास प्रोत्साहन देऊ लागली.

मग ॲमॅरिन्सिअसपुत्र दायोरेझ याच्यावर दैवाचा घाला पडला ; त्याच्या उजव्या पायाच्या घोटचापाशी एक अणकुचीदार दगड लागला ; इनसहून आलेल्या थ्रेसिअनांचा नायक इम्ब्रॅससपुत्र पैरोउस याने तो दगड भिरकावला होता. त्या निर्दय दगडाने हाडे आणि दोन्ही स्नायुबंधही चिरडून टाकले. तो पाठीवर खाली पडला आणि मृत्युयातनानी तडफडत तो सोबत्यांकडे हात पसरू लागला, पण त्याला विद्ध करणाऱ्या पैरोउसने त्याच्यावर उडी घेऊन भाला त्याच्या पोटात खुपसला ; त्यासरसा त्याचा कोथळा उसळत बाहेर पडून जमिनीवर आला व त्याच्या डोळचांपुढे काळोख झाला. त्याच्या देहापासून पैरोउस दूर होताच ईतोलिआच्या थोआसने त्याच्या छातीत स्तनाग्रापाशी भाला मारला व त्याचे टोक त्याच्या फुप्फुसात घुसून बसले. थोॲस त्याच्या सन्निध आला व त्याच्या छातीतून भाला उपटून काढून त्याने आपली तलवार उपसून, त्याच्या पोटाच्या मध्यावर वार केला. त्यामुळे तो तात्काळ मरण पावला. पण त्याचे चिलखत थोॲसने काढून घेतले नाही. कारण चैरोऊसचे थ्रेसवासी सोबती,––माथ्यावर केसांचा एक झुवका बांधणारे ते लोक––त्याच्यादेहाभोवती उभे राहीले आणि थोॲसच्या धिप्पाड देहाला आणि शौर्याला दाद न देता आपल्या लांब भाल्यानी त्यांनी त्याला दूर ठेवून अखेर मागे हटवले. याप्रमाणे भूमीवर एकमेकांशेजारी ती दोन प्रेते हातपाय ताणून पडली होती ; एक तो थ्रेसिअन्सचा नायक, दुसरा एपिअन्सचा, आणि त्यांच्याभोवती इतर पुष्कळ सैनिक मरून पडले होते.

आणि आता जर मिनर्व्हाने भाल्यांच्या आणि बाणांच्या तुफानी हल्ल्यातून कोणाला घाव किंवा जखम न होऊ देता त्या संग्रामातून हाताने धरून फिरवले असते तर त्या लढाईत विशेष काही अर्थ नव्हता असा आव कोणीही आणू शकला नसता. कारण त्यादिवशी पुष्कळ त्रोजन आणि ॲकिअन योद्धे मरून भूमीवर शेजारी शेजारी पालथे पडलेले होते.



## सर्ग ५

मग तायदिअसपुत्र दायोमिद याने इतर सर्व आरगॉसवासीयांपेक्षा जास्त पराक्रम करून कीर्तिमान व्हावे, यासाठी पॅलास मिनर्व्हाने त्याच्या हृदयी शौर्य जागृत केले. ओशिॲनसच्या जलात स्नान झाल्यावर ग्रीष्मात तारा जसा आत्यंतिक तेजाने चमकतो, तसा त्याच्या ढालीतून व शिरस्त्राणापासून एक ज्वालाशिखा तिने तळपत ठेवली. तसेच त्याच्या डोक्यावर व खांद्यावरही असाच तेजाग्नी प्रदीप्त करून तिने त्याला लढाईच्या दाट धुमश्चक्रीत वेगाने शिरण्यास सांगितले.

आता ट्रोजन्समध्ये दॅरेझ या नावाचा, व्हल्कनचा पुजारी एक श्रीमन्त व माननीय पुरुष होता ; युद्धाच्या सर्वकलात निपुण असे फेगिअस व इदिअस नामक त्याचे दोन पुत्र होते. ट्रोजन सेनेच्या मुख्य फळीतून पुढे येऊन रथारूढ अशा त्या दोघांनी पायउतार असलेल्या दायोमिदवर चाल केली. एकमेकांच्या अगदी जवळ येताच फेगिअसने प्रथम नेम धरला ; पण त्याचा भाला दायोमिदला न लागता त्याच्या डाव्या खांद्यावरून पुढे निघून गेला. मग दायोमिदने फेकलेला भाला मात्र फुकट गेला नाही ; कारण त्याचा घाव फेविअसच्या वक्षाच्या स्तनाग्राजवळ बसला व तो रथावरून खाली पडला. त्याच्या देहाला सांभाळीत उभा राहण्याची इदिअसची छाती झाली नाही आणि रथावरून खाली उडी मारून तो पळून गेला ; नाहीतर तोही भावाच्याच दुर्भाग्याचा वाटेकरी झाला असता. तेव्हा त्याच्या म्हाताऱ्या बापावर सर्वस्वी दुःखाधीन होण्याची पाळी येऊ नये म्हणून व्हल्कनने अंधाराच्या ढगात गुंडाळून इदिअसला वाचवले ; पण तायदिअसपुत्राने रथाचे घोडे हाकून नेले व अनुयायांना ते, नौकांकडे घेऊन जाण्यास सांगितले. दॅरेझच्या दोन पुत्रातला एक पळून चाललेला नी दुसरा आपल्या रथापाशी मरून पडलेला पाहून ट्रोजन्स भयभीत झाले ; म्हणून मिनर्व्हाने मार्सचा हात धरून म्हटले, "मार्स, मार्स रे, माणसांच्या नाशका, नगरींच्या रक्तरंजक आक्रमका, आता ट्रोजन्स नी ॲकिअन्स यांना आपापसात लढू देण्यास आपण सोडू नये काय ? आणि दोघांपैकी जव्ह कोणाला विजय प्रदान करतो ते पाहत राहू या का ? चल आपण निघून जाऊ आणि अशा रीतीने जव्हचा कोप टाळू."

असे म्हणत तिने मार्सला लढाईबाहेर काढले आणि स्कॅमॅन्दरच्या सरळसोट काठावर नेऊन ठेवले. हे होताच दॅनाअनांनी ट्रोजनांना मागे रेटले आणि

त्यांच्या प्रत्येक नायकाने समोर आलेला शत्रू ठार केला. प्रथम ॲगॅमेम्नॉन राजाने हॅलिझोनींचा प्रमुख बलिष्ट ओदिअस याला रथावरून उडवले. ॲगॅमेम्नॉनचा भाला त्याच्या पाठीच्या रुंद भागात घुसला त्यावेळी ओदिअस पळून जाण्यासाठी वळत होता ; दोन खांद्यांच्यामध्ये त्याला तो भाला लागून त्याच्या छातीतून आरपार गेला व त्याच्या कवचाचा खडखड असा आवाज त्याच्याभोवती होत असता तो अवजडपणे भूमीवर पडला.

मग आयदोमेनिअसने व्हार्नेहून आलेला मेओनिअन बोरसचा पुत्र फीझर याला मारले ; तो रथावर चढत असता त्याच्या उजव्या खांद्यात आयदोमिअसचा भाला घुसला आणि रथातून अवजडपणे पडत असताच मरणाच्या अंधःकाराने त्याला लपेटले.

आयदोमेनिअसच्या शिलेदार सैनिकांनी फीझसचे चिलखत लुटून घेतले ; त्याचवेळी ॲत्रिअसपुत्र मेनेलॉसने मृगयेचा शोकीन व मातबर शिकारी स्लोपिअसपुत्र स्कॅमॅन्ड्रिअस याचा वध केला. याला गिरिकंदरात वाढलेल्या नाना प्रकारच्या रानटी पशूंची पारध करण्यास स्वतः दायानाने शिकवले होते ; पण ती किंवा त्याचे विख्यात शरसंधानकौशल्यही यावेळी त्याला वाचवू शकले नाही, कारण तो पळत असताच मेनेलॉसचा भाला त्याच्या पाठीवर लागून त्याच्या दोन खांद्यांमधून छातीतून आरपार गेला त्यामुळे तो रथावरून उलटापालटा होत पडला आणि त्याच्या कवचाचा त्याच्याभोवती खडखडाट झाला.

पॅलास मिनर्व्हाचे ज्याच्यावर फार प्रेम होते त्या सर्वप्रकारच्या चतुर कलाकुसरीत प्रवीण असलेल्या हर्मान नामक माणसाचा नातू व तेक्तॉनचा पुत्र फरेक्लस याला मग मेरिऑनिझने मारले. हर्माननेच अलेक्झँद्रसला नौका बांधून दिल्या होत्या—त्या नौका पुढील सर्व अनर्थाचे मूळ होत्या व त्यांच्यामुळेच दोघांवरही—त्रोजनांवर आणि खुद्द अलेक्झँद्रसवरही आपत्ती ओढवली, कारण त्याने स्वर्गस्थ देवांचे अध्यादेश मानले नाहीत. फरेक्लस पळून चालला असता त्याला गाठून मेरिऑनिझने त्याच्या उजव्या नितंबावर घाव घातला. भाल्याचे टोक हाडातून पार जाऊन मूत्राशयात शिरले आणि तो मोठ्याने ओरडून गुडघ्यांवर पुढे पडत असताच त्याला मृत्यु आला.

शिवाय मेगेझने पेदिअसचा प्राण घेतला ; हा ॲन्तेनॉरचा पुत्र जरी अनौरस होता तरी थिॲनोने पतिप्रेमाखातर याचे स्वतःच्या अपत्यापैकीच एक मानून संगोपन केले होते. त्याच्या अगदी जवळ जाऊन फिलीअसपुत्राने भाला त्याच्या मानेच्या मागल्या बाजूस खुपसला तो त्याच्या जिभेखालून दातांमधून जबड्यात गेला. तेव्हा ते थंड ब्रॉंझ टोक दातांखाली रगडले गेले व तो धुळीत मरून पडला.

आणि देवासारखा मान असलेल्या, स्कॅमॅन्दर नदीचा पुजारी म्हणून नियुक्त झालेल्या थोर दोलोपिअनचापुत्र हिप्सेनॉर, याला युइमॉनपुत्र युरिपिलसने मारले ; हा पुढे पळत असता त्याचा पाठलाग करून त्याच्या बाहूवर तलवारीचा घाव घातला आणि त्याचा भक्कम हात तोडला. तो रक्तबंबाळ हात भूमीवर पडला व कोणाही माणसाला प्रतिकार न करता येणाऱ्या दैवगतीसह मृत्यूच्या छाया त्याच्या डोळ्यावर आल्या.

अशी त्यांच्यामध्ये घनघोर लढाई माजली होती. तायदिअसपुत्राविषयी सांगायचे तर तो अॅकिअन्समध्ये जास्त होता की त्रोजन्समध्ये, हे सांगता आले नसते. हिवाळ्यात महापुराने फोफावलेला एकादा पाण्याचा लोंढा बंधारा फोडून मैदानावरून जोरात निघावा आणि आकाशीच्या पावसाने फुगून, बांध किंवा सुपीक द्राक्षमळे काटांवर टिकू न देता, क्षणार्धात अलोट वेगाने पुढे जात, त्याने अनेक बळकट माणसांच्या हातांनी पाणी हटवून केलेल्या शेतजमिनीवरच्या अनेक शेतांची नासाडी करावी त्याप्रमाणेच तायदिअसपुत्राने त्रोजन सैनिकांच्या दाटीने लढणाऱ्या फळ्या उधळून लावल्या, आणि ते संख्येने जरी अनेक होते तरी त्याचा आवेशपूर्ण हल्ला सहन करण्याची त्यांची छाती नव्हती.

आता सारे मैदान असे पायाखाली घालीत, आपल्यापुढे त्रोजनांना सैरावैरा पळवीत असलेला तो वीर लायकॅऑनपुत्राने जेव्हा पाहिला, तेव्हा त्याने नेम धरून मारलेला बाण तायदिअसपुत्राला खांद्याजवळ वक्षकवचावर अग्रभागी लागला ; तो त्या धातूच्या पल्यातून पार जाऊन मांसात रुतला व त्यामुळे वक्षकवचावर रक्त पसरले. ते पाहून लायकॅऑनपुत्राने विजयाने प्रफुल्ल होऊन आरोळी ठोकली, "वीरहो, त्रोजनांनो, या, पुढे व्हा, सर्वात शूर अॅकिअन योद्धा जखमी झाला आहे, आणि मी लिसिआहून इकडे धावत आलो तेव्हा राजा अॅपॉलो जर खरोखरच माझ्याबाजूला असेल तर तो जखमी वीर फार वेळ तग धरणार नाही."

अशी प्रौढी त्याने मिरवली ; पण त्याच्या बाणाने दायोमिद ठार झाला नव्हता, तो फक्त मागे हटला आणि कॅपॅनिअसपुत्र स्थेनेलसच्या रथाकडे व घोड्यांकडे चालला. तो म्हणाला, "प्रिय कॅपॅनिअसपुत्रा, तुझ्या रथावरून खाली ये आणि माझ्या खांद्यातला तीर बाहेर काढ."

स्थेनेलिअसने रथावरून खाली उडी घेतली व जखमेतून त्याने तो बाण बाहेर काढला; तेव्हा त्याच्या अंगरख्याला पडलेल्या भोकातून रक्त उफाळून बाहेर आले. तेव्हा दायोमिदने प्रार्थना केली, "माझी हाक ऐक, ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या अश्रान्त कन्ये, जर कधी माझ्या पित्यावर तू मनापासून

प्रेम ठेवले असशील आणि युद्धाच्या ऐन गर्दीत त्याच्या साह्याला उभी राहिली असशील तर माझ्यावरही तीच कृपा ठेव; वर दे, की त्या माणसाजवळ भालाफेकीच्या टप्प्यात मला जाता येऊन त्याला मारता यावे. तो माझ्या अंदाजाबाहेर चपळ निघाला, आणि त्याने मला जखमी केले; आणि आता तो बढाई मारतो आहे की, आता मी काही फार वेळ सूर्यप्रकाश पाहणार नाही".

याप्रमाणे त्याने प्रार्थना केली व ती पॅलस मिनर्व्हाने ऐकली. तिने त्याचे अवयव लवचीक केले, त्याच्या हातापायांना चापल्य आणले. मग ती त्याच्याजवळ जाऊन म्हणाली, "ट्रोजन्सशी युद्ध करण्यास भिऊ नकोस, दायोमिद, कारण तुझ्या वीर्यशाली पित्याचे, तायदिअसचे तेज मी तुझ्या हृदयात ठेवले आहे. शिवाय तुला देव आणि मानव वेगवेगळे ओळखता यावे म्हणून मी तुझ्या दृष्टीवरचे अवगुंठनही दूर केले आहे. तेव्हा मग दुसरा कोणी देव इथे आला आणि तुझ्याशी लढण्याची तयारी दर्शवू लागला, तर त्याच्याशी लढू नको; पण जव्हची कन्या व्हीनस जर आली तर तुझ्या भाल्याने मारून तिला जखमी कर".

हे बोलून झाल्यावर मिनर्व्हा निघून गेली आणि तायदिअसपुत्राने सर्वात पुढे लढणारात आपली जागा घेतली, आता पूर्वी होता त्याच्या तिप्पट तो उग्र दिसत होता. मेंढयांच्या कोंडवाडयाच्या भिंतीवरून मेंढरावर हल्ला करण्यासाठी उडी मारताना मेंढपाळाने जखमी केलेल्या पण ठार न मारलेल्या सिंहासारखी त्याची अवस्था झाली होती. मेंढपाळाने त्या पशूला भयंकर चवताळवले आहे आणि मेंढयांच्या कळपाचे तर तो संरक्षण करू शकत नाही म्हणून इमारतीमागे तो आडोसा घेतो, आणि त्याने वाऱ्यावर सोडल्यामुळे घाबरीघुबरी झालेली ती मेंढरे एकमेकांवर पडून गुदमरत आहेत, आणि तो संतप्त झालेला सिंह कोंडवाडयाच्या भिंतीवरून उडी मारून जातो आहे अगदी याप्रमाणेच ट्रोजनांच्या सैन्यात दायोमिदने क्रुद्धपणे संचार केला.

त्याने ॲस्तिनोउसला मारले आणि स्वतःच्या प्रजेचा पालक असणाऱ्या हायपैरॉनलाही-एकाच्या छातीत स्तनाग्रावर ती भाला खुपसून ठार केले, तर दुसऱ्याला गळ्याच्या हाडावर तलवारीचा असा जोराचा वार केला की, त्या वाराने खांदा मानेपासून नी पाठीपासून तुटून निघाला; त्या दोघांना तसेच भूमीवर पडू देऊन त्याने अॅबास नी पॉलिदस यांचा पाठलाग केला. स्वप्नांचे अर्थ उलगडून सांगणाऱ्या म्हाताऱ्या युरिडॅमासचे ते मुलगे बापाने स्वप्ने उलगडून सांगितलेली ऐकण्यास कधीच परत गेले नाहीत, कारण प्रतापी दायोमिदने त्यांच्या जीवनास विराम देऊन टाकला. मग तो फीनॉप्सचे दोन पुत्र झँथस

नी थॉउन यांच्यामागे लागला. हे पुत्र फीनॉप्सला अत्यंत प्रिय होते कारण आता तो फार थकला होता नी त्याच्या मालमत्तेचे वारस होण्यास आणखी पुत्र त्याला नव्हते. पण दायोमिदने त्याच्या दोन्ही पुत्रांचे प्राण घेतले नी त्यांच्या बापाला तीव्र शोकात लोटले; कारण युद्धातून जिवंत घरी परत आलेले ते त्याला पुन्हा कधी दिसले नाहीत, आणि त्याच्या भाऊबंदांनी त्याची संपत्ती आपापसात वाटून घेतली.

नंतर त्याची प्राअॅमचे दोन पुत्र, एकेमॉन नी क्रोमिअस यांच्याशी गाठ पडली, दोघेही एकाच रथात होते. गुरांचा कळप एकाद्या झाडीत चरत असता सिंह जसा एकाद्या गाईच्या किंवा पाडयाच्या नरड्याला घट्ट पकड घालतो तशी त्या दोघांवरही दायोमिदने झडप घातली. त्यांनी कितीही धडपड केली तरी तीस न जुमानता त्यांना दोघांना त्याने रथावरून खाली फेकले आणि त्यांच्या देहावरची कवचे ओरबाडून काढली; मग त्यांचे घोडे नौकांकडे नेण्यासाठी त्याने आपल्या सोबत्यांपाशी दिले.

जेव्हा ईनिआसने त्याला सैन्यात असा कहर उडवताना पाहिले तेव्हा तो लढाईच्या गर्दीमधून भाल्यांच्या वर्षावातून पॅन्डॅरस सापडतो का ते बघायला फिरू लागला. तो लायकॅऑनचा शूर पुत्र त्याला जेव्हा गवसला तेव्हा हा त्याला म्हणाला, "पॅन्डॅरस, ज्या बाबतीत तुझी बरोबरी इथला कोणीही मनुष्य करू शकणार नाही अथवा लिसिआत सुद्धा तुला भारी असा कोणी नाही, ते तुझे धनुष्य, तुझे पंखधारी बाण आणि धनुर्धर म्हणून तुझी कीर्ती हे सारे आता कोठे आहे? तेव्हा उचल तुझे हात जव्हच्या प्रार्थनेसाठी आणि इतक्या आक्रमक वृत्तीने सभोवार संचार करणाऱ्या व त्रोजनांचा इतक्या मोठ्या प्रमाणात संहार केलेल्या या माणसावर एक बाण मार. याने अनेक शूर पुरुष ठार मारले आहेत. हा कोण असावा? यज्ञकर्माच्याबाबतीत त्रोजन्सकडून काही प्रमाद घडल्यामुळे त्यांच्यावर चिडून संतप्त होऊन त्यांच्या विरुद्ध उठलेला हा खरोखरी कोणी देवपुरुष तर नसेल?"

लायकॅऑनपुत्राने उत्तर दिले, "इनिआस, तायदिअस पुत्राखेरीज हा अन्य कोणी नाही असे मला दिसतंय्. त्याच्या ढालीवरून, त्याच्या शिरस्त्राणाच्या मुखावरणावरून व त्याच्या घोड्यांवरून मला त्याची ओळख पटली. त्याचे रुप घेतलेला तो कुणी देव असेल हे शक्य आहे, पण मी म्हणतो तोच मनुष्य जर हा असेल तर हा सारा अनर्थ स्वर्गस्थ देवांच्या साह्याखेरीज तो करीत नसून त्याच्या बाजूला कृष्णमेघात झाकून गेलेला एकादा देव आहे आणि त्यानेच माझा बाण त्याला लागत असताना तो बाजूला फिरवला. मी त्याच्यावर अगोदरच

नेम धरून त्याच्या उजव्या खांद्यावर बाण मारला होता, त्याच्या वक्षकवचाच्या पुढील पट्यातून तो पार गेला आणि आता तो अधोलोकी तडक जाणार अशी माझी खात्री होती. पण आता असे दिसते की, माझ्या हातून तो ठार झाला नाही. हा माझ्यावर ज्याचा राग झाला आहे असा कोणीतरी एखादा देव असला पाहिजे. शिवाय माझ्याकडे घोडा नाही व रथही नाही. माझ्या पित्याच्या तबेल्यात अकरा उत्तम रथ आहेत. कारागिराकडून तयार होऊन नुकतेच आलेले, त्यांच्यावर कापडे पसरलेली आहेत; आणि प्रत्येक रथापाशी बार्ली नी राय खात घोडयांची एकेक जोडी उभी आहे. मी घरी होतो तेव्हा माझा पिता लायकॅऑन याने मला निघताना वारंवार आग्रह केला की मी रथ व घोडे बरोबर आणावे म्हणजे युद्धात त्रोजनांचे नेतृत्व मला करता येईल; पण मी त्याचे ऐकले नाही, ऐकले असते तर फार बरे असते. पण माझ्या मनात घोडयांचा विचार चालला होता; त्यांना पोटभर खाण्याची सवय होती आणि मला भीति वाटली की जेथे इतकी पुष्कळ माणसे गोळा होणार तेथे घोडयांना पोट भर मिळणार नाही. म्हणून मी त्यांना घरीच ठेऊन, फक्त माझे धनुष्य-बाण घेऊन पायीच इलिअमला आलो. पण यांचा काही उपयोग होत नाहीसे दिसते; कारण मी दोन सैनिक प्रमुखांना आतापावेतो बाण मारलेले आहेत. अत्रिअसपुत्र नी तायद्दिअसपुत्र या दोघांना आणि जरी मी नक्की त्यांचे रक्त सांडले असले तरी त्यांना अधिकच भडकावले मात्र आहे. हेक्तरच्या कामगिरीसाठी इलिअमला माझ्या अनुयायांचा नेता म्हणून येण्यास मी निघालो व त्या दिवशी माझे धनुष्य मी खुंटीवरून काढले हे एकंदर वाईटच झाले म्हणायचे! आणि जर कधी माझे जन्मग्राम, माझी पत्नी आणि माझ्या घरातले वैभव डोळयांनी पहायला मी घरी परत गेलो आणि मी ते धनुष्य मोडून पेटलेल्या विस्तवावर ठेवले नाही, तर तिथल्या तिथे कोणीतरी माझे डोके उडवो—कारण हे धनुष्य माझ्याशी खोडसाळपणे वागत आहे".

ईनिआसने उत्तर केले, "आता आणखी काही बोलू नकोस. आपण दोघे रथ नी घोडे घेऊन या माणसाविरुद्ध चालून जाऊन त्याच्याशी शस्त्रयुद्ध केल्या-खेरीज परिस्थिती सुधारणार नाही. माझ्या रथावर चढ नी पहा थॉसचे घोडे मैदानावर पाठलाग करताना किंवा माघार घेतांना किती हुशारीने धावतात ते. जर जव्हने तायदिअसपुत्रास पुन्हा विजयश्री बहाल केली तर हे घोडे आपल्याला नगरीस सुखरूप परत नेतील. तर मग हा चाबूक नी लगाम धर, म्हणजे मी रथावर लढाईस उभा राहतो, नाहीतर त्या माणसाच्या हल्ल्यासाठी तू तयार रहा नी मी घोडे हाकतो."

लायकॅऑनपुत्र बोलला, "ईनिआस, लगाम घेऊन सारथ्य तूच कर, तायदिअसपुत्राच्या हल्ल्यापुढे आपल्याला पळ काढावा लागला तर स्वतःचा नेहमीचा सारथी असल्याने घोडे अधिक चांगले धावतील. सारथ्य करताना त्यांच्या अपेक्षेप्रमाणे तुझा आवाज त्यांनी ऐकला नाहीतर ते कचरतील व लढाई-च्या क्षेत्राबाहेर आपल्याला नीटपणे काढणार नाहीत. मग तायदिअसपुत्र आपणा दोघांनाही ठार मारून घोडे मात्र घेईल. तेव्हा तू स्वतःच त्याना हाक नी मी भाला घेऊन शत्रूला तोंड देण्याच्या तयारीत राहतो."

मग ते रथावर चढले आणि तो त्यांनी पुऱ्यावेगाने तायदिअसपुत्राकडे हाकला. कॅपॅनिअसपुत्र स्थेनेलस याने या दोघांना येताना पाहिले आणि तो दायोमिदला म्हणाला, "तायदिअसपुत्र दायोमिद, माझ्या आदर्श पुरुषा, तुझ्याकडे दोन वीर वेगाने येत असलेले मला दिसत आहेत ; दोघेही प्रबळ---एक लायकॅऑनपुत्र निष्णात धनुर्धर पॅन्दॅरस आणि ज्याची माता व्हीनस आहे तो दुसरा अँकिसिझ-पुत्र ईनिआस. रथावर चढ आणि आपण माघार घेऊ या ; मी तुला विनवतो, इतक्या त्वेशाने पुढे होऊ नकोस नाहीतर तुझा वध व्हायचा संभव आहे."

त्याच्याकडे रागान पाहून दायोमिद म्हणाला, "पळून जाण्याची गोष्टच करू नको ; त्याबाबतीत मी तुझे ऐकणार नाही. पलायन किंवा भय ज्याला ठाऊक नाही त्या वंशाचा मी आहे आणि माझे हातपाय अजून काही थकले नाहीत. रथावर आरुढ होण्याचा माझा मुळीच मानस नाही, आणि मी आहे तसाच त्यांच्याविरुद्ध चाल करून जाणार आहे. पॅलॉस मिनर्व्हाने मला सांगि-तले आहे की, मी कुठल्याही माणसाला भिऊ नये, आणि जरी त्या दोघातला एक निसटला, तरी त्यांचे घोडे दोघांनाही काही पुन्हा परत नेणार नाहीत. मी पुढे सांगतो आणि ते तुझ्या मनावर ठसवून घे,---की, जर मिनर्व्हाने दोघांनाही ठार करण्याचे उज्ज्वल यश मला देणे योग्य ठरवले तर तुझे घोडे येथेच थांबव नी त्यांचे लगाम रथाच्या कडेला घट्ट बांध. मग ईनिआसच्या घोड्यांवर नेमकी उडी घे व त्यांना त्रोजनांच्या सेनाश्रेणीकडून अँकिअनांकडे हाकून आण. त्रॉसला त्याचा पुत्र गॅनिमीद याची किंमत म्हणून महान जव्हने दिलेल्या घोड्यांच्या वंशातले ते घोडे आहेत व जगातल्या जिवंत आणि सूर्यप्रकाशात जगात राहाणाऱ्या व हिंडण्याफिरणाऱ्या साऱ्या घोड्यात ते सर्वोत्कृष्ट आहेत. "लॅओमेदॉनला नकळत अँकिसिझ राजाने आपल्या घोड्यांचा त्या घोड्यांशी समागम घडवून आणून त्यांच्या वंशाचे रक्त चोरले आणि त्या घोड्यांना सहा शिंगरे झाली. त्यापैकी चार अजून त्याच्याच तबेल्यात आहेत, पण बाकीची

दोन त्याने ईनिआसला दिली. ते घोडे जर आपण जिंकून घेतले तर आपल्याला मोठी किर्ती लाभेल."

याप्रमाणे ते आपापसात बोलले, पण ते दुसरे दोघे आता रथातून त्यांच्या अगदीजवळ आले होते आणि लायकॅऑनपुत्र प्रथम बोलला ; तो म्हणाला, "महान नी प्रबळ कुलवान तायदिअसच्यापुत्रा, माझ्या बाणाने तुला लोळवण्याचे काम केले नाही, तेव्हा आता मी माझ्या भाल्याने प्रयत्न करतो."

हे बोलतानाच त्याने आपल्या भाल्याचा नेम धरला आणि तो दूर फेकला ; तो भाला तायदिअसपुत्राच्या ढालीवर बसला. त्याचे ब्रॉंझचे टोक ढालीतून आरपार जाऊन वक्षकवचाला पोहोचले. त्यावर लायकॅऑनपुत्र मोठ्याने ओरडला, "घाव तुझ्या पोटातून आरपार गेला आहे ; तू आता फार वेळ टिकाव धरणार नाहीस, आणि युद्धाची विजयश्री माझी आहे."

पण दायोमिदने अजिबात न डगमगता उत्तर दिले, "तुझा नेम चुकला आहे, लागला नाही : आणि तुम्ही दोघे या प्रकरणाचा शेवट पाहण्याआधी तुमच्यातला कोणीतरी एक आपल्या रक्ताचे टणक ढाल असलेल्या मार्सला आकंठ पान घडवील."

असे बोलून त्याने आपला भाला फेकला आणि मिनर्व्हाने त्याला पॅन्दॅरसच्या डोळ्यापाशी नाकावर वळवले. तो भाला चिरफाड करीत त्याच्या शुभ्र दाता-तून घुसला ; त्याच्या जिभेच्या मुळातून घुसत भाल्याचे ब्रॉंझचे टोक हनुवटी-खाली बाहेर आले, आणि तो धाडकन भूमीवर कोसळत असता त्याच्या चकाक-णाऱ्या चिलखताचा खडखड असा आवाज त्याच्याभोवती झाला. घोडे भीतीने बिचकून बाजूला झाले व तो हतबल होऊन गतप्राण झाला.

ॲकिअन्स त्याचा देह पळवून नेतील या भयाने ईनिआसने ढाल व भाला घेऊन, रथावरून उडी घेतली. त्या देहाच्या दोन्ही बाजूस पाय रोवून एकाद्या सिंहासारखा बळाच्यागर्वात, ढाल व भाला पुढे धरून आणि तोंडाने युद्धगर्जना करीत, समोर येण्याचे धाडस करील त्या पहिल्या माणसाचा जीव घेण्याच्या निश्चयाने तो उभा राहिला. पण तायदिअसपुत्राने एक भला मोठा दगड उचलून घेतला ; असा दगड उचलायला आजच्या जमान्यातली दोन माणसे लागली असती. पण त्याने तो सहज कोणाच्या मदतीविना उंचावर धरला आणि तो, ज्या गोटा-वाटी नावाच्या सांध्यात मांडीचे हाड फिरते त्याठिकाणी ईनिआसच्या कमरेवर हाणला. त्या दगडाने सांध्याचा चक्काचूर केला, दोन्ही बाजूचे स्नायुबंध तोडले व त्याच्या दंतुरकडांनी सारेमांस फाडून काढले. तो वीर गुडघ्यांवर पडला आणि रात्रीचा काळोख डोळ्यांवर पडेपर्यंत हातांनी

जमिनीचा आधार घेऊन तसाच टेकून राहिला. आणि आता तो नृपती ईनिआस तेथल्या तेथेच मरण पावला असता, पण अँकिसिझ गुरांची देखभाल करीत असता त्याच्यापासून तिला गर्भसंभव झाला व नंतर जिने ईनिआसला जन्म दिला ती त्याची माता जव्हकन्या व्हीनस हिच्या तात्काल परिस्थिती लक्षात येऊन तिने आपले शुभ्र बाहू आपल्या प्रियपुत्राभोवती टाकले ; आपल्या सुंदर वस्त्राचा एक पदर त्याच्यावर घालून तिने त्याचा बचाव केला ; नाहीतर तिला भीती वाटली की, एकाद्या दॅनाअनने आपला भाला याच्या छातीत खुपसून त्याला मारले असते.

तेव्हा याप्रमाणे तिने आपल्या लाडक्या मुलाला लढाईबाहेर काढले. पण दायोमिदने केलेली आज्ञा कॅपॅनिअसपुत्र विसरला नव्हता. युद्धाच्या धाईगर्दीपासून दूर त्याने आपले घोडे रथाच्या कडेला लगाम बांधून जखडून ठेवले. मग त्याने ईनिआसच्या घोड्यांवर झडप घातली व ते त्रोजनांच्या सैन्याकडून ॲकिअनांकडे हाकून नेले. ते काम झाल्यावर ते घोडे त्याने आपला खास सोबती दैपिलस याच्या स्वाधीन केले, कारण घोडे नौकांकडे घेऊन जाण्याच्या आपल्या मताशी जुळणाऱ्या मताचा असा सर्वात तोच होता म्हणून कॅपॅलिअसपुत्र त्याला सर्वापेक्षा जास्त मानीत असे. मग त्याने स्वतःच्या रथावर आरोहण केले, लगाम हातात घेतले आणि संपूर्ण वेगात तायदिअसपुत्राच्या शोधार्थ रथ हाकला.

आता तायदिअसपुत्र हातात भाला घेऊन त्या सिप्रिअन देवीचा पाठलाग करीत होता ; कारण ती दुबळी आहे, पुरुषांवर वर्चस्व गाजवू शकतील अशा मिनर्व्हा किंवा नगर-विनाशिनी एन्यो अशा देवींपैकी ती नाही हे त्याला माहित होते, आणि जेव्हा अखेर दीर्घ पाठलागानंतर तो तिच्याजवळ पोहोचला तेव्हा तिच्यावर धावून जाऊन त्याने भाला तिच्या नाजूक हाताच्या मांसल भागात खुपसला ; त्याचे टोक कलादेवतांनी तिच्यासाठी विणलेल्या अमृतमय महावस्त्राला फाडून, तिच्या मनगट नी तळहातामधल्या त्वचेत शिरले, त्यामुळे 'इकॉर' अथवा धन्यदेवांच्या शिरांतून वाहणारे अमर रक्त जखमेतून बाहेर उसळले ; देव धान्याचे पदार्थ खात नाहीत किंवा मद्य पीत नाहीत त्यामुळे त्यांच्या देहात आपल्यासारखे रक्त नसते, आणि ते अमर असतात. व्हीनसने मोठ्याने किंकाळी फोडली व तिच्या हातातून तिचा पुत्र खाली पडला. पण फीबस ॲपॉलोने, कोणी दॅनाअनने त्याच्या छातीत भाला खुपसून त्याचा प्राण घेऊ नये म्हणून आपल्या बाहूत त्याला झेलले आणि एका काळ्या ढगात लपविले. आणि व्हीनसला तेथे सोडून दूर जाताना दायोमिद गरजला, "जव्हकन्ये, युद्ध आणि लढाई यांच्या वाटेला जाऊ नको. खुळचट बायकांना नादी लावून

तुझे समाधान होत नाही का ? तू जर लढाईत लुडबूड केलीस तर तुला असे फळ मिळेल की, मग युद्धाचे नुसते नाव ऐकले तरी तुझा थरकाप होईल."

नामोहरम व सुन्न झालेली ती देवी निघून गेली, आणि वायुवेगाने आयरिसने तिला गर्दीतून बाजूला काढले तेव्हा तिला वेदना होत होत्या आणि तिची सुंदर त्वचा डागाळलेली होती. युद्धाच्या डाव्या बाजूस आपला भाला व आपले दोन वेगवान वारु घेऊन ढगावर विश्रांती घेत असलेला उग्र मार्स तिची वाट पहात असलेला तिला दिसला ; तेव्हा त्या आपल्या भावापुढे गुडघे टेकून त्याने आपले घोडे तिला घेऊ द्यावेत अशी तिने त्याची विनवणी केली. ती म्हणाली, "प्रिय बंधो, मला वाचव, आणि देव रहातात त्या ऑलिम्पसला मला घेऊन जाण्यासाठी तुझे घोडे दे. एका मर्त्य मानवाने—त्या तायदिअसपुत्राने भयानक-रीत्या मला जखमी केले आहे. मला तर वाटते की, तो आता पिताश्री जव्ह याच्याबरोबरदेखील लढायला तयार होईल."

असे ती म्हणाली आणि मार्सने आपले सुवर्णालंकृत घोडे तिला दिले. मनात रुष्ट नी कष्टी झालेली ती रथावर चढली व तिच्या शेजारी बसून आयरिसने लगाम हाती घेतले. तिने चाबूक फटकारून आपले घोडे पिटाळले आणि तेही हुरुपाने उड्डाण केल्यासारखे जे निघाले ते एका क्षणात जेथे देवांचा निवास असतो त्या उंच ऑलिम्पसवर येऊन पोचले. तेथे तिने त्यांना थांबवले, रथा-पासून सोडले आणि त्यांची अमृतमय चंदीवैरण त्यांना दिली ; पण व्हीनसने मात्र तिची आई दायोनी हिच्या मांडीवर अंग टाकले. तिच्या आईने तिला आलिंगन देऊन कुरवाळले आणि ती म्हणाली, "कुठल्या देवाने तुझी अशी अवस्था केली आहे ? ढळढळीत सूर्यप्रकाशात तू काही वेडेवाकडे केलेस म्हणून त्याने असे केले की काय ?"

आणि हास्यप्रेमी व्हीनसने उत्तर दिले, "सर्व मानवजातीत मला प्रिय असा माझा लाडका पुत्र ईनिआस याला युद्धातून काढून मी बाजूला नेत असता गर्वोद्धत तायदिअसपुत्र दायोमिद याने मला जखम केली. आता हे युद्ध त्रोजन व ॲकिअनांमध्येच राहिलेले नाही ; कारण आता अमरांशीही लढण्यास दॅना-अनांनी सुरवात केली आहे."

दायोनी बोलली, "माझ्या बाळे, सहन कर व झाले त्याच्यात शक्य तेवढे समाधान मानून घे. मानवांकडून आपणा ऑलिम्पसनिवासियांना बराच त्रास सोसावा लागतो, आणि आम्ही एकमेकांना पुष्कळ दुःख भोगायला लावतो. ॲलोइअसचे पुत्र ओतस नी एफिॲल्तिझ यांनी दुःसह बंधात जखडल्यामुळे मार्सला हाल सोसावे लागले व तो ब्राँझच्या एका भांड्यात तेरा महिने कोंडून

पडला होता. तेथेच त्याचा अंत व्हायचा, पण ॲलोइसच्या मुलांची सावत्र आई ईरिबिआ हिने मर्क्युरीला त्याबद्दल सांगितले आणि त्याने बंदिवासाच्या हालांनी झिजून जवळजवळ मृतप्राय झालेल्या मार्सला चोरुन नेले. तसेच ॲंफिल्नीमॉन-च्या बलिष्ट पुत्राने तीन अग्रांच्या बाणाने ज्यूनोच्या उजव्या स्तनावर जखम केली, व तिच्या यातना कशानेही कमी होईनात, तेव्हा तिनेही असेच दुःख सोसले. त्याचप्रमाणे जेव्हा याच पुरुषाने, ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या या पुत्राने अधोलोकाच्या अगदी वेशीपाशी महाकाय हेदिझला बाण मारून जबर जखमी केले तेव्हा त्या प्रचंड हेदिझलाही तीव्र वेदना सहन कराव्या लागल्या. तेव्हा महान ऑलिम्पसवर जव्हच्या निवासाकडे हेदिझ रागावून आणि वेदनेने ग्रस्त होऊन गेला. आणि त्याच्या पीळदार भक्कम खांद्यातला बाण त्याला फार यातना देत होता, शेवटी पीईऑनने जखमेवर उपशामक औषधी वनस्पती लावून त्याला बरे केले, कारण हेदिझ हा मर्त्यमानवाच्या साच्यात घडवलेला नव्हता. धाडसी व हेकट असा तो दुराचारी आहे. ऑलिम्पसवासी देवावर वार करण्यामुळे जोडल्या जाणाऱ्या पापाची काही पर्वाच नाही त्याला ! आणि आता मिनर्व्हाने या तायदिअसपुत्राला तुझ्याविरुद्ध चिथावले आहे. पण तो असा मूर्ख की, देवांशी लढणारा कोणीही पुरुष दीर्घायुषी होणार नाही किंवा लढाईतून परत घरी जाऊन आपल्या मांडीवरच्या आपल्या बालकांची बडबड ऐकायला रहाणार नाही, हे विचार करूनही त्याला कळत नाही. तेव्हा तायदिअसपुत्राने तुझ्यापेक्षा प्रबळ अशा देवांशी लढण्याची वेळ त्याच्यावर येऊ नये याबद्दल खबरदारी घ्यावी नाहीतर साऱ्या ॲकिअनांमध्ये शूर असा दायोमिद जिचा विवाहित पती, तो गमावला म्हणून रडून सारे घर झोपेतून जागे करण्याचा प्रसंग त्याच्या ईजिॲलैआ या शूर पत्नीवर यायचा."

असे म्हणून तिने दोन्ही हातांनी कन्येच्या मनगटावरील ('इकॉर') देवरक्त पुसले, तेव्हा तिची वेदना नष्ट झाली ; व हात बरा झाला. पण हे पाहात असलेल्या मिनर्व्हा व ज्यूनो उपहासपर शब्दांनी जव्हला हिणवू लागल्या. प्रथम मिनर्व्हा म्हणाली, "पिताश्री जव्ह, माझ्यावर कोप करू नको, पण मला वाटते की, ज्या ट्रोजन्सचे तिला इतके प्रेम आहे त्यांच्याबरोबर जाण्यासाठी एकाद्या ॲकिअन स्त्रीचे मन ही सिप्रिअन (व्हीनस) वळवीत होती, आणि त्यांच्यापैकी कोणाला तरी कुरवाळताना त्या स्त्रीच्या सुवर्णभूषणाच्या आकड्याने हिचा नाजुक हात फाटला असावा."

देवा-मानवांचा तात थोडा हसला आणि सुवर्णकांती व्हीनसला त्याने आपल्या-जवळ बोलावले. तो म्हणाला, "माझ्याबाळे, कुशल योद्धा होण्याची देणगी

तुला मिळालेली नाही : तेव्हा तुझ्या स्वतःच्या खास अशा आनंददायक वैवाहिक जीवनाच्या कर्तव्यांकडे लक्ष दे आणि लढाईची ही सारी कामगिरी मार्स आणि मिनर्व्हावर सोड."

याप्रमाणे त्यांचे संभाषण झाले. पण ईनिआस जरी प्रत्यक्ष अॅपॉलोच्या बाहूंमध्ये प्रविष्ट आहे हे दायोमिदला माहित होते तरी त्याच्यावर त्याने उडी घेतली. ईनिआसला ठार मारून त्याचे कवच काढून घेण्याचा त्याचा इतका दृढनिर्धार होता की, त्या प्रबळ देवाला तो रतिमात्र भ्याला नाही. साऱ्या शक्तिनिशी आणि नेटाने त्याने तीनदा शत्रूला मारण्यासाठी झडप घातली आणि अॅपॉलोने तीनदा त्याची चमकती ढाल परतवली. एखादा देव असल्यासारखा तो चौथ्या खेपेस धावून येत असता अॅपॉलो भयानक आवाजाने ओरडून त्याला म्हणाला, "ऐक, सांभाळ, तायदिअसपुत्रा, आणि मागे फीर ; देवांच्या विरुद्ध चढाओढ करण्याचा विचार करू नकोस, कारण पृथ्वीतलावर चालणारे मानव अमरांपुढे टिकू शकत नाहीत."

तेव्हा देवाचा कोप टाळण्यासाठी तायदिअसपुत्राने थोडा वेळ माघार घेतली, तेवढ्यात अॅपॉलोने ईनिआसला गर्दीतून बाजूला काढून आपले मंदिर असलेल्या पवित्र पर्गमसमध्ये नेऊन ठेवले. तेथे त्या महान पवित्र आश्रयस्थानामध्ये लॅतोना नी दायाना यांनी त्याला बरे केले आणि दिव्यरूप दिले ; दरम्यान रौप्य धनुर्धारी अॅपॉलोने एक छायादेह ईनिआसचे रूप देऊन व त्याच्यासारखा शस्त्रसज्ज करून निर्माण केला. त्याच्या भोवताली लढत, त्रोजनांनी व अॅकिअनांनी एकमेकांच्या छातीवरच्या कवचांवर वार केले व एकमेकांच्या गोल व चर्माच्छादित हलक्या ढाली फोडून काढल्या. मग फीवस अॅपॉलो मार्सला म्हणाला, "मार्स, मार्स रे, मानवांवर अरिष्टे आणणाऱ्या नगरीच्या रक्तलांच्छित आक्रमका, जो आता खुद्द पिताश्री जव्हशीदेखील लढायला उठला आहे, त्या या तायदिअस पुत्राकडे, या मानवाकडे जाऊन त्याला लढाईतून बाहेर खेचून काढता येणार नाही का तुला ? त्याने पहिल्याने त्या सिप्रियन (व्हीनस) पाशी जाऊन तिच्या मनगटाजवळ हाताला जखम केली, आणि नंतर स्वतः एखादा देव असल्याप्रमाणे माझ्यावरही झेप घेतली."

मग तो पर्गमसच्या माथ्यावर आसनस्थ झाला. आणि थ्रेसिअनांचा वेगवान नायक अॅकॅमास याच्यारूपाने त्रोजनांच्या श्रेणीमधून इतस्ततः फिरत संहारक मार्स त्यांना युद्धास प्रोत्साहन देऊ लागला. "प्राअॅमपुत्रहो," तो म्हणाला "अॅकिअन्सकडून स्वतःच्या लोकांची अशी कत्तल किती वेळ चालू देणार आहात तुम्ही ? ते त्रॉयच्या तटांना भिडेपर्यंत तुम्ही थांबणार की काय ?

अँकिसिझपुत्र ईनिआस रणात पडला आहे ; त्याला हेक्तर इतकाच आमच्यामध्ये बहुमान होता. तर मग आता लढाईच्या तणावातून आपल्या शूर सोबत्याला सोडवण्यास मला मदत करा ".

या शब्दांनी त्याने त्या सर्वांच्या ठिकाणी धीर आणि हिम्मत आणली. मग सार्पेदॉनने हेक्तरला फार कठोरपणे दूषण दिले. तो म्हणाला, "हेक्तर, तुझा पराक्रम आता कुठे गेला आहे ? तू म्हणत होतास की तुला अनुयायी किंवा मित्र मदत करायला नसले तरी देखील भावांच्या नी मेव्हण्यांच्या बरोबर तू एकटा शहराचे संरक्षण करशील. पण त्यांच्यापैकी तर एकजणदेखील मला येथे दिसत नाही. सिंहापुढे शिकारी कुत्रे दबून रहातात तसे भिऊन ते मागे राहात आहेत ; लढाईला तोंड देत आहोत ते आम्ही—तुझे मित्र. दूर देशाहून, लिसिआ नी झँथस नदीच्या तीरावरून माझी बायको, माझा तान्हा मुलगा व जो कोणी गरजू असेल त्याला मोह पाडील अशी विपुल संपत्ती मागे ठेवून मी इथे आलो आहे ; येथे माझ्याकडे ॲकिअनांनी लुटण्याजोगे असे काही नाही तरीसुद्धा माझ्या लिसिआच्या सैनिकांच्या अग्रभागी, माझ्याशी लढायला येईल त्याला तोंड देत मी जागेवर ठाम उभा आहे, आणि तू 'आपल्या बायकांना सांभाळण्यास खंबिरपणे उभे रहा' एवढेसुद्धा तुझ्या लोकांना न सांगता नुसता पहात उभा आहेस ! जाळ्यात सापडलेल्या लोकांसारखा तू शत्रूच्या तावडीत सापडणार नाहीस व ते तात्काल तुझी सुंदर नगरी लुटणार नाहीत एवढी मात्र खबरदारी घे. हे एवढे रात्रंदिवस मनात बाळग, आणि तुझ्या मित्रपक्षीयांच्या सेनाप्रमुखांना विनव की त्यांनी न कचरता लढाई चालू ठेवावी ; आणि याप्रमाणे असे केलेस म्हणजे मग त्यांना तुला दूषणे द्यायला जागा रहाणार नाही".

सार्पेदॉन असे बोलला आणि त्याचे शब्द हेक्तरला झोंबले. सर्वांगावर कवच धारण केलेला असा तो रथावरून उडी मारून निघाला व आपले दोन भाले परजीत, सैनिकांना लढण्यासाठी चेतवीत आणि भयानक युद्धगर्जना करीत तो सेनादलात फिरू लागला. तेव्हा पुन्हा एकत्र होऊन जोर धरून ते ॲकिअनांना सामोरे गेले. पण अरगॉसचे सैनिक अभेद्य फळी करून, जागच्याजागी ठाम राहिले व मागे हटवले गेले नाहीत. एकाद्या सुरेख खळ्यावर माणसे मळणी करीत असता मंदवारे जसा तुसाशी खेळ करतात, आणि पिवळी (धान्यदेवता) सीरीज वायूची फुंकर घालून दाण्यापासून तूस बाजूला उडवते व तुसाचे ढीग अधिकाधिक पांढरे होत जातात,—अगदी तसेच, जेव्हा सारथ्यांनी घोडे परत युद्धाकडे वळवले व शत्रूवर ॲकिअनांनी जोरदार चढाई केली तेव्हा घोड्यांच्या टापांनी आकाशात उसळलेल्या धुळीने आच्छादिले जाऊन ते वीर पांढरे दिसू

लागले. त्रोजनांना मदत करण्यासाठी उग्र मार्सने त्यांना अंधाराच्या अवगुंठनाखाली झाकले आणि त्यांच्यामधून तो सर्वत्र संचार करू लागला. कारण दॅनाअनांना मदत करीत असलेली मिनर्व्हा लढाईपासून दूर गेलेली दिसली की मार्सने त्रोजनांच्या हृदयात धैर्याचा प्रादुर्भाव करावा, असे त्याला फीबस अॅपॉलोने सांगितले होते. मग अॅपॉलोने आपल्या वैभवसंपन्न पवित्र आश्रयस्थानातून ईनिआसला रणक्षेत्राकडे पाठवले आणि त्याचे हृदय शौर्याने परिप्लुत केले. मग त्याने आपल्या सोबत्यात आपली जागा घेतली. त्याला जिवंत व शिवाय धडधाकट आणि हिंमतवान असा परत आलेला पाहुन त्यांना अत्यंत आनंद झाला. पण हे सगळे कसे काय घडले हे त्याला त्यांना विचारता आले नाही कारण ते मार्स आणि विग्रहदेव यांनी त्यांच्यामध्ये माजवलेल्या अखंड धुमश्चक्रीत अगदी गुंतून गेले होते.

दोघे अॅजॅक्स, युलिसिस आणि दायोमिद, त्रोजन्सच्या त्वेषाला व आक्रमक हल्ल्याला न डरता पुढे सरसावण्यात दॅनाअनांना प्रोत्साहन देत होते. वारा पडला असताना व कर्कश सोसाटयांनी ढग चौफेर उधळून टाकणाऱ्या इतर आडदांड वायूसह भयंकर बोरिआस निद्रिस्त असताना, पर्वतांच्या माथ्यावर सॅटर्नपुत्राने पसरलेल्या ढगांप्रमाणे ते दॅनाअन्स त्रोजन्सविरुद्ध ठामपणे निश्चल राहिले. त्यांच्यामधून फिरत अॅत्रिअसपुत्र त्यांना आग्रहाने बजावू लागला :—

" माझ्या मित्रांनो, शूर पुरुषांना शोभेल अशी स्वत:वरील जबाबदारी पार पाडा आणि लढाईच्या भरात एकमेकांसमोर मानहानी होईल असे प्रसंग टाळा. मानहानी होऊ नये म्हणून निकराने लढणारे मारले जातात—पण पुष्कळवेळा जगतातही. पण जे मानहानी पत्करून पळून जातात ते जीवही बचावीत नाहीत व नावही अकलंकित ठेवीत नाहीत".

असे बोलत असताच त्याने आपला भाला फेकला आणि समोरच्या आघाडीच्या ओळीतल्या एकाला मारला ; तो होता वर्गससपुत्र दैकोउन सदैव सर्वांच्यापुढे राहण्यात तो तत्पर असल्याने त्रोजनामध्ये त्याला प्राअॅमच्या पुत्राइतकाच मान होता. अॅगॅमेम्नॉन राजाचा भाला त्याच्या ढालीतून आरपार गेला, ढालीने तो अडला नाही ; तो त्याच्या कमरपट्ट्यातून जाऊन पोटाच्या खालच्या भागात घुसला ; व तो जडशीळ होऊन भूमीवर पडला तेव्हा त्याच्या चिलखताचा त्याच्याभोवती खडखडाट झाला.

मग क्रेथॉन नी ऑर्सिलोकस या दॅनाअनाच्या दोन कैवारी प्रवीण वीरांना ईनिआसने मारले. त्यांचा पिता पायलिअन्सच्या भूमीतून रुंद पात्रांतून वाहणाऱ्या अॅल्फिअस नदीचा वंशज असून, फेरॅ या मजबूत नगरीत राहणारा

एक श्रीमान गृहस्थ होता. त्या नदीने ऑर्सिलोकसला जन्म दिला होता. त्याच्या राज्यात पुष्कळ प्रजा होती व तो दायोक्लिझचा पिता होता; दायोक्लिझलाही योग्य वेळी सर्व युद्धकलात निष्णात असे जुळे मुलगे झाले, तेच हे क्रेथॉन व ऑर्सिलोकस. ते मोठे झाल्यावर ॲत्रिअसपुत्र मेनेलॉस व ॲगॅमेम्नॉन यांच्या कार्यसिद्धिसाठी ऑरगॉसच्या नौकादलाबरोबर इलिअमला गेले व दोघेही तेथेच लढाईत पडले. एकाद्या निबिड गिरिकुहरात सिंहिणीने वाढवून मोठे केलेले, शेतवाड्या लुटीत मेंढ्या-गुरे पळवून नेणारे दोन सिंह जसे अखेर माणसाच्या हातून मारले जातात, तसे ईनिआसकडून ते दोघे वीर पराभूत झाले आणि उंच पाईन वृक्षांसारखे भूमीवर कोसळले.

ते पडलेले पाहून शूर मेनेलॉसला करुणा आली आणि चकाकत्या ब्राँझ कवचाने आवृत्त असा तो, भाला परजीत आघाडीकडे गेला, कारण तसे करण्यास मार्सनेच त्याला प्रवृत्त केले होते. तो इनिआसच्या हातून मारला जावा असा मार्सचा हेतू होता; पण नेस्तॉरपुत्र ॲंतिलॉकस याने त्याला पाहिले व पुढे उडी घेतली, कारण राजाला अपाय झाला तर त्यांचे सर्वच श्रम व्यर्थ होतील अशी त्याला भीति वाटली. एकमेकांशी लढण्यासाठी तेव्हा उत्सुक अशा मेनेलॉसने व ईनिआसने ज्यावेळी आपापल्या भाल्यांना हात घातले त्यावेळी मेनेलॉसच्या बाजूला ॲंतिलोकस उभा राहिला. ईनिआस धीट होता तरी त्या दोन वीरांना शेजारी शेजारी समोर पाहून तो मागे झाला, तेव्हा क्रेथॉन नी ऑर्सिलॉकस यांचे देह या दोघांनी ओढून ॲकिअनांच्या रांगांकडे आणले आणि त्या बिचाऱ्यांना आपल्या सोबत्यांच्या स्वाधीन केले. मग परत फिरून ते आघाडीच्या श्रेणीत लढले.

त्यांनी पॅफ्लॅगॉनिअन लढवैय्यांचा नेता मार्सतुल्य पायलिमिनिझ याला मारले; तो रथावर उभा असता मेनेलॉसने त्याच्या गळ्याजवळच्या हाडावर प्रहार केला; त्याचवेळी ॲन्तिलॉकसने त्याचा शिलेदार व सारथी ॲतिम्निअसपुत्र मायदॉन घोडे वळवून पळवीत असता त्याला मारले. त्याने दगड मारून त्याच्या कोपराला जखम केली; त्यामुळे शुभ्र हस्तिदंताने विभूषित केलेले लगाम त्याच्या हातून धुळीत पडले; मग त्याच्यावर धावून जाऊन ॲन्तिलॉकसने त्याच्या कानशिलावर तलवारीचा वार केला. त्यामुळे तो खाली डोके वर पाय होऊन रथावरून भूमीवर कोसळला; काही वेळ तेथे तो डोके व खांदे धुळीत खोल गाढले गेलेल्या अवस्थेत तसाच राहिला कारण रेताड जमिनीवर तो पडला होता—अखेर ॲन्तिलॉकस त्याच्या घोड्यांना फटके मारून ॲकिअनांच्या सेनेकडे त्यांना हाकून नेत असता, त्याच्याच घोड्यांच्या लाथा त्याला बसून तो भुईसपाट झाला.

पण सैनिक श्रेणींपलीकडून हेक्तरने त्यांच्यावर लक्ष ठेवले होते आणि मोठ्याने गर्जना करून तो त्यांच्यावर धावला; त्याच्या मागोमाग त्रोजनांची प्रबल पथके धावली. मार्स व भयावह एन्यो यांनी त्यांचे नेतृत्व केले; तिने लढाईची निर्दय धुमश्चक्री उडवली तर मार्स एक राक्षसी भाला घेऊन कधी हेक्तरच्या पुढे तर कधी मागे असा संचार करीत होता.

त्यांना पाहून तीव्र भावना वेगाने दायोमिदचा थरकाप झाला. विस्तीर्ण मैदान ओलांडीत असता उसळत्या लाटांनी वेगात समुद्राकडे जाणाऱ्या नदीच्या काठी आपण अचानक आल्याचें जाणवून एकादा माणूस जसा नाउमेद होतो, तिचे खदखदणारे पाणी पाहून दचकून भीतीने जसा मागे होतो, अगदी तसाच तायदिअसपुत्र मागे हटला. मग तो आपल्या लोकांना म्हणाला, "माझ्या मित्रांनो, हेक्तर भाला इतक्या हुशारीने चालवतो आहे याचे आश्चर्य करण्याचे कारण नाही. कोणीतरी देव सदा त्याला सांभाळायला त्याच्या बाजूला असतो. व यावेळी मर्त्यमानवाच्या रुपाने मार्स त्याच्याबरोबर आहे. तेव्हा त्रोजनांना सन्मुख असा, पण मागे हटत रहा, कारण देवांशी युद्ध करण्याची आपली छाती नाही".

तो बोलत असता त्रोजन अगदी नजीक आले व हेक्तरने एकाच रथात बसलेले मेनेस्थिअस आणि अँकिॲलस हे दोघे युद्ध निपुण वीर मारले. ते असे पडलेले पाहून तेलमॉनपुत्र ॲजॅक्सला दया आली, तो अगदी जवळ आला व त्याने भाला फेकला तो ॲम्फिअसला लागला; पीझसमध्ये राहणारा आणि धान्याची पिके देणाऱ्या बऱ्याच मोठ्या जमिनीचा धनी व वैभवसंपन्न अशा सेलॅगसचा हा ॲम्फिअस पुत्र होता. पण त्याच्या नशिवाने त्याला प्रआॅमच्या व त्याच्या पुत्रांच्या मदतीस यायला भाग पाडले. ॲजॅक्सचा भाला त्याच्या कमरपट्ट्यावर बसला, त्याने त्याच्या पोटाचा खालचा भाग फाडला व तो जडशील असा भूमीवर कोसळला. मग त्याचे चिलखत काढून घेण्यासाठी ॲजॅक्स त्याच्याकडे धावला. पण त्रोजनांनी त्याच्यावर भाल्यांचा वर्षाव केला; त्यापैकी बरेच भाले त्याच्या ढालीवर आपटले. त्याने मृत देहावर टाच ठेवून आपला भाला उपटून काढला; पण शत्रूच्या भाल्यांनी त्याच्यावर इतका जोर धरला की ते उत्तम चिलखत त्याला देहाच्या खांद्यावरून काढून घेणे जमेना. शिवाय ते बहुसंख्य शूर त्रोजन सेनानायक भाले सरसावून त्याला घेरू लागले; तेव्हा त्याला तेथे थांबण्याचीही छाती होईना; थोर, शूर आणि पराक्रमी असा जरी तो होता, तरी त्या लोकांनी त्याला आपल्या पासून दूर हाकलले; आणि त्याला पराजित होऊन माघार घ्यावी लागली.

तेव्हा त्यांच्यात याप्रमाणे लढाई अशी निकराने चालली होती. लौकरच दैवाच्या बलवत्तर योजनेने हर्क्युलिझपुत्र शूर व धिप्पाड लेपोलेमस यास सार्पेदॉनशी लढण्यास प्रवृत्त केले, तेव्हा महान जव्हचा पुत्र आणि नातू असे एकमेकांजवळ आले नी लेपोलेमस प्रथम बोलला. तो म्हणाला, "लिसिआतील लोकांच्या सल्लागारा सार्पेदॉना, शांततावादी मनुष्य तू; तू लपतछपत येथे कशाला यावेस ? तुला जे ढाल धारण करणाऱ्या जव्हचा पुत्र म्हणतात ते खोटे बोलतात, कारण पूर्वीच्या काळी त्याची जी संताने होती त्यांच्यासारखा तू अजिबात नाहीस. तुझ्यापेक्षा फार वेगळा होता माझा स्वतःचा शूर नी सिंहाच्या छातीचा पिता हर्क्युलिझ; तो येथे लॅओमेदॉनचे घोडे घेऊन जाण्यासाठी आला होता; आणि जरी त्याच्यापाशी अवघ्या सहाच नौका व थोडेसेच अनुयायी होते तरी त्याने इलिअम नगरी लुटून तिच्या राजमार्गांचे ओसाड रान केले. तू भ्याड आहेस व तुझे लोक तुला सोडून जात आहेत. तुला कितीही शक्ती असली व तू जरी लिसिआहून मुद्दाम आला असलास तरी तुझी त्रोजनांना मुळीच मदत होणार नाही; आणि माझ्याकडून पराभूत झालेला तू हेदिझच्या अधोलोकांच्या वेशीतून मात्र पार होशील".

आणि लिसिअनांचा प्रमुख सार्पेदॉन उत्तरला, "लेपोलेमस, लॅओमेदॉनने ज्याने आपली कामगिरी उत्तम बजावली त्याची परतफेड नाकारण्याचा मूर्खपणा केला म्हणून तुझ्या पित्याने इलिअम नगरीचा पाडाव केला. जे घोडे नेण्यासाठी तुझा पिता इतका दूर आला होता ते त्याला देण्याचे लॅओमेदॉनने नाकारले. तुझ्याबद्दल म्हणशील तर माझ्या भाल्याने तुला मृत्यू येणार आहे. तू मला यशश्री देशील आणि उमदे घोडे बाळगणाऱ्या हेदीजला तुझा आत्मा देशील".

याप्रमाणे सार्पेदॉन बोलला आणि लेपोलेमसने आपला भाला उंचावला. एकाचक्षणी दोघांनीही भाले फेकले आणि सार्पेदॉनचा भाला शत्रूच्या कंठाच्या मध्यभागी लागला. भाला आरपार गेला आणि मृत्यूची छाया त्याच्या डोळ्यांवर पसरली. लेपोलेमसचा भाला सार्पेदॉनच्या डाव्या मांडीवर इतक्या जोराने बसला की तो मांस फाडून हाडापर्यन्त गेला, पण त्याच्या पित्याने अद्यापिही विनाश त्याच्या पासून दूर ठेवला होता.

त्याच्या सोबत्यांनी सार्पेदॉनला लढाईतून बाहेर नेले. जखमेत रुतलेल्या भाल्याच्या वजनाने त्याला फार वेदना होत होत्या. त्याला घेऊन जाण्याची त्यांना इतकी घाई झाली होती व ते इतके व्यग्र झाले होते की भाला उपसून काढून त्याला उभा राहून नीट ताठ चालता येईल असे करावे हे कोणाला सुचले नाही. दरम्यान ॲकिअनांनी लेपोलेमसचा देह उचलून नेला; त्यामुळे

युलिसिसला अनुकम्पा उत्पन्न झाली व त्यांच्याकडे पहात असताना युद्धासाठी त्याचे हात शिवशिवू लागले. जव्ह पुत्राचा पाठलाग करावा की लिसिअन सैनिकांच्या श्रेणींची कत्तल करावी असा प्रश्न त्याला पडला; परंतु त्याने जव्ह पुत्राला मारावे असा दैवाचा संकेत नव्हता; म्हणून मिनर्व्हाने त्याला लिसिअन्सच्या मुख्य समूहाकडे वळवले; मग त्याने किरॅनस, अॅलॅस्तॉर, क्रोमिअस, अॅलॅकँड्रस, हॅलिअस, नोईमॉन आणि प्रितॅनिस यांना ठार मारले. आणखीही लोक त्याने मारले असते. पण महान हेक्तरने त्यांना हेरले व लोखंडी कड्यांच्या चिलखताने सुसज्ज असा तो वीर दॅनाअनाना भयभीत करीत आघाडीकडे धावला. तो येत असलेला पाहून सार्पेदॉनला आनंद झाला; आणि त्याने त्याला विनवले, "प्राअॅमपुत्रा, दॅनाअनांच्या हाती पडायला मला येथे पडून राहू देऊ नको, मला मदत कर आणि माझ्या पत्नीच्या व तान्ह्या मुलाच्या, मनाला आनंदविण्यासाठी कदाचित मी घरी परत जाऊ शकणार नसलो तरी निदान तुझ्या नगरीच्या तटाच्या आत तरी मला मरु दे."

हेक्तरने त्याला काही उत्तर दिले नाही, पण जोरात चाल करून तो अॅकिअन्स-वर तुटून पडला व त्यांच्यातले अनेक त्याने मारले. त्याच्या सोबत्यांनी मग सार्पेदॉनला उचलून दूर नेले आणि जव्हच्या विस्तीर्ण ओक वृक्षाखाली ठेवले. त्याचा मित्र व सोबती पेलॅगॉन याने त्याच्या मांडीतून भाला बाहेर उपटून काढला; पण सार्पेदॉनला मूर्च्छा आली व त्याच्या डोळ्यावर सावट साकळले; पण लौकरच तो शुद्धीवर आला. कारण त्याच्या अंगावर खेळत असलेल्या उत्तर वाऱ्याच्या झुळुकेने त्याला नवजीवन मिळाले, आणि त्याला आलेल्या गाढ मूर्च्छेतून त्याला जागे केले.

दरम्यान मार्स नी हेक्तरकडून आॅर्गासचे सैनिक त्यांच्या नौकांकडे हाकललेही गेले नाहीत किंवा त्यांनी उलट हल्लाही केला नाही. त्रोजन्ससमवेत मार्स आहे हे कळल्यावर आॅरगॉसनिवासी मागे हटले पण आपली तोंडे मात्र त्यांनी अजूनही शत्रूकडेच वळवून ठेवली होती; तर मग मार्स नी हेक्तरकडून मारला गेलेला पहिला कोण होता, व शेवटचा कोण होता बरे? ते होते शौर्यशाली त्युथ्राज व विख्यात सारथी आॅरेस्तिझ, ईनोलिअन योद्धा त्रेकस, इनोमॉस, ईनॉप्सपुत्र ऐलेनस, आणि सुपीक प्रदेशाचे धनी बीओनिअनांचा शेजारी असलेला, सेफिसिअन सरोवराजवळ राहणारा, विपुल संपत्ती जवळ असलेला, चमकत्या कमरपट्ट्याचा ओरेसिअस.

आता आॅरगॉसचे वीर याप्रमाणे धारातीर्थी पडत असलेले देवी ज्यूनोने जेव्हा पाहिले, तेव्हा ती मिनर्व्हाला म्हणाली, "अरेरे, ढाल धारण करणाऱ्या

जव्हच्या अक्लान्त कन्ये, जर आपण मार्सला असा बेफाम धुमाकूळ घालू दिला तर मेनेलॉसला आपण जे वचन दिले होते, की इलिअम नगरी लुटल्याखेरीज तो परतणारच नाही, ते निष्फळ होईल. आपण तात्काल युद्धात प्रवेश करू या ".

मिनर्व्हाने तिच्या म्हणण्यावर आक्षेप घेतला नाही. तेव्हा थोर सॅटर्नची कन्या, ती पूज्य देवता हिने आपल्या सुवर्णालंकृत घोडयांवर सरंजाम चढवण्यास सुरवात केली. रथाच्या आडव्या लोखंडी दांडयाच्या दोन्ही बाजूस आठ आऱ्यांची ब्राँझची चाके हीबीने त्वरेने बसवली. चाकांचे परीघ अक्षय्य सोन्याचे असून त्यांच्या कडांवर ब्राँझच्या अद्भुत कारागिरीच्या धावा होत्या. आडव्या दांडयाच्या दोन्ही बाजूस वाटोळी फिरणारी आसांची टोके सांधणारी मध्यवर्तुळे चांदीची होती. प्रत्यक्ष रथ सोन्याचांदीचे पट्टे विणून बनविलेला होता, व त्याच्या चारी बाजूना वर दुहेरी कठडा होता. रथातून निघालेल्या चांदीच्या दांडयांच्या टोकाला तिने सोनेरी जोखड बांधले. त्याला घोडयांच्या मानां-खालून जाणारे सोन्याचे पट्टे होते. मग ज्यूनोने लढाईसाठी व रणगर्जना ऐकण्यासाठी उत्सुक असे घोडे जोखडाला जुंपले.

दरम्यान मिनर्व्हाने स्वतःच्या हातानी भारी भरतकाम केलेले आपले वस्त्र पित्याच्या उंबरठ्यावर फेकले व जव्हचा अंगरखा अंगावर चढवून ती युद्धार्थ शस्त्रसज्ज झाली. खांद्याभोवती तिने जी ढाल अडकवली होती तिला गोंडे होते. 'दंगल' देवगण तिच्यावर झालरीसारखा विराजला होता; आणि तिच्यावर कलह, 'शक्ति' नी थंड रक्ताची 'कातरभीति' या देवगणांची चिन्हे होती; शिवाय त्या ढालीवर ढाल धारण करणाऱ्या जव्हचे सूचकचिन्ह असे गॉर्गान राक्षसीचे निष्ठुर व भयकारी दिसणारे शिरही होते. मिनर्व्हाने डोक्यावर आपले जे शिरस्त्राण ठेवले ते सोन्याचे असून त्याला चार तुरे होते. ते पुढे व मागे निमळते होत गेलेले होते. आणि ते शंभर नगरींच्या बोध-चिन्हांनी अलंकृत होते. नंतर ती आपल्या ज्वालातुल्य झळकणाऱ्या रथावर आरुढ झाली आणि तिचे अप्रिय करणाऱ्या वीरश्रेणींचे दमन करणारा तिचा भलाभक्कम नी मजबूत भाला तिने हातात धरला. ज्यूनोने फटकारे मारून घोडे पळवले आणि स्वर्गाच्या दरवाज्यांनी आपोआप उघडत असता गर्जने-सारखा आवाज केला. या दरवाजांवर काल घटिकांचे स्वामित्व असते. स्वर्ग व ऑलिम्पस झाकून लपवणारा दाट ढग दूर करायचा की कायम ठेवायचा ते या दरवाज्यांच्या हातात असते. त्यातून देवींनी आपले आज्ञाधारक अश्व हाकले आणि त्यांना सॅटर्नपुत्र ऑलिम्पसच्या सर्वोच्च टेकडांवर बसलेला आढळला.

तेथे घोडे थांबवून अखिल सृष्टीचा स्वामी सॅटर्नपुत्र जव्ह यास ज्यूनो म्हणाली, "पिताश्री जव्ह, मार्सने चालवलेल्या या अत्याचारांचा व अतिरेकांचा तुला राग आलेला नाही काय? पहा ना थोर आणि उत्तम असे ॲकिअन्सचे सैन्य नष्ट करून त्याने मला कसे अत्यंत दु:खी केले आहे ? आणि ते देखील काही अधिकार किंवा कारण नसताना! आणि ती सिप्रिअस बया व ॲपोलो आरामात या सगळ्याचा आनंद मानीत बसले आहेत व त्या अन्यायी माथेफिरूला आणखी नुकसान करण्यास प्रवृत्त करीत आहेत. पिताश्री जव्ह, मला उमेद आहे की जर मी मार्सला सणसणीत टोला हाणला व त्याला लढाईतून पिटाळून लावला तर तुला राग येणार नाही".

आणि जव्हने उत्तर दिले, "त्याच्यावर मिनर्व्हाला सोड ना, कारण दुसऱ्या कोणापेक्षा तीच त्याला जास्त वेळा शिक्षा लावीत असते".

त्याने सांगितले तसे ज्यूनोने केले. तिने घोड्यांना फटकारले व ते मुळीच कुचराई न करता आकाश आणि पृथ्वीच्या दरम्यान वायुवेगाने चालले. एकाद्या उंच दीपस्तंभावरून माणसाला समुद्रावर जितके दूरवर पाहता येईल तितके अंतर ते उच्च स्वराने खिंकाळणारे देवांचे घोडे एका झेपेत काटतात. जेव्हा ते ट्रॉयला आणि सिमॉइस व स्कॅमॅन्दर या प्रवाहांच्या संगमापाशी गेले, तेव्हा ज्यूनोने त्यांना थांबवून रथापासून सोडवले. एका दाट ढगात त्यांना तिने लपवून ठेवले आणि सिमॉइसने (ॲम्ब्रोजिआ) अमृतमयतृण त्यांनी खाण्यासाठी उगवून दिले. नंतर आॅर्गासवासीयांना साह्य करण्याच्या आतुरतेने दोघी देवी कबुतरांसारखे उड्डाण करीत गेल्या. खूप शक्ती व चिकाटी असणाऱ्या सिंहाप्रमाणे किंवा वन्य वराहांसारखे लढणारे सर्वात शूर व बहुसंख्य योद्धे जेथे प्रतापी दायोमिदभोवती गोळा झाले होते, त्या भागाकडे आल्यावर ज्यूनो निश्चल उभी राहिली आणि पन्नास माणसांच्या एकत्रित आवाजाइतकी मोठी 'ब्राँझ-स्वर' स्तेन्तॉरसारखी आरोळी ठोकून ती म्हणाली, "आॅर्गासच्या सैनिकानो, भेकड प्राण्यानो धिक्कार असो तुमचा ! तुम्ही नुसते दिसायलाच शूर; ॲकिलिझ लढत होता तोवर त्याचा भाला इतका हिंस्त्र होता की दार्दानिअन वेशीबाहेर तोंड काढायची ट्रोजन्सना हिंमत होत नव्हती, पण आता ते नगरीबाहेर दूरवर चाल करून थेट तुमच्या नौकांपाशी देखील लढतात".

या शब्दांनी तिने सर्वांच्या ठिकाणी हुरुप आणि चेव आणला आणि मिनर्व्हा तायदियस पुत्राच्या बाजूला झटपट येऊन ठेपली. तो आपल्या रथापाशी घोड्यांजवळ, पॅन्दॅरसने त्याला केलेल्या जखमेचा दाह शमवीत असलेला तिला

दिसला; कारण ढालीचे वजन वाहणाऱ्या पट्ट्याच्या दबावाने आलेल्या घामाने जखम चुरचुरत होती. वेदनेने त्याचा बाहू गलित गात्र झाला होता. आणि रक्त पुसण्यासाठी तो पट्टा वरचेवर उचलीत होता. त्याच्या घोड्यांच्या धुरेवर हात ठेवून देवी म्हणाली, "तायदिअसचा पुत्र आपल्या बापासारखाच काही निघाला नाही. तायदिअस लहान खुरा पुरुष होता, पण त्याला युद्धकला पूर्ण अवगत होती व मी नको नको म्हणत असता देखील तो बेफामपणे लढाईच्या गर्दीत घुसे. जेव्हा तो बरोबर कोणीही न घेता एकटा राजदूत म्हणून थीब्ज नगरीला, कॅदमिअन्समध्ये गेला तेव्हा मी त्याला सांगितले की त्यांच्याघरी मेजवान्या झोड आणि शांतपणे रहा; पण त्याच्या अंगी नेहमीच दांडगी हिंमत असल्यामुळे त्याने कॅदमिअन युवकांना आव्हान दिले आणि त्याने भाग घेतलेल्या सगळ्या स्पर्धांत त्यांना पराभूत केले; इतकी प्रभावी मदत मी तेव्हा त्याला केली. तुला सांभाळायला तुझ्याही बाजूने मी उभी असते. आणि मी तुला त्रोजन्सशी सारखे लढत रहाण्याची आज्ञा देत असते; पण एकतर तू थकून जातोस किंवा भिऊन कच खातोस, आणि म्हणूनच मी म्हणते की तू इन्यसपुत्र तायदिअसचा सच्चा पुत्रच नव्हेस".

दायोमिदने उत्तर दिले, "देवी, ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्ये, मी तुला ओळखले आणि तुझ्यापासून मी काही लपवीत नाही. मी भ्यालो नाही किंवा कचही खाल्ली नाही, अथवा माझ्यात कसली शिथिलता पण आलेली नाही. मी केवळ तुझे स्वत:चेच आदेश पाळीत आहे; तू मला सांगितलेस की कोणत्याही पुण्य श्लोक देवाशी मी युद्ध करू नये; पण जर जव्हची कन्या व्हीनस लढाईत उतरली तर मात्र तिला भाल्याने मी जखमी करावे, म्हणून मी माघार घेत आहे व इतर ऑरगॉस सैनिकांना पण येथे जमा होण्यास सांगत आहे, कारण मार्स आता रणभूमीवर सत्ता गाजवीत आहे हे मला ठाऊक आहे".

मिनर्व्हा उत्तरली, "तायदिअसपुत्रा दायोमिद, माझ्या आवडत्या पुरुषोत्तमा, मार्सला किंवा दुसऱ्या कोणाही अमराला भिऊ नकोस, कारण मी तुझी साह्यकारिणी राहीन. असं कर, थेट मार्सवरच रथ घाल व हातघाईच्या लढाईत त्याच्यावर घाव घाल. त्या बेफाम माथेफिरुची, मूर्तिमंत दुर्जनाची धास्ती बाळगू नको; तो प्रथम एका पक्षाला तर नंतर दुसऱ्या पक्षाला वळत असतो. आता इतक्यात तो माझ्याशी व ज्यूनोशी बोलणी करीत होता की तो ऑरगॉसच्या सैनिकांना मदत करणार आहे आणि त्रोजनांवर हल्ला चढवणार आहे; पण आता मात्र तो त्रोजनांच्याच पक्षाला आहे व ऑरगॉसवासीयांना पार विसरून गेला आहे".

असे म्हणून तिने स्थेनेलसला धरून रथावरून उचलून भूमीवर ठेवले. तो निमिषात खाली आला; त्याबरोबर देवी रथावर चढली आणि दायोमिदच्या बाजूला स्थानापन्न झाली. रथाचा ओक लाकडाचा दांडा त्या भयकारी देवीच्या आणि वीराच्या ओझ्याखाली करकरला. पॅलास मिनर्व्हाने प्रतोद व लगाम हाती घेतले आणि थेट मार्सकडे रथ हाकलला. मार्स ॲकेसिअस पुत्र इतोलिअनांचा सर्वात शूर वीर, अवाढव्य देहाचा पेरिफाज याचे चिलखत काढण्यात गढला होता; रक्तलांछित मार्स चिलखत काढीत असता त्याला आपण दिसू नये म्हणून मिनर्व्हाने हेदिझचे शिरस्त्राण घातले; त्यामुळे दायोमिदला पाहताच, पेरिफाज यास तो पडल्याठिकाणीच सोडून, मार्स थेट दायोमिदकडे धावला. ते एकमेकांच्याजवळ येताच त्याने धुरा व लगाम यांच्यावरून नेम धरून दायोमिदचा जीव घेण्यासाठी आपला ब्राँझ भाला फेकला. पण मध्येच मिनर्व्हाने तो हाताने पकडला व मग त्याला निरुपद्रवीपणे रथावरून बाजूला भिरकावले. मग दायोमिदने आपला भाला फेकला आणि पॅलास मिनर्व्हाने तो मार्सच्या पोटाच्या मर्मस्थानी आतला पट्टा गुंडाळलेल्या जागी घुसेल असे केले. त्याठिकाणी दायोमिदने त्याला जखम करून त्याचे गोरे मांस फाडले आणि भाला परत उपसून काढला. लढाईच्या भर गर्दीतल्या नऊ किंवा दहा हजार लोकांइतकी मोठ्याने मार्सने डरकाळी फोडली आणि त्याने काढलेला तो ध्वनि इतका भयंकर होता की ॲकिअनांची व त्रोजनांची त्रेधातिरपीट उडाली.

उष्मा झाल्यानंतर वारा सुटल्यावर एकादा कृष्णमेघ जसा आकाशात दिसावा तसा मार्स तायदिअसपुत्र दायोमिदला विस्तीर्ण स्वर्ग लोकाकडे चढताना दिसला. पूर्ण वेगाने देवनिवास उंच ऑलिम्पस गाठून अति वेदनांनी पीडित असा तो मार्स सॅटर्नपुत्र जव्हच्या शेजारी जाऊन बसला. जव्हला त्याने आपल्या जखमेतून वाहणारे अमर रक्त दाखवले, आणि तो दीनपणे म्हणाला, "तात जव्ह, अशा कृत्यांनी तुला कोप येत नाही काय? मानवांना साह्य करताना आम्ही देव एकसारखे अत्यंत दु:सह असा त्रास एकमेकांच्या हातून भोगीत आहोत; आणि सदा काही तरी अत्याचार करणारी ती पिसाट कर्कशा (मिनर्व्हा) जन्माला घातल्याबद्दल आम्हा सर्वांच्या मनात तुझ्याबद्दल अढी आहे. आम्ही बाकीच्या देवानी तू सांगशील तसे ऐकले पाहिजे आणि तिला मात्र तू रागे भरीत नाहीस किंवा शिक्षा करीत नाहीस. ती तुझी मुलगी आहे, म्हणून या उपद्रवी पोरीला तू प्रोत्साहन देतोस. अमर देवांवर आपला संताप काढण्यासाठी गर्विष्ठ दायोमिदला ती कशी चिथावीत होती ते पहा. प्रथम

तो त्या सिप्रियन (व्हीनस) पाशी गेला व तिच्या हातावर मनगटापाशी तिला त्याने जखम केली, आणि नंतर जणु स्वतः देव असल्यासारखी त्याने माझ्यावरही झडप घातली. मी तेथून पळ काढला नसता तर तेथे भयानक प्रेतांच्या मध्ये यातना सोशीत पुष्कळ वेळ पडून राहिलो असतो, नाहीतर जिवंतपणीच भाल्यांचा इतका मार खाल्ला असता की अंगात त्राणही उरले नसते".

जव्हने त्याच्याकडे रागाने पाहून म्हटले, "श्रीमान दुतोंडे, रडत तक्रार करीत येथे येऊ नका". ऑलिम्पसच्या सर्व देवांपेक्षा तुझ्याबद्दल मला अधिक तिरस्कार वाटतो, कारण सर्वकाळ तू लढत असतोस नी कुरापती काढतोस. तुझी आई ज्यूनो हिची दुःसह्य व हटवादी वृत्ती तुझ्याठायी आहे; तिला आवरतानाच माझी पुरेवाट होते, आणि तू या दुरवस्थेत आहेस त्याला तिचेच कर्म कारण आहे. तथापि अशा तीव्र वेदनात तुला जास्त वेळ राहू देववत नाही मला; तू माझेच अपत्य आहेस व माझ्यापासूनच तुझ्या आईच्या ठिकाणी गर्भ संभव झाला; पण जर दुसऱ्या कोणा देवाचा तू पुत्र असतास तर तू इतका विध्वंसक आहेस की एव्हाना तायतन्सहून पण खालच्या पातळीवर तू खितपत पडला असतास.

मग त्याने पीऑनला जखम बरी करण्यास सांगितले. तेव्हा पीऑनने वेदनाहारक औषधी वनस्पती जखमेवर लावून त्याला बरे केले कारण तो मानवी साच्यात घडवलेला नव्हता. ज्याप्रमाणे अंजिराच्या झाडाचा रस दूध द्रव स्वरुपात असले तरी त्याला फाडून क्षणात दाट करतो, तसे अगदी तात्काल पीऑनने उग्र मार्सला वेदनामुक्त केले. मग हीबीने त्याला स्नान घालून चांगली वस्त्रे नेसवली आणि तेजस्वी स्वरुपात त्याने त्याचा पिता जव्ह याच्या-बाजूचे स्थान मंडित केले.

पण ऑरगॉसची ज्यूनो व अॅलॅल्कॉमिनीची मिनर्व्हा यांनी आता मार्सच्या जीवघेण्या कर्मांना खीळ घातल्याने त्या दोघीही पुन्हा परत जव्हच्या प्रसादा-प्रत गेल्या.

● ● ●




# सर्ग ६

त्रोजन्स नी ॲकिअन्स यांच्यामधली लढाई आता जशी चालेल तशी चालू देण्यात आली. उभय सेना आपले ब्रॉंझने मढवलेले भाले सिमॉइस व झँथस यांच्या प्रवाहामधल्या क्षेत्रात एकमेकावर नेम धरून जसजसे फेकीत राहिले तसतशी युद्धाची लाट त्या मैदानावर कधी या तर कधी त्या बाजूस उसळत राहिली.

प्रथम ॲकिअन्सचा बलशाली आधारस्तंभ तेलेमॉनपुत्र ॲजॅक्स याने त्रोजन्सच्या सैन्याची एक फळी फोडली आणि शूर तसाच धिप्पाड असा थ्रेसिअनामधला सर्वोत्तम वीर युसॉरसपुत्र ॲकॅमॉस याचा वध करून आपल्या सोबत्यांना त्याने साह्य केले. त्या वीराच्या शिरस्त्राणाच्या पुढे आलेल्या टोकावर भाला बसला व मग त्याचे ब्रॉंझचे टोक त्याच्या कपाळातून मेंदूत शिरले नी त्याच्या डोळयांवर अंध:काराचे पटल आले.

मग ॲदिस्बी या मजबूत नगरीचा श्रीमंत निवासी, आणि रस्त्याच्या बाजूला असलेल्या आपल्या घरात दारावरून जाणाऱ्या प्रत्येक पांथस्थाचे आतिथ्य करणारा असल्यामुळे लोकप्रिय अशा त्युथ्रॅनसपुत्र ॲक्झिलसचा वध दायोमिदने केला. पण एवढ्या आतिथ्यानतरही त्याचा जीव वाचविण्यास त्याचा एकही पाहुणा त्याच्यापुढे उभा राहिला नाही ; आणि दायोमिदने त्याला व त्याचा शिलेदार व सारथी कॅलेसिअस यालाही ठार केले––याप्रमाणे ती जोडी भूमीखाली गेली.

युरिॲलसने ड्रेसस नी ऑफेल्तिअस यांना मारले, आणि उच्चकुलीन ब्युकॉलिअनच्या जलदेवता ॲबर्बरिआ हिच्या पोटी झालेल्या पुत्रांचा––ईसेपस नी पेदॅसस यांचा पाठलाग करीत तो गेला. ब्युकॉलिअन हा लॅओमेदॉनचा सर्वात थोरला मुलगा पण तो अनौरस होता. मेंढरे वळीत असता त्या जलदेवतेशी त्याचा संबंध आला व तिला जुळे मुलगे झाले ; त्यांनाच आता मेसिस्तिअस पुत्राने ठार केले आणि त्यांची कवचे त्यांच्या खांद्यावरून ओढून काढली. मग पॉलिपिनिझने ॲस्तिॲलसला, पर्कोतीचा युलिसिस पिदायतिझ व त्यूसर ॲरेतॲऑन यांना मारले. नेस्तॉरपुत्र ॲन्तिलॉकस याच्या भाल्याला ॲब्लेरस बळी पडला, आणि नृपती ॲगॅमेम्नॉन याने सॅतिओऐस नदीकाठी पेदॅससमध्ये राहणाऱ्या एलॅतसला गतप्राण केले. लैतसने पळून जात असलेल्या फिलॅकसला मारले आणि युरिपायलसने मेलॅन्थसचा वध केला.

मग उच्चरवाने रणगर्जना करणाऱ्या मेनेलॉसने अॅड्रेस्तसला जिवंत धरला, कारण त्याचे घोडे मैदानावरून सैरावैरा पळत सुटले असता एका तॅमॅरिस्कच्या झुडुपात गुरफटले व रथाचा दांडा मोडून रथापासून अलग झाला. घोडे इतरांबरोबर नगरीकडे भरधाव पळत गेले, पण अॅड्रेस्तस घसरून बाहेर पडला व रथाच्या चाकापाशी धुळीत सपशेल पालथा पडला. हातात भाला घेऊन मेनेलॉस त्याच्याजवळ आला पण अॅड्रेस्तसने त्याचे गुडघे कवटाळून जीवदानाची याचना केली. तो आक्रंदला, "अॅत्रिअसपुत्रा, मला जिवंत धर म्हणजे मग माझ्यासाठी तुला पुरी खंडणी मिळेल. माझा पिता सधन आहे, आणि सोने ब्राँझ व घडीव लोखंडाचा पुष्कळ खजिना त्याच्या घरात साठवून ठेवलेला आहे. जर त्याला कळले की मी जिवंत आहे व अॅकिअन्सच्या नौकांसमीप आहे, तर त्या भांडारातून तो तुला मोठी खंडणी देईल".

याप्रमाणे त्याने गयावया केली आणि त्याचे म्हणणे मान्य करून त्याला अॅकिअन्सच्या नौकांकडे घेऊन जाण्यासाठी आपल्या एकाद्या शिलेदाराच्या स्वाधीन करण्याचा मेनेलॉसचा विचार होता, पण अॅगॅमेम्नॉनने धावत त्याच्याजवळ येऊन त्याचा अधिक्षेप केला. तो म्हणाला, "माझ्या भल्या मेनेलॉस, ही वेळ दया दाखवावयाची नव्हे. मग काय तुझ्या घराण्याला त्रोजन्सच्या हातून इतकी चांगली वागवणूक मिळाली आहे? त्यांच्यातल्या एकाद्याचीदेखील आपण गय करता कामा नये––मातेच्या पोटात असलेल्या अजून न जन्मलेल्या बालकाची देखील––त्यांच्यातला एकही पुरुष जिवंत सुटता कामा नये; तर इलिअममधले सगळे मेले पाहिजेत. त्यांची कुणी चौकशीसुद्धा करता कामा नये व त्यांची नावनिशाणीही मागे रहायला नको".

असे तो बोलला आणि त्याच्या भावाला त्याचे म्हणणे पटले, कारण तो बोलला ते वाजवीच होते. तेव्हा मेनेलॉसने अॅड्रेस्तसला आपल्यापासून दूर लोटले व मग अॅगॅमेम्नॉनने त्याच्या कुशीत वार केला व तो मरून खाली पडला, मग अॅत्रिअसपुत्र त्याच्या छातीवर पाय रोवून आपला भाला उपसून काढू लागला.

दरम्यान नेस्तॉर आरगॉसच्या सैनिकांना उद्देशून ओरडला, "मित्रहो, दॅनाअन योद्धयांनो, मार्सच्या सेवकांनो! मेलेल्यांना लुटून पुष्कळसा ऐवज नौकांकडे नेण्याच्या लोभाने कोणी रेंगाळू नका. जेवढ्यांना ठार करता येईल तेवढे ठार करा. प्रेते मैदानावर पडून राहतील आणि नंतर सवडीने त्यांची चीजवस्तु तुम्हाला लुटून नेता येईल".

या शब्दांनी त्याने त्या सर्वात उत्साह व हिंमत आणली, आणि आता त्रोजनांचा पुरा धुव्वा उडून ते इलिअममध्ये परत हाकलले गेले असते, पण साऱ्या शकुनज्ञात

शहाणा असलेला प्राअॅमपुत्र हेलेनस, हेक्तर व ईनिआस यांना म्हणाला, "हेक्तर व ईनिआस, तुम्ही दोघे त्रोजन्सचे व लिसिअन्सचे आधारस्तंभ आहात, कारण तुम्ही सर्वकाळ सर्वांच्यापुढे असता, लढण्यातही व मंत्रणेतही ; तुम्ही येथे टिकाव धरून रहा आणि सेनादलात फिरून वेशीपुढे सर्वांना एकत्र करा, नाहीतर ते जाऊन आपल्या बायकांच्या गळचात पडतील आणि त्यामुळे आमच्या शत्रूंना अत्यानंद होईल. नंतर आपल्या सगळचा पथकांना याप्रमाणे तुम्ही धीर दिलात म्हणजे मग आपण इथे ठाम उभे राहू आणि दॅनाअनानी आपल्यावर किती जरी नेटाने हल्ला केला तरी त्यांना तोंड देऊ ; कारण आता याशिवाय दुसरे काहीच करता येण्यासारखे नाही. दरम्यान हेक्तर, तू नगरीत जा व इथे काय घडते आहे ते आपल्या मातेला सांग. तिला म्हणावे अॅक्रॉपोलिसमधील मिनर्व्हाच्या मंदिरात जमा होण्याची साऱ्या पुरंध्रीना आज्ञा कर ; मग आपल्याजवळची किल्ली घेऊन, त्या पवित्र मंदिराची कवाडे उघड म्हणाव. तेथे मिनर्व्हाच्या गुडघ्यांवर, घरातले तिला सर्वात मोलाचे वाटणारे, मोठचात मोठे, सर्वात सुंदर महावस्त्र तिला वहायला सांग ; शिवाय ज्यांना कधी पराणीचा स्पर्श झाला नाही अशा एक वर्ष वयाच्या बारा कालवडी देवीच्या देवळात वळी देऊ, असा नवस करायला तिला सांग. देवीने नगरीवर व त्रोजनांच्या बायकामुलांवर दया करावी आणि तायदिअसपुत्राला या इलिअमच्या सुंदर पुरीवर तुटून पडू देऊ नये यासाठी हा नवस. तो बेफामपणे लढतो आणि लोकांची मने भयंकर भीतिग्रस्त करतो. त्या सर्व लोकात त्याला मी अति प्रबल समजतो ; त्याचा महान कैवारी वीर अॅकिलिझ जरी देवीचा पुत्र आहे तरी त्याला सुद्धा आम्ही इतके भीत नव्हतो––जितके या माणसाला भितो; त्याचा कोप असीम आहे व पराक्रमात त्याची बरोबरी करणारा दुसरा कोणी नाही."

भावाने सांगितले तसे हेक्तरने केले. रथावरून खाली उडी मारून सेनादलात तो सर्वत्र आपले भाले परजीत फिरला, लोकाना लढण्यास त्याने प्रोत्साहन दिले, आणि भयावह रणगर्जना केली. त्यामुळे विस्कळित झालेले त्याचे लोक एकत्र येऊन पुन्हा अॅकिअन्सना तोंड देऊ लागले. अॅकिअन्स मागे हटले व त्यांनी आपला प्राणघातक हल्ला थांबवला, कारण त्रोजन्स इतक्या आश्चर्यकारक रीतीने एकत्र आले होते की, त्यांच्या मदतीस तारकामंडित आकाशांतून कोणी एखादा अमरच खाली उतरला असावा असे अॅकिअन्सना वाटले. आणि हेक्तरने त्रोजन्सना ओरडून म्हटले, "त्रोजन्स व मित्रपक्षीयहो, काही पुरुषार्थ दाखवा, माझ्या सवंगडचांनो, आणि असेल नसेल ती शक्ति एकवटून लढत रहा ; दरम्यान मी इलिअमला जाऊन आपल्या मंत्रिमंडळातले वृद्ध लोक आणि आपल्या

स्त्रिया यांना देवांची प्रार्थना करायला व त्याच्याप्रीत्यर्थ महायज्ञांचे नवस करायला सांगतो."

असे बोलून तो आपल्या मार्गाला लागला आणि चालताना त्याच्या ढाली-भोवतालच्या चामड्याची काळी कड त्याच्या मानेवर व घोट्यावर आपटताना दिसत होती.

मग हिप्पॉलॉकसपुत्र ग्लॉकस व तायदिअसपुत्र उभय सैन्यांच्यामधील मोकळ्या जागेत द्वंद्वयुद्ध करण्यास गेले. ते एकमेकांच्याजवळ आले तेव्हा उच्चरवाने रणगर्जना करणारा दायोमिद अगोदर बोलला. तो म्हणाला, "कोण तुम्ही सज्जन श्रीमान् ? लोकात तुम्ही कोणत्या नावाने ओळखले जाता ? आता-पर्यंत लढाईत मी तुम्हाला कधीच पाहिले नाही ? पण माझ्या हल्ल्याला तोंड देण्यास तुम्ही पुढे आला आहात त्याअर्थी सर्व लोकात तुम्ही अत्यंत धाडसी आहात असे म्हटले पाहिजे. माझ्या ताकदीशी टक्कर द्यायला ज्यांचे मुलगे उभे राहतील त्यांच्या बापांच्या वाट्याला दुःखच येणार ! तथापि तू जर अमरांपैकी एकादा असशील आणि स्वर्गातून उतरला असशील तर मी तुझ्याशी लढणार नाही ; कारण देवांशी लढायला सुरवात केल्यावर द्रायाझपुत्र पराक्रमी लायकर्गसदेखील फार काळ जिवंत राहिला नाही. बेफाम वाक्कसला सांभाळ-णाऱ्या दायांना नैसाच्या भूमीमधून हाकलून लावणारा तोच ; त्या हिंसक लायकर्गसने आपल्या बैल-पराणीने त्यांना मारझोड केली तेव्हा त्या दायांनी आपले नक्षीदार पवित्र दंड भूमीवर फेकून दिले. स्वतः वाक्कसने भयभीत होऊन समुद्रात उडी घेतली व त्या माणसाच्या अचाट शिवीगाळीने व संतापाने घाबरलेल्या वाक्कसचे सांत्वन करण्यासाठी थेतिसने त्याला हृदयाशी कवटाळले. त्यावर सुखासीनपणे राहणारे देव लायकर्गसवर रागावले आणि सॅटर्नपुत्राने त्याला अंध केले, व अशाप्रकारे अमरांच्या द्वेषाचे लक्ष्य झाल्यानंतर तो फार काळ जगलाही नाही. म्हणून मी पुण्यश्लोक अशा देवांशी युद्ध करणार नाही, पण तू जर भूमीजन्य अन्नपाणी सेवन करणारा (मानव) असलास तर पुढे ये आणि आपल्या कर्मभोगाला मिठी मार".

आणि हिप्पॉलॉकसपुत्राने उत्तर दिले, "प्रबल तायदिअसपुत्रा, माझी कुल-परंपरा कशाला विचारतोस ? झाडावरच्या पानाप्रमाणे वर्षावर्षाला माणसे येतात नी जातात. हेमंत ऋतूतल्या पानांना वायू भूमीवर विखरवितो, पण वसंताच्या पुनरागमी वन नव्या पल्लवांनी अंकुरित होते. अगदी तसेच मानव जातीच्या पिढ्यांचे आहे. जुने नाहीसे होत असतानाच नवे उभे राहतात. तर मग तुला जर माझा वंश जाणून घ्यायचा असेल तर सांगतो की तो पुष्कळांना

चांगला माहित आहे. घोड्यांची चराऊ कुरणे असलेल्या आरगॉसच्या अंतर्भागात एफिरा नामक एक नगरी आहे. तिथे साऱ्या मनुष्य जातीत कुटिल असा सिसिफस राहात असे. तो इओलसचा पुत्र होता. आणि त्याला ग्लॉकस नावाचा मुलगा होता, तो पिता होता असामान्य रूप व लोभस देखणेपणा लाभलेल्या बेलेरॉफॉनचा. पण प्रीतसने बेलेरॉफॉनचा नाश योजिला, आणि त्याच्यापेक्षा तो प्रबळ असल्याने ज्या ऑर्गासच्या भूमीवर जव्हने त्याला अधिपती केले होते त्या भूमीतून त्याने त्याला हाकून लावले. कारण प्रीतसपत्नी अॅन्तिआ त्याच्यासाठी कामातुर झाली आणि गुप्तपणे त्याच्याशी रममाण होण्याची तिने इच्छा धरली ; पण बेलेरॉफॉन सच्छील मनुष्य होता, व त्याने तिला झिडकारले, तेव्हा तिने प्रीतसला त्याच्याबद्दल खोट्यानाट्या गोष्टी सांगितल्या. ती म्हणाली, 'प्रीतस, बेलेरॉफॉनला ठार मार किंवा तू तरी मर, कारण माझ्या इच्छेविरुद्ध तो माझ्याशी बदकर्म करू इच्छितो'. राजा रागावला, पण बेलेरॉफॉनचा प्राण घेण्यास त्याचे मन कचरले ; म्हणून त्याने त्याला, बंद केलेल्या लेखफलकावर तो आणणाराची खूप निंदा केलेला मजकूर लिहून, फसवी परिचयपत्रे देऊन लिसिआला पाठवला. त्याने बेलेरॉफॉनला ती पत्रे आपल्या सासऱ्याला दाखविण्यास सांगितले ; मनात हा हेतू की बेलेरॉफॉन मारला जावा. तेव्हा बेलेरॉफॉन देवांनी सुरक्षित सोबत केल्यामुळे सुखरूप लिसिआला पोहोचला.

"जेव्हा तो लिसिआतील झांथस नदीपर्यंत आला तेव्हा राजाने पूर्ण सदिच्छापूर्वक त्याचे स्वागत केले, नऊ दिवस त्याला मेजवान्या दिल्या आणि त्याच्या सन्मानार्थ नऊ कालवडी कापल्या ; पण जेव्हा दहाव्या दिवसाची अरुणांगुली प्रभात उजाडली तेव्हा त्याने त्याची चौकशी करण्यास सुरवात केली. आणि आपला जावई प्रीतस याने दिलेली पत्रे पाहण्यास मागितली. ते दुष्ट पत्र मिळाल्यावर त्याने प्रथम बेलेरॉफॉनला आज्ञा केली की, किमीरा या विक्राळ राक्षसी प्राण्यास त्याने मारावे ; किमीरा ही मानवी नसून एक देवी होती ; तिला सिंहाचे डोके, सर्पाचे शेपूट व बकरीचा देह असून ती अग्निज्वालांचे उच्छ्वास सोडी ; पण बेलेरॉफॉनने तिला ठार मारले कारण त्याला स्वर्गाच्या संकेतांचे मार्गदर्शन मिळाले. त्यानंतर त्याने दूरवर कीर्ती पसरलेल्या सोलिनीशी सामना दिला आणि ही लढाई त्याच्या साऱ्या लढायात सर्वात कठीण होती असे तो म्हणाला. तिसऱ्या खेपेला त्याने पुरुषांशी तुल्यबल असलेल्या अॅमेझॉन्स नामक लढाऊ स्त्रियांना ठार केले. तिकडून तो परत येत असता राजाने त्याच्या नाशासाठी आणखी एक बेत रचला ; त्याने साऱ्या लिसिआतले

सर्वात शूर योद्धे निवडून त्यांना त्याच्या वाटेत दबा धरून बसवले ; पण त्यांच्यातला एकही परत आला नाही, कारण बेलेरॉफॉनने त्यातला एकूण एक मारला. तेव्हा राजाने ओळखले की, हा एकाद्या देवाचे पराक्रमी संतान असला पाहिजे. म्हणून राजाने त्याला लिसिआत ठेऊन घेतले, आपल्या मुलीचे लग्न त्याच्याशी लावून दिले ; व त्याला राज्यात आपल्या बरोबरीच्या मानाचा दर्जा दिला ; आणि लिसिअनांनी त्याला नांगरवटीखालील शेते व द्राक्षमळे यांनी संपन्न असा देशातील सर्वोत्तम जमिनीचा भाग संपूर्ण स्वामित्वासह दिला.

राजकन्येला बेलेरॉफॉनपासून तीन अपत्ये झाली, इसॅन्दर, हिप्पॉलोकस नी लॅओदॅमैआ ; मंत्रणाधिपति जेव्ह याचा लॅओदॅमैआशी समागम होऊन तिला सार्पेदॉन हा थोर पुत्र झाला ; पण बेलेरॉफॉन सर्वच देवांचा द्वेषविषय होऊन हताश व उदास असा ॲलिअन मैदानावर तो आतल्याआत झुरत, झिजत व माणसांचा संसर्ग टाळीत भटकू लागला. युद्धासाठी नेहमी वखवखलेल्या मार्सने त्याचा पुत्र इसॅन्दर हा सोलिमीशी लढत असता त्याला मारले ; त्याची कन्या सोन्याचे लगाम वापरणाऱ्या दायानाच्या कोपास बळी पडली ; पण हिप्पोलस मात्र जगूनवाचून पुढे माझा पिता झाला, आणि जेव्हा मला त्याने त्रॉयला पाठवले तेव्हा पुनःपुन्हा आग्रहाने बजावले की सदा सर्वात पुढच्या लोकात लढून बरोबरीच्या लोकांवर कडी करावी, जेणेकरून एफिरात नी साऱ्या लिसिआत सर्वोच्च कुलात जन्मलेले जे माझे वाडवडील त्यांच्या खानदानाला काळिमा येणार नाही. तेव्हा या माझ्या वंशावळीवर मी असा दावा सांगत आहे".

तो याप्रमाणे बोलला आणि दायोमिदला मनात आनंद झाला. त्याने आपला भाला जमिनीत रोवला आणि तो त्याच्याशी स्नेहपूर्ण शब्दांनी बोलला तो म्हणाला, "तर मग तू माझ्या वडिलांच्या घराण्याचा जुना मित्र आहेस". थोर ईन्यूसने एकदा बेलेरॉफॉनचे वीस दिवस आतिथ्य केले होते व उभयतात देणग्यांची देवघेव झाली होती. ईन्यूसने जांभळ्या रंगाने झळाळणारा असा कमरपट्टा दिला व बेलेरॉफॉनने एक नेहमीच्या आकारापेक्षा दुप्पट आकाराचा पेला दिला, तो मी त्रॉयला निघालो तेव्हा घरीच ठेवला. मला तायदिअस आठवत नाही, कारण माझ्या बाळपणीच आम्ही त्याला मुकलो--जेव्हा थीब्सपुढच्या लढाईत ॲकिअन्सच्या सैन्याचे तुकडे तुकडे झाले तेव्हा तो मारला गेला. यानंतर मात्र मध्य आरगॉसमध्ये मी तुझा आतिथ्य करणारा यजमान, आणि तसाच लिसिआत, कधी मी तिकडे गेलो तर तू माझा यजमान असे झाले पाहिजे. यापुढे सर्वसाधारण लढाईत आपण एकमेकांचे भाले टाळून राहू या ; मी ठार

करू शकेन असे उच्च कुलीन त्रोजन्स व त्यांचे मित्रपक्षीय पुष्कळ आहेत ; पाठलाग करून मी त्यांच्यापर्यंत पोहोचलो व स्वर्गस्थ शक्तींनी माझ्या तावडीत त्यांना दिले म्हणजे झाले.

"तीच गोष्ट तुझ्याबाबत ; तुला साधले तर तू प्राण घेऊ शकशील असे पुष्कळ ॲकिअन्स आहेत. तेव्हा आपण आता दोघे चिलखतांची अदलाबदल करू, म्हणजे येथील सर्व उपस्थितांना आपल्यामध्ये असलेल्या स्नेहसंबंधाचा बोध होईल".

असे बोलणे होताच दोघांनी रथावरून उड्या मारल्या, एकमेकांचे हात धरले व मैत्रीच्या आणाशपथा घेतल्या. पण सॅटर्नपुत्राच्या योजनेने ग्लॉकसचे शहाणपण त्याला सोडून गेले ; कारण शंभर गुरांच्या मोलाचे सुवर्णकवच देऊन त्याबदली त्याने नऊ गुरे किंमतीचे ब्रॉंझचे चिलखत घेतले.

यावेळी जेव्हा हेक्तर स्कीअन वेशीपाशी ओकवृक्षाजवळ पोहोचला तेव्हा त्रोजनांच्या बायकापोरी धावत त्याच्याकडे येऊन आपले मुलगे, भाऊ, नातलग व पती कसे आहेत म्हणून विचारू लागल्या. त्याने त्यांना देवांच्या प्रार्थनेच्या तयारीस लागण्यास सांगितले आणि त्याचे शब्द ऐकून पुष्कळजणी कष्टी झाल्या. थोड्याच वेळात तो प्राॲम राजाच्या वैभवशाली प्रासादात पोहोचला. दगडात कोरून काढलेल्या खांबांच्या ओळींनी प्रासादाच्या अंतर्गत वीथी नटवल्या असून तशाच कोरून काढलेल्या दगडांची पन्नास शयनागारे जवळजवळ बांधलेली होती. त्यातून आपआपल्या भार्यांसह प्राॲमचे पुत्र शयन करीत. त्यांच्यासमोर प्रांगणाच्या दुसऱ्या बाजूस वरच्या मजल्यावर तशाच घडीव दगडांचे बारा महाल प्राॲमच्या कन्यांसाठी जवळजवळ बांधलेले होते. त्यातून प्राॲमचे जावई सपत्नीक शयन करीत. हेक्तर तेथे पोहोचला तेव्हा त्याची प्रेमळ आई तिच्या सर्वांत सुंदर अशा लॅओदिसीनामक कन्येला घेऊन त्याच्या समीप आली. पुत्राचा हात आपल्या हातात घेऊन ती माता म्हणाली, "हेक्तर, लढाई सोडून तू इकडे का आलास ? ॲकिअन्स—धाड येवो त्यांच्यावर !—नगरीभोवती तुमच्या सेनेला इतके नेटाने रेटीत आहेत की काय, की ज्यामुळे तुला येथे येऊन बालेकिल्ल्यातून जव्हकडे प्रार्थनार्थ हात उंचावणे आवश्यक वाटू लागले ? थांब, मी मद्य आणते म्हणजे तुला जव्ह व इतर अमर यांना अर्घ्य देता येईल आणि मग तुलाॅपण स्वतः मद्य पिऊन तरतरी येईल. थकलेल्या माणसाला मद्य नवी शक्ती देते; बांधवांच्याबतीने लढून तू पण आता तसाच थकलेला आहेस".

आणि हेक्तरने उत्तर दिले, "पूज्यमाते, मद्य आणू नको, कारण मद्यप्राशनाने मी दुबळा होऊन माझ्या शक्तीवरचा माझा विश्वास उडेल. हात धुतले

नसताना जव्हला मद्याचे अर्घ्य प्रदान करण्याचे मला धाडस होत नाही. ज्याच्या अंगावर रक्त नी घाण उडाली आहे त्याने सॅटर्नपुत्राची प्रार्थना करायची नसते. पुरंध्रीना एकत्र जमव नी लुटालुटीची स्फूर्तीदेवता मिनर्व्हा हिच्या मंदिराकडे उपायने घेऊन जा. तुझे अगदी ठेवणीतले बहुमोल, सर्वात मोठे व सर्वात सुंदर महावस्त्र तेथे मिनर्व्हाच्या अंकांवर ठेव ; शिवाय पराणीचा स्पर्श माहित नसलेल्या एक वर्षाच्या बारा कालवडी देवीच्या देवळात बळी देण्याचा नवस कर---म्हणजे ती नगरीवर आणि त्रोजन्सच्या बायकावछडचांवर दया-कृपा करील व इलिअमच्या सुंदर पुरीपासून तायदिअसपुत्राला दूर ठेवील. कारण तो बेफामपणे लढतो आणि लोकांची पाचावर धारण बसवतो. तर मग तू आता मिनर्व्हाच्या मंदिराकडे जा व मी पॅरिसला शोधून तो माझे बोलणे मनावर घेणार असला तर त्याला आग्रहाचा उपदेश करतो. पृथ्वीने जबडा उघडून त्याला गिळले तर बरे होईल. कारण त्रोजन्स, प्राअॅम आणि प्राअॅमचे मुलगे यांच्या नाशाला कारण होण्यासाठीच जव्हने जणू त्याला जन्माला घातले आहे ! तो जर नुसता खाली हेदिझच्या घरी (अधोलोकी) जाताना मला दिसला तर माझ्या हृदयावरचा केवढातरी भार उतरून ते हलके होईल".

त्याची आई घरात गेली आणि सेविकाना बोलावून त्यांच्याकडून साऱ्या शहरातल्या पुरंध्री तिने एकत्र जमवल्या. नंतर ती खाली आपल्या सुगंधित भांडारात गेली. तेथे तिची भरतकाम व कलाकुसर केलेली महावस्त्रे ठेवलेली होती. कुलीन हेलनला पळवून आणतेवेळी समुद्रावरच्या सफरीत ज्या सायदोनिअन बायकाना अॅलेक्झँड्रसने सायदॉनहून आणले होते त्यांच्या हातचे हे भरतकाम व कलाकुसर होती. मिनर्व्हाला समर्पण करण्यासाठी सर्वात मोठे आणि सर्वांत सुंदर रीतीने भरतकामाने नटवलेले महावस्त्र हेक्युबाने काढले ; ते पेटीच्या अगदी तळाशी होते आणि ताऱ्यासारखे चमकत होते. ते घेऊन ती रस्त्याला लागली आणि तिच्यासह पुष्कळ पुरंध्री गेल्या.

जेव्हा त्या साऱ्याजणी मिनर्व्हाच्या मंदिराजवळ आल्या तेव्हा सिसिअसची कन्या व अॅन्तेनॉरची पत्नी सौंदर्यशालिनी थिअॅनो हिने दरवाजे उघडले, कारण त्रोजन्सनी तिला मिनर्व्हाची पुजारीण केले होते. मग त्या बायकांनी उच्च स्वराने साद घालून देवीकडे हात उंचावले, आणि मिनर्व्हाच्या अंकांवर ठेवण्यासाठी थिअॅनोने महावस्त्र घेऊन जव्हच्या थोर कन्येची प्रार्थना केली ; ती उच्च स्वरात म्हणाली, "पवित्र मिनर्व्हा देवी, आमच्या नगरीच्या आरक्षिके, प्रतापी देवते, दायोमिदचा भाला मोडून टाक नी स्कीअन वेशीपुढे त्याचा अधःपात होऊ दे. हे एवढे कर व जर तू याप्रमाणे नगरीवर व त्रोजन्सच्या

बायका-बछड्यांवर दया दाखवलीस तर आम्ही तुझ्या देवळात पराणीचा कधी स्पर्श माहित नसलेल्या बारा कालवडी बळी देऊ", अशी प्रार्थना तिने केली पण पॅलास मिनर्व्हाने तिचे मागणे मान्य केले नाही.

थोर जव्हच्या कन्येची त्या याप्रमाणे प्रार्थना करीत असताना हेक्तर अॅलेक्झँद्रसच्या सुंदर वाड्यात गेला. देशातल्या अग्रेसर कारागिरांकडून हा वाडा त्याने बांधून घेतला होता. अॅक्रोपोलिसच्या उंचवट्यावर प्राअॅम व हेक्तर यांच्या निवासाजवळच हा वाडा, भांडार व प्रांगण बांधलेले होते. येथे हेक्तरने अकरा हात लांबीचा आपला भाला घेऊन प्रवेश केला. त्या भाल्याचे ब्राँझचे अग्र त्याच्यापुढे चमकत होते आणि ते भाल्याच्या दांड्याला एका सोन्याच्या वलयाने खिळवले होते. हेक्तरला अॅलेक्झँद्रस घरातच दिसला, तो आपले चिलखत, ढाल, वक्षकवच वगैरेंच्या व्यवस्थेत गुंतला होता व आपले बाकदार धनुष्य हाताळीत होता ; तेथेच आॅर्गासची हेलन आपल्या दासीना निरनिराळी कामे सोपवीत बसली होती ; हेक्तरने त्याला पाहिल्यावर तिरस्कारयुक्त शब्दांनी त्याची निर्भत्सना केली, तो म्हणाला, "श्रीमान्, अशी अढी मनात बाळगणे तुम्हाला शोभत नाही. या आपल्या नगरीभोवताली लढतलढत लोक मृत्युमुखी पडत आहेत. लढाईत आपल्या वाट्याला आलेल्या कामाची टाळा-टाळ करणाराला तू स्वतः रागे भरशील. उठ तर मग, नाहीतर शहर पेटण्यास वेळ लागणार नाही."

आणि अॅलेक्झँद्रसने उत्तर दिले, "हेक्तर, तुझी कानउघाडणी वास्तव आहे. म्हणून ऐक व विश्वास ठेव मी सांगतो त्यावर, मी त्रोजन्सविरुद्ध मनात अढी किंवा दुष्टावा धरून येथे थांबलो नाही ; तर माझ्या दुःखाला वाव देण्यासाठी मी येथे बसलो आहे. आताच माझी पत्नी सौम्यपणे मला लढाईस जाण्याचा आग्रह करीत होती आणि आता मलाही मी जावे हे अधिक बरे वाटते आहे, कारण विजयश्री सदा चंचल असते. तेव्हा मी चिलखत चढवीपर्यंत थांब, नाहीतर तू पुढे हो व मी पाठोपाठ येतोच. तुला नक्कीच येऊन गाठीन मी."

हेक्तर त्यावर काहीच बोलला नाही. पण हेलनने हेक्तरचा राग शमवण्याचा प्रयत्न केला. ती म्हणाली, "या तिरस्कृत पापीणीच्या बंधो, ज्यादिवशी आईने मला जन्म दिला त्याच दिवशी एकाद्या चक्री वादळाने मला उचलून नेऊन कुठल्यातरी पर्वतावर, नाही तर गरजणाऱ्या सागराच्या लाटावर वाहून जाण्यासाठी टाकले असते तर बरे झाले असते; म्हणजे हा सारा नंतरचा अनर्थ झालाच नसता. पण ज्याअर्थी देवानी ही अरिष्टे योजिलीच आहेत, तेव्हा निदान मी याच्याहून जास्त चांगल्या माणसाची—ज्याला मानहानी आणि

लोकांचे टोचून बोलणे झोंबले असते---अशाची तरी बायको व्हायला हवी होते. हा प्राणी भरवशाचा कधीच नव्हता व पुढेही त्याच्यावर भरवसा ठेवण्याची सोय नाही . आणि त्याने जे पेरले आहे त्याचे फळ निश्चितच तो भोगील. तरी पण बंधो, आत या व या आसनावर बसून विश्रांती घ्या, कारण तिरस्करणीय अशा माझ्यामुळे, अलेक्झँद्रसच्या पापास्तवच तुम्हाला या साऱ्या कष्टांचा भार वहावा लागत आहे. जव्हने तर आम्ही दोघे भावी पिढयांच्या कवनांचे विषय व्हावे अशी कठोर नियतीच ठरवून टाकली आहे."

आणि उत्तरार्थी हेक्तर म्हणाला, "तुझी माझ्यावद्दल कितीही सद्भावना असली तरी मला बसायला सांगू नको, हेलन. मला थांबता येत नाही, त्रोजन्सना मदत करण्याच्या गडबडीत मी आहे व मी जर त्यांच्यामध्ये नसलो तर त्यांना फार चुकल्या सारखे वाटते. पण तुझ्या नवऱ्यामागे निकड लाव व त्याला स्वत:लाही सनाद्र घेऊ दे व घाई करून, मी नगरीबाहेर पडण्याच्या आत माझ्यापर्यन्त त्याला येऊन पोहोचू दे. माझ्या कुटुंबातील माणसे, बायको व लहान मुलगा यांना भेटायला मला घराकडे गेले पाहिजे. कारण कोण जाणे मी पुन्हा परत त्यांच्यामध्ये येईन का देव ॲकिअन्सच्या हस्ते माझा रणात शेवट करतील."

मग हेक्तर तिला तेथेच सोडून थेट आपल्या स्वत:च्या घरी गेला. त्याला अॅन्द्रोमॅकी तिथे आढळली नाही. कारण ती आपल्या अर्भकाला व एका दासीला घेऊन तटावर दु:खाश्रू ढाळीत बसली होती. ती घरात नाही हे पाहून घरातील बायकांकडील भागाच्या उंबरठ्यापाशी उभा राहून तो म्हणाला, "बायांनो, मला सांगा, व खरे सांगा, की अॅन्द्रोमॅकी घराबाहेर पडली ती कुठे गेली? माझ्या बहिणींकडे की भावजयांकडे? का त्या भयकारी देवीचा राग शांत करण्यासाठी इतर बायका मिनर्व्हाच्या मंदिरात गेल्या आहेत तिकडे ती आहे?"

त्याच्या सालस गृहव्यवस्थापिकेने उत्तर दिले, "हेक्तर, तू मला खरे बोलायला सांगतो आहेस म्हणून सांगते; ती तुझ्या बहिणीकडे किंवा भावजयांकडे किंवा मिनर्व्हाच्या देवळात जिथे इतर बायका त्या भयकारी देवीचा कोप शान्त करीत आहेत तिकडेही ती गेलेली नाही. तर ती इलिअमच्या उंच तटावर गेली आहे, कारण त्रोजन्स अडचणीत आले असून मागे रेटले जात आहेत व ॲकिअन्सचे सैन्य मोठ्या जोरात आहे असे तिने ऐकले; म्हणून ती अत्यंत घाईगर्दीने तटावर गेली व मुलाला घेऊन दाई तिच्याबरोबर; गेली."

तिचे बोलणे ऐकल्यावर हेक्तर घाईघाईने घरातून निघाला. आणि आलेल्याच रस्त्यानी चालत परत जाऊ लागला. तो नगरीतून बाहेर पडून

तिच्या बाहेरच्या मैदानावर पोहोचण्यासाठी स्कीअन वेशीपाशी जेव्हा पोचला तेव्हा त्याची पत्नी धावत त्याच्याकडे आली. प्लॅकस पर्वताच्या वृक्षाच्छादित उताराखालच्या थीब्जवर राज्य करणारा सिलिसिअन्सचा राजा थोर एइशॉन याची अन्द्रोमॅकी कन्या होती. तिनेच हेक्तरला वरिले होते आणि आता ती त्याला भेटायला दाईने पोटाशी धरलेल्या त्याच्या अर्भकाला घेऊन आली. ते हेक्तरचे लाडके पोर अगदी तान्हे होते व नक्षत्रासारखे सुंदर होते. हेक्तरने त्याला स्कॅमँद्रियस हे नाव दिले होते. पण लोक त्याला ॲस्तिॲनक्स (नगराधीप) म्हणत, कारण इलिअमचा मुख्य संरक्षक एकटा त्याचा पिताच होता. पुत्राकडे पाहून हेक्तरने स्मित केले पण तो काही बोलला नाही; व ॲन्द्रोमॅकी त्याच्या बाजूला रुदन करीत आणि त्याचा हात हातात घेऊन उभी राहिली. ती म्हणाली, "प्रिय पतिराज, तुमचे शौर्यच शेवटी तुमच्या नाशाला कारण होणार आहे, आपल्या लहानग्याचा विचार करा व जिच्या कपाळी थोडयाच अवधीत वैधव्य येणार आहे त्या या अभागिनीचाही. याप्रमाणे तुम्हाला मुकण्याची जर माझ्यावर पाळी येणार असेल तर त्यापूर्वीच मला मरण येऊन मी भूमीखाली चिरशयन करीन तर बरे होईल. कारण ॲकिअन्स सगळे मिळून नक्कीच तुमच्यावर हल्ला करतील आणि तुमचा घात करतील. कारण तुम्ही गेल्यावर माझ्या वाटचाला केवळ दुःखच येणार. ज्याच्याकडे पाहून मला दिलासा मिळेल असे काहीही मग उरणार नाही. आता मला नाही पिता ना माता, सिलिसिअन्सची थीब्सही सुंदर नगरी लुटतेवेळी ॲकिलिझने माझ्या पित्याला ठार मारले. जीव घेतला पण निव्वळ लाजेखातर त्याला लुटले मात्र नाही. त्याचे अद्‌भुत कवच त्याच्या अंगावर ठेऊनच त्याने त्याचे दहन केल्यावर त्याच्या राखेवर ॲकिलिझने एक आडवा मातीचा ढीग समाधी-सारखा रचला आणि ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्या गिरिनिवासिनी अप्सरा, ह्यानी त्या समाधीभोवती एल्मवृक्षांची एक राई लावली. मला पित्याच्या घरी सात भाऊ होते, पण त्याचदिवशी ते सगळे हेदिझच्या गृही (अधोलोकी) गेले. ते आपल्या मेंढ्यागुरांपाशी असतानाच ॲकिलिझने त्यांना ठार मारले. माझी माता, जी प्लॅकस पर्वताखालच्या सर्व भूमीची राणी होती, तिला ॲकिलिझने लुटीवरोबर इकडे आणले व मोठी द्रव्यराशी घेऊन तिला मुक्त केले, पण धनुर्धारिणी-- राणी दायानाने ती तुमच्या पित्याच्या घरात असताना तिला नेले नाही. हेक्तर, तू आता माझा पिता, माता, भाऊ व प्रिय पती, सर्व काही आहेस. माझ्यावर दया कर; येथे या तटावरच थांब; तुझ्या बाळाला पितृहीन व तुझ्या पत्नीला गतधवा करू नको. सैन्याबद्दल

म्हणशील तर अंजिराच्या झाडापाशीं, जेथे तट सर्वात कच्चा आहे व जेथून तो चढून नगरीत येता येईल, तेथे सैन्य ठेव. तिथे शत्रूचे सर्वात शूर योद्धे तीनदा आले आहेत व त्यांनी हल्ले चढवले आहेत. दोघा अॅजॅक्सांच्या इडॉमिनिअमच्या अॅत्रिअस पुत्रांच्या व शूर तायदिअस पुत्राच्या नेतृत्वाखाली स्वतःच्या बुद्धीने म्हणा किंवा कोणी भविष्यवाद्याने सांगितल्यावरून म्हणा ते हल्ले झाले."

आणि हेक्तरने उत्तर दिले, "भार्ये, मीही या सर्वांचा विचार केला आहे. पण एकाद्या भेकडासारखी लढाई चुकवून त्रोजन स्त्री-पुरुषांपुढे कोणत्या तोंडाने मला जाता येईल? मला तसे करता येणार नाही. त्रोजन सैन्याच्या अग्रभागी शौर्याने लढून माझ्या पित्यासाठी, तशीच माझ्यासाठी कीर्ती संपादन करण्या-खेरीज अन्य काही मला ठाऊक नाही. प्राअॅम नी प्राअॅमची प्रजा यांच्यासह बलशाली इलिअम नष्ट होण्याचा दिवस निश्चित येईल हे मला पुरते माहित आहे, पण त्यापकी कोणासाठीही मी दुःख करीत नाही—हेक्युबासाठी नाही, ना प्राअॅम राजासाठी, ना जे शत्रूंपुढे कदाचित धुळीत पडतील त्या माझ्या अनेक व शूर भावांसाठी—यातल्या कोणासाठीच मी इतका दुःखी होत नाही—जितका तुझ्यासाठी होतो—अॅकिअन्सपैकी कोणीतरी एखादा तुझ्या स्वातंत्र्याचा कायमचा अपहार करील व रडत असलेल्या तुला उचलून घेऊन जाईल, असा दिवस तुझ्यावर ओढवणार यासाठी मी दुःखी होतो. एकादे वेळी असेही होईल की एखाद्या स्वामिनीच्या आज्ञेने आरगॉसमध्ये तुला हातमाग चालवावा लागेल किंवा मेसेइस वा हैपेरिआच्या झऱ्यांवरून पाणी भरून आणावे लागेल, व कोणा काम करवून घेणाऱ्या कडक मालकाकडून पशुतुल्य वागवणूक मिळेल; मग तुला रडताना पाहून एखादा म्हणेल, 'इलिअमपुढे झालेल्या युद्धातला त्रोजनसमधील सर्वात शूरवीर हेक्तर याची ही बायको होती'. ते ऐकून, ज्याने बंदिवासाचा दिवस तुझ्यापासून दूर ठेवला असता त्याच्यासाठी तुझी आसवे पुन्हा जोराने वाहू लागतील. शत्रू तुला गुलाम करण्यासाठी घेऊन जात असता तुझा विलाप ऐकण्याआधीच माझ्या देहावर घातलेल्या मातीच्या ढिगाऱ्याखाली मी मरून पडलेला असो."

त्याने आपल्या अर्भकाकडे आपले हात पसरले पण ते मूल बापाच्या चिलखताला व त्याच्या शिरस्त्राणावर उग्रपणे डोलणाऱ्या अश्वपुच्छ केसाच्या तुऱ्याला भिऊन रडू लागले, व आपल्या दाईच्या छातीला बिलगले. त्याला पाहून त्याचे आईबाप हसले, पण हेक्तरने आपले चकाकते शिरस्त्राण काढून जमिनीवर ठेवले; मग त्याने आपले लाडके पोर घेऊन त्याचा मुका घेतला, आपल्या

वाहूत त्याला नाचवले, उडवले आणि त्याच्यावर ओठंगून जव्ह आणि सर्व देवांची प्रार्थना एकसारखी केली. तो म्हणाला, "जव्ह, वरदान दे की अगदी माझ्या सारखेच हे माझे मूल त्रोजन्समध्ये अग्रगण्य होईल; त्याच्या शक्तीचा दर्जा अगदी सर्वोत्कृष्ट राहू दे. आणि स्वपराक्रमाने इलिअमवर त्याला राज्य करू दे. मग तो लढाई संपवून येत असता कोणी म्हणावे की 'बापापेक्षा मुलगा फार गुणी आहे', त्याने ज्याला रणात लोळवले त्याचे रक्तलांछित युद्धसाहित्य लुटून तो इकडे आणो नी त्याच्या आईचे हृदय आनंदित करो."

असे बोलून त्याने मूल पुन्हा त्याच्या पत्नीच्या हातात दिले; ते तिने आपल्या मृदु वक्षाशी कवटाळले व अश्रू ढाळता ढाळता स्मित केले; तिच्याकडे पाहताना त्याला तिच्याबद्दल तीव्र ओढ वाटू लागली, आणि प्रेमाने त्याने तिला कुरवाळीत म्हटले, "माझी स्वतःची लाडकी ती! या गोष्टी इतक्या तीव्रतेने मनाला लावून घेऊ नकोस. माझी वेळ येण्याआधी मला कोणीही घाईने खाली हेदिझकडे (अधोलोकी) घालवू शकणार नाही; पण एकदा माणूस जन्माला आला व त्या माणसाची घटका भरली की मग तो शूर असो की भ्याड, मृत्यूच्या हातातून त्याला निसटून जाणे शक्य नाही. मग आता घरात जा व तुझी रोजची कामे---तुझा हातमाग, तुझी तकली आणि तुझ्या सेवकांना कामाला लावणे---यात स्वतःला गुंतवून घे; कारण युद्ध हा पुरुषांचा विषय आहे; व इलियममध्ये जन्मलेल्या इतर सर्व पुरुषांपेक्षा जास्त प्रमाणात तो माझा विषय आहे."

त्याने जमिनीवरचे आपले शिरस्त्राण उचलेले आणि त्याची बायको हमसा-हमशी रडत आणि पुनः पुनः त्याच्याकडे वळून पाहात परत आपल्या घराकडे गेली. ती घरी पोहोचली तेव्हा तिला तिच्या दासी तिच्या दृष्टीस पडल्या व त्यांना आपल्या आक्रोशात सहभागी होण्यास तिने सांगितले. तेव्हा हेक्तर अद्यापी जिवंत असूनही त्याच्यासाठी त्याच्याच घरात त्यांनी शोक केला; कारण त्यांना वाटले की युद्धातून नी खवळलेल्या ॲकिअन्सच्या तावडीतून तो सुख-रुप परत आलेला त्यांना कधीच दिसणार नाही.

पॅरिस आपल्या घरात फार वेळ थांबला नाही. त्याने आपले ब्राँझने मढवलेले सुंदर चिलखत चढवले, आणि नगरीतून पाय नेतील तितक्या त्वरेने तो घाईत चालू लागला. जसा तबेल्यात बांधून ठेवलेला, पुरा पोसलेला एकादा घोडा बंध तोडून मोकळा होतो आणि आकर्षकपणे वहाणाऱ्या नदीत नेहमी डुंबण्याच्या ठिकाणी डौलात दौडत मैदानावरून जातो---तो आपले मस्तक

उंच, ताठ ठेवतो व स्वतःच्या सामर्थ्याच्या जाणीवेने उल्हसित असा तो वाऱ्यासारखा घोडयांच्या चरायच्या व हिंडण्या फिरण्याच्या नेहमीच्या जागेकडे दौड लागतो—तेव्हा त्याची आयाळ त्याच्या खांद्यावर उडत रहाते, अगदी तसाच, चिलखत धारण केल्यामुळे सूर्यप्रकाशासारखा चकाकणारा पॅरिस उंच परगॅमसवरून निघाला आणि त्वरेने आपला मार्ग आक्रमीत असता तो मोठयाने हसला. अगदी थोडया वेळात तो आपला भाऊ हेक्तर याच्यापाशी आला; त्यावेळी हेक्तर, पत्नीशी संभाषण झाल्यावर त्या जागेवरून दूर निघून जाण्यासाठी वळत होता; व पॅरिसच प्रथम बोलला, "श्रीमान, मला भय वाटते की मी तुम्ही घाईत असताना तुम्हाला वाट पाहात ठेवले, आणि तुम्ही सांगितल्या इतका त्वरित आलो नाही."

हेक्तरने त्याला उत्तर दिले, "माझ्या भल्या बंधो, तू शौर्याने लढतोस आणि लढाईतल्या तुझ्या करामती, कोणीही न्यायी माणूस कमी लेखू शकणार नाही; पण तू निष्काळजी आहेस आणि मुद्दाम हलगर्जीपणे वागतोस. त्रोजनांनी तुझ्यामुळे फार भोगलेले आहे, व त्यामुळे ते तुझ्याबद्दल जे वाईट बोलतात ते ऐकून माझ्या मनाला खेद होतो. चल, आपण जाऊ या, आणि इतःपर सारे ठीकठाक करू या. जव्हच्या मनात असेल तर तो त्रॉयपासून ॲकिअन्सना आपण पळवून लावल्यानंतर, आपल्या मुक्ततेचा पेला नैवेद्यासारखा आपल्या घरातील चिरंजीवी स्वर्गस्थ देवांपुढे ठेवण्याची संधी आपल्याला प्रदान करील."



## सर्ग ७

या शब्दाबरोबरच हेक्तर व त्याच्या बरोबर त्याचा भाऊ ॲलेक्झँद्रस वेशीतून बाहेर पडले; दोघेही झुंज सुरु होण्यासाठी उत्सुक होते. नाविकांनी दीर्घकालपर्यन्त व्यर्थ प्रतीक्षा केल्यावर आणि कष्टांनी अर्धमेले होईपर्यंत वल्ही मारण्याचे श्रम घेतल्यानंतर आकाशातून आलेली वाऱ्याची झुळुक जशी त्यांना आनंद देते अगदी तसेच या दोघा वीरांचे दर्शन त्रोजनांना स्वागतार्ह झाले.

त्यानंतर ॲलेक्झँद्रसने ॲरेइस्थोउसपुत्र मेनेस्थिअसला मारले; हा आर्नमध्ये राहणारा आणि गदाधारी ॲरेइस्थोउस व फिलोमेघुसा यांचा पुत्र होता. हेक्तरने ऐओतिअसकडे भाला फेकला व त्याच्या शिरस्त्राणाच्या ब्राँझच्या कडेखाली मानेत जखमी करून त्याला ठार केले. शिवाय हिप्पोलॉकसपुत्र लिसिअन्सचा प्रमुख ग्लॉकस याने हातघाईच्या लढाईत देक्सिअसपुत्र इफिनॉउसच्या खांद्यावर घाव घातला. त्यावेळी तो आपल्या वेगवान घोड्यांमागे रथावर उडी घेत होता. त्यामुळे तो रथावरून भूमीवर कोसळला आणि निष्प्राण झाला.

म्हणून जेव्हा मिनर्व्हाने या वीरांना आरगॉसच्या सैन्यात कहर उडवताना पाहिले तेव्हा ती ऑलिम्पसच्या शिखरांवरून तीरासारखी खाली इलिअमला आली आणि परगॅमसवरून युद्ध पहात असलेला ॲपोलो तिला भेटायला पुढे झाला, कारण त्याला त्रोजन्स विजयी व्हायला हवे होते. दोघांची भेट ओक वृक्षापाशी झाली आणि प्रथम जव्हपुत्र राजा ॲपोलो बोलला, "थोर जव्हच्या कन्ये, एवढी अभिमानी तू पण ऑलिम्पसवरून इथवर आलीस तेव्हा तुझे काहीतरी काम असले पाहिजे. त्रोजन्सबद्दल तुला दया नाही वाटत व यशाचे पारडे दॅनाअन्सच्या बाजूला तुला झुकवायचे आहे की काय? मला तुझी समजूत घालू दे, त्यानेच भले होईल. आजच्या दिवस लढाई थांबव, पण नंतर पुन्हा त्यांना, इलिअमचा विनाश ते घडवून आणीपर्यन्त युद्ध चालू करु दे. कारण तुम्ही देवींनी ही नगरी नष्ट करण्याचा निश्चयच केलेला आहे".

आणि मिनर्व्हा उत्तरली, "तसेच होऊ दे, दीर्घशरक्षेपका, याच हेतूने मी ऑलिम्पसवरून त्रोजनांकडे व ॲकिअनांकडे आले. तर मग मला सांग, सध्या चाललेली ही लढाई थांबवण्यासाठी तुझा काय करण्याचा बेत आहे ?"

जव्हपुत्र अ‍ॅपोलो म्हणाला, "द्वंद्वयुद्ध करण्याचे आव्हान दॅनाअनांपैकी एकाद्याला देण्यास आपण हेक्तरला प्रवृत्त करु या. ते आव्हान स्वीकारुन अ‍ॅकिअनांना लाजेकाजेस्तव त्याच्याशी लढणारा मनुष्य शोधून काढणे भाग पडेल".

मिनर्व्हाने हे मान्य केले; आणि प्राअ‍ॅमपुत्र हेलेनस याने देवांची मंत्रणा ताडली. म्हणून तो हेक्तरपाशी जाऊन म्हणाला, "हेक्तर, मंत्रणेत देवतुल्य अशा प्राअ‍ॅम-पुत्रा, मी तुझा भाऊ आहे, तेव्हा पुढील कार्यासाठी तुझे मन मला वळवू दे. साऱ्या त्रोजनांना आणि अ‍ॅकिअन्सला, सर्वांना आपापल्या जागी बसायला सांग, आणि अ‍ॅकिअन्समधल्या सर्वोत्तम वीराला तुझ्याशी द्वंद्वयुद्ध करण्यास आव्हान दे. मी अमर देवांचा आवाज ऐकला आहे, तुला यात धोका नाही. तुझ्या विनाशाचा काळ अजून आलेला नाही".

हे बोलणे ऐकून हेक्तरला बरे वाटले, आणि भाला मध्ये आडवा धरून त्रोजन्सना मागे थोपवून धरीत तो त्यांच्यात फिरला, तेव्हा ते सगळे खाली बसले. अ‍ॅगॅमेम्नॉननेही अ‍ॅकिअन्सना खाली बसण्यास सांगितले. पण मिनर्व्हा व अ‍ॅपोलो गिधाडांची रुपे घेऊन पिता जव्ह याच्या उंच ओक वृक्षावर बसली; त्यांना आपापल्या पक्षाच्या लोकांचा अभिमान होता; सैनिक श्रेणी भोवताली जवळजवळ बसल्या; त्यांच्या रांगात ढाली, शिरस्त्राणे व भाले उठून दिसत होते. पश्चिमेकडून सुटणारा वारा जसा सागरपृष्ठावरून लहरत जातो व त्यामुळे खालचे पाणी कृष्णवर्ण दिसते त्याप्रमाणे त्रोजनांची व अ‍ॅकिअनांची मैदानावर बसलेली पथके दिसत होती. आणि हेक्तरने याप्रमाणे भाषण केले :—

"त्रोजन्स नी अ‍ॅकिअन्स, माझे बोलणे शांतपणे ऐकून घ्या म्हणजे माझ्या मनात जे आहे ते मला मोकळेपणी बोलता येईल. आपल्या शपथा आणि संधिसंहिता उच्च सिंहासनारुढ जव्हने निरर्थक करून सोडल्या आहेत, आणि आपल्या दोन्ही पक्षांचे भवितव्य, एकतर तुम्ही त्रॉयचे मनोरे जिंकून होईपर्यंन्त नाहीतर तुमचा स्वतःचा तुमच्या नौकांपाशी पराभव तरी होईपर्यंन्त अनिष्ट असेच सूचित करीत आहे. येथे तुमच्यामध्ये अ‍ॅकिअनांचे राजवंशीय उपस्थित आहेत. तेव्हा माझ्याशी युद्ध करील असा तुमचा कोणताही कैवारी वीर माझ्याविरुद्ध पुढे उभा राहू द्या. हे मी निश्चयपूर्वक म्हणत आहे व त्याबद्दल आपणा उभयतात जव्ह साक्षीदार राहो. जर तुमच्या वीराने मला मारले तर त्याला माझे चिलखत काढून घेऊन तुमच्या नौकांकडे नेऊ द्या, पण माझा देह मात्र त्याला माझ्या घरी पाठवू द्या, म्हणजे त्रोजन व त्यांच्या बायका मला मरणोत्तर उचित रीत्या यथार्ह अग्नी देऊ शकतील. त्याच पद्धतीने जर अ‍ॅपोलोने कीर्तीचे वरदान

मला दिले व मी तुमचा कैवारी वीर मारला तर त्याचे चिलखत मी काढून घेऊन इलिअम नगरीत नेऊन अॅपोलोच्या मंदिरात टांगीन; पण त्याच्या देहावरचा हक्क मी सोडून देईन; म्हणजे मग अॅकिअनांना त्यांच्या नौकांपाशी त्याचे दफन करता येईल, व हेलेस्पाँतच्या रुंद प्रवाहाकाठी त्याच्यावर मातीचे शिल्प उभारता येईल. मग भविष्यकाळात समुद्रावरून नौका हाकारणारा एकादा कोणी म्हणेल, 'फार काळापूर्वी मृत्यू पावलेल्याचे, प्रतापी हेक्तरने मारलेल्या वीराचे हे स्मारक आहे,' आणि याप्रमाणे माझी कीर्ती नष्ट होणार नाही ".

असे तो बोलला पण सगळे (अॅकिअन्स) गप्प राहिले,—आव्हान नाकारण्याची त्यांना लाज वाटत होती, तर ते स्वीकारण्याची भीति वाटत होती. शेवटी मेनेलॉस उठला नी त्याने त्यांची निर्भत्सना केली, कारण त्याला राग आला होता. तो ओरडला, "अरेरे, फुकाच्या बढाया मारणारानो, पुरुष नव्हे तर खरोखर बायकाच असणारानो, दॅनाअनापैकी कोणीही पुरुष जर हेक्तरसमोर युद्धासाठी उभा राहिला नाही तर आपल्याला तो अगदी पक्का,—दोन हात देऊन पक्का केलेला कलंक लागेल. आपल्या जागेवर धैर्यशून्य व हिंमत हरून, तेजोहीन असे बसून राहणाऱ्या तुमच्यातला प्रत्येक जण धुळीस मिळो किंवा त्याचे पाणी पाणी होऊन जावो. या माणसाविरुद्ध मी स्वतःच आता लढण्यास जातो अर्थात् लढाईचा निर्णय मात्र स्वर्गातल्या अमर देवांच्या हातून दिला जाईल ".

या शब्दांबरोबर त्याने आपले चिलखत चढवले, आणि—हे मेनेलॉस, हेक्तरच्या हातून तुझ्या आयुष्याचा अंतच झाला असता, कारण युद्धात तो तुझ्या पुष्कळच वरचढ होता. पण अॅकिअनांचे राजवीर पटकन तुझ्याजवळ आले आणि त्यांनी तुला थांबवले. मेनेलॉसचा उजवा हात धरून अॅगॅमेम्नॉन राजा म्हणाला, "मेनेलॉस, तू वेडा आहेस; हा मूर्खपणा जरा आवर, आत्यंतिक संताप तुला आला असला तरी जरा संयम कर", तुझ्याप्रमाणेच दुसरे पुष्कळ ज्याला भितात, व तुझ्याहून जो पुष्कळच अधिक बलवान आहे, त्या प्रॉअॅमपुत्र हेक्तरशी लढण्याचा विचार करू नको. तुझ्याहून खूपच जास्त दुर्दम्य असणारा अॅकिलिझ देखील युद्धात त्याला भिडण्यास कचरला होता. तू आपल्या स्वतःच्या अनुयायांमध्ये खाली बैस. दुसऱ्या एकाद्या कैवारी वीराला हेक्तरशी सामना देण्यासाठी अॅकिअन्स धाडतील. जरी तो वीर निर्भय असला व संग्राम त्याला प्रिय असला तरी सुद्धा मला वाटते की जर तो या लढाईच्या धकाधकीतून निभावून जिवंत राहिला तर तो स्वतःला धन्य मानील असे मला वाटते."

अशा सूज्ञ सल्ल्याच्या शब्दांनी त्याने आपल्या भावाचे मन वळवले, आणि तद्नुसार मेनेलॉसच्या शिलेदारांनी त्याच्या अंगावरचे चिलखत मोठ्या संतोषाने उतरवले. मग नेस्तॉर उठून बोलला, " खरोखर ॲकिअन भूमीला वाईट दिवस आले आहेत. मार्मिदिअनांमधला मंत्री व वक्ता वृद्ध कुलीन वीर पेलिअस मी त्याच्या घरी असताना, सगळ्या आरगॉसवासीयांची कुलपरंपरा व वंशावळी याबद्दल मला प्रेमपूर्वक विचारीत असे. आता त्या लोकांचा हेक्तरच्यापुढे थरकाप होत असल्याचे तो ऐकता तर त्याला दुःख झाल्याविना कसे राहते ? अनेकदा हात उचलून तो प्रार्थना करता, की त्याचा आत्मा देह सोडून खाली हेदिझच्या गृही (पाताळलोकी) जावो. पिता जव्ह, मिनर्व्हा व ॲपॉलोशपथ, फैआच्या तटाखाली, वेगवान सेलॅदॉन नदीजवळ व आयॅर्दानिस नदीच्या पात्रा-भोवती विलिअन व आर्केदिआनिवासी जेव्हा युद्धार्थ जमले होते, तेव्हा मी जसा होतो तसा तरुण व बलवान आज असतो तर किती बरे होते ! त्यांचा कैवारी वीर म्हणून देवतुल्य वीर एऱ्युथॅलिऑन, ॲरेइथॉउस राजाचे चिलखत चढवून पुढे उभा ठाकला--त्या ॲरेइथॉउसला स्त्रीपुरुषांनी 'गदाधारी' हे उपनाव दिले होते, कारण धनुष्य किंवा भाला घेऊन युद्ध न करता शत्रूची सैनिकदले तो लोखंडी गदेने फोडून काढी ; लायकर्गसने त्याचा वध केला,--धर्मयुद्धाने नव्हे तर एका चिंचोळ्या वाटेवर, जेथे त्याची गदा निरुपयोगी ठरली अशा ठिकाणी त्याला कोंडीत पकडून, कारण लायकर्गसच्या चपळाईपुढे त्याचा टिकाव लागला नाही व त्याने शरीराच्या अगदी मध्यावरच त्या गदाधाऱ्याला भोसकले ; त्या-मुळे तो धरणीवर उताणा पडला. मग जे मार्सने त्याला दिले होते ते त्या वीराचे चिलखत काढून घेऊन लायकर्गसने नंतर ते लढाईत स्वतः वापरले ; पण मग तो जेव्हा म्हातारा होऊन घरी बसला तेव्हा ते चिलखत त्याने आपला एकनिष्ठ शिलेदार एऱ्युथॅलिअन याला दिले आणि तेच चढवून त्याने आमच्यातल्या अग्रगण्य वीराला आव्हान दिले. इतर लोक घाबरले व कचरले व कोणीही धाडस करून पुढे येत नव्हता पण माझ्या अपार हिंमतीने मला त्याच्याशी लढ-ण्यास प्रवृत्त केले. त्यासर्वात मी वयाने लहान होतो ; पण जेव्हा मी त्याच्याशी लढलो तेव्हा मिनर्व्हाने मला विजयाचे वरदान दिले. मी मारलेल्या सर्व वीरात सर्वाधिक मोठाड आणि मजबूत असा पुरुष तो होता व तो भूमीवर अस्ताव्यस्त पडला तेव्हा त्याने अत्यंत विस्तृत जागा व्यापली. तेव्हा होतो तसा तरुण व बलवान मी आता असतो तर किती बरे होते ; कारण मग प्राॲमपुत्राला स्वतःला तोंड देईल असा एकतरी वीर तात्काल उपलब्ध झाला असता. पण तुम्ही,--सबंध सैन्यात

अग्रगण्य असे आहात, तरी तुमच्यातल्या एकालाही हेक्तरशी लढण्याची हिंमत नाही".

याप्रमाणे त्यावृद्धाने त्यांची निर्भत्सना केल्यावर तात्काल नऊ वीर उठून उभे राहिले. सर्वांच्या आधी उठला राजा ॲगॅमेम्नॉन व त्याच्यामागून तायदिअस-पुत्र शूर दायोमिद. नंतरचे दोघे होते, वस्त्राप्रमाणे शौर्याने वेढलेले ॲजॅक्स नावाचे उभय वीर आणि मग आयदोमिनिअस व शस्त्र चालवण्यात त्याचा बंधू शोभणारा मेरिओनिझ ; यांच्यामागून युइमॉनपुत्र युरिपायलस, ॲन्द्रीमॉनपुत्र थोॲस आणि युलिसिस हेही उठले. मग जेरिनीचा उमराव नेस्तॉर पुन्हा बोलला, " कुणाची निवड व्हावी हे ठरवायला आता तुमच्यामध्ये चिठ्या टाका ; जो कोणी निवडला जाईल तो या युद्धातून जिवानिशी पार पडला तर त्याने स्वतःच्या आत्म्याप्रमाणेच ॲकिअनाचीही उत्तम सेवा केली असे होईल".

असे तो म्हणाल्यावर प्रत्येकाने आपल्या चिठ्ठीवर खूण करून ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉनच्या शिरस्त्राणात ती टाकली ; साऱ्या लोकांनी प्रार्थनेसाठी हात उंचावले आणि स्वर्गाच्या घुमटात त्यांच्यातला एकेक दृष्टी स्थिर करीत म्हणायचा, " पित्या जव्ह, अशी योजना कर की, नाव निघेल ते ॲजॅक्सचे---किंवा तायदिअसपुत्राचे---अथवा संपन्न मायसिनीच्या स्वतः राजाचेच निघावे".

याप्रमाणे ते बोलत असता जेरीनीचा वीर नेस्तॉर याने शिरस्त्राण हलविले आणि त्यातून नेमकी त्यांना हवी तीच चिठ्ठी खाली पडली---ॲजॅक्सच्या नांवाची. दूताने ती उचलून डावीकडून उजवीकडे या क्रमाने सर्वत्र, ॲकिअन्सच्या साऱ्या नायकांमध्ये फिरवली ; पण त्यापैकी कोणीही ती आपली खूण असे म्हणाला नाही. तथापि त्या चिठ्ठीवर खूण करून ती शिरस्त्राणात ज्याने टाकली होती, त्याच्यापाशी दूत जेव्हा क्रमाने पोहोचला तेव्हा शूर ॲजॅक्सने हात पुढे केला व दूताने त्याला चिठ्ठी दिली. आपली खूण पाहून ॲजॅक्सने ती ओळखली व त्याला आनंद झाला. चिठ्ठी जमिनीवर टाकून तो म्हणाला, " माझ्या मित्रांनो, चिठ्ठी माझ्या नावाची आहे व मला हर्ष होत आहे ; कारण मी आता हेक्तरला पराभूत करणार आहे. मी माझे चिलखत चढवतो, दरम्यान, तुम्ही आपापसात, त्रोजनांना एकू न जावी म्हणून जव्ह राजाची मुक प्रार्थना करा---किंवा वाटले तर मोठ्यानेही करा, कारण आपण कोणाही माणसाला भीत नाही. माझा पराजय कोणीही करणार नाही, बळाने वा कूटनीतीने ; कारण मी सॅलमिसमध्ये जन्मलो व वाढलो आणि सर्व गोष्टीत आपले वर्चस्व टिकवून ठेवण्याची मला धमक आहे".

यावर त्यांनी सॅटर्नपुत्र जव्हची प्रार्थना करण्यास सुरवात केली ; आणि स्वर्गाच्या घुमटाकडे पाहात त्यांच्यातला एखादा उद्गार काढायचा, “इदाहून राज्य करणाऱ्या महायशस्क सत्ताधीशा तात जव्ह, अँजॅक्सला जयाचे वरदान कर आणि त्याला थोर कीर्ती संपादन करू दे, पण जर तुला हेक्तरचेही भले व्हावेसे वाटत असले व त्यालाही सुरक्षित ठेवायचे असेल तर दोघांनाही समान कीर्ती, समान शौर्य गाजवून तुझ्याकडून प्राप्त होऊ दे.”

अशी त्यांनी प्रार्थना केली व अँजॅक्स चमकत्या ब्राँझच्या आपल्या चिलखतात शस्त्रसज्ज झाला. सर्वप्रकारे सज्ज झाल्यावर, जव्हने एकमेकांशी लढायला लावलेल्या माणसात भाग घेणाऱ्या राक्षसी मार्ससारखी त्याने पुढे झेप घेतली ; अगदी त्याच्यासारखीच उडी घेऊन अॅकिअन्सचा आधारस्तंभ असा तो महाकाय अँजॅक्स एकप्रकारचे कठोर हास्य मुद्रेवर खेळवीत, स्मितमुद्रेने आपला लांब भाला परजीत लांब पावले टाकीत पुढे निघाला ; त्याला पाहताना आरगॉसचे लोक उल्हसित झाले. पण ट्रोजनांचे सारे अंग कापू लागले व हेक्तरचे काळीजसुद्धा जोराने धडधडू लागले. पण आता त्याला माघार घेऊन पाठीमागच्या सैन्याच्या रांगात मिसळून जाणे शक्य नव्हते. कारण मूळ आव्हान देणारा तो स्वत: होता. अँजॅक्स आपली ढाल भिंतीसारखी पुढे धरून सरसावला—त्या ब्राँझच्या ढालीला बैलाच्या चामड्याची सात आवरणे होती ; व हायलीनिवासी सर्वोत्कृष्ट चर्मकार तायकिअस याची ती कारागिरी होती ; पुरत्या पोसलेल्या सात बैलांच्या कातड्याची ती ढाल बनवून तिच्यावर त्याने आठवा थर ब्राँझचा बसवला होता. ही ढाल पुढे धरून तेलॅमॉनपुत्र अँजॅक्स हेक्तरच्या जवळ आला आणि धमकावणीच्या स्वरात त्याला म्हणाला, “हेक्तर, आता तुला समोरासमोर द्वंद्वयुद्ध खेळताना कळेल की सैनिकांच्या श्रेणी फोडून काढणाऱ्या सिंहहृदयी अॅकिलिझशिवाय देखील दॅनाअन्समध्ये कोणत्या प्रकारचे योद्धे आहेत ते ! प्रजापालक अॅगॅमेम्नॉनवर रागावून अॅकिलिझ आता नौकाजवळच राहिला आहे. पण तुला तोंड देण्यास पुढे उभे राहायला पूर्णपणे समर्थ असे आमच्यात पुष्कळजण आहेत, म्हणून म्हणतो लढाई सुरू कर.”

आणि हेक्तरने उत्तर केले, “तेलेमॉनपुत्रा, उच्चकुलीन अँजॅक्स, सेनानायका, मी एकादे युद्धात अनभिज्ञ असे दुर्बळ मूल किंवा बाईमाणूस असल्यासारखे माझ्याशी वागू नकोस. लढाईतील रक्तपाताची व कापाकापीची मला पुष्कळ दिवसांची सवय आहे. माझी चामड्याची ढाल उजवीकडे किंवा डावीकडे वळवण्यात मी चपळ आहे, कारण हीच लढाईतली मुख्य गोष्ट आहे असे मी मानतो. रथांच्या व घोडेस्वारांच्या गर्दीत मी हल्ला करू शकतो, व हात-

घाईच्या लढाईत माझ्या कौशल्याने मी मार्सला प्रमुदित करू शकेन. तथापि तुझ्यासारख्या माणसावर तो बेसावध असताना मी हल्ला करणार नाही. मला करता आला तर उघडपणे मी घाव घालीन."

असे बोलत असताना त्याने आपला भाला समतोल धरून फेकला. तो सातपदरी ढालीच्या आठव्या, सर्वात बाहेरच्या ब्राँझच्या थरावर बसला पण आतल्या सहा थरांना भेदून चामडयाच्या सातव्या पदराला मात्र अडला. मग ॲजॅक्सची पाळी आली, आणि त्याने फेकलेला भाला प्राअॅमपुत्राच्या गोल ढालीवर बसला. तो भयंकर भाला त्याच्या चकाकत्या ढालीतून आरपार जाऊन नेटाने त्याच्या कसबी कलाकुसरीच्या वक्षकवचाला भेदून त्याच्या अंगरख्याच्या कुशीत घुसला, पण त्याने बाजूला झुकून आपला जीव बचावला. मग दोघांनीही आपापल्या ढालीतले भाले उपटून काढले आणि ते एकमेकांवर अक्राळविक्राळ सिंहासारखे किंवा भारी ताकद व चिकाटी असलेल्या वनवराहांसारखे तुटून पडले. प्राअॅमपुत्राने ॲजॅक्सच्या ढालीच्या मध्यावर घाव घातला पण तिच्या ब्राँझचा भेद झाला नाही, व भाल्याचे टोक मात्र बाकले. मग ॲजॅक्सने पुढे उडी घेऊन हेक्तरच्या ढालीचा भेद केला; भाला तिच्यातून पार गेला आणि हल्ला करण्यास उडी घेण्याच्या तयारीत असलेल्या हेक्तरला त्याने हादरवले. भाल्याने त्याच्या मानेला जखम झाली व तिच्यामधून भळाभळा रक्त वाहू लागले. पण तरीही हेक्तर लढण्याचा थांबला नाही, तो थोडा मागे हटला व आपल्या मजबूत हाताने मैदानात पडलेला एक भला मोठा खडबडीत धोंडा उचलून त्याने ॲजॅक्सच्या ढालीच्या मध्यावरील उंचवटयावर प्रहार केला त्यामुळे ब्राँझ पुन्हा खणखणले. मग ॲजॅक्सनेही उलटपक्षी त्याहूनही फार मोठा दगड घेतला, त्याला उंचावर, झोका देत उचलला व अचाट जोर करून तो भिरकावला. जात्याच्या पाळयासारख्या त्या पाषाणाने हेक्तरची ढाल मोडून आतल्या बाजूस बाकली, व त्या धक्क्याने तो स्वतः भूमीवर उताणा पडून स्वतः-च्याच ढालीच्या भाराखाली चिरडला जाऊ लागला, पण ॲपॉलोने तात्काल त्याला उठवले. त्यानंतर त्यांनी जवळजवळ भिडून तलवारीनी एकमेकावर घाव घातले असते पण निरोप पोचवणारे देवांचे व मानवांचे दूत पुढे आले, एक त्रोजनांकडून व दुसरा ॲकिअनांकडून---त्यांची नावे तॅल्थिबिअस आणि इदिअस; दोघेही माननीय पुरुष; यांनी आपापल्या दंडांनी लढणारांना एकमेकांपासून दूर केले आणि भलादूत इदिअस म्हणाला, "माझ्या मुलांनो, आता आणखी लढू नका, तुम्ही दोघेही शूर व दोघेही जव्हला प्रिय आहात हे आम्हाला ठाऊक आहे; पण आता अंधार पडू लागला आहे आणि रात्रीच्या आदेशांविरुद्ध वागून चालत नाही."

तेलॅमॉनपुत्र अॅजॅक्सने उत्तर दिले, " इदिअस, हेक्तरला तसे म्हणायला सांग, कारण आमच्या राजवंशीयांना आव्हान देणारा तो होता. त्याला काय ते प्रथम बोलू द्या, आणि मग मी त्याचे म्हणणे मान्य करीन."

मग हेक्तर म्हणाला, " अॅजॅक्स, स्वर्गस्थ देवांनी तुला मजबूत बांधा व शक्ती तशीच विवेकबुद्धीही दिली आहे आणि भाला चालवण्यात दुसऱ्या सर्व अॅकिअन्स-पेक्षा तू निष्णात आहेस. आजच्या दिवसापुरते आपण लढणे थांबवू या. नंतर आपण पुन्हा लढाई करू ; स्वर्गस्थ शक्ती आपल्यात निवाडा करीपर्यंत, व दोघांपैकी एकाला जय प्रदान करीपर्यंत आपण लढाई चालू ठेवू. आता अंधार पडू लागला आहे व रात्रीच्या आदेशांविरुद्ध वागणे बरे नसते. तेव्हा तू-- नौकांकडच्या तुझ्या अॅकिअन्सची मने आनंदित कर--विशेषतः तुझ्या स्वतःच्या अनुयायांची आणि भाऊबंदांची ; दरम्यान मी प्राअॅम राजाच्या महानगरीत त्रोजन्सना व माझ्यासाठी प्रार्थना करण्याची अहमहमिका लावणाऱ्या त्यांच्या स्त्रियांना दिलासा देतो. शिवाय आपण एकमेकात देणग्यांची देवाणघेवाण करू या. म्हणजे मग अॅकिअन्स व त्रोजन्स यांच्यामध्ये आपापसात बोलले जाईल की, " ते साऱ्या शक्तिसामर्थ्यानिशी लढले पण मग त्यांच्यात मनमिळवणी झाली आणि स्नेहपूर्वक त्यांनी परस्परांचा निरोप घेतला."

असे म्हणून त्याने अॅजॅक्सला चांदीच्या फुल्या बसवलेली तलवार व म्यान ती अडकवण्याच्या चामडी पट्ट्यासकट अर्पण केली ; आणि परतभेट म्हणून अॅजॅक्सने जांभळ्यारंगाने रंगवलेला कमरपट्टा त्याला दिला. याप्रमाणे त्यांनी एकमेकांचा निरोप घेतला ; एक अॅकिअन्सच्या सेनादलाकडे गेला व दुसरा त्रोजन्सच्या, आणि बलाढ्य अॅजॅक्सच्या समर्थहातातून दुखापत न होता आपला वीर सुखरूप आलेला पाहून त्रोजन्सना आनंद झाला. आशा नसताना बचाव-लेला म्हणून ते आनंदाने त्याला नगरीकडे घेऊन गेले. दुसऱ्या बाजूला अॅकि-अन्सनी विजयाने उल्हसित झालेल्या अॅजॅक्सला अॅगॅमेम्नॉनकडे आणले.

अॅत्रिअसपुत्राच्या निवासस्थानी जेव्हा ते पोहोचले तेव्हा त्यांच्यासाठी सॅटर्नपुत्र जव्हच्या सन्मानार्थ अॅगॅमेम्नॉनने पाच वर्षांचा एक बैल बळी दिला. त्यांनी त्याची चामडी सोलून काढली व आतील भाग धुऊन, तयार करून अस्थि-सांध्यांवर त्याचे मोठाले काप केले आणि मग त्यांचे कुशलतेने बारीक तुकडे करून शूलांच्या टोकावर ते पुरेसे भाजून काढले. हे सर्व करून झाल्यावर व मेजवानीची सिद्धता झाल्यावर त्यांनी त्या मांसान्नाचे सेवन केले आणि प्रत्येकाला त्याचा पुरा व समान वाटा मिळाल्याने सगळे संतुष्ट झाले. अॅगॅमेम्नॉन राजाने अॅजॅक्सला बैलाच्या कमरेखालचे उभे कापलेले काही लांबटकाप विशेष

बहुमानार्थी दिले. त्यांचे खाणेपिणे पुरेसे होताच सर्वदा सच्ची सल्लामसलत देणारा वृद्ध नेस्तॉर बोलू लागला ; अत्यंत कळकळीने आणि सदिच्छापूर्वक, त्यांना उद्देशून तो म्हणाला,

"ॲत्रिअसपुत्रा नी अन्य सेनानायकहो, ज्याअर्थी आता ॲकिअन्सपैकी पुष्कळसे मृत्यु पावले आहेत, मार्सने त्यांचे रक्त स्कॅमॅन्दरच्या काठावर सांडले आहे व त्यांचे जीवात्मे खाली हेदिझच्या गृही गेले आहेत, त्याअर्थी जेव्हा सकाळ होईल तेव्हा आपण लढाई थांबवणे उचित होईल. मग आपल्याकडच्या योद्धयांचे मृतदेह गाडयांवर घालून, बैल नी खेचरांकडून ओढून नेऊन, आपल्या नौकांजवळपासच आपण त्यांना अग्नी देऊ ; म्हणजे मग जेव्हा आपल्या नौका हाकारून आपण येथून जाऊ तेव्हा आपल्या सोबत्यांच्या अस्थी घरी त्यांच्या मुलाबाळांकडे पोहोचवता येतील. चितेच्या नजीकच मैदानापेक्षा उंच असा सर्वांसाठी सामाईक असा एक लांबोडका मातीचा ढिगारा आपण समाधीसारखा उभारू. त्याच्याजवळ एक उंच भिंत आपल्या व आपल्या नौकांच्या निवाऱ्यासाठी आपण बांधायला लागू या, आणि त्या भिंतीत उत्तम घडणीचे दरवाजे आपल्या रथांना वाट म्हणून असावे. भिंतीबाहेर जवळच आपण एक खोल खंदक सर्व बाजूंना खणू म्हणजे मग घोडे व पदाती आत येऊ शकणार नाहीत, आणि त्रोजन सेनानायक आपल्यावर निकराचा हल्ला करू शकणार नाहीत."

याप्रमाणे तो बोलला आणि राजवंशीयांनी ओरडून मान्यता व्यक्त केली. दरम्यान प्राॲमच्या प्रासादद्वाराजवळ, बालेकिल्ल्यावर रागावलेल्या व आपापसात तीव्र मतभेद झालेल्या त्रोजनांची सभा भरली ; आणि तीमध्ये सुज्ञ ॲन्तेनॉर बोलला, "ऐकून घ्या माझे बोलणे, त्रोजन्स, दार्दानिअन्स व मित्रपक्षीयहो, म्हणजे जसे माझ्या मनात आहे तसे मला बोलता येईल. आरगॉसवासिनी हेलन व तिची संपत्ती ॲत्रिअसपुत्रांना आपण परत करू या, कारण आपण सध्या आपल्या गंभीर संधिसंहितेचा भंग करून लढत आहोत, आणि मी म्हणतो तसे केल्याशिवाय आपल्याला काही लाभ होणार नाही."

मग तो बसला आणि सुंदरी हेलनचा पती अलेक्झँद्रस बोलायला उभा राहिला. तो म्हणाला, "ॲन्तेनॉर, तुझे बोलणे मला मुळीच आवडले नाही. तू मनात आणशील तर याहून चांगले काहीतरी तुला बोलता येईल. पण जर तू अगदी मनापासूनच हे सारे बोलला असशील तर मग स्वर्गस्थ शक्तींनी खरोखर तुझी सारासार बुद्धी हिरावून घेतली असावी. मी आता स्पष्ट बोलतो व माझ्या या भाषणाने त्रोजन्सपुढे घोषणा करतो आहे की त्या स्त्रीला मी परत करणार

नाही ; पण आरगॉसहून तिच्यावरोबर जी संपत्ती मी आणली ती मात्र परत करीन आणि आणखीही माझ्या धनाची भर तिच्यात घालीन."

यानंतर पॅरिसचे बोलणे संपून तो खाली बसल्यावर दार्दानसवंशाचा आणि मंत्रणेत देवतुल्य असा प्राअॅम उठला व अत्यंत कळकळीने निष्ठापूर्वक व सदिच्छेने त्यांना म्हणाला, "त्रोजन्स, दार्दानिअन्स व मित्रपक्षीयहो, माझे बोलणे ऐकून घ्या म्हणजे मला वाटते ते मला मोकळेपणी बोलता येईल. सबंध नगरीतून आजपर्यंत मागवलीत तशी रात्रीची जेवणे मागवून घ्या पण पहारे कडक ठेवा आणि जागृत रहा. दिवस उजाडताच इदिअसला नौकांकडे जाऊन, अॅत्रिअसपुत्र अॅगॅमेम्नॉन व मेनेलॉस यांना, ज्याच्यामुळे हा कलह घडून आला आहे त्या अॅलेक्झँड्रसचे म्हणणे सांगू द्या ; आणि त्यांच्यापाशी त्याला असाही आग्रह धरू द्या की त्यांनी आमच्या मृतवीरांचे दहन होईपर्यंत लढाई थांबवावी. त्यानंतर आपण पुन्हा लढू व स्वर्गस्थ शक्ती आमच्यात निवाडा करून आमच्यापैकी कोणातरी एका पक्षाला विजय देईपर्यंत लढाई चालू ठेऊ."

असे तो बोलला आणि त्याच्या सांगण्याप्रमाणेच त्यांनी सर्वकाही केले. रात्रीचे जेवण आपापल्या पथकात त्यांनी उरकले आणि दिवस उजाडत असता इदिअस नौकांकडे मार्गक्रमण करू लागला. अॅगॅमेम्नॉनच्या नौकेतील मागच्या भागावर मार्सचे भक्त दॅनाअन्स मंत्रणासभेत असलेले त्याला आढळले आणि त्यांच्यामध्ये जाऊन तो उभा राहिला. तो म्हणाला, "अॅत्रिअसपुत्रा, आणि अॅकिअन सेनेतील राजवंशीयांनो, ज्या अॅलेक्झँड्रसमुळे हा कलह घडून आला, त्याचे म्हणणे तुम्हाला सांगायला प्राअॅमनी इतर उच्च कुलीन त्रोजनांनी मला पाठविले आहे, ते तुम्हाला पटत असल्यास पहा. त्याने आपल्या नौकातून त्रॉयला आणलेली सारी संपत्ती––त्याआधीच जर तो मेला असता तर बरे झाले असते––तो परत करील व स्वतःच्या संपत्तीची भर त्यात घालील, पण मेनेलॉसची लग्नाची बायको, त्रोजन्सच्या म्हणण्याप्रमाणे तो सोडणार नाही. प्राअॅमने मला आणखी असे विचारायला सांगितले आहे की आमच्या मृतवीरांचे आम्ही दहन करीपर्यंत तुम्ही लढाई थांबवाल का ? त्यानंतर आपण लढाई पुन्हा सुरू करू व स्वर्गस्थ शक्ती आपल्यात निवाडा करून आपल्यापैकी एका पक्षाला विजयी करीपर्यंत ती चालू ठेऊ."

ते सगळे मूक राहिले पण लौकरच उच्चरवाने रणगर्जना करणारा दायोमिद म्हणाला, "काहीही घ्यायला नको––संपत्ती नको किंवा हेलनसुद्धा नको, कारण लहान पोराला देखील दिसून येईल की त्रोजन्सचा विनाश अगदी जवळच आला आहे."

दायोमिदने उच्चारलेले शब्द ऐकून ॲकिअन्सपुत्रांनी ओरडून आपली पसंती दर्शवली, आणि त्यावर राजा ॲगॅमेम्नॉन इदिअसला म्हणाला, "इदिअस, ॲकिअनांनी तुला काय उत्तर दिले आहे ते तू आताच ऐकले आहेस, तेच माझेही उत्तर आहे. पण मृतांबद्दल सांगायचे तर त्यांचे दहन करण्याची अनुज्ञा मी तुम्हाला देत आहे, कारण माणसे एकदा मेल्यानंतर त्यांचे अग्निसंस्कार करण्याविषयी कुरकुर होऊ नये. ज्यूनो-पती बलशाली जव्ह या आपल्या गंभीर कराराला साक्ष असो."

असे बोलताना सर्व देवांच्या नजरेपुढे त्याने आपला राजदण्ड उचलून वर धरला आणि इदिअस इलिअमच्या प्रबल नगरीत परत गेला. त्रोजन व दार्दानिअन यांची मंत्रणासभा त्याची वाट पहात होती. तो आला व त्यांच्यामध्ये उभा राहून त्याने आपला संदेश सांगितला. तो ऐकताच ते आपल्या दुहेरी कामगिरीला लागले; काही जण प्रेते गोळा करायला गेले आणि दुसरे काही सर्पण आणायला निघाले. आरगॉसचे लोकही आपल्यापरीने नौकांवरून घाईने निघाले ; काही प्रेते एकत्र जमवण्यास व इतर लाकडे घेऊन येण्यास गेले.

खोल ओशिॲनसच्या संथ, शांत प्रवाहातून स्वर्गाच्या घुमटात सूर्य नुकताच उगवून शेतांवर उन्हाचा मारा सुरू करीत होता, तेव्हा दोन्ही सेनांची गाठ पडली. आपल्या मृतांची पुरती ओळखही त्यांना पटत नव्हती, पण त्यांनी त्यांच्या देहांवरचे साकळलेले रक्त धुऊन काढले, त्यांच्यावर अश्रू ढाळले, आणि त्यांना उचलून गाड्यांवर घातले. त्रोजन्सना मोठ्याने आक्रंदून रडण्यास प्राॲमने प्रतिबंध केला होता म्हणून खेदपूर्वक आणि मुकाट्याने त्यांनी त्यांच्याकडच्या मृतदेहांचा चितेवर ढीग केला आणि त्यांना अग्नी दिल्यावर ते इलिअम नगरीस परतले. त्याचप्रकारे ॲकिअनांनीही खिन्नपणे व मूकपणे त्यांच्या मृतांचे देह चितेवर रचले, आणि त्यांचे दहन झाल्यावर ते आपल्या नौकांकडे परत गेले.

नंतर संधिप्रकाशात, उषेचा पुरा उदय झालेला नसतानाच ॲकिअनांच्या निवडक टोळ्या चितेभोवती जमल्या आणि त्यांनी एक मातीचा लांबट ढिगारा सर्वांची सामायिक समाधी म्हणून उभारला, आणि जवळच त्यांनी स्वतःला व आपल्या नौकांना निवारा म्हणून एक उंच भिंत बांधली ; त्या भिंतीपलीकडे त्यांच्या रथांना आतबाहेर जातायेता यावे म्हणून त्यांनी तिच्यात मजबूत दरवाजे ठेवले, आणि भिंतीबाहेर अगदी नजीक एक खोल व रुंद खंदक खणून त्यांत त्यांनी अणकुचीदार खांब रोवले.

याप्रमाणे ॲकिअन्स राबले आणि विद्युत्स्वामी जव्हच्या बाजूला बसलेल्या देवांनी त्यांचा तो मोठा उद्योग पाहून आश्चर्य केले. पण भूकम्पाधिपती

नेपच्यून म्हणाला, "तात जव्ह, सबंध जगात आता कोणता मर्त्यमानव पुन्हा कधी देवांना आपल्या विश्वासात घेईल ? देवांना महायज्ञ अर्पण न करता, ॲकिअन्सनी आपल्या नौकांभोवती भिंत बांधून तिच्याबाहेर खंदक कसा खणला आहे हे तुला दिसत नाही काय ? या भिंतीची कीर्ती प्रत्यक्ष उषेइतकी पसरेल आणि फीबस ॲपॉलो व मी मिळून लॅओमेदॉनसाठी इतके कष्ट घेऊन बांधलेल्या भिंतीबद्दल माणसाना काही वाटेनासे होईल."

जव्ह रुष्ट झाला आणि त्याने उत्तर दिले, "अरे भूकम्पकारका, तू कशाबद्दल बोलतो आहेस ? तुझ्यापेक्षा कमी शक्तिमान देव त्यांच्या कृतीने कदाचित भयभीत होईल, पण तुझी कीर्ती प्रत्यक्ष उषेसारखी सर्वत्र पोहोचते. खरोखर, ॲकिअन्स आपल्या नौकातून स्वदेशी गेल्यानंतर, त्यांच्या भिंतीचे तुकडे तुकडे करून तुला ती समुद्रात उधळून देता येतील; किंवा किनाऱ्यावर तू पुन्हा वर वाळू रचू शकशील, आणि मग ॲकिअनांची महान भिंत पूर्णपणे लोपून जाईल."

याप्रमाणे त्यांचे संभाषण झाले आणि सूर्यास्तापर्यंत ॲकिअनांचे काम पुरे झाले ; मग त्यांनी आपल्या तंबूपाशी बैल मारले आणि रात्रीचे जेवण केले. हिप्सिपिलीला जेसनपासून झालेल्या युनेउस नामक पुत्राने लेम्नॉसहून धाडलेले मद्य घेऊन पुष्कळ नौका आल्या होत्या. जेसनपुत्राने दहा हजार मापे मद्य त्या नौकांवर चढवून मुद्दाम ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉन व मेनेलॉस यांच्यासाठी पाठवले होते. या साठ्यामधून ॲकिअन्स स्वतःसाठी दारू विकत घेत ; कोणी ब्राँझ, कोणी लोखंड, कोणी चामडी, कोणी सबंध कालवडी तर कोणी बंदीवान मोबदल्यात देऊन ती विकत घेत. त्यांनी मेजवाणीसाठी अनेक उत्तम पदार्थ तयार करून मेजावर मांडले, आणि रात्रभर सर्वांनी खाद्यपेयांवर ताव मारला. तसेच त्रोजनांनी आणि नगरीतल्या त्यांच्या मित्रपक्षीयांनी केले. पण हे सर्व चालले असता सगळा वेळ जव्हने अनिष्ट भाकिते सूचित केली आणि उत्पात-निदर्शक मेघगर्जना केल्या. त्यामुळे आनंदोत्सव करणारे भीतीने फिके पडले ; त्यांच्या पेल्यातून मद्य भूमीवर सांडले व सॅटर्नच्या महाप्रतापी पुत्राला अर्घ्य प्रदान केल्याखेरीज मद्यप्राशन करण्यास ते धजेनात. नंतर त्यांनी विश्रांतीसाठी बिछान्यावर अंगे टाकली आणि निद्रेचे वरदान उपभोगले.



## सर्ग ८

आता जेव्हा केसरी वस्त्र ल्यालेली प्रभात आपला प्रकाश पृथ्वीवर पसरू लागली, तेव्हा दंतुर ऑलिम्पसच्या सर्वोच्च शिखरावर जव्हने सभेसाठी देवाना बोलावले. नंतर तो बोलू लागला व इतर सर्व देवांनी त्याचे बोलणे श्रवण केले. "देवांनो आणि देवींनो, माझे बोलणे नीट ऐका, म्हणजे माझ्या मनात काय आहे ते मला मोकळेपणी सांगता येईल. तुमच्यापैकी कोणीही, देवी असो की देव, माझ्याशी विरोध करण्याचा प्रयत्न करू नये, हे प्रकरण एकदाचे मला मिटवून टाकता यावे म्हणून तुमच्यापैकी प्रत्येकानी माझी आज्ञा पाळावी. जर कोणी या व्यतिरिक्त वेगळी वागणूक गुप्तपणे करून त्रोजन्सना किंवा डॅनाअन्सला मदत करताना मला दिसला तर ऑलिम्पसला पुन्हा परत येण्याच्या आधीच त्याला खरपूस मार बसेल ; किंवा मी त्याला लोखंडी वेशी नी ब्राँझची फरशी असलेल्या पृथ्वीखालच्या सर्वात खोल खड्ड्यात, अंधेऱ्या तार्तारस गर्तेत, जी हेदिझच्या अधोलोकाखाली, पृथ्वीपासून स्वर्ग जितक्या उंचावर आहे तितक्याच दूर खाली आहे, तेथे फेकून देईन म्हणजे तुम्हाला कळेल की तुम्हा सर्वांपेक्षा मी किती अधिक सर्वशक्तिमान आहे ते. वाटले तर माझी परीक्षा पाहून स्वतःच ते जाणून घ्या. स्वर्गाभोवती एक सोनेरी साखळी बांधा, आणि देव, देवी सगळे मिळून ती साखळी धरा व हवी तितकी ओढा ; सर्वश्रेष्ठ मंत्रणाधिपती जव्हला तुम्ही स्वर्गापासून पृथ्वीवर ओढू शकणार नाही ; पण मी स्वतः जर ती साखळी ओढली तर तुम्हालाच काय तुमच्याबरोबर पृथ्वीला व समुद्रालाही वर ओढून घेईन ; मग ऑलिम्पसच्या एकाद्या शिखराभोवती ती साखळी बांधून मी तुम्हा सर्वांना आकाशात मध्येच लटकत राहू देईन. इतका मी इतर सर्व देवांच्या किंवा माणसांच्यापेक्षा श्रेष्ठ आहे."

ते भ्याले आणि सारे गप्प राहिले, कारण त्याच्या बोलण्यात तसाच दरारा होता ; पण शेवटी मिनर्व्हाने उत्तर दिले, "तात, सॅटर्नपुत्रा, राजाधिराज ; तुझ्या सामर्थ्याविरुद्ध एकही शब्द उच्चारणे अशक्य आहे, हे आम्हा सर्वांना ठाऊक आहे, पण त्या पटापट मरून पडत असलेल्या व जीवनाची दुःखद अखेर होत असलेल्या डॅनाअन लढवय्यांसाठीही आम्हाला हळहळ वाटते, तथापि तुझी आज्ञा म्हणून आम्ही प्रत्यक्ष युद्ध करणार नाही, पण तुझ्या रोषामुळे ते सगळेच मृत्युमुखी पडू नयेत म्हणून आरगॉसवासीयांना आम्ही उपयुक्त सूचना करू."

जव्हने तिच्याकडे पाहून स्मित केले व उत्तर दिले, "माझ्या बाळे, त्रितो-जाते, घाबरु नको, मी काही खरोखरच मनापासून बोललो नाही व तुमच्याशी दयार्द्रतेने वागावे अशीच माझी इच्छा आहे."

हे बोलणे झाल्यावर त्याने ब्राँझचे खूर व चमकत्या सोन्याची आयाळ असलेल्या आपल्या वेगवान घोड्यांवर धुरा चढवली. स्वतःचा देहही त्याने सुवर्ण कवचाने वेढला आणि आपला सोन्याचा चाबुक हाती धरून तो रथातल्या स्वस्थानी बसला. मग त्याने घोड्यांना फटकारले व त्यांनीही हुरुपाने पृथ्वी आणि तारकांकित आकाशामधून वेगाने पुढे उड्डाण केले. थोड्यावेळाने तो वन्य-पशूंची जन्मदात्री व अनेक झऱ्यांनी संपन्न अशा इदाला आणि वृक्षराई व सुगंधित वेली असलेल्या गॅरगॅरसला पोहोचला. तेथे देवांच्या व मानवांच्या पित्याने घोडे थांबवले, रथापासून सोडले व एका दाट ढगात लपवले ; मग अत्यंत तेजस्वी असा तो सर्वोच्च शिखरावर बसला व खाली त्रॉयनगरीकडे व अॅकिअन्सच्या नौकांकडे पाहू लागला.

अॅकिअन्सनी आपल्या नौकांपाशी घाईत सकाळची न्याहरी केली आणि नंतर आपली चिलखते चढवली. दुसऱ्या बाजूस त्रोजन्सही साऱ्या नगरीभर शस्त्र-सज्ज झाले ; ते संख्येने कमी होते पण आपल्या बायकामुलांसाठी युद्ध करण्यास तत्पर राहणे त्यांना भागच होते. सर्व वेशी सताड उघडण्यात आल्या आणि घोडे व पायदळ महान जनसमुदायासारखा पदाघात करीत बाहेर पडले.

जेव्हा दोन्ही सैन्ये एकत्र येऊन एकमेकांशी भिडली तेव्हा लोखंडी कड्यांची कवचे चढवलेल्या पुरुषांमधील संघर्षात ढालीवर ढाल व भाल्यावर भाला धडकू लागला. मध्यभागी उंचवटे असलेल्या ढाली एकमेकींवर जोराने आपटत असता मरणोन्मुखांच्या आरोळ्या व मारणाऱ्यांचे विजयघोष यांचा प्रचंड कोलाहल उठून भूमीवर रक्ताचे पाट वाहू लागले.

जोपर्यंत दिवस वर चढत होता व अजूनही सकाळचीच वेळ होती तोपर्यंत त्यांची शस्त्रे एकमेकांवर आपटत होती आणि लोक मरून पडत होते, पण सूर्य जेव्हा आकाशमध्याला पोहोचला तेव्हा त्या सर्वांच्या पित्याने आपला सुवर्णाचा तराजू समतोल धरला व दोन्ही पारड्यात दोन मृत्युप्राक्तने ठेवली, एक त्रोजन्स-साठी व दुसरे अॅकिअन्ससाठी. त्याने मध्यभागी धरून तराजू उचलला तेव्हा अॅकिअनांच्या त्या दिवसाच्या भवितव्याचे पारडे खाली बसले. मृत्यूसंख्या-सूचक अॅकिअनांचे पारडे पार खाली भूमीला टेकले, आणि त्रोजन्सचे पारडे उंच आकाशाकडे चढले. मग त्याने इदाहून मोठ्याने मेघगर्जना केली व

आपल्या विद्युल्लतेचा तीव्र प्रकाशझोत ॲकिअनांवर टाकला. तो पाहून ते भीतीने फिके पडले आणि त्यांना अतिशय धास्ती वाटू लागली.

आता आयदोमिनिअस युद्धस्थळी राहण्यास धजेना व ॲगॅमेम्नॉन, तसेच दोघे ॲजॅक्स, मार्सचे भक्त, हेही टिकाव धरू शकले नाहीत. एकटा जेरीनचा उच्चकुलीन वीर नेस्तॉर, ॲकिअन्सचा आधारस्तंभ, जागच्याजागी दृढ राहिला—— स्वेच्छेने नव्हे तर त्याचा एक घोडा निकामी झाला होता म्हणून. सुंदरी हेलनच्या पतीने, ॲलेक्झँड्रसने त्या घोड्याच्या माथ्यावर आयाळ सुरू होण्याच्या नेमक्या जागी, वर्मी एक बाण मारला होता ; तो मेंदूत शिरल्याने घोड्याने वेदनेमुळे उडी मारली, आणि त्याच्या धडपडीने दुसऱ्या घोड्यांचा गोंधळ उडाला. तो वृद्ध लगेच घोड्याच्या लगामपट्ट्या तलवारीने कापू लागला, पण त्या गर्दीत स्वतः हेक्तर सारथ्य करीत असलेल्या रथाचे घोडे त्याच्यावर धावून आले आणि त्या वृद्धाचा तेव्हाच, तेथेच अन्त झाला असता, पण दायोमिदच्या ते चटकन लक्षात आले व त्याने उच्च स्वरात हाक मारली.

तो ओरडला, "युलिसिस, लेर्आतिझच्या थोर पुत्रा, भेकडासारखी पाठ फिरवून कोठे पळून जातो आहेस ? सांभाळ नाही तर तुझ्या खांद्यांच्यामध्ये भाला बसेल ! येथेच थांब व त्या माणसाच्या भयानक आक्रमणापासून नेस्तॉरचा बचाव करण्यास मला साह्य कर."

पण युलिसिसने त्या बोलण्याकडे लक्षच दिले नाही आणि ॲकिअन्सच्या नौकांकडे तो वेगाने पळत राहिला ; आणि तायदिअसपुत्र लढाईच्या ऐन गर्दीत एकटा घुसला व नेलिअसपुत्राच्या घोड्यांसमोर उभा राहिला. तो (नेस्तॉरला) म्हणाला, "महाराज, या तरुण योद्ध्यांनी तुम्हाला रेटीत आणले आहे. तुमची शक्ती संपली आहे. वयाच्या भाराने तुम्ही लवले आहात ; तुमच्या शिलेदारात विशेष अर्थ दिसत नाही आणि तुमच्या घोड्यांची हालचाल मंद झाली आहे. माझ्या रथावर चढा व पहा ट्रॉसचे घोडे काय करू शकतात ते ; पुढे धाव घेताना किंवा पाठलाग करताना, मैदानावरून इकडेतिकडे किती कुशलतेने ते धावू शकतात ते पहा. वीर इनिआसकडून मी ते घेतले. तुमच्या स्वतःच्या घोड्यांची व्यवस्था आपल्या शिलेदारांना करू द्या, पण मला माझे घोडे थेट ट्रोजन्सकडे हाकू द्या म्हणजे हेक्तरला कळेल मीही किती त्वेषाने माझा भाला चालवू शकतो ते."

जेरिनीचा उच्चकुलीन वीर नेस्तॉर याने त्याचे म्हणणे ऐकले. मग स्थेनेलस व दयाळू मनाचा युरिमेदॉन या खंबीर शिलेदारांनी नेस्तॉरच्या घोड्यांची व्यवस्था केली आणि ते (दोघे वीर) दायोमिदच्या रथावर चढले. नेस्तॉरने

लगामाच्या वाद्या हातात घेऊन घोडयांना फटकारे मारून पिटाळले आणि लौकरच ते हेक्तरच्याजवळ आले ; तो समोरून त्यांच्याकडे वेगाने दौडत येत असताना त्याच्यावर नेम धरून तायदिअसपुत्राने भाला फेकला. घाव त्याच्यावर बसला नाही पण त्याचा सारथी व शिलेदार उच्चकुलीन थेबिअस याचा पुत्र इनिओपियस याला तो भाला स्तनाग्रापाशी छातीवर बसला ; त्यामुळे हाती लगाम असतानाच तो तेथल्या तेथे मरण पावला आणि तो रथातून अस्ताव्यस्त असा खाली पडत असताना धावणारे घोडे बाजूला वळले. सारथी गमावल्याने हेक्तरला अतिशय दुःख झाले, पण तशा दुःखातही त्याला तसेच पडू देऊन, तो दुसऱ्या सारथ्याच्या शोधार्थ निघाला ; आणि त्याच्या घोडयांनाही फार वेळ विनासारथी रहावे लागले नाही, कारण लौकरच त्याला इफितसपुत्र शूर आर्केतोलेमस भेटला व त्याला घोडयांच्यामागे रथावर चढून बसायला लावून त्याने लगाम त्याच्या हातात दिले.

त्यावेळी सर्वनाशच ओढवला असता व काही इलाजही चालसा नसता व सारे त्रोजन इलिअममध्ये मेंढयांसारखे कोंडवाडयात कोंडले गेले असते पण देवमानवांच्या पित्याने चटकन् वेळ ओळखून एक जळजळीत पेटता भडकता विद्युत्पात क्षेपित केला ; तो जळत्या गंधकाचा लोळ दायोमिदच्या घोडयांच्या अगदी पुढेच पडला. घोडे भेदरले व मागे रथाखाली हटू लागले आणि लगाम नेस्तॉरच्या हातातून खाली पडले. तेव्हा त्याला भीती वाटली व तो दायोमिदला म्हणाला, "तायदिअसपुत्रा, माघार घेण्यासाठी घोडे वळव ; जव्हचा हात तुझ्याविरुद्ध उगारला गेला आहे हे तुला दिसत नाही काय ? आज तो हेक्तरला विजयश्री प्रदान करीत आहे उद्या जर तशी त्याची मर्जी लागली तर तो आपल्याला पुन्हा विजय बहाल करील. कितीही शूर असला तरी कोणाही माणसाला जव्हच्या हेतूस मोडता घालता येणार नाही, कारण कोणाही मानवापेक्षा तो (देवराज) पुष्कळच अधिक प्रबल आहे."

दायोमिदने उत्तर केले, "तू म्हणालास ते सारे खरे आहे, पण माझ्या थेट काळजाला भिडणारी एक व्यथा आहे ; कारण त्रोजन्समध्ये हेक्तर बढाई मारील व म्हणेल "तायदिअसपुत्र माझ्यापुढून पळून जाऊन नौकांच्या आश्रयाला गेला." व मग पृथ्वी मला गिळून टाकील तर बरे असे मला होईल.

नेस्तॉरने प्रत्युत्तर दिले, "तायदिअसपुत्रा, तुझ्या बोलण्याचा अर्थ काय ? जरी तू भेकड आहेस असे हेक्तर म्हणाला तरी त्रोजन्स व दार्दानिअन्स त्याच्यावर विश्वास ठेवणार नाहीत, आणि तू भुईसपाट केलेल्या बलशाली योद्धयांच्या बायका तर त्याहूनही त्यावर विश्वास ठेवणार नाहीत."

असे म्हणून त्याने घोडे लढाईच्या धुमश्चक्रीतून मागे फिरवले आणि वातावरण फाटेल असा उच्चरव करून त्रोजन्सनी व हेक्तरने त्यांच्या पाठोपाठ बाणांचा वर्षाव केला. त्याला उद्देशून हेक्तर ओरडला, " तायदिअसपुत्रा, दॅनाअनांनी आता आजपावेतो तुला खूप मानाने वागवले. भोजनाच्या मेजाशी तुला मानाची जागा मिळे ; त्यांनी तुला दिलेल्या भोजनात व तुझा पेला मद्याने काठोकाठ भरण्यात त्यांचा तुझ्याबद्दलचा आदर दिसून येई ; पण यापुढे ते तुझा तिरस्कार करतील, कारण आता युद्धात एकाद्या बाईमाणसापेक्षा तुझा काही जास्त उपयोग होईल असे दिसत नाही. एकाद्या पोरीसारखा दुबळा असलेल्या भ्याडा, चल, निघून जा. माझ्याकडून कुचराई झाल्यामुळे तुला आमच्या तटांवरून चढून आत येता आले---असे आता होणे नाही. शिवाय आमच्या बायकाही जिंकून तुमच्या नौकांकडे नेण्याची तुला आता आशा नको, कारण मी माझ्या हाताने तुझा जीव घेईन."

घोडे परत वळवून याच्याशी पुन्हा लढावे की नाही याबाबत तायदिअसपुत्राची मनोवृत्ती द्विधा झाली. त्याला तीनदा संदेह उत्पन्न झाला आणि जव्हने इदाहून तीनदा मेघगर्जना करून त्रोजन्सना अनुकूल निर्देश दिला की तो लढाईत त्यांच्या बाजूची सरशी घडवून आणील. मग त्यांना उद्देशून हेक्तर ओरडला, " त्रोजन्स, लिसिअन्स नी दार्दानिअन्स, हातघाईच्या लढाईचे प्रेमी हो, पौरुष प्रकट करा मित्रांनो, आणि साऱ्या ताकदीनिशी निकराने लढा ; मला दिसत आहे की जव्हची इच्छा मला विजयश्री प्रदान करण्याची व महान कीर्ती मिळवून देण्याची आहे आणि दॅनाअनांचा तो विनाश करणार आहे. त्यांना ही कम-कुवत व निरूपयोगी भिंत बांधण्याची बुद्धी झाली हा त्यांचा केवढा मूर्खपणा ! माझ्या तिरिमिरीच्या हल्ल्यापुढे ती टिकणार नाही ; माझे घोडे खंदकापार अलगद उड्या घेतील आणि मी त्यांच्या नौकांपाशी पोहोचलो की त्या जाळायला मला अग्नी आणून देण्यास विसरू नका. नौका जळत असता त्या धुराने सुन्न झालेल्या व गोंधळलेल्या आरगॉस सेनेची मी कत्तल करीन."

मग तो आपल्या घोड्यांना मोठ्याने म्हणाला, " झँथस व पोदॅर्गस, आणि तू ईथॉन व देखण्या लॅम्पस, आता मला तुम्हाला पोसल्याचे मोल द्या, तसेच थोर एइशनची कन्या अँन्द्रोमॅकी, हिने तुम्हाला खायला घातलेल्या मधासारख्या गोड अशा चंदीचे व तुमची तहान भागवण्यासाठी तुम्हाला मद्यमिश्रित पाणी पाज-ल्याचे चीज करा ; अरे, स्वतःच्या पतीसाठी मद्य तयार करण्यापूर्वी ती तुमचे सिद्ध करी. आता त्वरेने पाठलाग करा म्हणजे कडी-मुठीसह संपूर्ण सोन्याची व जिची ख्याती स्वर्गापर्यंत पोचली आहे अशी नेस्तॉरची ढाल आपल्याला

त्याच्याकडून काढून घेता येईल. तसेच व्हल्कनने दायोमिदसाठी केलेले वक्षकवचही त्याच्या खांद्यावरून ओरबडून घेता येईल. एवढ्या दोन वस्तू आपल्याला जर जिंकून घेता आल्या तर अॅकिअन्स आजच्या रात्रीच नौका हाकारून स्वदेशाकडे निघतील."

अशी त्याने फुशारकी मारली, पण संतापाने सिंहासनावर थरारणाऱ्या राणी ज्यूनोने उंच ऑलिम्पस कापायला लावला. मग ती बलशाली नेपच्यून देवाला म्हणाली, " आता काय होणार, सर्वत्र भूकंपावर स्वामित्व गाजवणाऱ्या नेपच्यून देवा ? हेलिसेला व इजीसला तुला अनेक स्वागतार्ह नैवेद्य समर्पण करणाऱ्या व आता मरू घातलेल्या दॅनाअनासाठी तुझ्या हृदयात अनुकंपेचा प्रादुर्भाव मुळीसुद्धा होत नाही का ? तर मग त्यांचे भले चिंत ; दॅनाअन्सच्या पक्षाच्या आपण सर्व देवांनी जर त्रोजन्सना मागे हाकलले आणि जव्हला त्यांना मदत करू दिली नाही, तर त्याला चडफडत इदाला एकटे बसावे लागेल."

राजा नेपच्यून फार अस्वस्थ झाला व म्हणाला, "अविचारी जिव्हेच्या ज्यूनो, तू काय म्हणते आहेस ? आपण अन्य देवांनी जव्हच्याविरुद्ध बाजूस उभे राहता कामा नये कारण आपण आहोत त्यापेक्षा तो फार प्रबळ आहे."

याप्रमाणे त्यांचे संभाषण झाले, पण मध्यंतरी खंदकाने वेढलेली सगळी जागा, नौकांपासून अगदी भिंतीपर्यंत घोड्यांनी व लढवय्यांनी भरून गेली होती, कारण प्राअॅमपुत्र हेक्तरने जव्हच्या मदतीचा हात त्याच्या बाजूस असल्यामुळे त्यांना तेथे कोंडले होते. त्याने नौकांना आग लावून त्या जाळल्यादेखील असत्या, पण राणी ज्यूनोने अॅगॅमेम्नॉनच्या मनात अंग झाडून उठण्याची व अॅकिअन्सना प्रोत्साहन देण्याची प्रेरणा उत्पन्न केली. त्या कार्यार्थ तो एक जांभळे महावस्त्र पांघरून नौका व तंबू यांच्यामधून सर्वत्र फिरला व नंतर सर्वांत मधल्या युलिसिसच्या प्रचण्ड काळ्या नौकेजवळ उभा राहिला ; या जागेवरूनच त्याचा आवाज अगदी दूरपर्यंत पोहोचू शकत होता––एका बाजूस तेलेमॉनपुत्र अॅजॅक्सच्या तंबूपर्यंत व दुसऱ्याबाजूस अॅकिलिझच्या तंबूपर्यंत–– कारण या दोघांनी स्वतःच्या बळावर पूर्ण विश्वास असल्यामुळे, धीटपणे आपापल्या नौका ओळीच्या दोन टोकांना लावल्या होत्या. तेव्हा लांबवर पोहोचणाऱ्या आवाजात त्या स्थानावरून अॅगॅमेम्नॉन दॅनॅअन्सना उद्देशून ओरडला, " आरगॉसच्या सैनिकांनो, धिःकार असो तुम्हा भेकड प्राण्यांना ! तुम्ही दिसायला नुसते शूर ; लेम्नॉसमध्ये शृंगधारी गुरांचे मांस खाऊन व मद्यमिश्रणपात्रे कांठोकाठ भरून आम्ही विजयी ठरू म्हणून ज्या घमेंडखोर वल्गना आम्ही केल्या त्या आता कोठे गेल्या ? तुम्ही शपथा घेतल्या होतात की तुमच्यापैकी प्रत्येक

जण शंभर किंवा दोनशे लोकांविरुद्ध उभा ठाकेल, व आता एकट्यापुढे देखील तुम्ही टिकू शकत नाही, कारण हेक्तरला आता आपल्या नौका पेटवून देण्यास फार वेळ लागणार नाही. तात ज्व्ह, एका थोर राजाचा तू कधी असा नाश करून त्याची थोरवी अशी सर्वस्वी नष्ट केली होतीस का? आणि तरीही मी इकडे येत होतो तेव्हा हे दुःख पुढे वाढून ठेवले होते याची काय कल्पना! माझ्या नौका तुझ्या वेदीपुढून जेव्हा जेव्हा जात तेव्हा कालवडींच्या मांड्यांची हाडे व चरबी यांच्या आहुती प्रत्येक वेदीवर दिल्यावाचून मी कधी राहिलो नाही——इतका आतूर होतो मी त्रॉयनगरी जिंकून लुटायला. मग आता माझ्या प्रार्थनेचे एवढे तरी फलित होऊ दे की निदान जिवानिशी तरी आम्हाला निसटून जाऊ दे आणि त्रोजन्सकडून इतक्या संपूर्णपणे अॅकिअनांचा पराभव होऊ देऊ नको."

अशी त्याने प्रार्थना केली, आणि त्याच्या आसवांची दया येऊन पिता ज्व्हने कृपा करून योजना केली की त्याच्या लोकांनी जगावे, मरू नये; तात्काल त्याने सर्वात अचूकपणे भविष्य सुचवणारा असा पक्षी, एक गरुड त्यांच्याकडे पाठवला; त्याच्या पंज्यांच्या नख्यात एक कोवळे हरिणशावक होते, ते, अॅकिअन्स ज्या वेदीवर शकुनस्वामी ज्व्हप्रीत्यर्थ यज्ञबली अर्पण करीत, तिच्याजवळ गरुडाने टाकले; म्हणून जेव्हा लोकांनी पाहिले की हा पक्षी ज्व्हकडून त्यांच्याकडे आला आहे तेव्हा ते अधिक त्वेषाने त्रोजन्सवर तुटून पडले आणि जास्त धैर्याने लढले.

त्यावेळी तायदिअसपुत्राच्या आधी खंदकापार घोडे हाकून आपण लढाईवर गेलो, अशी बढाई इतक्या साऱ्या दॅनाअन्सपैकी कोणालाही मारता आली नसती, कारण तसे कोणी बाहेर पडण्याच्या कितीतरी आधीच त्याने त्रोजन्सचा एक सशस्त्र योद्धा, फ्रॅदमॉनपुत्र अॅगेलॉस, याला ठार मारले. पळून जाण्यासाठी त्याने घोडे परत फिरवले होते पण भाला त्याच्या दोन खांद्याच्या मध्यभागी लागून छातीतून आरपार गेला व चिलखत अंगाभोवती खडखडत असता तो रथावरून पुढे भूमीवर पडला.

त्याच्या पाठोपाठ आले अॅत्रिअसपुत्र अॅगॅमेम्नॉन व मेनेलॉस, वस्त्रासारखे शौर्य परिधान केलेले उभय अॅजॅक्स, आयदोमिनिअस आणि त्याला युद्धात साथ देणारा मार्सतुल्य हिंसक मेरिओनिझ व युईमॉनचा शूर पुत्र युरिपायलस; नववा होता त्याच्या धनुष्यासह त्यूसर आणि त्याने तेलॅमॉनपुत्र अॅजॅक्स याच्या ढालीच्या आश्रयाखाली आपली जागा घेतली. अॅजॅक्सने ढाल उचलली की तो पर आजूबाजूला बघे आणि शत्रूच्या गर्दीतल्या एकाद्याला बाण मारून खाली

पाडी. तो मरून पडला की मग आईकडे मूल धावल्यासारखा त्यूसर अॅजॅक्स-कडे जाऊन पुन्हा त्याच्या ढालीखाली डोके खाली घालून शिरे.

शूर त्यूसरने त्रोजन्सपैकी सर्वांच्या आधी कोणाला मारले ? ऑर्सिलॉकस व मग आर्मेनस, ऑफेलेस्तिझ, दीतॉर, क्रोमिअस आणि देवांसमान भासणारा लायकोफॉन्तिझ, पॉलिमॉनसचा पुत्र अॅमोपेऑन आणि मेलेनिपस. या सर्वांना क्रमाने त्याने भूमीवर आडवे केले, आणि तो आपल्या प्रतापी धनुष्याने त्रोजन्स-मध्ये असा हाहाःकार उडवीत असल्याचे पाहून अॅगॅमेम्नॉनला संतोष झाला ; तो त्याच्यापाशी जाऊन म्हणाला, "त्यूसर, माझ्या मनपसंत तेलेमॉनपुत्रा, सेने-तल्या प्रमुख नायका, शरसंधान चालू ठेव, आणि दॅनॅअन्सचा तारणहार हो ; त्याचप्रमाणे, तू अनौरस असूनही ज्या पित्याने स्वतःच्या घरात बाळपणी तुला वाढवून तुझे संगोपन केले त्या तेलेमॉनला भूषणभूत हो. तो दूर असला तरी त्याला कीर्तीने मंडित कर. मी वचन देतो व मी जे बोलतो त्याप्रमाणे मी नक्की करीन. ढाल धारण करणारा जव्ह व मिनर्व्हा यांनी इलिअमच्या नगरीची लूट करू देण्याचा वर जर मला दिला तर माझ्या खालोखाल बहुमानाचे पारितोषक तुला मिळेल--एकादी पवित्र तिवई, रथासह घोड्यांची जोडी किंवा तुला शय्यासोबत करील अशी स्त्री."

आणि त्यूसरने उत्तर दिले, "थोर अॅत्रिअसपुत्रा, तू मला उत्तेजन देण्याची गरजच नाही. ज्याक्षणी आपण त्यांना इलिअममध्ये परत रेटण्यास सुरवात केली त्या क्षणापासूनच बाण मारून ठार करण्यासाठी लोक हेरून काढण्यात मी, मला शक्यतो, खंड पडू दिला नाही. मी आठ काटेरी बाण मारले आहेत व ते सगळे लढाऊ जवानांच्या मांसात जाऊन खोल रुतले आहेत. पण या पिसाट कुत्र्याला मात्र अजून माझा नेम लागत नाही."

असे बोलत असता त्याने आणखी एक बाण थेट हेक्तरवर मारला, कारण त्याला टिपायचा याचा निर्धारच होता, तरीही नेम चुकला व बाण लागला प्राअॅमच्या गॉर्गिथिऑन या शूर पुत्राच्या छातीत. त्याच्या देवीसारख्या सुंदर कॅस्तिआनैरा या मातेचे प्राअॅमशी ईसिमिला लग्न झाले होते, आणि आता वसंतऋतूतल्या सरींच्या माऱ्याने खाली वाकलेल्या पूर्ण विकसित उद्यानपुष्प पॉपीसारखे, शिरस्त्राणाच्या भाराखाली त्याचे मस्तक वाकले.

त्यूसरने पुन्हा हेक्तरवर नेम धरला, कारण त्याला बाणाने जखमी करण्याची त्याला तीव्र इच्छा होती, आणि पुन्हा त्याचा नेम चुकला, कारण अॅपॉलोने त्याचा बाण बाजूला वळवला, पण लढाईच्या गर्दीत महावेगाने रथ घालणाऱ्या हेक्तरच्या शूर सारथ्याच्या, आर्केतॉलेमसच्या छातीवर स्तनाग्रापाशी तो बाण लागला

व तो रथावरून उलटा होऊन पडत असताच घोडे बाजूला झुकले आणि तो निष्प्राण झाला. सारथ्याला मुकल्याने हेक्तर फार दुःखी झाला, पण इतके दुःख होऊनही, सारथ्याला होता तेथेच पडू देऊन त्याने जवळच असलेल्या सेब्रिऑनिझ नामक आपल्या भावाला लगाम हाती घ्यायला सांगितले, आणि भावाने त्याप्रमाणे केले. त्यावर मोठी गर्जना करून हेक्तरने रथावरून खाली उडी घेतली, आणि एक मोठा धोंडा उचलून त्यूसरचा प्राण घेण्यासाठी त्याच्याकडे थेट धाव घेतली. त्यूसरने नुकताच एक बाण भात्यातून काढून तो धनुष्याच्या दोरीवर लावला होता. पण नेम धरून तो दोरी खांद्यापर्यंत मागे ओढीत असतानाच हेक्तरने तो खडबडीत दगड त्याच्यावर फेकला; तो नेमका छाती व मान यांच्या सांध्यावर गळ्याच्या हाडावर वर्मी बसला आणि त्याने त्यूसरच्या बाहूचा स्नायु तुटून त्याचे मनगट लटके पडले, आणि त्याचे धनुष्य हातातून गळून पडले व तो गुडघ्यांवर पुढे पडला. आपला भाऊ खाली पडल्याचे अॅजॅक्सने पाहिले व धावत येऊन तो त्याच्या दोन्ही बाजूस पाय रोवून उभा राहिला, आणि त्याने आपल्या ढालीचा निवारा त्याला दिला. दरम्यान एकिअसपुत्र मेसिस्तिअस व अॅलॅस्तॉर हे त्याचे दोन विश्वासू शिलेदार तेथे आले व अत्यंत वेदनेने विव्हळणाऱ्या त्यूसरला उचलून घेऊन नौकांकडे गेले.

जव्हने आता पुन्हा त्रोजनांमध्ये धैर्याचा प्रादुर्भाव केला, आणि त्यांनी शौर्याच्या तेजाने झळकणाऱ्या हेक्तरच्या नेतृत्वाखाली अॅकिअन्सना त्यांच्या खोल खंदकापर्यंत मागे रेटले. ज्याप्रमाणे एकादा शिकारी कुत्रा पाठलाग करताना वनवराहाच्या किंवा सिंहाच्या कुशीत किंवा पुठ्ठ्यात दात रोवून सावधपणे त्या जनावराच्या उलटण्यावर नजर ठेवतो त्याप्रमाणेच अॅकिअन्सच्या अगदी पाठीवर राहून ते अत्यंत घाबरून पुढेपुढे पळत सुटले असता त्यांच्यातले सर्वात मागे राहिलेले हेक्तरने एकसारखे मारले. जेव्हा ते अॅकिअन खंदकातून व त्यात बसवलेल्या अणकुचीदार खांबामधून पार झाले आणि त्यांच्यापैकी पुष्कळ अॅकिअन्स त्रोजन्सच्या हातून वाटेतच लोळवले गेले—तेव्हा ते नौकांपाशी थांबले आणि लगेच एकमेकांना हाका मारीत प्रत्येक जण हात उचलून तात्काल देवाची प्रार्थना करू लागला. पण हेक्तर आपले घोडे कधी इकडे तर कधी तिकडे असे सारखे वाटोळे फिरवीत होता, आणि त्यावेळी त्याचे डोळे गॉर्गोसारखे किंवा हिंसक मार्ससारखे क्रूरदृष्टीने न्याहाळीत होते.

त्यांना पाहून ज्यूनोला त्यांची दया आली व ती तात्काल मिनर्व्हाला म्हणाली, "अरेरे, ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्ये, मरणाऱ्या दॅनाअन्सबद्दलचा विचार तू व मी आता तरी करायचाच नाही का? तसा तो करण्याची ही

अखेरचीच वेळ ठरणार आहे ! ते बघ कसे मरताहेत व एकाच माणसाच्या हल्ल्यापुढे त्याची कशी दुर्दैवी अखेर होत आहे ! प्राअॅमपुत्र हेक्तर दुःसह क्रोधाने कहर उडवीत आहे आणि आतापावेतो त्याने पुष्कळच नाश केला आहे."

मिनर्व्हा उत्तरली, "खरोखर जर हा प्राणी आपल्याच देशात मेला व तोही अॅकिअनांच्या हातून, तर बरे होईल. पण माझ्या पित्याचे पित्त खवळले आहे व तो पिसाटासारखा वागत आहे. माझे सारे बेत तो नेहमीच हाणून पाडतो. नेहमीचाच त्याचा हा हट्टी व अन्यायी स्वभाव ! युरिस्थिअसने लादलेली कष्टाची कामे करताना थकून गेलेल्या याच्या पुत्राला मी किती वेळा वाचवले आहे हे तो विसरतो. स्वर्गात ऐकू जाईपर्यंत तो मुलगा रडायचा, व मग त्याला मदत करायला जव्ह मला खाली पाठवायचा. पुढचे हे सगळे भाकित आधी ताडण्याचे शहाणपण जर मला असते तर एरेबसहून पाताळ-श्वान आणायला युरिस्थिअसने त्या मुलाला जेव्हा हेदिझच्या घरी पाठवले तेव्हा स्तिक्स नदीच्या खोल पाण्यामधून त्या मुलाला मी कधी जिवंत परतू दिले नसते. आणि आता जव्ह माझ्याबद्दल आकस बाळगतो, व अॅकिलिझचा बहुमान कर म्हणून थेतिस भीक मागत होती तेव्हा तिने त्याच्या गुडघ्यांचे चुंबन घेतले व त्याची दाढी कुरवाळली म्हणून तो तिच्या मनासारखे होऊ देतो. आता पुन्हा मला तो 'करड्या डोळ्यांचे लाडके' म्हणायला लागला म्हणजे काय करायचे ते मला नीट समजेल. ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या घरात जाऊन मी माझे चिलखत चढवीपर्यंत आपले घोडे तयार होऊ देत. मग आपण याचा छडा लावू की युद्धाच्या राजमार्गावर आमच्याशी युद्धात भिडण्यात प्राअॅमपुत्र हेक्तरला आनंद होतो, की अॅकिअन्सच्या नौकांजवळ मरून पडलेल्या त्रोजन्सच्या मांस-चरबीवर कुत्री-गिधाडे आकंठ ताव मारतात."

ती असे बोलली आणि तिचे बोलणे सॅटर्नकन्या शुभ्र बाहू ज्यूनोने मानले; आणि ती आपल्या सुवर्णालंकृत घोड्यावर सरंजाम चढवीत असता ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्येने आपल्या स्वतःच्या हाताने बनवलेले भारी भरतकाम केलेले वस्त्र पित्याच्या उंबरठ्यावर फेकले व जव्हचा अंगरखा अंगात घालून ती लढाईसाठी शस्त्रसज्ज झाली. मग ती आपल्या उज्ज्वल झळकणाऱ्या रथात चढली व तिचा रोष ओढवून घेतलेल्या वीरांच्या श्रेणींचे दमन करणारा दणकट, मजबूत व जाड भाला तिने हाती धरला. ज्यूनोने घोड्यांना फटकारले आणि स्वर्गाचे दरवाजे आपोआप उघडत असता उच्च रवाने करकरले; त्या दरवाजांवर कालघटिका-देवांचे नियंत्रण असते, त्यांच्या हाती स्वर्ग व ऑलिम्पस असून त्यांना लपवणारा दाट ढग दूर करायचा की तसाच

ठेवायचा हे ते ठरवतात. त्या दरवाज्यातून देवींनी आपले आज्ञाधारक अश्व हाकले.

पण इदाहून त्यांना पाहून पिता जव्ह फार रागावला व त्याने पक्षधारी आयरिसबरोबर एक निरोप त्यांना पाठवला. तो म्हणाला, "शीघ्रगामिनी आयरिस, त्यांना मागे फिरव, आणि त्या माझ्याजवळ येणार नाहीत अशी योजना कर; कारण आमचा झगडा सुरू झाला तर हानी होईल. हे असे मी म्हणतो आहे व हे असेच करण्याचा माझा बेत आहे; मी त्यांचे घोडे लंगडे करीन, त्यांच्या रथातून त्यांना फेकून देईन व रथाचे तुकडे तुकडे करीन. माझ्या विद्युत्क्षेपाने त्यांना होणाऱ्या दुखापती बऱ्या व्हायला पुरती दहा वर्षे लागतील. मग माझ्या करड्या डोळ्यांच्या मुलीला कळेल, बापा बरोबर भांडण्याचा परिणाम काय होतो ते ! ज्युनोच्या वर्तणुकीबद्दल मला इतके आश्चर्य वाटत नाही किंवा राग येत नाही. कारण मी काही म्हणालो तरी ती नेहमीच माझ्या उलट बोलते."

हे ऐकून आयरिस वायुवेगाने इदाच्या उच्च पठारांकडून ऑलिम्पसच्या अत्युच्य शिखरांकडे गेली. त्या पर्वताच्या अनेक दऱ्यांच्या बाहेरील वेशींपाशी ती देवींना भेटली व त्यांना तिने आपला संदेश दिला. ती म्हणाली, "तुम्ही कसल्या तयारीत आहात? तुम्हाला वेड लागले आहे की काय ? सॅटर्न-पुत्राचा तुमच्या जाण्यास प्रतिबंध आहे. तो म्हणतो ते असे आहे व त्याचा हेतु हे सारे करण्याचा आहे. तो तुमचे घोडे लंगडे करील, तुमच्या रथावरून तुम्हाला फेकून देईल व रथाचे तुकडे तुकडे करील. त्याच्या विद्युन्निक्षेपाने तुम्हाला होणाऱ्या दुखापती बऱ्या व्हायला दहा वर्षे लागतील; म्हणजे मग करड्या डोळ्यांच्या देवी, तुझ्या पित्याशी भांडणाचा परिणाम काय होतो ते तू शिकशील. ज्यूनोची वर्तणूक त्याच्या मनाला एवढी लागलेली नाही व तो तिच्यावर इतका रागावलेलाही नाही; कारण तो काही म्हणाला तरी ती नेहमीच त्याला विरोध करते—पण तू, धीट उद्धट पोरटे, जव्हची अवज्ञा करून तुझा दांडगा भाला उगारण्याचे धाडस तू खरोखरीच करणार आहेस का?"

असे म्हणून ती तेथून निघून गेली आणि ज्यूनो मिनर्व्हाला म्हणाली, "खरे म्हणशील तर ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्ये, जव्हची अवगणना करून यापुढे मानवांच्या लढाया लढण्यास माझे मन घेत नाही. त्यांच्या नशिबी असेल त्याप्रमाणे त्यांना जगू दे नाही तर मरू दे, आणि त्रोजन्स नी दॅनाअन्स यांच्या वाटचाला जव्ह त्याच्या मर्जीप्रमाणे काय तो कर्मभोग आणू दे."

तिने आपले घोडे वळवले. लगेच काल-घटिका देवांनी त्यांचे जोखड उतरून त्यांना त्यांच्या अमृतमय तबेल्यात बांधले, व प्रांगणाच्या कडेच्या भिंतीला रथ टेकून ठेवला. त्या दोन देवी मग इतर देवांच्या सहवासात आपल्या सुवर्णपीठांवर स्थानापन्न झाल्या, पण त्या फार रुष्ट होत्या.

थोडयाच वेळात तात जव्हने आपला रथ ऑलिम्पसला हाकून आणला व तो देवसभेत शिरला. त्याचे घोडे भूकम्पाच्या बलशाली देवाने जोखडातून सोडवले, रथ त्याच्या चौकटीवर चढवला व त्याच्यावर एक वस्त्र टाकले. मग जव्ह आपल्या सोन्याच्या सिंहासनावर बसला व ऑलिम्पस त्याच्या खाली हादरला. मिनर्व्हा व ज्यूनो जव्हपासून दूर एकीकडे बसल्या, आणि दोघींपैकी कोणीही त्याच्याशी बोलली नाही की, तिने त्याला प्रश्न विचारले नाहीत, पण त्यांच्या मनातले जव्हला ठाऊक होते आणि तो म्हणाला, "मिनर्व्हा व ज्यूनो, तुम्ही इतक्या का रागावला आहात? तुमचे अत्यंत प्रिय मित्र त्रोजन्स यांना ठार मारून तुम्ही थकला आहात का? ते कसेही असो, माझ्या बाहूंची शक्ति अशी आहे की ऑलिम्पसचे सगळे देवही मला माझ्या निश्चयापासून ढळवू शकणार नाहीत. लढाई व तिच्यातली भयानक कर्मे पाहण्याच्या कितीतरी आधीच तुम्हा दोघींच्याही सर्वांगाला कंप सुटला होता! म्हणून मी तुम्हाला सांगतो आहे की, मी म्हणतो तसे खरोखरच झाले असते; मी तुम्हाला विजेचा तडाखा दिला असता; तुमच्या रथांनी तुम्हाला कधीही ऑलिम्पसला परत आणले नसते."

शेजारी शेजारी बसून त्रोजन्सचे अनिष्ट चिन्तीत असलेल्या मिनर्व्हा व ज्यूनो मनात कष्टी झाल्या. मिनर्व्हा एक शब्दही न बोलता गप्प बसली, कारण तिला अत्यंत क्रोध चढला होता व पित्याविरुद्ध ती अतिशय चिडली होती; पण ज्यूनोला राहवले नाही, आणि ती म्हणाली, "भयकारी सॅटर्नपुत्रा, तू काय म्हणतो आहेस? तुझी शक्ती किती महान आहे ते आम्हाला ठाऊक आहे. तरीही आम्हाला दॅनॅअन योद्धयांबद्दल अनुकम्पा वाटते, कारण ते नाश पावत आहेत व त्यांचा शेवट वाईट होत आहे. तथापि तुझी आज्ञा म्हणून प्रत्यक्ष लढाईत आम्ही भाग घेणार नाही, पण तुम्ही आरगॉससेनेला उपयुक्त सूचना करू म्हणजे तुझ्या रोषाने ते सगळेच नष्ट होणार नाहीत."

आणि जव्हने उत्तर केले, "ज्यूनो, तुला बघावेसे वाटले तर उद्या सकाळी सॅटर्नपुत्र आरगॉसच्या बहुसंख्य योद्धयांचा नाश करताना तू पाहशील; कारण ते लोक तेव्हा बिकट परिस्थितीत नौकांच्या पिछाडयांपाशी पॅत्रोक्लसच्या देहाभोवती लढत असतील व पेलिअसपुत्राला डिवचून उठवीपर्यन्त उग्र हेक्तर

लढायचा थांबणार नाही; तुला आवडो वा न आवडो पूर्व योजित हे असे अटळ आहे. पृथ्वी व सागराच्या खाली सर्वात खोल ठिकाणी, जेथे आयावेतस व सॅटर्न राहतात व ज्या एकाकी तार्तारसमध्ये, प्रकाशकिरण किंवा वाऱ्याची झुळूक देखील मन उल्हसित करण्यास येत नाही, तेथे तू जाऊन पडलीस तरी मला त्याची क्षिती नाही. तेथे पोहोचेपर्यंत तू एकसारखी जातच राहिलीस तरी तुझ्या रुसव्याची मला काडीइतकी किंमत वाटणार नाही, कारण आज ह्यात असणारात सर्वात तापदायक कर्कशा तू आहेस."

ज्यूनोने त्याला उत्तर दिले नाही. सूर्याचा तेजोगोल आता ओशिॲनस-मध्ये बुडाला व त्यामुळे भूमीवर रात्र उतरली. युद्ध करण्यास उजेडाचे साह्य होईना म्हणून त्रोजनांना खरोखर वाईटच वाटले. पण तो अंधार ॲकिअनांना मात्र स्वागतार्ह व त्रिवार प्रार्थनेचे वरदान म्हणून लाभल्या-सारखा वाटला.

मग हेक्तरने नौकांजवळुन त्रोजनांना परत नेले व प्रेते नसलेल्या मोकळ्या जागेवर नदीपाशी मंत्रणासभा घेतली. रथांवरून उतरून त्यांना उद्देशून होणारे त्याचे भाषण ऐकण्यासाठी ते भूमिवर बसले. ज्याचे ब्राँझचे अग्र दांडयापुढे चकाकत होते व फाळाभोवतालची कडी सोन्याची होती असा अकरा हात लांबीचा भाला हातात धरून तो बोलला, "श्रवण करा, त्रोजन्स, दार्दा-निअन्स व मित्रपक्षीय हो, मी आताच विचार केला होता की इलिअमला परत जाण्याआधीच नौका व त्यांच्यासह साऱ्या ॲकिअन्स यांचा नाश करावा; पण अंधार फार लौकर पडला. केवळ यामुळेच ते व त्यांच्या सागर तीरावरच्या नौका वचावल्या म्हणून आता आपण रात्रीचे आदेश पाळू या, व आपली रात्रीची जेवणे तयार करू या. तुमचे घोडे रथापासून सोडवा व त्यांना दाणाचंदी खायला घाला; मग नगरीतून त्वरेने मेंढरे नी गुरे आणा; त्याचप्रमाणे मद्यही, तशीच घोडयांसाठी चंदीही आणा व तसेच पुष्कळसे सर्पण गोळा करा, म्हणजे रात्रीपासून उजाडेपर्यन्त, ज्यांच्या ज्वाळा आकाशापर्यन्त पोहोचतील अशा पहाऱ्यांसाठी शेकोटया आपल्याला पेटवता येतील. कारण रात्री समुद्रापार पळून जाण्याचा प्रयत्न ॲकिअन्स कदाचित करतील, आणि त्यांना दुखापत किंवा उपद्रव न होताच नौकावर चढून स्वदेशी जाऊ देता कामा नये. नौकेवर उडी मारताना अंगात रुतलेल्या भाल्याचे किंवा बाणाचे टोक त्यांच्यातल्या अनेकांना घरी गेल्यावर परिचर्या करण्यासाठी न्यायला लावले पाहिजे म्हणजे मग त्रोजन्सवर युद्ध आणि आक्रोश ओढवून आणण्यास इतर भितील. शिवाय नगरीभर दूतांना घोषणा करू द्या, की तारुण्याकडे वाटचाल करणारे कुमार व

करडया दाढयांचे म्हातारे यांनी नगरीच्या स्वर्ग-सहाय्याने बांधलेल्या तटांवर तळ ठोकावे. प्रत्येक बाईने आपल्या घरात धगधगीत अग्नी पेटत ठेवावा, आणि सैन्य बाहेर असताना (शत्रूचा) अनपेक्षितपणे नगरीत प्रवेश होऊ नये म्हणून सुरक्षिततेसाठी कडक पाहरा ठेवण्यात यावा. शूर त्रोजनांनो, मी सांगितली तशी सर्व व्यवस्था ठेवा; सध्या एवढे आदेश पुरेत. दिवस उजाडताच मी आणखी सूचना तुम्हाला देईन. ज्व्हला व देवांना मी अपेक्षा पूर्तीसाठी प्रार्थना करतो की आपल्या भूमितून हे स्वतःच्या नियतीने येथे हाकून आणलेले शिकारी कुत्रे आपण हाकून काढू शकू, कारण नियती देवतांनीच त्यांना व त्यांच्या नौकानाच इकडे आणले आहे. म्हणून या रात्री आपण पहारा करू या व भल्या पहाटेच आपले चिलखत चढवू व ॲकिअन्सच्या नौकांपाशी घोर युद्ध चेतवून देऊ. मग मला कळेल की तायदिअसपुत्र शूर दायोमिद मला नौकांपासून मागे तटापर्यन्त रेटतो, का मी स्वतः त्याचा वध करून त्याचा रक्तरंजित शस्त्रसंभार लुटून नेतो. उद्या त्याला आपली धमक दाखवू दे व हिंमत असेल तर माझ्या भाल्यापुढे टिकू दे. मला वाटते की दिवस उजाडतानाच पहिल्याने रणक्षेत्री पडणारात तो असेल व त्याच्याभोवती त्याच्या सोबत्यांपैकीही पुष्कळसे पडतील."

"आजचा दिवस आरगॉस सेनेवर आरिष्ट ओढवून आणील अशी मला जितकी खात्री आहे तितकीच अमर होण्याची, कधीही वृद्ध न होण्याची आणि मिनर्व्हा व ॲपोलोसारखी पूजा करून घेण्याची असती तर छान झाले असते."

हेक्तरने असे भाषण केले व त्रोजनांनी ओरडून पसंती व्यक्त केली. त्यांनी आपले घामेजलेले घोडे जोखडातून मोकळे केले व ते ज्याच्या त्याच्या रथापाशी बांधले. त्यांनी नगरीतून मेंढरे आणि गुरे त्वरेने आणली; त्याचप्रमाणे मद्यही आणले; तसाच आपल्या घरामधून दाणा आणि पुष्कळसे सर्पणही गोळा केले. मग त्यांनी अमरांना निष्कलंक महायज्ञ अर्पण केले आणि बळींचा मधुर स्वाद वाऱ्याने स्वर्गापर्यन्त पोहोचवला—पण धन्य देवांनी तो स्वीकारला नाही, कारण प्राअॅम व प्राअॅमच्या प्रजेसह इलिअमबद्दल त्यांना कटु द्वेष होता. याप्रमाणे युद्धाच्या महामार्गावर उच्च आकांक्षा मनात बाळगून त्रोजन्स साऱ्या दीर्घ रात्रभर बसले व पहाऱ्यासाठी त्यांनी पुष्कळ शेकोट्या पेटवल्या. ज्याप्रमाणे तारका निष्कलंक तेजाने चमकत असता व चंद्र षोडशकलांनी तळपत असता, वाऱ्याची एक झुळुकही नसता, एकही शिखर, वनमार्ग, किंवा पुढे घुसलेले भुशीर त्या शांत नभातून बरसणाऱ्या व कशानेही न झाकाळणाऱ्या दीप्तीत उठून दिसल्याशिवाय राहात नाही, सर्व तारकांची नावाने गणना करता येते

आणि मेंढपाळाचे मन प्रसन्न होते–अगदी त्याचप्रमाणे नौकांच्या व झांथस नदीच्या दरम्यान इलिअमपुढे त्रोजनांच्या पहाऱ्यासाठी पेटवलेल्या शेकोटया झळाळत होत्या. मैदानावर हजार शिबिराग्नी चमकत होते आणि प्रत्येकाच्या उजेडात पन्नास लोक बसले होते, व त्याचवेळी घोडे आपापल्या रथांजवळ ओट व दाणा चावीत पहाट होण्याची वाट पाहात होते.

● ● ●

## सर्ग ९

याप्रमाणे त्रोजनांनी पहारा ठेवला. पण ॲकिअन्सवर रक्तबंबाळ दाणादाणीची सोबतीण जी घबराट तिची घट्ट पकड बसली होती आणि त्यांचे सर्व राजवंशीय नेते हताश झाले होते. थ्रेसकडून वाहणारे उत्तर नी वायव्य दिशांचे वारे एकाएकी सोसाट्याने उठतात व सागराला खवळून टाकतात——क्षणात कृष्णवर्ण लाटा मस्तके उभारून सागरांतर्गत वनस्पती सर्व दिशाना विखरून टाकतात——अगदी अशाच प्रकारे ॲकिअन्सची हृदये त्रस्त झाली होती.

ॲत्रिअस पुत्राने खट्टू मनाने दूताना आज्ञा केली की एकेक माणसाला निरोप सांगून लोकाना मंत्रणा सभेस बोलवावे, पण सर्वत्र ओरडून घोषणा करू नये; त्याने स्वत:ही लोकाना बोलावण्याची त्वरा केली, आणि ते येऊन दु:खित मनाने सभेत बसले; एखाद्या उभ्या कड्यावरून कोसळणाऱ्या धावत्या प्रवाहासारखे किंवा प्रपातासारखे ॲगॅमेम्नॉनच्या नेत्रातून अश्रू वाहू लागले; आणि याप्रमाणे पुष्कळ खोल सुस्कारे सोडीत तो ॲकिअन्सना उद्देशून बोलला, "माझ्या मित्रांनो, आरगॉसचे राजवंशीय व मंत्रीहो, स्वर्गाचा माझ्यावर घणाघात झाला आहे. कठोर जव्हने मला गंभीरपणे वचन दिले होते की स्वदेशी परत फिरण्या आधी मी त्रॉयनगरी लुटीन, पण त्याने मला फसवले आहे, आणि तो आता मला अनेक लोकांना गमावून अपकीर्ती पदरी घेऊन आरगॉसला परत जाण्यास सांगत आहे. ज्याने अनेक स्वाभिमानी शहरे धुळीस मिळवली आहेत व अजूनही अनेक जो धुळीस मिळवील, कारण त्याची सत्ता सर्वात श्रेष्ठ आहे, त्या जव्हची इच्छा ही अशी आहे. म्हणून आता मी म्हणतो तसे आपण सगळे करू या, व सागरावरून नौकांनी आपल्या स्वदेशी परत जाऊ या, कारण आपल्याला त्रॉय जिंकून घेण्याची आशा उरली नाही."

असे तो बोलला व ॲकिअनांचे पुत्र पुष्कळ वेळपर्यन्त खिन्नपणे तेथे बसून राहिले, पण त्यांच्यापैकी कोणीही काहीही बोलले नाही. पण अखेर उच्चरवाने गर्जना करणारा दायोमिद उत्तरार्थी म्हणाला, "ॲत्रिअसपुत्रा, मंत्रणासभेत जो माझा अधिकार आहे त्याच्या अनुसार मी तुझा अविचार खोडून काढणार आहे, तेव्हा तसे मी केल्याने कष्टी होऊ नको. पहिली गोष्ट ही की सर्व दॅनाअनांच्या समक्ष तू माझ्यावर टीका केलीस व मी भेकड आहे, सच्चा योद्धा नाही असे म्हणालास. तू असे केलेस हे इथल्या आरगॉसवासी सर्व

तरुणाना व वृद्धाना ठाऊक आहे. पण कावेबाज सॅटर्नपुत्राने तुला गुणांच्या देणग्या दिल्या त्या अर्ध्याअर्ध्यानेे. आमच्यावरचा मुख्य सत्ताधारी हा मान त्याने तुला दिला, पण न्याय व बल या दोन्हीत सर्वोच्च जे शौर्य ते त्याने तुला दिले नाही. अहो श्रीमान्, ॲकिअनांचे पुत्र तुम्ही म्हणता तितके बिनलढाऊ वृत्तीचे व भित्रे खरोखरच आहेत असे तुम्हाला वाटते काय? जर तुझा स्वतःचा घरी जायचा निश्चयच असेल, तर जा, मार्ग तुला मोकळा आहे ; मायसिनीहून ज्या अनेक नौका तुझ्या मागोमाग आल्या त्या किनाऱ्याला ओळीने उभ्या आहेत; पण आम्ही बाकीचे मात्र ट्रॉय लुटीपर्यन्त येथेच राहणार. हो, पण जर हेही आपापल्या नौकांसह स्वदेशाकडे वळणार असतील, तर स्थेनेलस व मी स्वतः आमचे इलिअम हे उद्दिष्ट साध्य होईपर्यन्त लढतच राहू, कारण आम्ही येथे आलो तेव्हा स्वर्ग आमच्या पक्षाचा होता असा आमचा विश्वास आहे."

दायोमिदच्या बोलण्याला ॲकिअन्स पुत्रांनी ओरडून पसंती दर्शवली व लगेच नेस्तॉर बोलण्यास उठला. तो म्हणाला, "तायदिअसपुत्रा, युद्धात तुझा पराक्रम संदेहातीत आहे आणि मंत्रणासभेत तू समवयस्कांपेक्षा श्रेष्ठ आहेस; तू जे म्हणतोस ते ॲकिअन्सपैकी कोणीच दुर्लक्षून उडवून देऊ शकणार नाही किंवा त्याच्याविरुद्धही आवाज उठवू शकणार नाही; पण अजून संपूर्ण प्रश्नाच्या अंतापर्यन्त तू पोचलेला नाहीस. तू अद्यापि लहान आहेस—माझ्या स्वतःच्या मुलात सर्वात धाकटा असल्यासारखे तुझे वय आहे—तरीही तू शहाण-पणाने बोलला आहेस आणि ॲकिअन्सच्या अधिपतीला तू दिलेली सल्ला सुज्ञ-पणाची नाही असे नाही. हे सर्व खरे असले तरी मी तुझ्याहून वडील आहे व मी तुला सगळे उलगडून सांगत आहे; म्हणून कोणीही, ॲगॅमेम्नॉन राजानेही, माझ्या बोलण्याची उपेक्षा करू नये, कारण जो समाजात बेवनावास चिथावणी देतो तो कुलाची, घरादाराची पर्वा न करणारा तडीपार झालेला माणूस असला पाहिजे.

"तथापि आता आपण रात्रीचे आदेश पाळून आपापली सायंभोजने उरकून घेऊ या; पण पहारेकऱ्यातल्या प्रत्येकाला मात्र भिंतीबाहेरच्या खंदकावर तळ ठोकू द्या. या सूचना मी तरुणाना देत आहे; त्यांचे पालन झाल्यानंतर ॲत्रिअसपुत्रा, तू आपल्या आज्ञा कर, कारण आम्हा सर्वात श्रेष्ठतम राज्याधिकारी तू आहेस; तुझ्या मंत्र्यांसाठी मेजवानी सिद्ध करण्यास सांग, तसे करणे योग्य व वाजवी होईल. थ्रेसहून रोज ॲकिअनांची जहाजे आणीत असलेल्या मद्याचा सुकाळ तुझ्या तंबूत आहे. पाहुण्यांचे आदरातिथ्य करण्यासाठी जरूर ते सर्व काही तुला उपलब्ध आहे आणि तुझे प्रजाजन पुष्कळ आहेत.

पुष्कळसे एकत्र जमविले म्हणजे ज्याचा सल्ला सर्वात शहाणपणाचा असेल त्याचे मार्गदर्शन घेता येते. आणि चतुर व धोरणी सल्ला आपल्याला आज फार निकडीने हवा आहे; कारण शत्रूने त्याच्या पाहऱ्याच्या शेकोटचा आपल्या नौकांच्या अगदी जवळच पेटवलेल्या आहेत. अशा परिस्थितीत लोक ना-उमेद नाही तर काय होणार? आजची ही रात्र एकतर आपल्या सैन्याचा विनाश तरी करील किंवा बचाव तरी करील."

याप्रमाणे तो बोलला व त्याने सांगितल्याप्रमाणेच त्यांनी सर्व केले. एक सेनाप्रमुख नेस्तॉरपुत्र थ्रॅसिमिदिझ आणि धैर्यवान योद्धे अॅस्कॅलॅफस व आयॅल्मेनेस, यांच्या नेतृत्वाखाली पहारेकरी आपली चिलखते चढवून बाहेर पडले; तसेच मेरिऑनिझ, अॅफॅरिअस आणि दैपिरस, त्याचप्रमाणे क्रैऑनपुत्र थोर लिकोमिदिझ हेही निघाले. याप्रमाणे पहारेकऱ्यांचे प्रमुख सात होते व प्रत्येकाबरोबर लांब भाले घेऊन सज्ज झालेले शंभर तरुण गेले. त्यांनी खंदक व भिंत यांच्या मध्यभागी आपापल्या जागा घेतल्या, आणि एवढे करून झाल्यावर, आपापले विस्तव पेटवून प्रत्येकाने रात्रीचे जेवण उरकले.

मग अॅत्रिअसपुत्राने अॅकिअन्समधील बऱ्याच सल्लागारांना आपल्या छावणीत बोलावले, आणि त्यांच्या सन्मानार्थ मोठी मेजवानी सिद्ध केली. त्यांच्यापुढे ठेवलेल्या उत्तम पदार्थांवर त्यांनी चांगलाच हात मारला व त्यांचे खाणेपिणे भरपूर झाल्यानंतर, सर्वदा योग्य सल्ला देणाऱ्या वृद्ध नेस्तॉरने प्रथम आपल्या मनातला विषय त्यांच्यापुढे काढला; अत्यंत कळकळीने व सदिच्छेने त्यांना उद्देशून तो असे बोलला :

"अत्यंत थोर नृपते, अॅत्रिअसपुत्रा अॅगॅमेम्नॉन, माझ्या भाषणाची सुरुवात आणि शेवटही मी तुला उद्देशूनच करणार आहे, कारण तू मोठ्या जनसमुदायावर राज्य करतोस. शिवाय जव्हने, राजदण्ड धारण करून सदाचाराच्या परिमाणाचे कार्य तुझ्यावर सोपवले आहे, यासाठी, की तू आपल्या प्रजेची काळजी घ्यावीस. म्हणून स्वतः बोलणे, ऐकणे आणि सुज्ञपणे बोलण्याची बुद्धी ज्याला असेल त्याच्या मंत्रणेनुसार कार्य करणे, हे सर्वाहून अधिक तुझे कर्तव्य आहे. सर्व काही तुझ्यावर व तुझ्या आज्ञांवर अवलंबून आहे, म्हणून जे सर्वथैव यथा-योग्य होईल असे मला वाटते ते मी सांगतो. श्रीमान, ज्या क्षणाला ती ब्रिसेइस नामक मुलगी माझ्या मताला न जुमानता तुम्ही अॅकिलिझच्या तंबूमधून घेऊन जाऊन त्याला कोपविलेत, तेव्हापासून माझ्या मनात जो सच्चा विचार घोळत आहे तसा दुसऱ्या कोणाच्याही मनात घोळत नसेल. तसे करू नका म्हणून मी तुम्हाला आग्रहाने सांगितले, पण तुम्ही आपल्याच अभिमानाच्या आधीन

झालात, आणि प्रत्यक्ष स्वर्गाने ज्याचा बहुमान केला होता त्या वीराचा अपमान केलात—कारण अजूनही त्याला देण्यात आलेली ती लूट तुम्ही आपल्याच स्वाधीन ठेवली आहेत. तथापि आता आपण त्याचा कोप शांत करण्यासाठी काय करावे याचा विचार करू या. नजराणे व आर्जवी भाषणे, अशा दोन्ही मार्गांनी त्याची समजूत घालता येईल."

आणि ॲगॅमेम्नॉन राजाने उत्तर दिले, "महाशय, माझ्या मूर्खपणाला आपण दूषण दिलेत ते ठीकच आहे. माझे चुकले हे मी कबूल करतो. स्वर्ग ज्याला मित्र मानतो तो स्वतः एकटाच एका सेभासंभारासमान असतो, आणि ॲकिअन्सचे पुष्कळ लोक नष्ट करून जव्हने या माणसाला आपण मित्र मानल्याचे दाखवून दिले आहे. तीव्र मनोविकाराने माझी विवेकशक्ती अंध झाली होती व त्यामुळे मीही नंतर भावनेच्या आहारी गेलो; पण आता मी त्याची भरपाई करतो आणि प्रायश्चितार्थ त्याला मोठ्या देणग्या देतो. तुम्हा सर्वांसमक्ष त्या कोणत्या ते गणना करून सांगतो; मी त्याला यज्ञाग्नीवर कधीच न ठेवलेल्या सात पवित्र तिवया देईन, त्याचप्रमाणे दहा तॅलेन्त सोने देईन. मी त्याला वीस मोठे लोखंडी कटाह आणि स्पर्धा जिंकून पारितोषके मिळवलेले बारा बळकट घोडे देईन. माझ्या घोड्यांनी माझ्यासाठी जिंकलेल्या पारितोषिकां-इतकी पारितोषिके ज्याच्यापाशी असतील तो भूमी व सुवर्ण यांनी खरोखरच समृद्ध म्हटला पाहिजे. मी त्याला सात उत्तम कारागीर स्त्रिया देईन. लेस्वॉसमधील या स्त्रिया त्याने जेव्हा लेस्वॉस जिंकले त्यावेळी मी स्वतःसाठी निवडून घेतल्या होत्या. त्या सगळ्या अप्रतिम सुंदर आहेत. त्या तर मी देईनच, पण त्यांच्याबरोबर त्यांच्याकडून यापूर्वी घेतलेली ब्रिसिअस कन्याही देईन. आणि मी गंभीर शपथ घेतो की मी कधीही तिच्या शय्येवर गेलो नाही, व स्त्री पुरुष परस्पर करतात त्याप्रमाणे तिच्याशी समागम केला नाही."

"या सर्व गोष्टी आताच, लगेच, मी त्याला देतो, आणि जर पुढे देवांनी प्राअॅमची नगरी लुटण्याचे वरदान मला दिले, तर आम्ही ॲकिअन्स लुटीची वाटणी करीत असता तेथे त्याला येऊ द्या, व आपल्या नौका हव्या तितक्या सोन्याने व ब्राँझने लादून घेऊ द्या. त्याखेरीज हेलनच्या खालोखाल अत्यंत सुंदर अशा वीस त्रोजन स्त्रिया त्याला घेऊ द्या. नंतर जेव्हा आम्ही सर्व भूमित समृद्ध अशा ॲकिअन आरगॉसला पोहोचू, तेव्हा त्याला मी माझा जावई करून घेईन. आणि संपूर्ण समृद्धीत वाढत असलेला माझा प्रिय पुत्र ऑरेस्तिझ याच्या बरोबरीने मी त्याला मान देईन. मला क्रिसोथेमिस, लॅओदिसी व इफिॲनॅसा अशा तीन मुली आहेत, त्यातली हवी ती त्याला निवडू द्या; कुठल्याही

अटींशिवाय व प्रणयाराधनेसाठी द्याव्या लागणाऱ्या कुठल्याही देणग्या दिल्याशिवाय त्याने तिला वरून, मुक्तपणे नी अनुनय न करता पेलिअसच्या घरी घेऊन जावे. वरती अशी वरदक्षिणा मी त्याला देईन की जशी कधी कोणा माणसाने आपल्या मुलीसाठी दिली नसेल, आणि त्याला मी सात सुस्थापित शहरे देईन,—कारदॅमिली, इनोपी व गवताची कुरणे असलेला हायरी, पवित्र फेरी व ॲन्थिआची संपन्न कुरणे; त्याचप्रमाणे ईपिआव पेदॅससचे द्राक्ष वेलींनी लहडलेले उतरते प्रदेश; हे सगळे समुद्राजवळ व रेताड पायलॉसच्या सीमेवर आहेत. तेथे राहणारे लोक भरपूर गुरे व मेंढरे बाळगून सुस्थितीत आहेत. जणू तो देवच आहे असे मानून ते त्याचा देणग्यांनी बहुमान करतील. व त्याचे सुखद आदेश आज्ञाधारकपणे पाळतील. तो जर आता आपला राग सोडीत असेल तर हे सगळे मी त्याच्यासाठी करीन. तेव्हा त्याने जरा आता हट्ट सोडावा. सर्वस्वी निष्ठुर व ताठर असा केवळ (मृत्यूदेव, पाताळ राज) हेदिझच असतो, आणि म्हणूनच सर्व देवात तो एकटाच मानव जातीच्या द्वेषाचे लक्ष्य झाला आहे. शिवाय त्याच्यापेक्षा (ॲकिलिझ) मी वयाने मोठा व अधिक श्रेष्ठ राजकुलातला आहे. तेव्हा आता त्याने माझी आज्ञा पाळली पाहिजे."

मग नेस्तॉरने उत्तर दिले, "परमथोर ॲत्रिअसपुत्रा, नृपते ॲगॅमेम्नॉन, तू देऊ केलेल्या देणग्या काही लहानसहान नाहीत; तेव्हा आता आपण विलंब न लावता पेलिअसपुत्र ॲकिलिझच्या तंबूकडे निवडक दूत पाठवू या. मी ज्यांची नावे घेईन त्यांना जाऊ दे. सर्वात पुढे ज्व्हचा प्रिय फीनिक्स जाऊ दे, त्याच्यामागून ॲजॅक्स व युलिसिस व घोषणादूत ओदिअस व युरिबॅतिझ यांना त्यांच्याबरोबर जाऊ दे. आता आमच्या हातांचे प्रक्षालन करण्यासाठी पाणी आण व आम्ही सटर्नपुत्र ज्व्हची त्याच्या कृपाप्रसादासाठी प्रार्थना करीत आहोत तोपर्यंत सर्वांना गप्प रहायला सांग."

असे तो बोलला आणि त्याच्या शब्दांनी सर्वांना संतोष झाला. सेवकांनी पाहुण्यांच्या हातावर पाणी घातले आणि शागिर्दांनी मिश्रणपात्रात मद्य व पाणी भरून प्रत्येकाला प्रथम अर्घ्य प्रदानार्थ मिश्रण देऊन नंतर सर्वांनी मद्यार्घ्य दिल्यावर प्रत्येकाने हवे तेवढे मद्यपान केले आणि दूत ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉनच्या तंबूमधून निघाले. नेस्तॉरने प्रथम एकाकडे व नंतर दुसऱ्याकडे जाऊन पण विशेषत: युलिसिसकडे जास्त लक्ष देऊन सर्वांना बजावले की, पेलिअसच्या थोर पुत्राचे मन त्यांनी वळवावेच.

गंभीर निनाद करणाऱ्या सागराच्या किनाऱ्याने ते गेले व त्यांनी पृथ्वी वेढणाऱ्या नेपच्यूनची मनापासून प्रार्थना केली की, इॲकसपुत्राची तेजस्वी वृत्ती

त्यांना अनुकूल व्हावी. जेव्हा ते मिर्मिदॉनांच्या नौकांजवळ व तंबूपाशी पोहोचले, तेव्हा ॲकिलिझ कसबी कलाकुसरीच्या व चांदीची आडवी पट्टी लावलेल्या सुंदर वीणेवर मधुर स्वर छेडीत असलेला त्यांना दिसला. एइशन नगरी त्याने लुटली तेव्हा त्याला मिळालेल्या लुटीपैकी ते वाद्य होते आणि यावेळी तो ते वाजवून वीरांच्या पराक्रमाचे गुणगान करीत मन रिझवीत होता. पॅत्रोक्लससह तो एकटाच बसला होता ; पॅत्रोक्लस त्याच्यासमोर मुकाट्याने बसून त्याचे गाणे संपण्याची वाट पहात होता. आता युलिसिस व ॲजॅक्स आत आले ; युलिसिस पुढे होता ; ते त्याच्यापुढे उभे राहिले. वाद्य हाती असतानाच ॲकिलिझ उडी मारून जागेवरून उठला आणि परके लोक आलेले पाहून पॅत्रोक्लसही उठून उभा राहिला. नंतर ॲकिलिझने त्यांना अभिवादनार्थ म्हटले, " शुभ चिंतन व स्वागत, असो आपले. काहीतरी महत्वाच्या प्रकरणी तुम्ही आलेले असणार ! मला कितीही राग आला असला तरी ॲकिअन्समध्ये तुम्ही अजूनही मला सर्वात प्रिय आहात."

असे म्हणून त्यांना घेऊन तो पुढे झाला व त्याने जांभळ्या गालिच्यांनी आच्छादलेल्या बैठकीवर त्यांना बसण्यास सांगितले. मग शेजारीच असलेल्या पॅत्रोक्लसला तो म्हणाला, " मेनितिअसपुत्रा, मेजावर एक अधिक मोठे पात्र ठेव, मिश्रण करताना मद्यात थोडे कमी पाणी घाल व प्रत्येकाला एक एक पेला दे, कारण हे आता माझ्या निवासात आले आहेत ते माझे फार प्रिय मित्र आहेत."

मित्राने सांगितल्याप्रमाणे पॅत्रोक्लसने केले ; त्याने विस्तवापुढे मांस कापण्याचा ठोकळा ठेवला ; मेंढराच्या कमरेखालचा एक भाग, तसाच बकऱ्याच्या कमरेचा भाग व पुष्ट डुकराच्या कण्याजवळचा मांसल भाग असे ठोकळ्यावर ठेवले. ॲकिलिझ त्या मांसाचे कापून तुकडे करीत असता ते ऑतोमेदॉनने धरून ठेवले होते. मग त्याने त्याच्या खापा करून सळयांवर चढवल्या ; दरम्यान मेनितिअसपुत्राने त्याच्यावर विस्तव रचून वरपर्यंत फुलवला ; मग ज्वाळा खाली गेल्यावर निखारे पसरून त्यांच्यावर चौकटीवर मांस खंड अडकवलेल्या सळ्या ठेवल्या व भाजत असलेल्या मांसावर त्याने मीठ टाकले. मांस भाजून तयार झाल्यावर ते लाकडी थाळ्यात ठेवले आणि ॲकिलिझ पाहुण्यांना त्यांचे त्यांचे भाग वाटून देत असता, त्याने सुंदर टोपल्यातून भेजाभोवताली सर्वांना रोट दिले. मग ॲकिलिझ युलिसिसच्या सन्मुख समोरच्या भिंतीपाशी बसला आणि आपला सोबती पॅत्रोक्लस याला त्याने देवांना यज्ञाहुती देण्यास सांगितले ; तेव्हा त्याने आहुती अग्नीत टाकल्या आणि मग सर्वांनी पुढे असलेल्या स्वादिष्ट अन्नाचा समाचार घेतला. त्यांचे खाणेपिणे पुरेसे झाल्यावर ॲजॅक्सने

फीनिक्सला खूण केली, आणि ते पाहून युलिसिसने आपला पेला मद्याने भरून ॲकिलिझचे अभीष्ट चिन्तन केले.

तो म्हणाला, "कुशल असो तुझे ॲकिलिझ ; आपल्याला सुग्रास भोजनाची वाण कधीच पडली नाही—ना ॲगॅमेम्नानच्या तंबूत ना येथेही; आता खाणे पिणे भरपूर झाले, पण अशा प्रकारच्या कुठल्याही गोष्टीचा विचार सध्या आमच्या मनात नाही. श्रीमान्, आमच्यापुढे महान संकट उभे आहे आणि तुमच्या सहाय्याशिवाय आम्ही आमचे नौकादल वाचवू की गमावू ते कळत नाही. त्रोजन्स व त्यांचे मित्रपक्षीय यांनी आमच्या नौकांजवळच व अगदी भिंतीपाशी तळ दिला आहे ; त्यांनी आपल्या सैन्यात सर्वत्र पहाऱ्याच्या शेकोटया पेटवल्या आहेत, आणि आमच्या नौकादलावर तुटून पडण्यास त्यांना आता कशाचाही प्रतिबंध होऊ शकणार नाही असे ते मानतात. शिवाय जव्हने आपले विद्युत्क्षेप त्यांच्या उजव्या बाजूला प्रगट केले आहेत. हेक्तर आपल्या पूर्ण तेजानिशी उन्मत्तासारखा भडकला आहे ; जव्ह आपल्या बाजूला आहे या विश्वासाने तो पिसाट माथेफिरू बनला असून तो देव किंवा माणूस कुणालाही जुमानीत नाही आहे. दिवस लवकर उगवावा म्हणून तो प्रार्थना करीत आहे. त्याची प्रतिज्ञा आहे की, आमच्या नौकांच्या उंच पृष्ठभागांचे तो मोडून तोडून तुकडे करणार, नौकांचे मुख्य भाग पेटवून देणार, आणि ॲकिअन्स भांबावलेले व धुराने गुदमरलेले असताना त्यांचा फन्ना उडवणार ; मला भीती वाटते की, स्वर्गस्थ शक्ती त्यांची बढाई खरी करून दाखवतील, आणि आरगॉसमधील आपल्या घरांपासून दूर त्रॉयला नाश पावणे आपल्या नशिबी येईल. तेव्हा ऊठ, आणि जरी उशीर झाला असला तरी त्रोजन्सच्या त्वेषापुढे दीन झालेल्या ॲकिअन्स-पुत्रांना आता तरी वाचव. तसे न केलेस तर पुढे तुला कटु पश्चाताप होईल, कारण एकदा अपाय होऊन गेल्यानंतर त्याचा उपाय होणे नाही. अतिविलंब होण्याआधीच विचार कर व डॅनाअनांचे विनाशापासून रक्षण कर."

"माझ्या सन्मित्रा, जेव्हा तुझा पिता पेलिअस याने थिआहून तुला ॲगॅमेम्नॉन-कडे पाठविले, तेव्हा त्याने तुला बजावून सांगितले नाही काय, की,' मुला, मिनर्व्हा व ज्यूनो त्यांची मर्जी लागल्यास त्या तुला खूप शक्ती देतील ; पण तुझा तिखट, आततायी स्वभाव आवरून धर, कारण सदिच्छेची भूमिका नेहमीच अधिक बरी असते ; व्यर्थ भांडण टाळ, म्हणजे मग वृद्ध तसेच तरुणही ॲकिअन्स तुला, त्यासाठी जास्त मान देतील.' हे त्याचे शब्द होते, पण ते तू विसरला आहेस, तथापि अजूनही शांत हो व आपला राग सोडून दे. तू क्षमा केलीस तर ॲगॅ-मेम्नॉन मोठ्या प्रमाणावर तुझी भरपाई करील ; ऐक म्हणजे मी तुला सांगतो.

तो आपल्या तंबूत तुला काय काय देणार म्हणून म्हणाला ते. तो तुला यज्ञाग्नीवर अजून कधीही न ठेवलेल्या सात पवित्र तिवया देईल, आणि सोने दहा तॅलेन्त ; वीस लोखंडी कटाह व स्पर्धा जिंकून पारितोषिके मिळवणारे बारा बळकट घोडे ॲगॅमेम्नॉनसाठी या घोड्यांनी जिंकलेल्या पारितोषिकांइतकी ज्याच्याकडे पारितोषिके असतील तो भूमी आणि सोन्यानेही खरोखरच संपन्न म्हटला पाहिजे. शिवाय तो तुला सात उत्तम कलाकुसरी करणाऱ्या स्त्रिया देईल. लेस्वॉसच्या या स्त्रिया तू लेस्वॉस जिंकलेस तेव्हा त्याने स्वत:साठी निवडल्या होत्या. त्या साऱ्या अप्रतिम रूपाच्या आहेत. या तर तो देईलच आणि त्यांच्याबरोबर जिला त्याने काही काळापूर्वी तुझ्याकडून आणून ठेऊन घेतले होते ती ब्रिसेअस कन्याही देईल. आणि तो गंभीरपणे शपथ घेईल की, तो तिच्या शय्येवर कधीही गेला नाही किंवा स्त्रीपुरुषांच्यात परस्पर होतो तसा त्याने तिच्याशी समागमही केलेला नाही. या सर्व वस्तू आता तात्काल तो तुला देईल आणि पुढे जर देवांनी प्राअॅमची नगरी लुटण्याचे वरदान त्याला दिले तर आम्ही ॲकिअन्स लुटीची वाटणी जेव्हा करू तेव्हा तुला तेथे येऊन हव्यातेवढ्या सोन्याने व ब्रॉंझने तुझी नौका लादून घेता येईल. हेलनच्या खालोखाल अत्यंत सुंदर अशा वीस त्रोजन स्त्रियाही तुला घेता येतील. नंतर जेव्हा आपण सर्व भूमीत संपन्न अशा ॲकिअन आरगॉसला पोहोचू तेव्हा तू त्याचा जावई होशील आणि सर्व प्रकारच्या समृद्धीत संगोपन होत असलेला त्याचा प्रिय पुत्र ऑरेस्तिझ याच्या इतकाच तो तुला मान देईल. ॲगॅमेम्नॉनला क्रिसोथेमिस, लॅओदिसी व इफिॲनॅसा अशा तीन मुली आहेत. तुला हवी ती त्यातून तुला निवडता येईल. मुक्तपणे, काही अटींशिवाय व प्रणयाराधनानिमित्त देणग्या न देता, तिला तुला पेलिअसच्या घरी घेऊन जाता येईल. शिवाय कोणी कधीही अद्यापि दिले नसेल असे स्त्रीधन मुलीला वरती तो देईल. त्याचप्रमाणे सात सुस्थापित शहरे तो तुला देईल : कारदॅमिली, इनोपी व कुरणे असलेली हिरी ; पवित्र फेरी व ॲंथिआची गवताळ संपन्न कुरणे ; तशीच ईपिआ व पेदॅससचे द्राक्षवेलींनी लहडलेले उतारावरचे प्रदेश ; ते सर्व समुद्रासन्निध असून रेताड पायलॉसच्या सीमेवर आहेत. तेथे राहणारे लोक गुरे व मेंढरे बाळगून सुस्थितीत आहेत. तू जणू देव आहेस असे मानून ते देणग्या देऊन तुझा बहुमान करतील आणि तुझ्या सुखद आदेशांचे आज्ञापालन करतील. हे सर्व तो करील––जर तू आता आपला राग सोडलास तर. शिवाय आणखी असे सांगायचे आहे की, जरी तू त्याचा व त्याच्या देणग्यांचा मनापासून तिरस्कार करीत असशील, तरी बाकीच्या ॲकिअन्सवर दया कर ; त्यांच्या सर्व सैन्याचा छळ होतो आहे ; ते

तुला देवासारखा मान देतील आणि त्यांच्याद्वारा तुला परम कीर्ती लाभेल. तू एकादेवेळी हेक्तरचादेखील वध करशील ; तो तुझ्या आवाक्यात येईल, कारण तो उन्मत्त झाला आहे, आणि घोषणा करतो आहे की, नौकांनी आणलेला एकही दॅनाअन त्याच्यापुढे टिकाव धरू शकणार नाही."

ॲकिलिझने उत्तर केले, "लेअर्टिझच्या उदात्त पुत्रा युलिसिस, मी तुला स्पष्टपणे आणि निश्चित हेतूपूर्वक, औपचारिक सूचना द्यायला हवी की कोणाकडूनही असो, मला ही मनधरणी वारंवार पहायला नको आहे ; जो एक गोष्ट बाहेरून बोलतो व त्याचवेळी दुसरी हृदयात दडवतो त्याचा मी पाताळलोकाच्या द्वारांसारखा तिरस्कार करतो. म्हणून मी माझ्या मनात जे आहे तेच मी स्पष्ट बोलतो. माझी समजूत ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉनकडून किंवा दुसऱ्या कोणाही दॅनाअनकडून होणे नाही ; कारण माझ्या साऱ्या लढण्याबद्दल मला मुळीच कृतज्ञता दाखवली जात नाही हे मला स्पष्ट दिसते आहे. जो लढतो त्याचे न लढणाराहून काही अधिक भले होत नाही. भेकड व वीर यांना सारखाच मान मिळतो ; आणि काम करतो त्याला व आळशाला मृत्यू सारखेच माप देतो. माझे शिर सदा हातावर घेऊन, मी अमाप कष्ट सोसलेले असूनही मला त्यापासून काही लभ्यांश झालेला नाही. एकादी पक्षीण जशी भरवण्याजोगा घास सापडताच घरट्यातल्या पिलांकडे तो घेऊन जाते व स्वतः उपास काढते, तसाच मीही कितीतरी दीर्घ रात्री जागलेलो आहे, आणि दिवसा ॲकिअनांच्या बायकांना पळवण्यासाठी लढणारांविरुद्ध रक्तपाती युद्धे केली आहेत. माझ्या नौकांवरून हल्ला करून मी बारा शहरे जिंकली आहेत, व भूमीवरून माझ्या सैनिकांसह चढाई करून ट्रॉयभोवतालच्या अकरा नगरींचा पाडाव केला आहे. प्रत्येक नगरीमधून मी मोठाल्या धनराशी मिळवल्या पण त्या सर्व ॲत्रिअसपुत्र ॲगॅमम्नॉनला देऊन टाकल्या. तो आपल्या नौकांपाशीच तळावर राही, पण त्याला मिळाले त्यातून तो देई थोडे, स्वतःसाठी मात्र भरपूर ठेवी."

"तथापि काही बहुमानाची पारितोषिके त्याने सेनानायकात व राजांमध्ये वाटून दिली आणि ती अजूनही त्यांच्याजवळ आहेत. ॲकिअनपैकी एकट्या माझ्याकडून, मला सुखद अशी स्त्री त्याने काढून घेतली—तिला तो ठेवून घेऊ द्या, व तिच्यासह समागम करू द्या. असे पहा, आरगॉससेनेने त्रोजनांशी युद्ध करायला हवेच कशाला ? सैन्य गोळा करून ते येथे घेऊन येण्यास ॲत्रिअसपुत्र कशामुळे प्रवृत्त झाला ? हेलनसाठीच नव्हे काय ? आपल्या बायकांवर प्रेम करणारे जगात केवळ ॲत्रिअसपुत्रच तेवढे आहेत ? सर्वसाधारण उचितभावना

असलेला कोणीही पुरुष आपल्या स्वतःच्या स्त्रीवर प्रेम करून तिला जिवापाड जपतो. जरी ती माझ्या भाल्याच्या पराक्रमाचे केवळ फलित होती तरी त्या स्त्रीवर मी तसेच जिवाभावाने प्रेम करतो. त्या स्त्रीला अॅगमेम्नॉनने माझ्यापासून हिरावून घेतले आहे, त्याने माझा विश्वासघात केला आहे. मी त्याला चांगला ओळखतो, त्यान मला आणखी प्रलोभने दाखवून माझे मन फिरवण्याचा प्रयत्न करू नये, कारण तो मला कधीही माझ्या निश्चयापासून ढळवू शकणार नाही. त्याच्या नौका जळितापासून बचावण्यासाठी, युलिसिस, त्याला तुझ्या व इतर राजवंशीयांच्या तोंडाकडे पाहू दे. माझ्या मदतीशिवाय अगोदरच त्याने पुष्कळ काही केले आहे. त्याने एक भिंत बांधली आहे, तिच्याभोवती खोल व रुंद खंदक खणला आहे, आणि त्यात अणकुचीदार खांब रोवले आहेत ; पण तरीही हेक्तरची हिंसक शक्ती तो थोपवून धरू शकत नाही. मी अॅकिअन्समध्ये लढत होतो तोवर हेक्तरने नगरीच्या तटांपासून लढाई दूर सरकू दिली नाही ; तो लढतलढत स्कीअन वेशीपर्यंत व ओक वृक्षापर्यंत येई, पण पुढे मात्र कधी आला नाही. एकदाच तो माझ्याशी लढायला थांबला होता व माझ्या हल्ल्यातून त्यावेळी तो कसाबसा निसटला. तथापि आता, त्याच्याशी लढण्यात मला गोडी वाटत नाही म्हणून, उद्या मी जव्हच्या व सर्व देवांच्याप्रीत्यर्थ यज्ञ करीन ; मी माझ्या नौका पाण्यात ओढून काढीन व जरुर तो दाण्यापाण्याचा पुरवठा त्यांच्यावर चढवीन, उद्या सकाळी, तुला पाहावेसे वाटले तर, माझ्या नौका तुला हेलेस्पाँतवर दिसतील व माझे लोक जोरजोराने वल्हवीत त्या नौका समुद्रात दूर नेताना आढळतील. माझा प्रवास व्यवस्थित होऊ देण्याची कृपा थोर नेपच्यून देवाने जर मजवर केली तर तीन दिवसात मी थिआत असेन. मी इकडे आलो व पस्तावलो पण तिथून निघालो तेव्हा तिथे मागे पुष्कळसे ठेवलेले आहेच, आणि आपण घेतलेल्या लुटीच्या माझ्या वाटचातला आणखी सोन्याचा व रक्तवर्ण तांब्याचा साठा, तशाच सुंदर स्त्रियाही मी आता तिकडे परत घेऊन जाईन ; नेणार नाही ते फक्त एकच पारितोषिक, जे देणारानेच माझ्याकडून उद्दामपणे परत घेतले आहे. मी आता सांगतो तसे सगळे त्याला सांगा, आणि सर्वांसमोर जाहीररीत्या हेही सांगा की, त्याला जर असे वाटत असेल की, अजूनही इतरांना आपणास असेच ठकविता येईल— कारण त्याचे उर्मट धाष्टर्य कधीच त्याला सोडीत नाही——तर म्हणावे तू तसे केल्यास अॅकिअन्स त्याचा तिटकारा करतील व त्याच्यापासून सावध राहतील."

"माझ्या विषयी म्हणाल, तर तो क्षुद्रश्वानच असल्यामुळे माझ्याकडे वर तोंड करून कधीही पाहण्याचे त्याचे धाडस होणार नाही. मी त्याच्याशी

कुठलीही सल्लामसलत करणार नाही, आणि त्याच्या सहकार्यात कुठलेही कार्य अंगिकारणार नाही. त्याने माझ्यावर पुरेसा अन्याय केला आहे, मला पुरेसे फसवले आहे, आणखी जास्त फसवू देणार नाही मी त्याला ; त्याला आपल्या मार्गाने जाऊ द्या ; कारण जव्हने त्याला विवेकभ्रष्ट केला आहे. मला त्याच्या देणग्यांविषयी घृणा आहे व त्याला स्वतःला काडीइतकी किंमत मी देत नाही. तो आता मला देऊ करतो आहे त्याच्या दसपट किंवा वीसपट देखील देऊ लागला---किंबहुना जगात असेल ते त्याचे सर्वस्व, आताचे व त्याला कधी मिळणार असेल ते सारे, किंवा ऑर्कोमेनसची संपत्ती किंवा ज्या नगरीच्या शंभर वेशीतून प्रत्येकी दोनशे लोकांनी आपले रथ व घोडे एकाचवेळी हाकणे सुलभ जाते त्या अखिल जगातील सर्वात वैभवशाली ईजिप्तमधील थीब्झची संपत्ती देण्याचे तो मला वचन देवो---सागरकिनाऱ्याच्या वालुकाकणांइतक्या किंवा मैदानावरच्या असंख्य धूलीकणांइतक्या तो मला देणग्या देऊ करो, पण तरीही त्याने मजवर केलेल्या कटु अन्यायाचा मी पुरता सूड उगवीपर्यंत तो मला माझ्या निश्चयापासून विचलित करू शकणार नाही. मी त्याच्या मुलीशी लग्न करणार नाही, ती व्हीनससारखी सुंदर व मिनर्व्हासारखी कुशल असो, मला ती अजिबात नको ; तिला सर्वस्वी अनुरूप असेल व अधिक मोठ्या राज्याचा स्वामी असेल असा दुसरा कोणी तिचा स्वीकार करो. देवांनी मला जिवंतपणे घरी परत जाऊ दिले तर पेलिअस माझ्यासाठी पत्नी पाहून देईल. हेलाज् नी थिआमध्ये ॲकिअन स्त्रिया आहेत, नगरीवर राज्य करणाऱ्या राजांच्या मुली आहेत ; त्यांच्यामधून मला हवी ती मी निवडीन व तिच्याशी लग्न करीन. थिआमध्ये स्वगृही असताना पुष्कळदा माझ्या मनात आले होते की, जी मला अनुरूप पत्नी ठरेल अशा एखाद्या स्त्रीचा अनुनय करून तिच्याशी लग्न करावे व माझा वृद्ध पिता पेलिअस याच्या संपत्तीचा उपभोग घ्यावा. ॲकिअन्स तेथे जाण्यापूर्वीच्या शांततेच्या काळात इलिअममध्ये होती ती सारी संपत्ती, किंवा पायथोच्या कड्या-खालील ॲपॉलोच्या मंदिरातील दगडी फरशीवर रचेलेली प्रचंड धनराशी, यांच्यापेक्षा माझा जीव मला जास्त मोलाचा आहे. गुरे नी मेंढरे धाडी घालून मिळवता येतात आणि माणसाला हव्या असल्या तर तिवया व घोडे विकत घेता येतात, पण त्याचा जीव एकदा त्याच्या कुडीतून गेला म्हणजे तो विकत घेता येत नाही किंवा धाड घालून परतही आणता येत नाही."

"माझी माता थेतिस हिने मला सांगून ठेवले आहे की, माझा अंत दोन प्रकारे होण्याचा संभव आहे. मी जर इथेच राहिलो व लढलो तर जिवंत परत जाणार नाही पण माझे नाव चिरंजीव राहील ; आणि जर स्वगृही परत गेलो तर माझे

नाव नष्ट होईल पण मला मृत्यु येईपर्यंत दीर्घ काळ लोटेल. तेव्हा तुम्हा बाकीच्यांना मी म्हणतो 'स्वदेशी परत जा, कारण तुम्ही इलिअम जिंकून घेऊ शकणार नाही.' त्या नगरीच्या संरक्षणार्थ जव्हने आपला हात तिच्यावर धरला आहे ; आणि तिच्या नागरिकांनी हिम्मत धरली आहे. तेव्हा तुम्ही ज्या कर्तव्याला बांधून घेतले आहे ते बजावण्यासाठी जा, आणि मी त्यांच्यासाठी पाठवलेला निरोप अॅकिअन्सच्या राजवंशीयांना सांगा : त्यांचा नौका व लोक बचावण्यासाठी दुसरी एकादी योजना काढा म्हणावे. कारण जोपर्यंत माझा रोष टिकून आहे तोपर्यंत त्यांनी आता काढलेली योजना सिद्धीस जाणार नाही. फीनिक्सपुरते सांगायचे तर त्याला इथे झोपू द्या म्हणजे त्याची इच्छा असल्यास सकाळी त्याला माझ्याबरोबर नौका प्रवासाला निघता येईल ; पण मी बळाने त्याच्या इच्छेविरुद्ध त्याला नेणार नाही."

त्याने नकार देण्यात दाखवलेल्या कठोरपणाने निराश होऊन ते सगळे गप्प राहिले ; पण थोड्याच वेळात वयस्क कुलीन वीर फीनिक्स याला अॅकिअन्सच्या नौकांना धोका पोचेल या घोर भयाने रडू कोसळले. तो म्हणाला, "उदात्त अॅकिलिझ, तुझा जर आता परत जाण्याचा विचार असला, व तुझ्या संतापाच्या प्रक्षोभामुळे नौकादलाचे जळितापासून रक्षण करण्यासाठी तू काहीच करणार नसलास, तर, माझ्या मुला, तुझ्याशिवाय इथे मी कसा राहू शकेन ? तू केवळ एक किशोर होतास तेव्हा तुझ्या पित्याने, पेलिअसने, तुला थिआहून अॅगॅमेम्नॉनकडे पाठवले व तुझ्याबरोबर मला जाण्याची आज्ञा केली. तेव्हा तुला युद्धाविषयी किंवा सभेत आपली छाप पाडण्यासाठी पुरुषाना वापराव्या लागणाऱ्या युक्त्यांविषयी काही माहिती नव्हती, आणि तुला उत्कृष्ट वक्तृत्वकला आणि उठावदार कर्तृत्व याचे शिक्षण देण्यासाठी त्याने तुझ्याबरोबर मला धाडले होते. म्हणून म्हणतो माझ्या मुला, तुझ्याविना मी येथे राहणार नाही--छे, मुळीच नाही ! जरी स्वतः स्वर्गस्थ देवांनी माझे वाढलेले वय माझ्यावरून काढून घेऊन मला सुंदर स्त्रियांचा हेलाज देश प्रथम सोडताना मी होतो तेवढा तरुण केले तरीही नाही ! त्यावेळी मी पित्याचा माझ्यावर कोप झाल्यामुळे दूर पळून जात होतो ; माझा पिता आर्मेनसपुत्र अॅमिन्तॉर ; तो माझ्यावर क्रुद्ध झाला होता त्याच्या रक्षेच्या प्रकरणी, माझ्या मातेवर, आपल्या पत्नीवर अन्याय करून तो त्या रक्षेवर लुब्ध झाला होता ; म्हणून माझी माता एकसारखी माझी विनवणी करी की, त्या बाईशी मी समागम करावा म्हणजे त्याकारणने तिला माझ्या पित्याचा वीट येईल. काही दिवसांनी मी आईच्या सांगण्याप्रमाणे करायला कबूल झालो ; पण माझ्या वडिलांना माझे कर्म लौकरच कळले आणि

भयानक एरिनीझना साक्षीला आवाहन करून त्यांनी मला कटु शाप दिले. त्याने देवांची प्रार्थना केली की आपला पुत्र खेळवण्याचे सुख मला कधीही लाभू नये. आणि देवांनी, पाताळलोकींच्या जव्हने, प्रॉर्सपिनीने त्यांचा शाप पुढे खरा केला. मी त्यांचा वध करण्याची मसलत योजिली, पण कोणी तरी देवाने माझ्या अविचाराला आळा घातला आणि निक्षून सांगितले की, माणसांच्या दुष्ट जिव्हा माझ्याविषयी कशा बडबडतील व 'पितृघातकी' हा डाग माझ्यावर कसा बसेल याचा मी विचार करावा. पण तरीही, माझा पिता माझ्याविरुद्ध एवढा आकस मनात बाळगीत असताना त्याच्या घरी राहण्यास माझे मनाघेईना. चुलत भाऊ नी भाऊबंद माझ्याभोवती जमले व मला तेथेच राहण्याचा त्यांनी अत्यंत आग्रह केला. पुष्कळ मेंढरे नी पुष्कळ बैल त्यांनी माझ्यासाठी मारले, आणि पुष्कळ लठ्ठ डुकर विस्तवापुढे भाजायला घातले ; माझ्या पित्याच्या साठ्यातील मद्याच्या अनेक सुरया त्यांनी उघडल्या. पाळीपाळीने पहारा करून पुऱ्या नऊ रात्री त्यांनी माझ्यावर पहारा ठेवला, आणि सर्वकाळ अग्नी प्रदीप्त ठेवला---बाहेरच्या प्रांगणातील वीथीत, त्याचप्रमाणे आतील प्रांगणात मी निद्रिस्त असे. पण जेव्हा दहाव्या रात्रीचा अंधार पडला तेव्हा मी माझ्या खोलीचे बंद दार फोडून बाहेर पडलो, आणि पहारा करणारे पुरुष व सेविका यांची नजर चुकवून पटकन् पलीकडे जाऊन बाहेरच्या प्रांगणाची भिंत चढून निसटलो. मग मी हेलाजमधून पळत पळत मेंढरांची जन्मदात्री अशा सुपीक थिआनगरीपर्यंत आणि पेलिअस राजाकडे आलो ; त्याने माझे स्वागत केले व आपल्या साऱ्या धनाचा वारस असणाऱ्या एकुलत्या एक पुत्राप्रमाणे मला वागवले. त्याने मला संपत्ती दिली आणि पुष्कळ लोकांवर अधिकारी नेमले व थिआच्या सीमांवर मला लागी लावले. तेथे दॉलोपि-अन्सवर मी प्रमुख राज्यकर्ता म्हणून सत्ता चालवू लागलो.

"ॲकिलिझ, तुला घडवणारा होतो, मी. मी जिवाभावाने तुझ्यावर माया केली ; तू घरी किंवा दुसरीकडे कुठे बाहेर गेलास तर माझ्याशिवाय जेवाय-खायचा नाहीस. जेव्हा मी माझ्या मांडीवर तुला बसवून, तुला द्यायचे चिमुकले घास विभागून तयार करायचा व मद्याचापेला तुझ्या ओठांपाशी धरायचा तेव्हा तू जेवायचास. बाळपणच्या असहाय अवस्थेत कित्येक वेळा तुझ्या तोंडातील मद्य गळून माझ्या अंगरख्यावर सांडले आहे. तू मला कितीतरी सतावून सोडायचास, पण मी जाणून होतो की, स्वर्गस्थ देवांनी मला स्वतःला अपत्याचे वरदान दिलेले नाही ; तेव्हा मग मी तुलाच पुत्र मानला ; ॲकिलिझ : म्हटले, माझ्या गरजेच्या वेळी तू मला सांभाळशील. म्हणून आता मी म्हणतो, तू

आपल्या अभिमानाशी मुकाबला करून त्याला मोडून काढ. एकसारखा आपल्या रागाला उराशी कवटाळून बसू नको. स्वर्गस्थ शक्तींचे बळ व प्रताप आपल्यापेक्षा कितीतरी अधिक आहेत, पण त्यांचेही मन वळवता येते ; आणि एकाद्या माणसाने जर पाप केले असले तर तो देवांची प्रार्थना करतो : दीनवाण्या आळवण्यानी, धूप जाळून, मद्यार्घ्ये देऊन व अग्नीत टाकलेल्या बळींच्या आहुतीच्या स्वादाने त्यांना आपल्याला अनुकूल व प्रसन्न करून घेतो, कारण प्रार्थना या महान जव्हच्या कन्यांसारख्या आहेत ; लंगड्या, सुरकुतलेल्या, तिरकस नजरेच्या अशा त्या, पापाच्या पावलांवर पावले टाकीत मागून जातात : पाप उग्र व द्रुतगती असल्याने त्यांना पार मागे टाकते, आणि मानवजातीला सदा विनाशकारी करणारे असे ते पाप पृथ्वीच्या सीमापर्यंत देखील त्यांच्या पुढेच राहते ; पण तरीही त्या प्रार्थना लंगडत आणि भले करीत पाठोपाठ येत राहतात. त्या जव्हकन्या जवळ येतात तेव्हा माणसाने जर त्यांना सहानुभूती दाखवली तर त्या त्याला आशिर्वाद देतील आणि तो प्रार्थीत असताना ऐकतील ही ; पण जर त्याने त्यांना झिडकारले व त्यांच्याकडे लक्ष दिले नाही, तर त्या सॅटर्नपुत्र जव्हकडे जातात व विज्ञप्ती करतात की, त्या माणसाने लौकरच पापाचे वाटेकरी व्हावे व मग त्याला त्यानंतर कटु पश्चाताप भोगावा लागतो. म्हणून ॲकिलिझ, या जव्ह-कन्यांविषयी योग्य तो आदर दाखव आणि सर्व सज्जन वाकवतात तशी त्यांच्यापुढे मान वाकव. ॲत्रिअसपुत्र जर आता तुला देणग्या देऊ करीत नसता व नंतरही आणखी देण्याचे आश्वासन देत नसता--अजूनही तो भडकलेला व दुराराध्य असता--तर आपला राग सोडून ॲकिअन्सना मदत कर म्हणून सांगणारा माणूस मी नाही, मग त्यांना कितीही निकड असो ! पण आता तो पुष्कळ देतो आहे व नंतरही आणखी देणार आहे ; आपली मागणी आग्रहाने पुढे मांडायला त्याने आपले सेनानायक पाठवले आहेत ; आणि तेही सगळ्या ऑरगॉसवासियांमध्ये तुला अधिक मान्य असलेले निवडूनच ; तेव्हा त्याचे शब्द व त्यांचे येणे निरर्थक होईल असे करू नको. आतापावेतो तुझा राग न्याय्य होता. प्राचीन काळातले वीर चिथावल्याने क्रुद्ध झाल्यावर कसे भांडत ते आम्ही गाण्यातून ऐकले आहे, पण तरीही देणग्यांनी ते वश होत आणि मृदुभाषण त्यांना शांत करू शके."

"मला एक जुनी कथा आठवते आहे–फारच पुरातन कालाची–पण तुम्ही सगळे मित्र आहात तेव्हा ती मी सांगतो. कॅलिदॉनभोवती क्युरिती व इतोलिअन लढत एकमेकाना ठार करीत होते; त्या नगरीचा बचाव इमेलिअन करीत होते तर क्युरिती तिला नष्ट करण्याच्या प्रयत्नात होते. कारण

सुवर्णसिंहासनाधिष्टित दायाना रागावली होती व ईन्यूसने फळे उतरल्यावर पहिली वहिली फळे तिला अर्पण केली नाही म्हणून त्यांचे तिने नुकसान करण्याचे ठरवले. इतर देवांप्रित्यर्थ त्याने महायज्ञांचे उत्सव केले पण थोर जव्हच्या कन्येसाठी मात्र यज्ञ केला गेला नव्हता. तो तिला विसरला होता म्हणा किंवा इतर काहीतरी होऊन ते कार्य राहून गेले होते म्हणा, पण हे महत्पाप झाले होते. त्यामुळे त्या धनुर्धारिणी देवीने क्रोधाच्या भरात त्याच्यावर एक अचाट प्राणी सोडला होता–मोठाले पांढरे सुळे असलेला एक हिंस्त्र रानडुकर; त्याने त्याच्या फळांच्या बागांची खूप नासाडी केली, पूर्ण मोहरलेली सफरचंदाची झाडे मुळासकट उखडली व ती भूमीवर टाकली. पण ईन्यूसपुत्र मेलिॲगर याने पुष्कळ नगरींतून शिकारी व शिकारी कुत्रे जमा करून तो रानडुकर मारला; तो एवढा अजस्त्र होता की, त्याला मारायला थोडे लोक पुरे पडले नाहीत; व त्याने कित्येक जणांना चितेवर शयन करायला लावले. या निमित्ताने देवीने त्या रानडुकराच्या डोक्यासाठी व चामड्याखातर क्युरिती व ईतोलिअन्स यांना त्वेषाने एकमेकांशी लढण्यास प्रवृत्त केले."

"जोपर्यन्त मेलिॲगर रणांगणावर होता तोपर्यन्त क्युरेतींची गत वाईट होती; त्यांच्या सैनिकांची एवढी मोठी संख्या असूनही नगरीच्या तटांखाली त्यांना टिकाव धरता येत नव्हता; पण कालांतराने कधीकधी शहाण्याला देखील राग येतो तसा मेलिॲगरलाही राग आला. त्याची आई ॲल्थिआ हिच्यावर तो भयंकर चिडला, व म्हणून त्याची लग्नाची बायको सुंदर क्लिओ-पॅत्रा हिच्यापाशी तो घरीच राहिला; तेव्हाच्या ह्यात पुरुषात सर्वात बलवान आयदेस व युअेनस यांची कन्या जी मार्पेसा हिची ती कन्या. त्या आयदेसनेच आपले धनुष्य घेऊन मार्पेसासाठी प्रत्यक्ष राजा ॲपॉलोला तोंड दिले होते. तिच्या आईबापांनी नंतर तिला ॲल्सिओनी नाव दिले; कारण फीबस ॲपॉलोने तिला पळवून नेले असता तिच्या आईने हॅल्सिअन पक्ष्याच्या करूण स्वरांनी तिच्यासाठी विलाप केला होता. तेव्हा मेलिॲगर क्लिओपॅत्रासह घरी राहून आईने दिलेल्या शिव्याशापांनी त्याला आलेला संताप कुरवाळीत बसला. त्याच्या आईने भावाच्या मरणाबद्दल शोक करीत देवांची प्रार्थना केली आणि भूमीवर हात आपटून हेदिझला व भयानक प्रॉर्जापिनीला आवाहन केले. प्रार्थना करीत असता तिने गुडघे टेकले व आसवांनी तिचे वक्षस्थळ भिजले; तिने प्रार्थिले की त्या पाताळ देवतांनी तिच्या पुत्राला मारावे–आणि नेहमी अंधारात संचार करणाऱ्या व निर्दय एरिनिसनी एरेबसहून तिची प्रार्थना ऐकली."

"मग कॅलिदॉनच्या वेशींभोवती युद्धाचा कोलाहल आणि तटांवर धडक दिल्याचे मंद आवाज ऐकू आले. तेव्हा ईतोलिअन्समधील ज्येष्ठांनी मेलिॲगरची विनवणी केली, त्यांनी आपला सर्वप्रमुख उपाध्याय त्याच्याकडे पाठवला व बाहेर पडून मदतीस येण्याची याचना केली, आणि मोठे पारितोषिक देण्याचे वचन दिले. कॅलिदॉनच्या मैदानावरची सर्वात सुपीक अशी पन्नास शेते निवडून घेण्यास त्यांनी त्याला सांगितले; त्यातली निम्मी खुली नांगरटीची होती व बाकीच्यात द्राक्षमळे होते. वृद्ध योद्धा इन्यूस याने त्याच्या खोलीच्या दारात उभे राहून व दारे अजिजीने ठोठावीत त्याला गळ घातली. त्याच्या बहिणींनी व स्वतः त्याच्या आईने देखील जीव तोडून याचना केली; पण त्याने जास्तीच ओढून धरले व त्यांना नकार दिला. त्याचे सर्वात जवळचे व प्रियतम सोबती होते त्यांनीही त्याची प्रार्थना केली पण त्याचा निश्चय ते ढळवू शकले नाहीत. अखेर शत्रूचे त्याच्या महालाच्या दारावरच धक्के बसू लागले. क्युरेती तटांवरून चढून आत आले व नगरीला आग लावू लागले, तेव्हा शेवटी त्याच्या दुःखी स्त्रीने पराभूत नगरीच्या रहिवाशांवर काय भयंकर प्रसंग ओढवतात हे त्याला तपशिलवार सांगितले; तिने त्याला पूर्वीच्या घटनांची आठवण दिली की, अशाप्रसंगी माणसे कशी ठार मारण्यात येतात, नगरी कशी ज्वाळांच्या स्वाधीन करण्यात येते आणि बायका व मुले बंदीवासात कशी नेली जातात; हे सर्व त्याने ऐकले तेव्हा त्याचे हृदय द्रवले आणि त्याने युद्धात चालून जाण्यासाठी चिलखत चढवले. याप्रमाणे स्वतःच्या अंतःप्रेरणेने ईतोलिअनांची नगरी त्याने वाचवली; पण अगोदर देऊ केलेल्या बहुमोल पारितोषिकातले त्याला त्यांनी काहीही दिले नाही, आणि जरी त्याने नगरी बचावली तरी त्यामुळे त्याला काही मिळाले नाही. तेव्हा माझ्या मुला, तू त्याच्यासारखा विचार मनात आणू नको; स्वर्गस्थ शक्ती तुला तसल्या काही मार्गाच्या मोहात न पाडोत. नौका एकदा जळू लागल्या म्हणजे मग त्या वाचवणेही जास्त कठीण गोष्ट होईल. देणग्यांचा स्वीकार कर व जा, कारण मग ॲकिअन्स तुझा देवासारखा बहुमान करतील. उलटपक्षी देणग्या न घेता तू लढलास तर तू शत्रूंचा हल्ला परतवशील पण तुला तसा मान मिळणार नाही."

आणि ॲकिलिझने उत्तर दिले, "वृद्ध व पितृतुल्य फीनिक्स, मला तशा बहुमानाची गरजच नाही. मला खुद्द जव्हपासूनच बहुमान प्राप्त झालेला आहे. जोवर माझ्या देहात प्राण आहेत व माझ्या अवयवात शक्ती आहे तोपर्यन्त तो मान, माझ्या नौकांवर मी असतानाच माझ्यापाशी कायम राहील.

मी आणखी पुढे सांगतो व माझे म्हणणे आपल्या मनावर बिंबवून घे. ॲत्रिअस-पुत्राच्या वतीने ही सारी रडारड व शोक करून मला आणखी संतापवू नकोस. त्याच्यावर इतका लोभ ठेवलास तर तुझ्याबद्दलचा माझा लोभ मात्र तू गमावून बसशील. यापेक्षा मला उपद्रव देणाराना उलट उपद्रव देण्यास तू मलाच मदत करायला हवीस. माझ्याप्रमाणेच तुही राजा हो आणि माझ्या बरोबरीने बहुमानाचा वाटेकरी हो; हे बाकीचे माझे उत्तर परत घेऊन जातील; तू स्वत: इथे रहा व आपल्या शय्येवर आरामात झोप. दिवस उजाडेल तेव्हा आपण राहायचे की जायचे याचा विचार करू."

यानंतर त्याने शांतपणे पॅत्रोक्लसकडे पाहून मान हलवली व त्याला खूण केली की त्याने फीनिक्सची शय्या तयार करावी, आणि इतरांनी जाण्याची अनुज्ञा समजावी. तेव्हा तेलॅमॉनपुत्र ॲजॅक्स म्हणाला, "युलिसिस, लेअर्टिझच्या उदात्त पुत्रा, आपण जाऊ या, कारण मला स्पष्ट दिसत आहे की आपला प्रवास व्यर्थ गेला आहे. उत्तराची वाट पहाणाऱ्या दॅनाअनांकडे, आपल्याला मिळालेले उत्तर, जरी ते अनिष्ट असले, तरी घेऊन गेले पाहिजे. ॲकिलिझ चेवलेला आहे व निर्दय बनला आहे; इतर सर्वांपेक्षाही त्याच्यावर त्याच्या सोबत्यांनी केलेल्या अपरिमित प्रेमाची त्या कठोराला काही क्षिती नाही. तो दुराग्रही आहे—जर एकाद्याचा भाऊ किंवा मुलगा मारला गेला तर तो मारणाराकडून भरपाईदाखल दंड स्वीकारतो व मग अपराधी माणूस, अपराधाची पूर्ण किंमत मोजल्यावर स्वतःच्या लोकात सुखशांतीत नांदतो. पण तुझ्याबद्दल पहावे तर, ॲकिलिझ, देवांनी तुझ्या हृदयात दुष्ट, क्षमाहीन वृत्ती ठेवली आहे व हे सारे केवळ त्या एका मुलीसाठी; उलट आम्ही आमच्यापाशी असलेल्यापैकी सर्वोत्तम अशा सात जणी तुला देऊ करीत आहोत आणि वरती पुष्कळ कितीतरी देणग्या पण देत आहोत, तेव्हा जरा अधिक सौजन्य दाखव; तुझ्या स्वतःच्या घरच्या आदरातिथ्याच्या परंपरा पाळ. दॅनाअनांच्या सैन्याकडून तुझ्याकडे दूत म्हणून आम्ही येथे आलो आहोत आणि सर्व ॲकिअनांपेक्षा तू आम्हाला निकटतम व प्रियतम असे मानावेस अशी आमची मनीषा आहे."

ॲकिलिझने उत्तर दिले, "तेलेमॉनच्या उदात्त पुत्रा ॲजॅक्स, मला पुष्कळसे आवडण्याजोगे असे तू बोलला आहेस, पण मी त्या सर्व प्रकरणाचा जेव्हा पुन्हा विचार करतो, आणि मी एखादा हलका कंगाल असल्यासारखे ॲत्रिअसपुत्राने मला जे वागवले व तेही साऱ्या आरगॉसवासीयांच्या समक्ष, हे मी जेव्हा आठवतो, तेव्हा माझे रक्त पेटून उठते. तेव्हा, जा, आणि तुझा हा संदेश त्यांना कळव; म्हण की उच्चकुलीन प्राअॅम याचा पुत्र हेक्तर त्याच्या हिंसक आक्रमणाने

मिर्मिदॉनांच्या तंबूंशी पोहोचून त्यांच्या नौकांवर अग्निक्षेप करीपर्यन्त मी युद्धाच्या भानगडीत पडणार नाही. त्याला लढण्याची कितीही हाव असली तरी माझ्या स्वतःच्या तंबू नी नौकांजवळ तो येईल तेव्हा त्याला आवर घालता येईल असे मला वाटते."

यावर त्यांच्यापैकी प्रत्येकाने आपला दुप्पट मापाचा पेला घेतला, मद्यार्घ्ये दिली व युलिसिसच्या मागोमाग ते नौकांकडे परत गेले. पण पॅत्रोक्लसने आपल्या लोकांना व सेविकांना फीनिक्ससाठी एक आरामशीर शय्या सज्ज करण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी मेंढरांची कातडी, गालीचा आणि तलमतागाच्या पाटावांनी सर्वसिद्धता केली. तो वृद्ध नंतर पहुडला व सकाळ होण्याची वाट पहात राहिला. पण ॲकिलिझ एका आतल्या खोलीत निजला व त्याने लेस्वॉसहून जिंकून आणलेली फोर्बासची सुंदर कन्या दायोमिदे त्याच्या बाजूला झोपली. खोलीच्या दुसऱ्या बाजूला पॅत्रोक्लस व ॲकिलिझने एनिएडसची स्किरॉस नगरी जिंकल्यावर त्याला दिलेली रुपवती इफिस ही दोघे निजली.

दूत जेव्हा ॲत्रिअसपुत्राच्या तंबूत पोहोचले तेव्हा ॲकिअन्सनी उठून सुवर्ण-चषकातून मद्य प्राशून त्यांचे अभीष्टचिंतन केले आणि त्यांना प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. ॲगॅमेम्नॉन राजाने पहिल्याने प्रश्न केला, "युलिसिस, मला सांग," तो म्हणाला, "नौकांचे जळितापासून तो रक्षण करणार आहे की त्याने तसे करण्यास नकार दिला? तो अजूनही भडकलेलाच आहे का?"

युलिसिसने उत्तर दिले, "अतिथोर ॲत्रिअसपुत्रा, नृपते ॲगॅमेम्नॉन, ॲकिलिझ क्रोध विसरण्यास तयार नाही, उलट पूर्वीपेक्षा अधिकच तीव्रपणे संतप्त झाला आहे, आणि तुझा व तुझ्या देणग्यांचाही त्याने धिःकार केला आहे. तुला जमेल तशी, तुझ्या नौका व सैन्य वाचवण्यासाठी इतर ॲकिअनांशी मंत्रणा कर असे तुला तो सांगतो. त्याच्या स्वतःबद्दल सांगायचे तर दिवस उजाडताच आपल्या नौका पाण्यात लोटणार असे तो म्हणाला. तो पुढे असेही बोलला की त्याच्या प्रमाणेच प्रत्येकाने समुद्रमार्गे स्वदेशी परतावे अशी त्याची सल्ला आहे, कारण इलिअम जिंकणे या तुमच्या साध्यापर्यन्त तुम्ही पोहोचू शकणार नाही. तो म्हणाला, 'जव्हने त्या नगरीवर संरक्षणासाठी आपला हात पसरून धरला आहे आणि त्या नागरिकांनी हिम्मत धरली आहे.' तो बोलला ते हे आणि माझ्याबरोबर जे दुसरे होते तेही तुला हीच हकीकत सांगतील– ॲजॅक्स व दोघे घोषणादूत, दोघेही विश्वासार्ह लोक आहेत. वृद्ध फीनिक्स झोपण्यासाठी तेथेच राहिला आहे, कारण ॲकिलिझची तशी इच्छा होती.

यासाठी, की हवे तर सकाळी त्याच्याबरोबर फीनिक्सने स्वदेशी जावे, पण त्याला तो त्याच्या इच्छेविरुद्ध बळाने नेणार नाही", असे तो म्हणाला.

ते सगळे गप्प राहिले, ॲकिलिझने अत्यंत कठोरपणे नकार दिला त्यामुळे मूक आणि खिन्न असे ते बराच वेळ बसले. अखेर थोड्यावेळाने दायोमिद म्हणाला, "अति उदात्त ॲत्रिअसपुत्रा नृपाला ॲगॅमेम्नॉन, तू पेलिअसपुत्राच्या आर्जवा करायला नको होत्यास किंवा त्याला देणग्याही देऊ करायच्या नव्हत्यास; आधीच तो भरपूर गर्विष्ठ आहे आणि त्याच्या गर्वाला तू आणखीच उत्तेजन दिले आहेस. त्याला इच्छा असेल तर राहू दे नाहीतर जाऊ दे. नंतर त्याची लहर लागली व देवांनी त्याला तशी बुद्धी दिली तर तो लढेल. तेव्हा आता मी म्हणतो तसे आपण सगळे करू या. आपले खाणेपिणे पोटभर झाले आहे, म्हणून आता विश्रांती घेऊ या, कारण शक्ति आणि चिवटपणा दोन्ही विश्रांतीने प्राप्त होतात. पण ज्या क्षणी सुंदर अरुणांगुली प्रभात उगवेल, तत्क्षणीच तुझे सैन्य व अश्वारुढ दल नौकांपुढे आण, त्यांना पुढे सरण्यास प्रोत्साहन दे व तू स्वत: अग्रगामी पथकात युद्ध कर."

याप्रमाणे तो बोलला आणि इतर सेनाप्रमुखांनी त्याच्या म्हणण्यास मान्यता दिली. मग त्यांनी आपापली मद्यार्घ्ये दिली आणि प्रत्येक जण आपापल्या तंबूत जाऊन विश्रांतीसाठी पहुडला आणि निद्रेचे वरदान उपभोगिता झाला.

• • •

## सर्ग १०

आता ॲकिअन्सपैकी इतर राजवंशीय रात्रभर गाढ झोपले, पण ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉन अस्वस्थ होता, त्यामुळे त्याला विश्रांती मिळू शकली नाही. जसा सुंदर ज्यूनोचा स्वामी मुसळधार पाऊस, गारा किंवा भूमि शुभ्र करणारा हिमपात यांच्या सूचक अशी आपली वीज वरचेवर चमकावतो अथवा तशाच प्रतीकाने आपण भूकेल्या युद्धाचा रूंद जबडा उघडणार असल्याचे सुचवतो, अगदी तसेच ॲगॅमेम्नॉनने अनेक जड निश्वास सोडले, कारण अंतर्यामी त्याच्या जिवाचा थरकाप होत होता. जेव्हा त्याने ट्रॉयच्या मैदानाकडे पाहिले तेव्हा इलिअमपुढे पहाऱ्यांच्या अनेक शेकोटया पेटलेल्या पाहून आणि पावे-पिपाण्यांचे स्वर व माणसांचा घोंघावणारा आवाज ऐकून त्याला विस्मय वाटला, पण थोडयावेळाने जेव्हा तो ॲकिअन्सच्या नौकांकडे नी सेनादलाकडे वळला तेव्हा उच्च स्वर्गातल्या जव्हपुढे त्याने मुठीमुठींनी आपले केस उपटून काढले व जिवाची तगमग होऊन तो मोठमोठयाने विव्हळला. शेवटी त्याला सर्वोत्तम मार्ग हा दिसला की तात्काल नेलिअसपुत्र नेस्तॉरकडे जावे व दोघांनी मिळून ॲकिअन्सना विनाशापासून बचावण्याचा काही मार्ग सापडतो का ते पहावे. म्हणून त्याने उठून आपला अंगरखा घातला, आपल्या सुभग पायावर पादत्राणे बांधली, खांद्यावरून पिंगलवर्ण सिंहाचे एक भले मोठे–पायापर्यन्त पोहोचणारे कातडे टाकले आणि आपला भाला हाती घेतला.

मेनेलॉसलाही झोप येत नव्हती, कारण त्याच्यासाठी दुरून समुद्रावरून प्रवास करून त्रोजन्सशी लढण्यास आलेल्या आरगॉसवासीयांच्या नशिबीचे अनिष्ट त्यालाही दिसत होते. त्याने आपली रुंद पाठ ठिपके असलेल्या चित्त्याच्या चामडयाने झाकून घेतली, डोक्यावर ब्राँझचा शिरटोप घातला आणि आपल्या बळकट हातात भाला घेऊन, ॲकिअन्समधील सर्वात अति प्रबल व लोक ज्याला देवाप्रमाणे मान देत अशा आपल्या भावाला उठवण्यास तो गेला. त्याला तो त्याच्या नौकेच्या पिछाडीस अगोदरच आपला उमदा साज खांद्यावर चढवीत असलेला दिसला व भाऊ आलेला पाहून त्यालाही फारच बरे वाटले.

प्रथम मेनेलॉस बोलला, "प्रिय बंधो, तू असा शस्त्रसज्ज का होतो आहेस? आपल्या फायद्यात पडेल अशी काही माहिती काढण्यासाठी त्रोजनांची टेहेळणी

करण्यास्तव तू आपल्या कोणा सोबत्यांना पाठवणार आहेस काय? मला भीती वाटते की, ही कामगिरी तुझ्यासाठी कोणीही करणार नाही व ऐन रात्री एकटा शत्रूवर टेहळणी करण्यास कोणीही तयार होणार नाही; तसे करणे म्हणजे एक मोठेच धाडस होईल.'' आणि ॲगॅमेम्नॉनने उत्तर दिले, ''मेनेलॉस, आपणा दोघांनाही आपले आरगॉसचे लोक व आपल्या नौका वाचवायच्या असतील तर आपल्याला धूर्त मंत्रणेची गरज आहे; कारण जव्हने आपला विचार बदलला आहे आणि आपल्या यज्ञांपेक्षा हेक्तरच्या यज्ञांकडे त्याचा अधिक कल आहे. ॲकिअन्सच्या पुत्रांविरुद्ध आता एका दिवसात हेक्तरने जेवढे रणकंदन केले तेवढे कोणीही माणसाने केलेले मी पाहिले किंवा ऐकले नाही—आणि हा विध्वंस त्याने केला तोही कोणाच्या मदतीशिवाय एकट्याने; कारण तो देवाचा किंवा देवीचा पुत्रही नाही. आरगॉसच्या लोकांना दीर्घकालपर्यन्त व तीव्रपणे याचा खेद होत राहील. तेव्हा अगदी त्वरेने नौकांच्या ओळींजवळून धावत जा आणि ॲजॅक्स व आयदोमिनिअस यांना बोलाव. दरम्यान मी नेस्तॉरकडे जातो व त्याला सांगतो की उठून आपल्या पहारेकऱ्यांच्या पथकातून फिरून त्यांना सूचना दे; दुसऱ्या कोणापेक्षा त्याचे ते आधी ऐकतील; कारण त्याचा स्वतःचा पुत्र व आयदोमिनिअसचा युद्धातील सवंगडी मेरिओनिझ हे पहारेकऱ्यांवरचे प्रमुख आहेत. ही जबाबदारी आपण विशेषतः त्या दोघांवर टाकली आहे.''

मेनेलॉसने उत्तर केले, ''तुझ्या म्हणण्याचा अर्थ मी काय घ्यायचा? मी त्यांच्याजवळ राहून तू येण्याची वाट पहायची, का तुझ्या आज्ञा कळविल्याबरोबर तात्काळ इथे परत यायचे?'' राजा ॲगॅमेम्नॉन म्हणाला, ''तेथेच थांब, कारण छावणीत इतक्या वाटा आहेत की आपली चुकामूक होईल. जाताना वाटेत प्रत्येक माणसाला हाक मारून 'तयारी करायला लाग' म्हणून सांग; दर एकाचे कुलपरंपरेचा व पित्याचा निर्देश करून नाव घे; प्रत्येकाला त्याच्या पदवीचा व किताबाचा उल्लेख करून सर्व प्रकारचा मान दे, आणि स्वतःच्या प्रतिष्ठेवर जास्त भर देऊ नको; कारण आपण आपला कष्टांचा पुरा वाटा उचलला पाहिजे; कारण आपण जन्माला आलो तेव्हाच जव्हने आपल्यावर हा जड भार घातला आहे.''

हे आदेश देऊन त्याने भावाला मार्गस्थ केले आणि तो स्वतः स्वप्रजापालक नेस्तॉर याच्याकडे गेला. त्याला तो स्वतःच्या नौकेजवळच तंबूत झोपलेला दिसला; त्याचे उत्तम चिलखत त्याच्याजवळच ठेवलेले होते तसेच त्याची ढाल, त्याचे दोन भाले व त्याचे शिरस्त्राण; त्याचप्रमाणे शस्त्रसज्ज होताना ज्या

चकाकणाऱ्या पट्टयाने कंबर कसून तो स्वतःच्या लोकांच्या अग्रभागी युद्धात जात असे--कारण वय झाले म्हणून मागे राहणारा तो नव्हता--तो कमरपट्टा त्याच्या बाजूला होता. कोपर टेकून त्याने अंग उंचावले व वर ॲगॅमेम्नॉनकडे पाहिले. तो म्हणाला, "लोक निजले असताना ऐन रात्री असा एकटा नौकांच्या व सेनेच्या मधून फिरणारा कोण आहे तो? तू काय आपले एकादे खेचर शोधीत आहेस की कोणी सोबती? काही न बोलता तेथे उभा राहू नकोस, बोल, काय काम आहे तुझे?"

आणि ॲगॅमेम्नॉनने उत्तर दिले, "नेलिअसपुत्रा नेस्तॉर, ॲकिअन या नाम धेयाला गौरव मिळवून देणाऱ्या ॲमिअसचा पुत्र हा मी ॲगॅमेम्नॉन आहे. ज्या माझ्यावर, देहात प्राण असेपर्यन्त व हातपाय काम देत आहेत तोपावेतो जव्हने कष्ट व दुःख लादले आहे. मी असा बाहेर फिरतो आहे, कारण डोळ्यावर झोप येत नाही व हृदय मात्र युद्धाच्या विचाराने व ॲकिअनांवरील अरिष्टाच्या कल्पनेने भारावले आहे. दॅनाअनांच्या भवितव्याविषयी मला फार आशंका वाटत आहे. मी पार गोंधळून गेलो आहे आणि अचूक असा सल्ला मला मिळत नाही; शरीराबाहेर उडी घेते की काय असे वाटण्याइतके माझे काळीज धडधडत आहे, गात्रे लटकी पडली आहेत; तेव्हा तुला जर काही करता आले तर बघ--कारण तुलाही झोप येत नाहीय्! आपण सर्व पहारेकऱ्यांचे बाजूने फेरी मारू या व पाहू या की ते श्रमांनी निजेस आले आहेत व कर्तव्यात हयगय करीत निजले आहेत की काय! शत्रूने छावणी अगदी जवळच ठोकली आहे व तो रात्री आपल्यावर हल्ला करील की काय याचा आपल्याला अंदाज करता येत नाहीय."

नेस्तॉर उत्तरला, "उच्चकुलीन ॲत्रिअसपुत्रा, नृपते ॲगॅमेम्नॉन, हेक्तरला वाटते तितके जव्ह सर्वच काही हेक्तरसाठी करणार नाही. जर ॲकिलिझने आपला राग सोडला तर हेक्तरला अजूनही भरपूर पीडा होईल. मी तुझ्या-समवेत चलतो व आपण इतरांना उठवू, तायदिअस पुत्राला किंवा युलिसिसला, नाही तर द्रुतगती ॲजॅक्सला व फिलीअसच्या शूर पुत्राला; कुणाला तरी जाऊन ॲजॅक्सला व राजा आयदोमिनिअसलाही बोलावून आणू दे; कारण त्यांच्या नौका जवळपास नसून सर्वांच्या पलीकडे फार दूर आहेत. तथापि, मेनेलॉसवर माझा कितीही लोभ असला व त्याला मी मान देत असलो, तरी त्याला दोष लावल्यावाचून मला राहवत नाही--आणि हे मी स्पष्ट, तुला दुखावण्याचा धोका पत्करूनही म्हणतो--स्वतः झोपून हा सारा कष्टभार तुला उचलण्यास त्याने लावावा, याबद्दल मी त्याला दोष देतो. त्याने साऱ्या ॲकिअनसच्या

राजवंशीयांमध्ये फिरून मदतीची याचना करायला पाहिजे, कारण आपण अत्यंत बिकट संकटात आहोत."

आणि ॲगॅमेम्नॉनने उत्तर दिले, "महाशय, आपण त्याला दोष लावणे कधी कधी न्याय्य ठरण्याजोगे आहे; कारण पुष्कळदा तो हलगर्जीपणा करतो व प्रयत्न करण्याचे मनावर घेत नाही. खरोखरी, आळसाने व बेपर्वाईने तो असे करीत नाही तर त्याची भिस्त माझ्यावर असते व पुढाकार मी घ्यावा ही त्याची अपेक्षा असते. तथापि, याप्रसंगी मात्र तो माझ्या अगोदर जागा झाला होता व आपण होऊन माझ्याकडे आला. मी त्याला आधीच तुम्ही ज्यांची नावे घेतलीत त्या लोकांना बोलावण्यास पाठवले आहे. तेव्हा आता आपण निघू या. ते सगळे वेशींच्या बाहेर पहाऱ्यांपाशी आपल्याला भेटतील. कारण मी त्यांना म्हटले आहे की आपण तिथे भेटू."

नेस्तॉर म्हणाला, "तसे असेल तर आरगॉसवासीय त्याला बोल लावणार नाहीत व जेव्हा तो त्यांना लढण्यास प्रोत्साहन देईल किंवा निरनिराळे आदेश देईल तेव्हा त्याची ते अवज्ञाही करणार नाहीत."

असे बोलून त्याने अंगात अंगरखा घातला व आपल्या सुबक पायांवर पादत्राणे बांधली. त्याने आपला जांभळा डगला चढवून चापाने कसला; तो डगला दुहेरी जाडीचा, प्रशस्त व खरखरीत, केसाळ पोताचा होता. त्याने ब्राँझचा पत्र्यावर लावलेला दुर्दम्य भाला हाती धरला व ॲकीअन नौकांच्या ओळीच्या बाजूने तो मार्गाला लागला. प्रथम, मंत्रणेत देवतुल्य अशा युलिसिसला मोठ्याने हाक मारून त्याने जागे केले, कारण तो युद्धगर्जनेने लौकर उत्तेजित होत असे. तो आपल्या तंबूबाहेर येऊन म्हणाला, "या शांत रात्री नौकांच्या ओळीजवळून व सैन्यामधून असा एकटा तू का जात आहेस? इतके निकडीचे असे तुला काय काम आढळले आहे?" आणि जेरीनीचा उच्च कुलीन वीर नेस्तॉर उत्तरार्थी बोलला, "युलिसिस, लेर्अतिझच्या उदात्त पुत्रा, गैरसमज करून घेऊ नकोस, कारण ॲकिअन्स महत्संकटात आहेत. माझ्याबरोबर चल. आपण दुसऱ्या कोणाला तरी उठवू; जो आपल्याला लढायचे की पळून जायचे याबाबत योग्य सल्ला देईल अशा माणसाला उठवू या."

यावर युलिसिस तात्काल आपल्या तंबूत गेला, त्याने ढाल खांद्यावरून अड-कवली व तो त्यांच्याबरोबर बाहेर पडला. प्रथम ते तायदिअसपुत्र दायोमिदकडे गेले; त्यांना तो त्याच्या तंबूबाहेर चिलखत चढवून झोपी गेलेला आढळला; त्याचे सोबती आपल्या ढाली उशाखाली घेऊन त्याच्या भोवती निजले होते; आणि त्यांचे भाले जमिनीत खुपसलेल्या दांड्यांच्या टोकाच्या आधाराने ताठ

उभे केलेले असून त्यांची घासलेली ब्राँझची पाती तात जव्हच्या विजेसारखी दूरवर लखलखत होती. तो वीर वृषभचर्मावर उत्तम गालिच्याचा तुकडा उशाला घेऊन झोपला होता. नेस्तॉरने त्याच्याजवळ जाऊन टाचेने हालवून त्याला जागे केले व त्याला दटावून, उठून बसण्यास सांगितले. नेस्तॉर उद्-गारला, " जागा हो, तायदिअसपुत्रा, तू असा सारखा झोपू शकतोस तरी कसा ? त्रोजनांनी आपल्या नौकांच्या अगदी निकट मैदानाच्या कडेला, आपल्यात व त्यांच्यात अगदी थोडे अंतर ठेवून छावण्या ठोकल्या आहेत हे तुला दिसत नाही का ?" हे शब्द ऐकताच दायोमिद तात्काल उडी मारून उठला व म्हणाला, " वृद्ध मनुष्या, तुझे हृदय कठीण लोखंडाचे घडवले आहे असे दिसते. तुझ्या श्रमांपासून तू क्षणभरही विश्रांती घेत नाहीस. राजवंशीयांना जागे करीत फिरायला अँकिअनांमध्ये तुझ्यापेक्षा तरुण असे पुरुष कोणीच नाहीत का ? तुला थकवा कसा तो माहीत नाही."

आणि जेरिनीचा उच्चकुलीन वीर नेस्तॉर उत्तरला, " माझ्या मुला, तू म्हणालास ते सारे खरे आहे. सेनाप्रमुखांना बोलावू शकतील असे मला चांगले मुलगे आहेत, तसे दुसरे पुष्कळ लोकही आहेत, पण अँकिअनांना अति गंभीर भय आहे ; जीवन व मरण जणु वस्तऱ्याच्या धारेइतक्या बारीक धाग्यावर लटकत आहेत. तर मग जा, कारण तू माझ्याहून तरुण आहेस, व तुझ्या दाक्षि-ण्याचा उपयोग करून अँजॅक्सला आणि द्रुतगती फिलिअसपुत्राला उठव."

तेव्हा दायोमिदने एका भल्या मोठ्या पिंगट सिंहाचे कातडे खांद्यावर टाकले---ते त्याच्या पायापर्यंत पोहचत होते---व आपला भाला हातात घेतला. त्या वीरांना उठवल्यानंतर त्यांना तो बरोबर घेऊन परत आला. मग ते पहाऱ्यावर असणाऱ्या साऱ्यांकडे फिरत फिरत गेले आणि पथकनायक स्वस्थानी झोपलेले नसून जागे व शस्त्रे हाताशी ठेवून बसलेले त्यांना दिसून आले. ज्या-प्रमाणे धनगरी कुत्रे, आवारात कोंडलेल्या मेंढरांच्या कळपावर पहारा करीत असता, डोंगरावरील अरण्यातून त्यांच्याकडे येणाऱ्या वन्यपशूची चाहूल येताच, एकदम कुत्र्यांचा व माणसांचा एकच कल्लोळ उठतो---अगदी त्याचप्रमाणे त्या संकटाच्या रात्री अँकिअन पहारे करीत असता, त्यांच्या डोळ्यांवरून झोप पार उडून गेली होती व त्रोजनांकडून थोडीही हालचाल ऐकू येताच, मैदानाच्या बाजूस ते एकसारखे वळून पहात होते. ते पाहून त्या वृद्ध पुरुषाला बरे वाटले व त्याने त्याना हुरुपात राहण्यास सांगितले. तो म्हणाला, " माझ्या मुलांनो पहारा चालू ठेवा, आणि झोपेचा पगडा तुमच्यावर बसू देऊ नका, नाहीतर आपल्या शत्रूची आपल्यावर सरशी होईल."

असे म्हटल्यानंतर तो व त्याच्यासह मंत्रणासभेसाठी बोलावून आणलेले इतर प्रमुख खंदकाजवळून पुढे गेले. मेरिऑनिझ व नेस्तॉरचा शूर पुत्र हेही त्यांच्याबरोबर गेले, कारण राजवंशीयांनी त्यांना बोलावले होते. भिंतीभोवताली खोदलेल्या त्या खंदकाच्या पार गेल्यानंतर, प्रेते नव्हती अशा मोकळ्या जागी त्यांनी सभा घेतली. रात्र पडली तेव्हा आरगॉस सैन्यावरची चढाई थांबवून हेक्तर परत वळला होता तो या ठिकाणापासूनच. ते खाली बसले व आपसात विचार करू लागले.

प्रथम नेस्तॉर बोलला, "माझ्या मित्रांनो, त्रोजनमध्ये शिरण्याचे धाडस करून, मागे रेंगाळलेल्या एकाद्याला पकडील, किंवा शत्रूचा काय विचार आहे याची खबर काढील––नगरीपासून दूर येथेच नौकांजवळ ते थांबणार आहेत, की आता ॲकिअन्सची दाणादाण उडवल्यानंतर परत आपल्या तटांच्या आत जाणार आहेत––ही माहिती आणील, असा कोणी पुरूष आपल्यात आहे का? हे सर्व जाणून घेऊन तो माणूस जर इथे सुखरूप परत आला तर त्याची कीर्ती सर्वांच्या मुखी स्वर्गाला पोहोचण्याइतकी उत्तुंग होईल आणि त्याला बहुमोल पारितोषिक मिळेल; कारण आपल्या सर्व नौकांवरचे प्रमुख प्रत्येकी कोकरासह एक काळी मेंढी त्याला देतील––आणि अशी देणगी अत्यंत मोलाची आहे–– शिवाय त्याला सर्व मेजवान्यांना व कुलसम्मेलनांना पाहुणा म्हणून आमंत्रणे मिळतील."

ते सगळे गप्प राहिले पण उच्चरवाने रणगर्जना करणारा दायोमिद म्हणाला, "नेस्तॉर, पलीकडच्या आपल्याविरुद्ध उभे ठाकलेल्या त्रोजनांच्या सैन्याला मी आनंदाने भेट देईन; पण माझ्याबरोबर जर दुसरा कोणी आला तर मला अतिशय सोईचे पडेल व मला जास्त आत्मविश्वासही वाटेल. दोघे लोक साथीने राहिले म्हणजे एकाच्या नजरेतून निसटलेली एकादी संधी दुसऱ्याला दिसू शकते. मनुष्य एकटाच असला म्हणजे युक्त्या-प्रयुक्त्या कमी पडतात व एकटी बुद्धीही कमी काम देते."

यावर कित्येकजण दायोमिदसह जाण्यास तयार झाले. मार्ससेवक असे उभय ॲजॅक्स, मेरिऑनिझ व नेस्तॉरचा पुत्र या सर्वांना, त्याचप्रमाणे ॲत्रिअसपुत्र मेनेलॉसलाही जाण्याची इच्छा झाली; आणखी युलिसिसलाही त्रोजनांच्या सैन्यात जाण्यास हवे होते, कारण तो नेहमीचाच साहस वृत्तीचा होता; आणि तेव्हा नृपती ॲगॅमेम्नॉन म्हणाला, "दायोमिद, तायदिअसपुत्रा, माझ्या मनोमान्य पुरुषा, तुझा सोबती तूच निवड––जे तयार झाले आहेत त्यांच्यातला सर्वोत्तम मनुष्य घे, कारण आता पुष्कळजण तुझ्याबरोबर जाऊ इच्छीत आहेत. भिडेस

पडून अधिक चांगल्या माणसाला नाकारून, जास्त उच्च राजवंशीय रक्ताचा म्हणून एकाद्याच्या उच्चकुळाला मान देण्याखातर, कमी पात्रतेच्या माणसाची निवड करू नकोस."

तो असे म्हणाला कारण त्याला मेनेलॉसची निवड होईल अशी काळजी वाटत होती. दायोमिद म्हणाला, "जर माझ्या निवडीचा मनुष्य बरोबर घ्यायला सांगत असशील तर मग ज्याच्यापेक्षा सर्व प्रकारच्या संकटांना–तोंड देण्यास उत्सुक असा दुसरा कोणी नाही––व पॅलास मिनर्व्हालाही जो अति प्रिय आहे, त्या युलिसिसचा आधी विचार करण्यास मी कसा चुकेन ? तो जर माझ्या बरोबर आला तर आम्ही प्रत्यक्ष अग्नीमधूनसुद्धा सुखरूप निभावून जाऊ कारण त्याची दृष्टी व समजही तल्लख आहे."

युलिसिसने उत्तर दिले, "तायदिअसपुत्रा, माझ्यासंबंधी चांगले किंवा वाईट काहीच बोलू नको ; कारण मला जे चांगले ओळखतात अशा आरगॉसवासीयां-मध्येच तू बोलतो आहेस. आपण चालायला लागू या, कारण रात्र सरत येत आहे व पहाट लौकरच होणार आहे. तारका क्षितीजावर पुढे सरकल्या आहेत, रात्रीचे दोन भाग आताच उलटून गेले आहेत आणि आपल्याला केवळ तिसराच भाग उरला आहे."

मग त्यांनी आपली चिलखते चढवली. शूर थ्रॅसियिदिझने तायदिअसपुत्राला खड्ग व ढाल मिळवून दिली (कारण त्याची स्वत:ची शस्त्रे त्याच्या नौकेवरच राहिली होती) आणि त्याच्या मस्तकावर टोक किंवा तुरा नसलेले बैलाच्या चामड्याचे शिरस्त्राण ठेवले ; त्याला एक प्रकारची माकडटोपी म्हणतात व ते एक सर्वसामान्य वापरातले शिरोभूषण आहे. युलिसिससाठी मेरिऑनिझने एक धनुष्य व बाणांचा भाता शोधून काढला, आणि त्याच्या डोक्यावर चाम-ड्याच्या मजबूत वाद्यांनी विणलेले अस्तर आतून व बाहेरून रानडुकराचे दात मोठ्या कसबाने, दाटीने बसवलेले असे कातड्याचे शिरस्त्राण ठेवले ; त्याला डोक्यालगत शिवाय एक नमद्याचे अस्तर आतून लावलेले होते. ऑर्मेनसपुत्र ॲमिन्तॉर याचे घर फोडले त्यावेळी ऑतोलिकसने एलिऑनमधून हे शिरस्त्राण चोरले होते. ते स्कॅन्दिआला नेण्यासाठी त्याने सिथेराच्या ॲम्फिदॅमाजला दिले आणि त्याने अतिथी-उपहार म्हणून ते मोलसला दिले; मोलसने ते आपला पुत्र मेरिऑनिझ याला दिले व आता ते युलिसिसच्या मस्तकावर ठेवण्यात आले होते.

जेव्हा ही जोडी शस्त्रसज्ज झाली, तेव्हा ते दोघे निघाले व इतर प्रमुखाना त्यांनी मागे टाकले. पॅलास मिनर्व्हाने त्यांच्या मार्गावर उजव्या बाजूस एक सारस शकून म्हणून पाठवला. अंधारात तो त्यांना दिसला नाही पण त्याचा

शब्द ऐकू आला. तो ऐकून युलिसिसला आनंद झाला आणि त्याने मिनर्व्हाची प्रार्थना केली, "ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या कन्ये, माझी प्रार्थना ऐक ; माझ्या सर्व मार्गांवर गुप्त नजर ठेवणारी व माझ्या साऱ्या विपत्तीत माझ्या बाजूला राहणारी तूच आहेस ; या माझ्या बिकटक्षणी माझी साह्यकर्ती हो, व वरदान दे की त्रोजन्सना दुःखकारक होईल असे एकादे महान साहस यशस्वी करून आम्ही उज्जवल कीर्ती प्राप्त करून घेऊन नौकांकडे परत येऊ."

मग उच्चरवाने रणगर्जना करणाऱ्या दायोमिदनेही प्रार्थना केली, "अक्लान्त जव्हकन्ये, माझी विज्ञप्तीही श्रवण कर ; माझा श्रेष्ठ पिता तायदिअस हा ॲकिअनांनी धाडलेला दूत म्हणून जेव्हा थीब्झ्‌ला गेला तेव्हा जशी तू त्याला संगत दिलीस तशीच मलाही दे. इसोपस नदीच्या तीरांवर ॲकिअनांना सोडून शांतिसंदेश घेऊन तो शहरात कॅद्‌मिअन्सकडे गेला ; तेथून परतल्यावर, देवी, तुझ्या साह्याने त्याने मोठमोठी धाडसाची कृत्ये केली ; कारण तू त्याची सदैव तत्पर अशी उपकर्ती होतीस. अगदी तसेच मार्गदर्शन आता मला करून माझा सांभाळ कर ; मग परतफेड म्हणून मी तुला, एक न माणसाळवलेली, माणसाने जोखडाखाली कधीही न आणलेली एक वर्षाची, रुंद कपाळाची कालवड यज्ञात समर्पण करीन. तिची शिंगे सुवर्णाने मढवून तुझ्या प्रीत्यर्थ मी तिची यज्ञाहुती देईन."

अशा प्रार्थना त्यांनी केल्या व पॅलास मिनर्व्हाने त्या ऐकल्या. थोर जव्हच्या कन्येची प्रार्थना करून झाल्यावर ते दोघे रणांगणी मरून पडलेल्या वीरांच्या शस्त्रास्त्रांतून व रक्तलांछित देहांमधून वाट काढीत शिकारीच्या मागावर रात्री फिरणाऱ्या दोन सिंहासारखे आपल्या मार्गाला लागले.

मग हेक्तरनेही त्रोजनांना पुन्हा झोपू दिले नाही ; त्यानेही त्रोजनांचे राजवंशीय व मंत्री यांना आपली सल्ला त्यांच्यापुढे ठेवण्यासाठी बोलावले. तो म्हणाला, "मी आता सांगणार आहे ते काम मोठ्या पारितोषिकासाठी करील असा कोणी तुमच्यात आहे का ? ते काम त्याने केले तर त्याला चांगला मोबदला मिळेल; हे साहस त्याने केले तर त्याला मी एक रथ आणि ॲकिअनांच्या नौकांपाशी सापडतील त्यातले सर्वात वेगवान दोन घोडे देईन; शिवाय त्याला अपार मानही मिळेल तो वेगळाच. या माणसाने नौकांजवळ जाऊन, त्या आतापर्यंत होत्या तशाच सक्त पहाऱ्याखाली आहेत, की आता आपण ॲकिअनांचा पराभव केल्यामुळे त्यांचा पळून जाण्याचा बेत आहे, व निव्वळ थकवा आल्यामुळे ते पहाऱ्याची हयगय करीत आहेत, याचा शोध काढायचा."

ते सगळे गप्प राहिले ; पण त्रोजनांमध्ये दोलॉन नावाचा कोणी एक मनुष्य होता, तो युमिदिस नामक विख्यात व सोन्याब्राँझनें संपन्न अशा घोषणादूताचा पुत्र ; त्याला रूप नव्हते पण तो पळण्यात पटाईत होता. पाच बहिणीत तो एकुलता एक भाऊ होता. तो आता त्रोजनांना उद्देशून बोलला, "हेक्तर, मी नौकांकडे जाऊन आपला फायदा होईल असा काही त्यांचा सुगावा काढून आणण्याचे धाडस करीन. पण आधी तुझा राजदण्ड उंच धरून शपथ घे की ब्राँझने भूषवलेला रथ व पेलिअसच्या उदात्त पुत्राला सध्या वाहून नेणारे घोडे तू मला देशील. मी तुझ्या हेराचे काम उत्तम बजावीन व तुझी निराशा होऊ देणार नाही. मी त्या सैन्यामधून या टोकापासून त्या टोकापर्यंत फिरत जाऊन अॅगॅमेम्नॉनच्या नौकेपाशी पोहोचेन. माझा असा तर्क आहे की यावेळी तेथेच अॅकिअनांचे राजवंशीय यापुढे लढावे की पळून जावे याबद्दल चर्चा करीत आहेत."

त्याचे बोलणे झाल्यावर हेक्तरने आपला राजदण्ड उंच धरला व त्या माणसाला हवी होती तशी शपथ घेतली ; तो म्हणाला, "ज्यूनोचा मेघगर्जनाकारी पती जव्ह साक्षी असो, की तुझ्याशिवाय दुसरा कोणीही त्रोजन त्या घोडयांवर आरूढ होणार नाही आणि पुढे ते कायमचे तुझ्या आधीन राहतील."

त्याने घेतलेली ती शपथ पुढे निरुपयोगी ठरणार होती ; पण तिच्यामुळे दोलॉन जाण्यास अधिक आतूर झाला. त्याने खांद्यावर आपले धनुष्य अडकवले व अंगभर आवरण म्हणून करडया लांडग्याचे कातडे पांघरून डोक्यावर फेरेट (नेवला) नामक प्राण्याच्या कातडयाची टोपी ठेवली. मग त्याने एक अण-कुचीदार हलका भाला घेतला व नौकांकडे जाण्यासाठी तो छावणीतून निघाला, पण हेक्तरसाठी काही वार्ता घेऊन तो परत यायचा नव्हता. घोडे व सैनिक मागे टाकून जेव्हा तो पुढे निघाला तेव्हा त्याने वाटेत आपला वेग पुष्कळ वाढवला, पण तो येत असलेला युलिसिसने पाहिले व दायोमिदला म्हटले, "दायोमिद, हा बघ कोणीतरी छावणीकडून येतो आहे ; तो कोणी हेर का मेलेल्यांच्या देहांवरील वस्तू लुटू पाहणारा कोणी चोर आहे याची मला खात्री नाही ; आपल्या अंगावरून त्याला थोडे पुढे जाऊ दे, मग त्याच्यावर झडप घालून त्याला आपल्याला पकडता येईल. तथापि तो जर आपल्याहून अधिक चपळ निघाला तर तू भाला घेऊन त्याच्यामागे जा व त्याला अडवीत त्रोजन छावनीकडून आपल्या नौकांकडे वळव म्हणजे त्याला परत नगरीत जाता येणार नाही."

एवढे बोलून ते आपली वाट सोडून प्रेतांच्यामध्ये पडून राहिले. दोलॉनला काही संशय आला नाही व तो थोडयाच वेळात त्यांच्यापुढून गेला, पण तो

साधारणपणे बैलाच्या नांगराने पाडलेल्या चरापेक्षा खेचराच्या नांगराने पाडलेला चर जितका जास्त लांब असतो (कारण खेचरे बैलांपेक्षा पडीत जमीन कमी वेळात नांगरु शकतात) तितका दूर जाताच ते त्याच्यामागे पळत गेले, आणि त्यांच्या पावलांचा आवाज ऐकून तो निश्चल उभा राहिला ; कारण त्याला नक्की वाटले की हेक्तरच्या आज्ञेने त्याच्या छावणीतून त्याला परत बोलावण्यासाठी आलेले ते मित्रपक्षीयच असणार ; तथापि ते जेव्हा भालाफेकी इतक्या किंवा त्याच्याहून कमी अंतरावर आले तेव्हा ते शत्रू आहेत हे ओळखून तो पाय नेतील तितक्या त्वरेने पळून जाऊ लागला. त्या दोघांनी तात्काल त्याचा पाठलाग सुरू केला आणि पुढे किंचाळत जाणाऱ्या हरिणी किंवा सशामागे उत्तम शिकवलेल्या शिकारी कुत्र्यांची जोडी जशी नेटाने धावते, अगदी तसेच तायदिअसपुत्र व युलिसिस दोलॉनमागे धावले व स्वजनांकडे परत जाण्याचा त्याचा मार्ग त्यांनी बंद करून टाकला. पण जेव्हा तो अगदी कडेच्या पहाऱ्याच्या हातात पडण्याइतका दूरवर नौकांकडे पळत आला तेव्हा दुसऱ्या कोणा ॲकिअनला त्याच्यावर पहिला घाव घालण्याचे श्रेय लाभेल व आपल्या भक्ताचा क्रम नंतर लागेल या भीतीने मिनर्व्हाने तायदिअसपुत्राला आणखी जास्त शक्ती दिली ; तेव्हा भाला हाती धरून त्याने पुढे उडी घेतली व म्हटले, "उभा रहा, नाहीतर मी भाला फेकीन, आणि तसे केले तर लौकरच माझ्या हातून तुझा अन्त होईल."

बोलता-बोलता त्याने भाला फेकला, पण नेम मुद्दामच चुकवला. त्या माणसाच्या उजव्या खांद्यावरून हवेतून उडत जाऊन तो भाला जमिनीत रुतला. तो मनुष्य एकदम जागच्याजागी उभा राहिला. अत्यंत भयभीत होऊन तो थरथरा कापू लागला, त्याचे दात कडकड वाजू लागले व घाबरून तो फिक्का पडला. ते दोघे धापा टाकीत त्याच्यापाशी आले व त्यांनी त्याचे हात पकडले. त्यावर तो रडू लागला व म्हणाला, "मला जिवंत धरा, स्वतःसाठी मी खंडणी देईन ; आमच्याकडे सोन्याचा, ब्राँझचा व घडीव लोखंडाचा मोठा संचय आहे. जर मी ॲकिअनांच्या नौकांपाशी जिवंत आहे हे माझ्या पित्याला समजले तर, त्या साठ्यातून तो फार मोठी खंडणी भरून तुम्हाला संतुष्ट करील."

युलिसिस म्हणाला, "भिऊ नकोस, मरणाचा विचार मनात आणू नको; पण मला सांग व खरे सांग की दुसरी माणसे निजली असता ऐन रात्री एकटा आपल्या छावणीपासून दूर व नौकांकडे असा तू कशाला चालला आहेस ? ठार झालेल्यांचे देहावरील चीजवस्तू लुटण्यासाठी की नौकांकडे काय चालले आहे त्याची टेहळणी करायला हेक्तरने तुला पाठवले म्हणून, का तू नुसता स्वतःच्या कल्पनेने इकडे आलास ?"

हातपाय लटपटत असलेल्या दोलॉनने उत्तर केले, " माझ्या स्वतःच्या अधिकारात विवेकी निर्णयाविरुद्ध हे करण्यास हेक्तरने पोकळ लालुच दाखवणारी वचने देऊन मला मोह पाडला ; तो म्हणाला की पेलिअसच्या उदात्त पुत्राचे घोडे व त्याचा ब्राँझने भूषविलेला रथ तो मला देईल. त्याने मला सांगितले की सरत्या रात्री काळोखात व शत्रूच्या अगदी जवळ पोच व आतापर्यंत होता तसा नौकांवर बंदोबस्त आहे, का आता आपण ॲकिअनांचा पराभव केल्यामुळे ते पळून जाण्याच्या तयारीत असून निव्वळ थकवा आल्यामुळे पहाऱ्याची हयगय करीत आहेत याचा शोध लाव."

युलिसिसने त्याच्याकडे पाहून स्मित केले व उत्तर दिले, " खरोखर फार मोठ्या पारितोषिकावर तुझा जीव जडला होता, पण ईकसच्या वंशजाचे घोडे, ज्याची माता अमर होती त्या स्वतः ॲकिलिझखेरीज अन्य कोणा मर्त्यमानवाला आवरणे किंवा हाकणे दुरापास्तच आहे. पण मला सांग व खरे सांग, तू निघालास तेव्हा हेक्तर कोठे होता ? त्याचा शस्त्रसंभार व घोडे कोठे आहेत ? त्याचप्रमाणे त्रोजन्सचे पहारे व झोपण्याच्या जागांची रचना कशी आहे ? त्यांचे पुढील बेत काय आहेत ? ते इथे नगरीपासून दूर नौकांजवळच राहणार आहेत की आता त्यांनी ॲकिअनांचा पूर्ण पराभव केल्यानंतर ते आपल्या तटांच्या आत निघून जाणार आहेत ?"

आणि दोलॉनने उत्तर दिले, " मी तुला सगळे खरे खरे सांगेन. हेक्तर आणि इतर मंत्री आता सर्वसाधारण गडबडीपासून दूर, थोर इलसच्या स्मारकाजवळ मसलतीसाठी सभा भरवीत आहेत. ज्या पहारेकऱ्यांबद्दल तू मला विचारतोस त्यांचेबाबत म्हणशील तर सैन्यावर राखण ठेवण्यासाठी निवडलेले असे कोणी खास पहारेकरी नाहीत. त्रोजनांकडे त्यांच्या पहाऱ्याच्या शेकोट्या आहेत, त्या ठेवणे त्यांना प्राप्तच आहे ; तेव्हा ते सारेच जागे आहेत व एकमेकांना राखणदारीच्या कामी सावध ठेवीत आहेत. पण दुसऱ्या ठिकाणांहून आलेले मित्रपक्षीय झोपलेले असून त्यांची बायकामुले येथे नसल्याने राखणदारीचे काम त्यांनी त्रोजनांकडेच राहू दिले आहे."

युलिसिस मग म्हणाला, " आता मला सांग, ते मित्रपक्षीय लोक त्रोजनांच्या सैन्यामध्येच झोपलेले आहेत की त्यांची निजण्याची जागा दुसरी आहे ? याचा खुलासा कर म्हणजे माझ्या सारे लक्षात येईल."

आणि दोलॉनने उत्तर दिले, " मी सगळे तुला खरेखरे सांगतो. समुद्राच्या बाजूला कॅरिअन्स, पीओतिअन धनुर्धर, लेलेजीज, कॉकोनिअन्स आणि थोर पेलास्गी तळ टाकून पडले आहेत. लिसिअन्स, गर्विष्ठ मिसिअन्स, तसेच

फिजिअन्स व मिऑनिअन्स यांची ठिकाणे थिम्ब्राकडील बाजूस आहेत ; पण या सगळ्यांबद्दल अशाला एवढी चौकशी ? त्रोजनांच्या सैन्यात जाण्याचा मार्ग तुम्हाला शोधून काढायचा असेल तर आणखी सांगतो ऐका. छावणीच्या अगदी दूरच्या टोकाला, सगळ्यांपासून निराळ्या जागी, नुकतेच येथे आलेले थ्रेसिअन्स तळ देऊन पडले आहेत, आणि त्यांचा राजा आहे ऐओनिअसपुत्र ऱ्हीसस. मी पूर्वी कधी पाहिले नाहीत इतके सर्वोत्कृष्ट व बळकट असे त्यांचे घोडे आहेत, बर्फाहून पांढरे व कुठल्याही वाहत्या वाऱ्यापेक्षा वेगवान. त्याचा रथ चांदी-सोन्याने भूषवलेला आहे व त्याने दुर्मिळ कारागिरीचे त्याचे अद्भुत सोन्याचे चिलखत आणले आहे ; ते इतके उत्कृष्ट आहे की कोणाही मर्त्य-मानवाची ते धारण करण्याची पात्रता नाही, केवळ देवांनाच योग्य असे ते आहे. तेव्हा आता मला नौकांकडे तरी घेऊन चला नाही तर माझे सांगणे खरे की खोटे ते पारखून परत येईपर्यंत येथेच घट्ट बांधून ठेवा."

दायोमिद त्याच्याकडे कठोरपणे पाहून म्हणाला, "दोलॉन, तू कितीही चांगली माहिती आम्हाला दिली असलीस, तरी आमच्या हाती एकदा आल्यानंतर तू सुटून जाशील असे समजू नकोस ; कारण आम्ही जर तुझ्यासाठी खंडणी घेतली किंवा तुला जाऊ दिले तर तू पुन्हा दुसऱ्या खेपेला हेर म्हणून किंवा उघडशत्रू म्हणून ॲकिअनांच्या नौकांकडे येशील ; पण मी तुला ठार मारून तुझा शेवट केला तर मग तू आम्हाला आणखी उपद्रव देणार नाहीस."

यावर त्याची आणखी विनवणी करण्यासाठी दोलॉनने त्याची दाढी धरली असती पण दायोमिदने आपल्या खड्गाने त्याच्या मानेच्या मध्यभागी घाव घालून त्याचे दोन्ही स्नायू तोडले त्यामुळे तो बोलत असतानाच त्याचे शिर तुटून धुळीत लोळत पडले. त्याच्या डोक्यावरील फेरेट-कातड्याची टोपी, तसेच त्याचे लांडग्याचे कातडे, धनुष्य व लांब भाला त्यांनी घेतला व लुटीची देवता मिनर्व्हा हिच्या सन्मानार्थ युलिसिसने त्या सर्व वस्तू उंचावर धरून प्रार्थना केली, "देवी, यांचा स्वीकार कर, कारण ऑलिम्पसच्या सर्व देवीपेक्षा तुला अधिक मानून त्या आम्ही तुला अर्पण करीत आहोत. म्हणून थ्रेसिअन्सच्या घोड्यांकडे व निद्राभूमीकडे आणखी पुढे जाण्यास आम्हाला साहाय्य कर."

या शब्दांनिशी त्याने ती लूट घेऊन एका सदा-हरित वृक्षावर टांगली आणि अंधेराच्या सरत्या घटिकात परत येते वेळी ती नजरेतून निसटू नये म्हणून तेथील वांबूची ताटे उपटून व सदा-हरित वृक्षाच्या डहाळ्या गोळा करून त्या जागेवर खूण ठेवली. मग विखुरलेल्या शस्त्रास्त्रांतून व रक्ताच्या पाटातून ते पुढे गेले आणि लौकरच दिवसाच्या श्रमाने थकलेले थेसिअन सैनिक-पथक जेथे झोपले

होते तेथे आले. त्यांची सुबक शस्त्रास्त्रे त्यांच्याबाजूला भूमीवर मोठ्या व्यवस्थितपणे तीन ओळीत मांडून ठेवलेली होती आणि प्रत्येकाच्या शेजारी त्याच्या घोडयांची धुरा ठेवलेली होती. त्यांच्या मध्यभागी ऱ्हीसस झोपला होता व जवळच त्याचे घोडे त्याच्या रथाच्या सर्वात वरच्या कडेला बांधून ठेवले होते. युलिसिसने थोडया दूर अंतरावरून त्याला पाहिले आणि तो म्हणाला, "दायोमिद, आपण ठार मारलेल्या दोलॉनने ज्याच्याबद्दल आपल्याला सांगितले तोच हा पुरुष व हेच त्याने वर्णन केलेले घोडे. आता तू आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा कर ; तुझ्या शस्त्रास्त्रांवर वेळ घालवू नकोस, तर तात्काळ ते घोडे सोडव——नाही तर तू स्वत: या लोकांना मार तोपर्यंत घोडयांचे काय ते मी करतो."

त्यावर मिनर्व्हाने दायोमिदच्या हृदयात धैर्याचा प्रादुर्भाव केला आणि त्याने दुतर्फा त्यांच्यावर घाव हाणले. त्यांची अशी लांडगेतोड होत असता ते भेसूरपणे विवळत होते आणि त्यांच्या रक्ताने भूमी लाल झाली. संरक्षक मेंढपाळा-शिवायच मेंढयाचा किंवा शेळयांचा कळप चरताना पाहून सिंह जसा त्वेषाने त्यांच्यावर झडप घालतो, तसा बारा थेसिअन सैनिक ठार होईपर्यंत तायदिअस-पुत्र त्यांच्यावर तुटून पडला होता. जसजसा तो त्यांना मारीत गेला तसतसा युलिसिस तेथे येऊन त्या एकेकाला पाय धरून ओढून बाजूला करीत होता. त्यांच्या मृत देहाचे बाजूने पुढे जाताना घोडयांनी घाबरू नये, मोकळेपणी पुढे जावे म्हणून युलिसिसने तसे केले. कारण या घोडयांना अजून मृतदेह ओलांडून पुढे जाण्याची सवय झाली नव्हती. तायदिअसपुत्र राजापाशी आला तेव्हा त्यालाही त्याने ठार केले (व अशी मृतांची संख्या तेरा झाली). तो राजा त्यावेळी जोरजोराने श्वासोच्छ्वास करीत होता, कारण मिनर्व्हाच्या सांगण्यावरून ईन्यूसचे बीज,——एक दुःस्वप्न त्याच्या डोक्यावर त्या रात्री घोटाळत होते. दरम्यान युलिसिसने घोडे सोडून एकमेकाशी बांधले व रथातून चाबूक घेण्याचे विसरल्यामुळे, आपल्या धनुष्याचे फटके मारीत हाकून नेले. मग त्याने दायोमिदला शीळ घालून खूण केली.

पण दायोमिद दुसरे कुठले तरी धाडसी कृत्य करता येईल का असा विचार करीत तेथेच थांबला. राजाचे चिलखत ज्यात पडले होते तो रथ दांडयाने ओढून बाहेर काढावा की चिलखत उचलून, घेऊन जावे हा प्रश्न त्याला पडला होता ; शिवाय पुन्हा त्याला असेही वाटले की आणखी काही थेसिअन्स का मारू नयेत ? असा तो घुटमळत असता मिनर्व्हा त्याच्यापाशी येऊन म्हणाली, "दायोमिद, नौकांकडे आपण होऊन परत जा, नाहीतर

दुसऱ्याकोणी देवाने त्रोजनांना जागे केले तर ते तुझी तिकडे हकालपट्टी करतील."

बोलणारी ती देवी होती हे दायोमिदने ओळखले आणि तात्काल त्याने घोड्यावर उडी घेतली. युलिसिसने त्यांना धनुष्याने झोडपले आणि ते ॲकिअनांच्या नौकांकडे दौडत गेले.

पण ॲपोलो काही आंधळ्यासारखा बसला नव्हता. तो चांगलाच डोळसपणे जागृत होता व त्याने तायदिअसपुत्रापाशी मिनर्व्हाला पाहिले. तो तिच्यावर संतापला व त्रोजनांच्या सैन्याकडे येऊन त्याने थेसिअनांचा एक मंत्री व ऱ्हीससचा कुलीन भाऊबंद हिप्पोकोउन यास जागे केले. हा झोपेतून जागा होऊन एकाएकी उठून बसला व त्याने पाहिले की घोडे आपापल्या जागेवर नाहीत आणि सैनिक मरण यातनांनी व्याकूळ झाले असून त्यांना श्वास लागला आहे. हे पाहून तो मोठ्याने किंचाळला व आपल्या मित्राला त्याने नाव घेऊन हाका मारल्या. तेव्हा संबंध त्रोजन छावणीत हलकल्लोळ उडाला. लोक घाईघाईने जमू लागले आणि आता नौकांकडे निसटून गेलेल्या वीरांचे कृत्य पाहून आश्चर्य व्यक्त करू लागले.

हेक्तरच्या हेराला मारले होते त्या ठिकाणी ते दोघे जेव्हा पोहोचले, तेव्हा युलिसिसने घोडे थांबवले आणि तायदिअसपुत्राने जमिनीवर उडी मारून तेथे ठेवलेली रक्तबंबाळ लूट युलिसिसच्या हाती दिली, व तो पुन्हा घोड्यावर बसला ; मग त्यांनी घोड्यांना पुढे जाण्यासाठी फटकारले आणि घोडेही जणू स्वतःच्याच इच्छेने निघाल्यासारखे उत्साहाने नौकांकडे धावले. त्यांच्या टापांचे आवाज आधी नेस्तॉरच्या कानावर पडले. तो म्हणाला, "माझ्या मित्रांनो, आरगॉसच्या राजवंशीयांनो व मंत्र्यांनो, माझा तर्क खरा ठरेल की खोटा ?——पण मला जे वाटते आहे ते बोललेच पाहिजे ; घोड्यांच्या टापांसारखा आवाज माझ्या कानी येत आहे. मला आशा आहे की ते दायोमिद व युलिसिस त्रोजनांकडून घोडे हाकून आणीत असतील ; पण मला अशीही फार धास्ती वाटते की त्या सर्वात शूर आरगॉसवासीयांना त्यांच्या हातून काही अपाय तर झाला नसेल !"

त्याचे बोलणे पुरे होते न होते तोच ते दोघे पुरुष पुढे येऊन घोड्यांवरून उतरले, तेव्हा इतरांनी अगदी आनंदाने त्यांच्याशी हस्तांदोलन करून त्यांचे अभिनंदन केले. जेरिनीचा उच्चकुलीन वीर नेस्तॉर हा त्यांना प्रश्न करणारा पहिला पुरुष होता. तो म्हणाला, "ख्यातनाम युलिसिस, मला सांग हे घोडे तुम्हा दोघांना कसे मिळाले ? तुम्ही त्रोजन सैन्यात चोरून शिरलात की कोणी देव

तुम्हाला भेटला व त्याने हे तुम्हाला दिले ? हे घोडे सूर्यकिरणांसारखे आहेत. मी त्रोजनांशी चांगला परिचित आहे ; कारण जरी मी वृद्ध योद्धा असलो तरी मागे नौकांपाशी कधीही राहात नाही. पण या घोड्यांसारखे दुसरे अजून कधी मी पाहिले नाहीत, की त्यांच्याविषयी कधी ऐकलेही नाही. खरोखर कोणीतरी देव तुम्हाला भेटला असला पाहिजे, व हे घोडे त्याने तुम्हाला दिले असावेत, कारण तुम्ही दोघेही जव्हला व जव्हकन्या मिनर्व्हाला प्रिय आहात".

आणि युलिसिसने उत्तर दिले, "नेलिअसपुत्रा नेस्तॉर, ॲकियन या नावाला गौरव प्राप्त करून देणाऱ्या स्वर्गस्थ देवांची इच्छा असेल तर यांच्याहूनही चांगले घोडे ते आम्हाला देऊ शकतील. कारण आम्ही आहोत त्यापेक्षा देव फारच अधिक बलशाली आहेत. तथापि ज्यांच्याबद्दल तू विचारीत आहेस ते हे घोडे नुकतेच थ्रेसहून आले आहेत. दायोमिदने त्यांच्या राजाला त्याच्या सर्वांत शूर अशा बारा सोबत्यांसकट ठार मारले. नौकांच्या जवळपासच आम्ही तेराव्याचा जीव घेतला--तो हेक्तरने व इतर त्रोजनांनी आपल्या नौकांची टेहळणी करण्यासाठी पाठवलेला एक हेर होता".

हे बोलत असता तो हसला व त्याने घोडे खंदकापलीकडे हाकले ; तेव्हा इतर ॲकिअन्स आनंदाने त्याच्या मागोमाग गेले. जेव्हा ते तायदिअसपुत्राच्या मजबूत निवासापाशी पोहोचले, तेव्हा त्यांनी चामड्याच्या वाद्यांनी घोडे गव्हाणीला बांधले ; तेथेच दायोमिदचे घोडे त्यांना घातलेले गोड मक्याचे दाणे खात उभे होते ; पण युलिसिसने दोलॉनची रक्तबंबाळ लूट आपल्या नौकेच्या पिछाडीला टांगून ठेवली ; कारण मग सर्वांना मिनर्व्हास ते सारे पवित्र बलिदान म्हणून समर्पण्याची तयारी करायची होती. ते स्वतः मग समुद्रात शिरले व त्यांनी अंगावरचा, मानेचा व मांड्यांचा घाम धुवून काढला. सागरजलाने त्यांचा सारा घाम धुवून गेल्यावर व त्यांना ताजेतवाने वाटू लागल्यावर त्यांनी स्नानगृहात जाऊन स्नाने केली. ते झाल्यावर अंगाला तेल लावून घेतल्यावर ते मेजापाशी बसले आणि पुऱ्या भरलेल्या मिश्रण-पात्रातून मद्य घेऊन त्यांनी मिनर्व्हाला मद्यार्घ्ये दिली.



## सर्ग ११

आणि आता, मर्त्य व अमर या दोघांनाही प्रकाश देणारा अग्रदूत जो तिथोनस, त्याच्या शेजारून आपल्या शय्येवरून 'उषा' जशी उठली, तशी जव्हने चंडिका 'विग्रहा' हिला हातात युद्धाचा ध्वज देऊन ॲकिअनांच्या नौकांकडे धाडली. सर्वांच्या मध्यभागी असलेल्या युलिसिसच्या नौकेच्या प्रचण्ड काळ्या मुख्यभागाजवळ ती उभी राहिली ; या हेतूने की दोन्ही बाजूना तिचा आवाज जास्तीत जास्त दूरवर पोचावा,—एका बाजूस तेलेमॉनपुत्र अजॅक्सच्या तंबूकडे व दुसऱ्या बाजूस ॲकिलिझच्या ; कारण या दोन वीरांनी स्वबलावर पूर्ण विश्वास असल्यामुळे मोठ्या धैर्याने नौकावलीच्या दोन्ही टोकाना आपापल्या नौका तीरावर ओढून लावल्या होत्या. त्या स्थानी उभी राहून तिने केलेल्या उच्च व कर्कश उत्क्रोशाने ॲकिअनांना खूपच धीर आला व निश्चयपूर्वक व सर्व ताकद पणास लावून लढण्याचा त्यांना हुरुप आला. आपल्या नौकांतून घरी जाण्यापेक्षा तेथेच राहून युद्ध करावे असा निश्चय त्यांनी केला.

ॲत्रिअसपुत्राने चिलखत चढवीत जोराने ओरडून ॲकिअनांना लढाईकरता कंबर कसण्याची आज्ञा केली. प्रथम त्याने पोटऱ्यांना सुबक कवचे बांधून घोटयांशी चांदीच्या चापांनी ती घट्ट केली ; सिनीराझने एकदा अतिथी-उपहार म्हणून दिलेले वक्षकवच त्याने छातीवर बसवले ; ॲकिअन समुद्रमार्गे त्रॉयवर चालून जाणार ही वार्ता दूर सायप्रसपर्यंत दुमदुमली होती म्हणून त्याने तेव्हा ही देणगी राजाला दिली होती. त्या कवचावर गर्द नीलखनिजाचे बारा पत्रे, सोन्याचे बारा व कथलाचे दहा ठोकलेले होते. त्याच्यावर नील खनिजाचे सर्प एकेका बाजूस तीन असे गळ्याकडे डोकी उंचावत गेलेले चित्रित केले होते, ते सॅटर्नपुत्राने आकाशात मर्त्य मानवासाठी सूचक खूण म्हणून प्रगटवलेल्या इंद्रधनुष्यासारखे होते. त्याने खांद्याभोवती अडकवलेल्या खड्गाला सोन्याच्या गुंड्या जडवलेल्या असून चांदीच्या खड्गकोशाला टांगण्याकरिता सोन्याची साखळी होती. शिवाय युद्धात त्याचे शरीर संपूर्णपणे झाकील अशी भारी नक्षीकामाची ढाल त्याने घेतली. ती दिसायला सुंदर असून तिच्याभोवती वाटोळी दहा ब्रॉझची वर्तुळे बसवली होती. ढालीच्या पृष्ठभागी शुभ्रकथलाच्या दहा गुंड्या व मध्यभागी नील खनिजाचा एक गंड होता, त्याच्यावर क्रूर व निष्ठुर मुद्रेच्या गॉर्गनि हडळीचे डोके कोरले असून दोन बाजूना 'विध्वंस'

व ' विप्लव ' ही प्रतीके कोरलेली होती. ढालीचा हातात अडकवण्याचा पट्टा चांदीचा असून त्याच्यावरच्या नील खनिजाच्या नागमोडी सर्पाच्या मानेतून निघालेली तीन डोकी एकमेकात गुंफली होती.

अॅगॅमेम्नॉनने डोक्यावर पुढेमागे टोके असलेले आणि वर भीषणपणे डोलणारे चार अश्वपुच्छ केशांचे चार तुरे बसवलेले शिरस्त्राण घातले, मग त्याने ब्राँझने मढवलेले दोन दुर्दम्य भाले हाती घेतले आणि त्याच्या शस्त्रसंभाराची चमक गगनात एखाद्या ज्वालेसारखी लखलखली तेव्हा वैभवशाली मायसिनीच्या त्या राजाच्या सन्मानार्थ ज्यूनो व मिनर्व्हा यांनी मेघगर्जना दुमदुमविली.

आता प्रत्येक माणसाने त्याचे घोडे खंदकाजवळ तयार ठेवण्यासाठी सारथ्याच्या ताब्यात दिले आणि संपूर्ण कवच-शस्त्र-सज्ज होऊन पायउतार होऊन तो युद्धात चालून गेला, तेव्हा तो प्रचंड कोलाहल नुकत्याच फटफटलेल्या आकाशापर्यंत उंच पोहोचला. घोडे तिथवर पोहोचण्यापूर्वीच खंदकाजवळ सेनाप्रमुख शस्त्रसज्ज होऊन तयार होते, लौकरच घोडेही आले. त्यांच्या सैन्याला अभद्र ध्वनीचे एक दुश्चिन्ह सॅटर्नपुत्राने ऐकवले व रक्ताने लाल झालेले दहिवर पडू लागले, कारण तो देवराज पुष्कळ शूर पुरुषांना त्वरेने खाली हेदिझकडे त्या दिवशी धाडणार होता.

दुसऱ्या बाजूस मैदानाच्या चढावर हेक्तरच्या भोवताली उच्च कुलीन पोलिदामाज, त्रोजन ज्याला देवासारखा मान देत तो ईनिआस आणि अॅन्तेनॉरचे तीन पुत्र, पॉलिबस, अॅगेनॉर व देवासारखा देखणा तरुण अॅकॅमाज हे गोळा झाले होते. हेक्तरची गोल ढाल पुढच्या ओळीत दिसत होती, आणि ज्याप्रमाणे एकादा अनर्थकारी तारा ढगांच्या फटीतून क्षणभर चमकून पुन्हा ढगांमागे लपावा, त्याचप्रमाणे हेक्तर कधी पुढच्या ओळीत तर कधी अगदी मागच्या असा आता दृष्टीस पडत होता, व त्याचे ब्राँझचे चिलखत, ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या विद्युल्लतेसारखे चमकत होते.

आणि एकाद्या धनवंताच्या भूमीवर कापणी करणारांची टोळी गव्हाच्या किंवा यवाच्या पिकांचे जेव्हा पट्टे कापते तेव्हा त्यांच्यापुढे जसे कापलेल्या ताटांचे भारे दाटीने एकमेकांवर पडतात, तसेच आता त्रोजन व अॅकिअन एकमेकांवर तुटून पडले ; त्यांची वृत्ती नमते घेण्याची नव्हती, उलट ते लांडग्यासारखे झुंजत होते, आणि दोघांपैकी कुठल्याच पक्षाची दुसऱ्यावर निर्णायक अशी मात झाली नाही. त्यांना पाहणाऱ्या ' विग्रहे ' ला बरे वाटत होते, कारण त्यांच्यात फिरणारी यावेळी ती एकटीच देवी होती, इतर देव तेथे नव्हते, ते ऑलिम्पसवरील गिरिकंदरात व दऱ्यात आपापल्या निवासात स्वस्थ होते. ते सर्व त्रोजनांना

विजयी करण्याची इच्छा धरण्याबद्दल सॅटर्नपुत्राला दोष देत होते ; पण तात जव्ह त्यांची क्षिती बाळगीत नव्हता, तो सर्वांपासून तुटकपणे राहिला होता आणि एकटाच आपल्या संपूर्ण प्रतापशाली राजवैभवात, त्रोजनांची नगरी, ॲकिअनांच्या नौका, ब्रॉंझचा लखलखाट, मारणारे व मरणारेही,––हे सर्व अवलोकन करीत एकीकडे बसून राहिला.

आता जोपर्यंत दिवस वर चढत होता व अजूनही सकाळचीच वेळ होती, तोपर्यंत त्यांच्या बाणांचा एकमेकांवर सतत वर्षाव होत होता व लोक मरत होते ; एखाद्या गिरिवनात काम करणारा लाकुडतोड्या मध्यान्हीचे भोजन ज्यावेळी करणार असतो––कारण हात थकेपर्यंत त्याने झाडे पाडली आहेत, तो अगदी दमून गेला आहे व त्याला आता जेवायला हवेच आहे––ती घटिका जेव्हा जवळ आली, तेव्हा सर्व श्रेणींमधून निनादत गेलेली गर्जना करून दॅना-अनांनी शत्रूची सैन्यदले फोडली. ॲगॅमेम्नॉन त्यांना पुढे घेऊन जात होता व त्याने प्रथम बिएनॉर या त्रोजनांच्या नेत्याला मारले आणि त्याच्यानंतर त्याचा सोबती व सारथी ऑइलिअस याला ठार केले. हा रथावरून उडी घेऊन थेट त्यांच्या सन्मुख येत असता ॲगॅमेम्नॉनने त्याच्या कपाळात भाला घातला ; त्या शस्त्राविरुद्ध त्याची ब्रॉंझची मुखरक्षक जाळीदार पट्टी टिकली नाही. भाल्याने ब्रॉंझ व हाड दोन्हीचा भेद केला व त्याच्या मेंदूचा चेंदामेंदा होऊन तो लढता-लढताच ठार झाला.

त्या दोघांच्या अंगावरून त्यांचे अंगरखे ओरबाडून काढून ॲगॅमेम्नॉनने त्यांना पडल्याठिकाणी उघड्या छातीनी तसेच राहू दिले. नंतर पुढे जाऊन त्याने प्राॲमपुत्र आयसस व ॲन्तिफस यांचा वध केला, त्यांच्यातला एक अनौरस व दुसरा लग्नाच्या बायकोला झालेला होता. दोघेही एकाच रथात होते. अनौरस पुत्र सारथ्य करीत होता व उच्च कुलीन ॲन्तिफस त्याच्या बाजूला लढत होता. ॲकिलिजने, एकदा ते मेंढ्या वळीत असता इदाच्या वनस्थलीत त्यांना बंदीवान करून गवताच्या हिरव्या सोपटांनी जखडले होते, पण नंतर त्यांच्यासाठी त्याने खंडणी स्वीकारली होती. तथापि आता ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉनने आयससला छातीवर स्तनाग्राच्यावर भाला मारला व ॲन्तिफसला कानाजवळ जोराने घाव घालून रथावरून खाली पाडले. त्याने तात्काल त्यांची उत्तम चिलखते त्यांच्या देहावरून काढून घेतली आणि त्याना ओळखले ; कारण ॲकिलिझने त्याना इदाहून आणले होते तेव्हा याने नौकांपाशी त्याना पाहिलेले होते. ज्याप्रमाणे हरिणीच्या शावकांची पकड घेऊन आपल्या महा-दंष्ट्रात सिंह त्यांना चिरडतो व गुहेकडे परतताना वाटेवर त्यांचे कोवळे जीव

लुटून नेतो—–हरिणी जवळच असूनही ती त्याच्या रक्षणासाठी काही करू शकत नाही, कारण ती स्वतःच भयव्याकुल असते व दाट अरण्यातून घामाघूम होऊन त्या प्रबळ राक्षसी प्राण्यापासून पराकाष्ठेच्या त्वरेने धावत सुटते—–त्याप्रमाणे त्रोजनांपैकी कोणाही माणसाला आयसस नी अँन्तिफस यांना मदत करता आली नाही, कारण ते स्वतःच अरगॉस सेनेपुढे कमालीचे घाबरून पळत सुटले होते.

नंतर अॅगॅमेम्नॉन राजाने अँन्तिमॅकसचे दोन पुत्र, पिसॅन्दर नी शूर हिप्पोलोकस यांचे प्राण घेतले. हेलनला मेनेलॉकसकडे परत करण्याच्या योजनेस अडवणूक करणारा अग्रेसर अँन्तिमॅकसच होता. कारण त्याला अलेक्झँद्रसने मोठी लाच दिली होती; आणि आता त्याचे एकाच रथात असलेले, लगाम हातातून गेल्यामुळे, भेदरून वेडावलेल्या घोड्याना थांबवण्याचा वृथा प्रयत्न करणारे दोन पुत्र अॅगॅमेम्नॉनने मारले. अॅत्रिअसपुत्राने त्यांच्यावर एकाद्या सिंहासारखी झेप घेतली व त्या दोघांनी रथातून त्याची विनवणी केली; ते ओरडले, "आम्हाला जिवंत धर, अॅत्रिअसपुत्रा, तुला आमच्यासाठी मोठी खंडणी मिळेल. आमचा पिता अँन्तिमॅकस याच्यापाशी सुवर्ण, ब्राँझ व घडीव लोखंडाचा मोठा संचय आहे, आणि आम्ही अॅकिअनांच्या नौकांपाशी जिवंत आहोत हे त्याला कळले तर त्या संचयातून फार मोठी खंडणी भरून तो तुला संतुष्ट करील".

अशा करुण शब्दांनी व आसवे गाळून त्यांनी राजापुढे विनवण्या केल्या, पण त्यांच्या मोबदल्यात त्यांना दयार्द्र उत्तर मुळीच मिळाले नाही. अॅगॅमेम्नॉन म्हणाला, "एकदा मेनेलॉस व युलिसिस तुमच्याकडे दूत म्हणून आले होते तेव्हा ज्याने त्रोजन्सच्या सभेत सुचविले की त्यांना ठार मारावे व परत जाऊ देऊ नये, त्या अँन्तिमॅकसचे पुत्र जर तुम्ही असाल, तर तुमच्या बापाच्या गलिच्छ अन्यायाचे प्रायश्चित तुम्ही आता भोगाल".

हे बोलत असता त्याने छातीवर भाला मारून पिसॅन्दरला त्याच्या रथावरून खाली पाडले, त्यामुळे तो तोंड वर करून भूमीवर उताणा पडला. हिप्पोलिकस पळत होता पण त्यालाही अॅगॅमेम्नॉनने मारले, त्याचे हात व डोके तोडले, ते गर्दीत चेंडूसारखे गडगडत गेले. तेथेच त्याना पडू देऊन जेथे जेथे सैनिकांच्या श्रेणी दाट होत्या तेथे तेथे राजा त्वरेने धावला, आणि इतर अॅकिअन त्याच्या पाठोपाठ गेले. पदाती सैनिकांनी शत्रूच्या पदातींची दाणादाण उडवून त्यांची कत्तल केली. तसेच अश्वारूढ सैनिकांनी शत्रूच्या अश्वारूढांना केले, आणि घोड्यांच्या धडधडणाऱ्या टापांनी मैदानावरून धुळीचा ढग उठवला. अॅगॅमेम्नॉन राजाने पाठलाग चालूच ठेवला, एकसारखा शत्रूना मारीत तो अॅकिअनांना पुढे सरसावण्यास उत्तेजन देत होता. एखादे महारण्य, चौफेर पेटावे—–

भोवऱ्यासारख्या भिरभिरत्या वाऱ्याच्या झोतांनी सर्व दिशांना आग झपाट्याने पसरवल्यामुळे झाडाझुडुपांच्या जाळ्या करपून ज्वाळेच्या झोतात भस्मसात व्हाव्यात, त्याप्रमाणेच ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉनपुढे पळणाऱ्या त्रोजनांची मस्तके तुटून खाली पडली आणि जातिवंत घोड्यांच्या अनेक जोड्यांनी, रिकामेच रथ युद्धाच्या महामार्गावरून ओढीत नेले. कारण त्यांचे सारथी मैदानात मरून पडले होते. आता त्यांचा उपयोग त्यांच्या स्त्रियांना होणार नव्हता तर फक्त गिधाडानांच होणार होता.

लढाईच्या हाणामारीतून व कल्लोळातून, बाणामधून व धुळीतून हेक्तरला जव्हने बाजूला काढले, पण ॲत्रिअसपुत्र दॅनाअनाना जोरात हाका देत वेगाने पुढे जातच राहिला. ते मैदानाच्या मध्यावरील दार्दानसपुत्र वृद्ध इलसच्या समाधीजवळून, व वन्य अंजिरवृक्षाच्या जागेपलीकडून एकसारखे नगरीच्या दिशेने त्वरेने धावत गेले ; ॲत्रिअसपुत्र ओरडतच होता व त्याचे हात रक्ताने पूर्ण माखले होते ; पण जेव्हा ते स्कीअन वेशीपाशी व ओक वृक्षाजवळ आले, तेव्हा ते थांबले व इतर लोक त्यांच्यापर्यंत पोहोचण्याची वाट पाहू लागले. दरम्यान मैदानाच्या मध्यभागावरून त्रोजन पळतच राहिले—भर मध्यरात्री सिंहाने ज्यावर हल्ला केला आहे अशा एकाद्या गाईच्या कळपासारखे ते पळत होते. कळपातल्या एकीवर सिंह उडी घेतो, त्याच्या बळकट दातांच्या पकडीत तिची मान धरतो, आणि मग तिचे रक्त घटाघटा पिऊन तिच्या आंतड्यांवर पोटभर ताव मारतो—अगदी तसाच शत्रूचा पाठलाग ॲत्रिअसपुत्राने केला ; ते धडपडत कसेबसे त्याच्यापुढे धावत असता तो सर्वात मागे रहाणारांना सारखा कापून काढीत होता. त्याच्या हातांनी कित्येक लोक आपल्या रथातून उलटे-पालटे होत फेकले गेले ; कारण इतक्या त्वेषानेच ॲत्रिअसपुत्राने आपला भाला चालवला होता.

पण नगरीच्या उंच तटासमीप पोहोचण्याच्या ऐन बेतात तो असतानाच देवा-मानवांचा पिता स्वर्गातून खाली आला व वज्र हाती घेऊन विपुल निर्झर-मंडित इदाच्या शिखरावर स्थानापन्न झाला. मग त्याने सुवर्णपक्षधारिणी आयरिसला आपला एक संदेश पोहोचविण्यास सांगितले. तो म्हणाला, "द्रुतगती आयरिस, जा व मी म्हणतो तसे हेक्तरला सांग ; त्याला म्हणावे की जोपर्यंत ॲगॅमेम्नॉन आपल्या लोकांच्या अग्रभागी राहून त्रोजन सैन्यात कहर उडवीत असल्याचे दिसत आहे तोपर्यंत हेक्तरने दूर राहून इतरांना युद्धाचा मुख्य भडिमार सहन करण्यास सांगावे ; पण जेव्हा ॲगॅमेम्नॉनला भाल्याची किंवा बाणाची जखम होईल व तो रथात चढेल, तेव्हा हेक्तरला, नौकांपाशी

पोहोचेपर्यंत व सूर्यास्त होऊन रात्र पडेपर्यंत कत्तल करण्यासाठी भरपूर बळ मी प्रदान करीन."

आयरिसने ते ऐकून घेतले व ती आज्ञापालन करण्यास सिद्ध झाली. इदाच्या शिखरावरून ती मजबूत इलिअमला गेली व प्राअॅमपुत्र हेक्तर आपल्या रथापाशी घोडयांजवळ उभा असलेला तिला दिसला, तेव्हा ती म्हणाली, "प्राअॅमपुत्रा हेक्तर, देवतुल्य मंत्रणाकुशल, तात जव्हने मला तुझ्याकडे हा निरोप सांगायला पाठवले आहे--जोपर्यंत तुला अॅगॅमेम्नॉन आपल्या लोकांच्या अग्रभागी राहून त्रोजन सैन्यात कहर उडवीत असल्याचे दिसेल, तोपर्यंत तू दूर राहून इतरांना युद्धाचा मुख्य भडिमार सहन करण्यास सांगायचेस ; पण जेव्हा अॅगॅमेम्नॉनला भाल्याची किंवा बाणाची जखम होईल व तो रथात चढेल, तेव्हा तुला नौकांपाशी पोहोचेपर्यंत सूर्यास्त होऊन रात्र पडेपर्यंत कत्तल करण्यासाठी भरपूर बळ जव्ह प्रदान करील."

याप्रमाणे बोलून झाल्यावर ती त्याच्यापासून निघून गेली, आणि संपूर्ण शस्त्रसज्ज हेक्तरने रथावरून भूमीवर उडी मारली व तो भाला परजित सैन्यात सर्वत्र फिरून त्याच्या लोकांना लढण्यास उत्तेजन देऊ लागला, व युद्धाचा भीषण कलह चेतवू लागला. मग त्रोजन परत फिरले व अॅकिअनांना पुन्हा भिडले आणि आरगॉसवासीयांनी आपल्यापरीने आपली सेनादले जास्त प्रबल केली. आता लढाईच्या तयारीने उभयपक्ष समोरासमोर उभे ठाकले. अॅगॅमेम्नॉन एकसारखा बाकी सर्वांच्या अग्रभागी राहण्याच्या आतुरतेने पुढे पुढे नेटाने सरकत होता.

आता मला कथन करा, हे ऑलिम्पसच्या प्रासादातील निवासिनी कला-देवतांनो, अॅगॅमेम्नॉनला तोंड देणाऱ्या त्रोजन किंवा त्यांच्या मित्रपक्षीयात पहिला कोण होता ? तो होता अॅन्तेमॉरपुत्र इफिदामाज, शूर तसाच धिप्पाड देहाचा पुरुष,--मेषमाता थ्रेसच्या सुपीक प्रदेशात लहानाचा मोठा झालेला ; त्याचा मातामह सिझिझ याने त्याला बाळपणापासून स्वतःच्या घरात वाढविला होता. हा सिझिझ सुंदर थिअॅनोचा पिता. नातू वयात आला तेव्हा सिझिझची इच्छा त्याला जवळच ठेवून त्याचे आपल्या मुलीशी लग्न लावून देण्याची होती ; पण ते लग्न होताच हा अॅकिअनांशी लढण्यास निघाला व त्याच्या बारा नौका त्याच्या मागोमाग गेल्या. नौका पर्कोती येथे सोडून हा खुष्कीच्या मार्गाने पुढे इलिअमला आला होता. हाच आता अॅत्रिअसपुत्र अॅगॅमेम्नॉनला युद्धात भेटला : ते जेव्हा एकमेकांच्या अगदी जवळ येऊन ठेपले, तेव्हा अॅत्रिअसपुत्राचा नेम चुकला आणि इफिदामाजने त्याच्या वक्षकवचाखालील पट्टयावर घाव घालून आपल्या

बाहुबलावर भरवसा ठेवून त्याच्यावर झेप टाकली ; तथापि पट्टयाचा भेद झाला नव्हता, थोडा देखील तो फाटला नव्हता, कारण भाल्याचे टोक चांदीवर आपटून मऊ शिशासारखे बाजूला झुकले होते; ॲगॅमेम्नॉन राजाने भाला त्याच्या हातातून हिसकून सिंहाच्या त्वेषाने आपल्याकडे खेचून घेतला ; मग त्याने खड्ग उपसून मानेवर वार करून इफिदामाजला ठार मारले. तेव्हा तो बिचारा तेथे मरून पडला,--जणु ब्राँझचा असल्यासारखा निश्चल निद्रेत,-- सांगाती असलेल्या नागरिकांच्या संरक्षणार्थ लढताना मारला गेला, लग्नाच्या बायकोपासून दूर ; तिच्यापासून त्याला काही सुख लाभले नव्हते--जरी त्याने तिच्यासाठी भरपूर दिले होते : शंभर गुरे जागच्या जागी देऊन, नंतर आपल्या मालकीच्या असंख्य कळपांमधून एक हजार मेंढरे-बकरी सरमिसळ देण्याचे त्याने कबूल केले होते. नंतर ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉनने त्याला लुटले व त्याचे चिलखत तो ॲकिअनांच्या सैन्यात घेऊन गेला.

जेव्हा अॅन्तेनॉरचा सर्वात मोठा मुलगा थोर कुऑन याने हे पाहिले तेव्हा मरून पडलेल्या भावाला पाहून त्याचे डोळे अतिव्यथित झाले. ॲगॅमेम्नॉनच्या नजरेस न पडता तो भाला घेऊन त्याच्या बाजला आला व त्याच्या बाहूच्या मध्यभागी कोपराखाली त्याला त्याने जखम केली. भाल्याचे टोक बाहूच्या आरपार गेले. ॲगॅमेम्नॉन वेदनेने तडफडला पण तरीसुद्धा त्याने आपले धडपडणे व लढणे थांबवले नाही ; तर वायुवेगाने जाणारा आपला भाला घेऊन आपल्या भावाचा-पित्याच्या पुत्राचा-देह पाय धरून ओढून नेण्याच्या प्रयत्नात असलेल्या व आपल्या सर्वात शूर सोबत्यांना मदतीसाठी हाका मारणाऱ्या कुऑनवर त्याने झडप घातली आणि ब्राँझच्या फुल्या ठोकलेल्या आपल्या भाल्याने भावाचा मृतदेह आपल्या ढालीच्या निवाऱ्याखाली सैनिकांच्या गर्दीतून ओढून नेत असलेल्या कुऑनचा प्राण घेतला. मग इफिदामाजच्या देहावर उभा राहून त्याने कुऑनचा शिरच्छेद केला. याप्रमाणे ॲत्रिअसपुत्राच्या हातून अॅन्तेनॉरच्या पुत्रांचा पूर्वनिश्चित अंत झाला आणि ते खाली हेदिझच्या सदनी गेले.

जोपर्यंत त्याच्या जखमेतून उष्ण रक्त उफाळून वाहात राहिले होते तोंवर ॲगॅमेम्नॉनने भाला व तलवार, त्याचप्रमाणे मुठी भरभरून मोठाले दगड यांनी हल्ला करीत शत्रूच्या श्रेणीत संचार चालू ठेवला होता ; पण जेव्हा रक्त वाहायचे थांबले व जखम सुकली तेव्हा वेदना फारच वाढली.

ज्यूनो-कन्यका व क्रूर वेदनांच्या प्रवर्तिका अशा प्रसूतीदेवता ऐलिथिई जशा तीव्र पीडा बाळंत होऊ घातलेल्या स्त्रीवर सोडतात, अगदी तशाच प्रखर यातना ॲत्रिअसपुत्राला होऊ लागल्या. त्याने आपल्या रथावर उडी घेतली आणि

सारथ्याला रथ नौकांकडे हाकण्यास सांगितले कारण त्याला आत्यंतिक व्यथेने पीडले होते. उच्च आणि स्पष्ट आवाजात तो दॅनाअनांना उद्देशून ओरडला, "माझ्या मित्रांनो, आरगॉसच्या राजवंशीयांनो व मंत्र्यांनो, नौकांचे रक्षण तुम्हीच आता स्वत: करा, कारण जव्हने मला सबंध दिवसभर त्रोजनांशी लढण्यास समर्थ ठेवले नाही."

त्याबरोबरच सारथ्याने आपले घोडे नौकांकडे वळवले आणि तेही हुरूपाने पुढे धावले. जखमी राजाला लढाईमधून बाहेर काढताना घोड्यांच्या छात्या पांढऱ्या फेसाने व पोटे धुळीने माखली गेली. जेव्हा हेक्तरने ॲगॅमेम्नॉनला रणक्षेत्र सोडून जाताना पाहिले तेव्हा तो त्रोजन्सना नी लिसिअन्सना ओरडून म्हणाला, "त्रोजन्स, लिसिअन्स व दार्दानिअन योद्धेहो, माझ्या मित्रांनो, पौरुषत्व प्रगट करा व लढाईत शूरपणे आपले कर्तृत्व दाखवा. त्यांच्या सर्वोत्तम वीराने त्यांना सोडले आहे आणि जव्हने मला महान विजय कृपाळूपणे प्रदान केला आहे. तुमच्या रथांवरून शत्रूवर हल्ला चढवा म्हणजे पहिल्यापेक्षाही तुम्हाला जास्त उज्वल यश मिळेल."

या शब्दांनी त्याने सर्वांच्या हृदयात धीर आणि जोम आणला, आणि जसा शिकारी आपले शिकारी कुत्रे एकाद्या सिंहाच्या किंवा रानडुकराच्या पाठीवर सोडतो, अगदी तसेच मार्सतुल्य हेक्तरने अभिमानी त्रोजन्सना ॲकिअन्सवर सोडले. मोठ्या उमेदीने सर्वात आघाडीच्या लोकात त्याने उडी घेतली आणि समुद्रावर अचानक कोसळून त्याच्या गर्द निळ्या पाण्याला झोडपणाऱ्या एकाद्या उग्र तुफानासारखा तो युद्धात हिरिरीने तुटून पडला.

मग जव्हने तेव्हा कृपाळूपणे प्रदान केलेल्या यशाच्या घटिकेत प्राॲमपुत्र हेक्तरने कोणा कोणाला ठार मारले? त्याचा पूर्ण वृत्तांत काय आहे? प्रथम ॲसीअस, आतोनोउस व ओपितीझ; क्लितिअसपुत्र दॉलॉप्स, ऑफेल्तिअस नी ॲगेलॉस; ईसिम्नस, ऑरस व युद्धात अचल रहाणारा हिप्पोनोउस; हे सारे ॲकिअन्सचे प्रमुख प्रथम मारून मग हेक्तर सामान्य सैनिकांवर धावून गेला. शुभ्र दक्षिणेचे ढग हाकलून काढून त्वेषभराने पश्चिम-वायू त्यांचा जसा नायनाट करतो—सागराच्या लाटा उंच उसळू लागतात व भटकत्या वाऱ्याच्या बेफामपणाने त्यांचे तुषार उंच फेकले जातात—अगदी तसाच हेक्तरच्या हातून मारले गेलेल्यांच्या मुंडक्यांचा खच पडला.

जर तेव्हा युलिसिसने दायोमिदला हाक दिली नसती तर यशाची सारी आशा संपली होती व काहीही इलाज होण्याजोगा असा नव्हता, व ॲकिअन सैरावैरा आपल्या नौकांकडे पळाले असते. पण युलिसिस ओरडला,

"तायदिअस पुत्रा आपल्याला झाले आहे तरी काय? कशामुळे आपल्याला आपल्या पराक्रमाचा विसर पडला आहे? चल, माझ्या भल्या सोबत्या, चल ये, माझ्या बाजूला उभा ठाक व मला साह्य कर, हेक्तरने जर आपल्या नौका जिंकल्या तर आपल्याला ती कायमची लाजिरवाणी गोष्ट होईल."

आणि दायोमिदने उत्तर दिले, "काय वाटेल ते होवो, मी भक्कमपणे माझी जागा धरून राहीन, पण यशाचा आनंद आपल्याला बेताचाच लाभेल, कारण आपल्यापेक्षा त्रोजन्सनाच जय मिळवून देण्याचे जव्हच्या मनात आहे."

असे बोलून त्याने थिम्ब्रिअसला ह्मणून रथावरून खाली पाडले, त्याच्या छातीवर डाव्या बाजूस त्याने भाला मारला; त्याचवेळी थिम्ब्रिअसचा शिलेदार मोलिऑन यास युलिसिसने मारले. त्यांचे लढणे असे बंद पाडल्यावर त्यांना तेथे तसेच पडू देऊन हे दोन वीर, चवताळून उलटलेल्या व आपली शिकार करणाऱ्या कुत्र्यांना फाडणाऱ्या दोन रानडुकरांसारखे, त्रोजनांकडे परत वळून शत्रूचा संहार करीत सुटले, आणि हेक्तरपासून पळताना उसंत मिळाल्यामुळे ॲकिअन्सनी धन्यता मानली.

मग त्यांच्या शस्त्राना सर्वांपेक्षा अधिक प्रवीण अशा, शकुनपरीक्षक पर्कोतीचा राजा मेरॉप्स याचे दोघे राजपुत्र त्यांच्या रथासह बळी पडले. त्यांच्या पित्याने त्यांना या युद्धावर येण्यास प्रतिबंध केला होता पण त्यांनी ते ऐकले नाही, कारण दैवानेच त्यांना मोह पाडून स्वनाशाप्रत आणले. तायदिअसपुत्र दायोमिदने दोघांनाही ठार मारून त्यांची चिलखते काढून घेतली आणि इकडे युलिसिसने हिप्पोदॅमस नी हायपैरोकस यांचे प्राण घेतले.

आणि आता इदाहून खाली पहात असता सॅटर्नपुत्राने ठरविले की दोघांपकी एकाही पक्षाला सरशी मिळू नये, आणि म्हणून ते एकमेकांना मारीतच राहिले. तायदिअसपुत्राने जघनाच्या सांध्यात भाला मारून पीऑनपुत्र ॲगॅस्त्रोफसला घायाळ केले. निसटून जाण्यासाठी त्याने आपला रथ जवळ ठेवला नव्हता, इतक्या अंधपणे तो आत्मविश्वास बाळगून होता. रथ त्याच्या शिलेदाराच्या ताब्यात थोड्या अंतरावर होता आणि तो पायउतार होऊन सर्वात पुढच्या लोकांत लढताना अखेर जीव गमावून बसला. हेक्तरने लौकरच दायोमिद व युलिसिस उडवीत असलेला अनर्थ पाहिला, आणि तो त्यांच्यावर मोठी गर्जना करून धावून आला, व त्याच्यामागे त्रोजन सैनिक आले; त्यांना पाहून शूर दायोमिद सचिन्त झाला आणि शेजारच्या युलिसिसला म्हणाला, "महान हेक्तर आपल्यावर चाल करून येतो आहे व आपला निकाल लागणार असे दिसते आहे. आपण ठाम उभे राहू व त्याच्या चढाईसाठी थांबू."

हे बोलताना त्याने नेम धरून भाला फेकला व त्याचा नेमही चुकला नाही. हेक्तरच्या मस्तकावरील शिरस्त्राणाचा माथा हे लक्ष्य त्याने ठेवले होते, पण ब्रॉझवर ब्रॉझचा आघात होऊन भाला वळला व हेक्तरला त्याचा स्पर्श झाला नाही, कारण फीबस अॅपॉलोने त्याला दिलेल्या धातूच्या तीन पट्ट्यांनी घडवलेल्या शिरस्त्राणाच्या नाक पठ्टीने भाला अडवला. हेक्तरने सैनिकांच्यामागे दूरवर उडी घेतली ; तो गुडघ्यावर पडला आणि आपले मजबूत हात जमिनीवर टेकून त्याने आपल्याला सावरले, कारण त्याच्या डोळ्यांपुढे अंधेरी आली होती. तायदिअसपुत्र भाला फेकल्यानंतर तो जेथे पडलेला दिसला त्या जागेकडे सर्वात पुढे लढणारांच्या गर्दीत त्वरेने शिरला. दरम्यान हेक्तरला पुन्हा हुशारी आली व रथावर उडी घेऊन तो गर्दीत मिसळून गेला व असा त्याने आपला जीव बचावला. पण दायोमिदने आपला भाला त्याच्याकडे सरसावीत म्हटले, "कुत्तरडचा, मरण अगदी तुझ्या पाठीशी भिडलेले असताना तू पुन्हा एकदा निसटला आहेस. लढाईत उतरण्यापूर्वी मला वाटते ज्या फीवस अॅपोलोची तू प्रार्थना करतोस त्याने तुला पुन्हा वाचवला आहे. तरीही मी पुन्हा तुझ्याशी गाठ घालीन आणि केव्हातरी तुझा शेवट करीनच. मात्र कोणीतरी देव माझ्या बाजूला उभा राहून माझा साह्यकर्ता झाला पाहिजे. तूर्त माझ्या हाती लागतील त्याचाच पाठलाग मला केला पाहिजे."

असे बोलत असतानाच त्याने पीऑनपुत्राच्या अंगावरचे चिलखत काढण्यास सुरवात केली, पण सुंदरी हेलनचा पती अलेक्झँद्रस याने प्राचीन काळातला एक राजा दार्दानसपुत्र इलस याच्या स्मृत्यर्थ उभारलेल्या स्मारकाच्या खांबाला रेलून त्याच्यावर बाणाचा नेम धरला. दायोमिदने अॅगॅस्त्रोफसच्या छातीवरून त्याचे कवच, तसेच त्याचे जड शिरस्त्राण व त्याच्या खांद्यावरची ढालही काढली होती. तेवढ्यात पॅरिसने बाण सोडला व तो त्याच्या हातून वेगाने सुटलेला बाण व्यर्थ गेला नाही ; त्या बाणाने दायोमिदच्या उजव्या तळपायाचा आरपार भेद केला व बाण जमिनीत रुतला. त्यावर मनसोक्त हास्य करून लपलेल्या जागेतून उडी मारून पॅरिस पुढे आला व दायोमिदला हिणवण्यासाठी म्हणाला, "तू विद्ध झाला आहेस. माझा बाण काही व्यर्थ सुटला नाही ; तो तुझ्या पोटात घुसून तू ठार झाला असतास तर किती बरे झाले असते ! कारण त्यायोगेच बकरी जशी सिंहाला भिते तसे तुला भिणाऱ्या त्रोजनांना दुरितापासून शांती लाभली असती."

दायोमिदने मुळीच न डगमगता उत्तर दिले, "धनुर्धरा, हातात जोवर धनुष्य आहे तोवरच तुझी काय ती प्रतिष्ठा ! निन्दका व दुराचाऱ्या, परस्पर द्वंद्वयुद्धात

संपूर्ण कवच घालून जर तुला परीक्षा देण्याची वेळ आली तर तुझे धनुष्यबाण तुला फारच थोडे उपयोगी पडतील ; माझ्या पायाचा तळवा तू ओरखडलास म्हणून व्यर्थ बढाई मारू नकोस. अरे, एकाद्या पोरीने किंवा वेडपट पोराने केलेल्या अपघातापेक्षा त्याची मला अधिक क्षिती नाही. नालायक भेकड केवळ वरवरच जखम करू शकणार. पण माझी गोष्ट निराळीच आहे. मी एकाद्या माणसाला जखमी करतो तेव्हा त्याची नुसती कातडीच जरी खर-चटली तरी तो माझ्या शस्त्राने भुईसपाट होईल, त्याची बायको शोकाने आपले गाल ओरबाडून काढील, त्याची मुले पितृहीन होतील ; तो कुजत पडेल, जमीन रक्ताने भिजवील, व त्याच्याभोवती बायका नव्हेत तर गिधाडे गोळा होतील."

तो असे म्हणाला, पण युलिसिस येऊन त्याच्या रक्षणास उभा राहिला ; त्याच्या निवाऱ्याखाली बाण पायातून काढण्यासाठी तो खाली बसला आणि तो उपसून काढताना त्याने भोगलेली वेदना तीव्र होती. मग त्याने रथावर उडी घेतली व आपल्याला नौकांकडे घेऊन जाण्यास सारथ्याला सांगितले, कारण अंतर्यामी तो व्यथित झाला होता.

आता युर्लिसिस एकटा पडला. आरगॉस सेनेपकी एकहीजण त्याच्या बाजूला उभा राहिला नाही, कारण ते सगळे भयंकर घाबरून गेले होते. तो निराशेने स्वतःशी म्हणाला, "अरेरे, आता माझे काय होणार ? शत्रूच्या या अधिक संख्याबलापुढे तोंड फिरवून मी पळालो तर ते वाईट खरे ; पण त्याहूनही वाईट गोष्ट म्हणजे मी एकटा राहून त्यांचा बंदिवान होणे ; कारण सॅटर्नपुत्राने तर बाकीच्या डॅनाअन्सना भयग्रस्त करून सोडले आहे. पण मी असा स्वतःशीच कशाला बोलत राहू ? मला पुरे ठाऊक आहे की भ्याड जरी रणांगण सोडून पळाले तरी वीराने जागच्याजागी दृढ राहून प्रतिपक्षाला झुंज दिली पाहिजे, मग तो दुसऱ्याना जखमी करो किंवा स्वतः जखमी होवो."

असा तो द्विधा वृत्तीत असताना त्रोजनांच्या सेनाश्रेणींनी पुढे येऊन त्याला घेरले आणि पुढे त्याबद्दल कटु पश्चाताप करण्याची त्यांना वेळ आली. आपले शुभ्र सुळे पाजळीत एकाएकी गुहेबाहेर येणाऱ्या रानडुकरावर शिकारी कुत्रे व दांडगे तरुण जसा हल्ला करतात, सर्व बाजूनी ते चढाई करताना त्याच्या दाढांची रागीट कचकच त्यांना ऐकू येते पण त्याच्या उग्रपणाला न जुमानता ते आपली जागा ठाम धरून रहातात---अगदी तशाच त्वेषाने त्रोजन्सनी युलिसिस-वर हल्ला केला. तेव्हा त्याने प्रथम डॅऑपितिझवर हाती भाला धरून उडी घेतली, आणि वरून खाली घाव घालून त्याच्या खांद्यावर जखम केली ; मग त्याने थोउन व एन्नॉमस यांना ठार मारले. त्याच्यानंतर त्याने रथावरून

नुकत्याच खाली उडी टाकलेल्या केर्सिदॅमाझच्या ढालीखालून त्याच्या जांघेत वार केला, त्यामुळे तो धुळीत पडून त्याने पंजांनी भूमी घट्ट धरली. मग त्यांना तसेच पडू देऊन युलिसिसने थोर सॉकसचा सख्खा भाऊ हिप्पॅसस याचा पुत्र कॅरॉप्स याला जखमी केले. मोठा शूर वीर असणारा सॉकस मोठ्या वेगाने कॅरॉप्सच्या मदतीला धावला, आणि युलिसिसजवळ येताच म्हणाला, "दिगंत-कीर्तिमान युलिसिस, कितीही कौशल्य दाखवले व कितीही कष्ट केले तरी समाधान न पावणाऱ्या, आजच्या दिवशी एकतर हिप्पॅससच्या दोन्ही पुत्रांना मारून त्यांची कवचे काढून घेतल्याबद्दल तू बढाई मारशील, नाहीतर माझ्या भाल्याला बळी पडशील."

हे बोलून त्याने युलिसिसच्या ढालीवर घाव घातला. भाला ढालीतून पार होऊन, त्याचे भारी कलाकुसरीचे वक्षकवच भेदून त्याच्या कुशीचे मांस फाडून गेला, पण पॅलाज मिनर्व्हाने तो त्या वीराच्या आतड्यात शिरू दिला नाही. आपली अखेरची वेळ अजून आली नाही हे युलिसिसने जाणले, पण तो मागे हटून सॉकसला म्हणाला, "नीचा, आता तू नक्कीच मरणार. तू मला ट्रोजनांशी आणखी लढण्यापासून थांबवलेस, पण आता तू माझ्या भाल्याने रणांगणी पडून मला स्वतःला कीर्ती व उत्तम अश्वांच्या हेदिझला स्वतःचा जीव देणार."

साकस पळण्यासाठी वळला होता, पण तशा स्थितीत तो असतानाच भाला त्याच्या पाठीत दोन्ही खांद्यांच्या मध्यभागी बसला आणि त्याच्या छातीतून थेट पार गेला. तो जडपणे भूमीवर पडला व युलिसिसने त्याच्यावर उभा राहून दर्पोक्ति उच्चारली, "अरे अश्वशिक्षक सिप्पॅससच्या पुत्रा सॉकस, मृत्यूने तुला फारच लौकर गाठले व तू त्याला चुकवू शकला नाहीस ; बिचाऱ्या नीचप्राण्या, मृत्युसमयीदेखील तुझे आईबाप तुझे डोळे झाकायला जवळ नाहीत, तर हपापलेली गिधाडे आपले काळे पंख फडफडावीत तुझ्यावर त्यांचेच प्रेतवस्त्र पांघरतील व तुला फाडून खातील. उलट जर मी रणांगणी पडलो तर ॲकिअन्स माझे योग्य ते अंत्यसंस्कार करतील."

असे म्हणून त्याने सॉकसचा जड भाला आपल्या मांसातून व ढालीतून उपटून काढला, आणि भाला निघताच रक्त भळाभळा वाहू लागले व त्यामुळ तो फारच उद्विग्न झाला. युलिसिसच्या अंगातून रक्तस्त्राव होत आहे हे जेव्हा ट्रोजन्सनी पाहिले तेव्हा त्यांनी जोराने आरोळ्या ठोकल्या व ते त्याच्यावर जमावाने चालून आले. तेव्हा तो मागे हटला व पुढे येऊन मदत करण्यासाठी त्याने आपल्या सोबत्यांना पाचारले. माणसाला ओरडवेल तितक्या मोठ्याने तो तीनदा ओरडला व तीनदा शूर मेनेलॉसने ते ऐकले ; तेव्हा बाजूला जवळच असलेल्या

ॲजॅक्सकडे वळून तो म्हणाला, "थोर तेलेमॉनपुत्रा ॲजॅक्स, स्वजननायका, युलिसिसची हाक माझ्या कानात निनादत आहे; जणु त्रोजनांनी त्याला आपल्या मुख्य सेनेपासून वेगळे काढलेले असून तो एकटा पडल्यावर ते त्याचा पाडाव करीत आहेत असे वाटते. चल, गर्दीतून वाट काढू या, त्याचे आपण संरक्षण करणे योग्य होईल; मला भीती वाटते की जर तो मदतीशिवाय एकटाच सापडला तर तो स्वत: कितीही शूर असला तरी त्याच्यावर संकट गुदरेल, आणि मग दॅनाअनांना त्याची उणीव तीव्रपणे भासेल."

तो पुढे गेला व बलशाली ॲजॅक्स त्याच्यासमवेत गेला. बाण लागलेल्या शृंगधारी सांबराच्या मृतदेहाभोवती बुभुक्षित गिरिशृंगाल जमावेत तसे युलिसिसभोवती त्रोजन्स गोळा झाले होते——तो सांबर अंगातील रक्त उष्ण असेपर्यंत व शक्ती टिकून होती तोपर्यंत पुऱ्यावेगाने धावला आहे, पण बाणाने त्याची पुरी वाट लावताच, ते रानटी जंबूक रानातील सावलीच्या मोकळ्या प्रदेशात जमून त्याचे लचके तोडतात. मग दैवी संकेताने तेथे एक भयानक सिंह येतो, तेव्हा भयभीत होऊन शृंगाल पळून जातात व त्यांचे भक्ष्य सिंह हिरावून घेतो——अगदी त्याप्रमाणेच अनेक शूर त्रोजन्स धूर्त युलिसिसभोवताली जमले; पण तो वीर उलटून त्यांना तोंड देत उभा राहिला आणि आपल्या भाल्याने त्यांना त्याने दूर रोखून धरले. मग ॲजॅक्स आपली ढाल भिंतीसारखी पुढे धरून तेथे आला व अगदी जवळच उभा राहिला, तेव्हा त्रोजन्स सर्व दिशांना पळाले. मेनेलॉसने युलिसिसचा हात धरून त्याला गर्दीतून बाहेर काढले; तेवढ्यात शिलेदाराने त्याचा रथ समीप आणला; पण ॲजॅक्स त्वेषाने त्रोजन्सवर धावून गेला व त्याने प्राअॅमचा एक अनौरस पुत्र दोरिक्लस याला ठार मारले; मग त्याने पॅन्दोकस, लिसॅन्द्रस, पिरॅसस नी पायलार्तिझ यांना जखमी केले; आकाशीच्या पावसाने फुगून जसा एकादा जलप्रवाह प्रचंड पूर आल्यासारखा फोफावत पर्वतावरून वेगाने सपाटीवर येतो——कित्येक वाळलेले ओकवृक्ष व अनेक पाइनवृक्ष गिळंकृत करून तो खूप चिखल वाहून आणून समुद्रात टाकतो——अगदी तसाच शूर ॲजॅक्सने शत्रूचा रणक्षेत्रावर त्वेषाने पाठलाग केला, व वाटेत अनेक माणसे व घोडे मारले.

ॲजॅक्स काय करीत आहे हे अद्यापि हेक्तरला कळले नव्हते, कारण तो लढाईच्या अगदी डाव्या कडेला, स्कॅमॅन्दर नदीच्या तीरांपाशी लढत होता. तेथे मोठ्या प्रमाणावर कत्तल चालली होती आणि नेस्तॉर व शूर आयदोमेनिअस यांच्याभोवती मोठमोठ्याने युद्धगर्जना होत होत्या. त्यांच्यामध्ये हेक्तर आपल्या भाल्याने, तुफान रथ चालवून, असंख्य हत्या करीत होता आणि विरोध

करणाऱ्या सैनिक श्रेणी नष्ट करीत होता ; तरीही अॅकिअन्स हटले नसते, पण स्वप्रजापाल मॅकॲऑन याच्या उजव्या खांद्याला तिहेरी अग्रांचा बाण मारून त्याच्या पराक्रमाला सुंदरी हेलनचा पती अॅलेक्झँद्रसने खीळ घातली. लढाई त्यांच्यावर उलटल्याने अॅकिअन्सना फार भीति वाटली की मॅकॲऑनला ट्रोजन्स बंदीवान करतील ; आणि आयदोमिनिअस नेस्तॉरला म्हणाला, "नेलिअसपुत्र नेस्तॉर, अॅकिअनांच्या नावाला गौरव प्राप्त करून देणाऱ्या, तात्काल तुझ्या रथावर आरोहण कर, तुझ्याबरोबर मॅकॲऑनला घे, व तुला शक्य तितक्या वेगाने घोडे नौकांकडे हाकल. इतर अनेक लोकांच्या समुदायापेक्षा वैद्य जास्त मोलाचा म्हटला पाहिजे. कारण जखमेतून तो बाण कापून काढू शकतो व वर उपशामक वनस्पतींचा लेप करतो."

आयदोमिनिअसने सल्ला दिल्याप्रमाणे जेरिनीचा उच्चकुलीन वीर नेस्तॉर याने केले. तो तात्काल आपल्या रथावर चढला व विख्यात वैद्य इस्क्युलॅपिअस याचा पुत्र मॅकॲऑन त्याच्यासह गेला. त्याने घोड्याना फटकारले आणि तेही हुरूपात जणू स्वेच्छेने प्रेरित झाल्यासारखे वेगाने नौकांकडे धावले.

मग ट्रोजन्समध्ये गोंधळ उडालेला पाहून हेक्तरच्या बाजूलाच असलेला सेब्रिऑनिझ त्याला म्हणाला, "हेक्तर, आपण दोघे येथे लढाईच्या अगदी कडेला लढत आहोत, आणि इतर ट्रोजन्सचा आणि त्यांच्या घोड्यांचा गोंधळ उडालेला असून ते सैरावैरा पळत सुटले आहेत. तेलेमॉनपुत्र अॅजॅक्स त्यांना मारा करून हाकलून काढीत आहे. त्याच्या ढालीच्या रुंदीवरून मी त्याला ओळखतो. आपण आपले घोडे व रथ जेथे घोडेस्वार व पायदळ प्राणपणाने लढत आहेत व जेथे लढाईचा ओरडा सर्वात मोठ्याने होत आहे तिकडे वळवू या."

असे बोलून त्याने आपल्या देखण्या घोड्यांना फटके मारले आणि चाबूक बसताच घोड्यांनी पुऱ्यावेगाने तो रथ मृत्युमुखी पडलेल्या लोकांच्या प्रेतांवरून व ढालींवरून अॅकिअन्स आणि ट्रोजन्स यांच्या मधोमध नेला. रथाचा आस रक्ताच्या शिडकाव्याने रंगला, आणि रथाभोवतालचा कठडा घोड्यांच्या टापांनी व चाकांच्या धावांनी उडवलेल्या चिखलाने माखून गेला. हेक्तर दाटीतून वाट काढीत घुसला व युद्धाच्या ऐन धुमश्चक्रीत त्याने स्वतःला झोकून दिले. त्याच्या आगमनाने डॅनाअन्समध्ये गोंधळ उडाला, कारण त्याचा भाला सारखा चालू होता ; तथापि जरी तो सैनिक श्रेणीतून तलवार-भाला चालवीत व मोठमोठे दगड भिरकावीत गेला तरी तेलेमॉनपुत्र अॅजॅक्सला मात्र त्याने टाळले ; कारण जर स्वतःपेक्षा भारी गड्याशी तो लढला असता तर ज्व्ह त्याच्यावर रागावला असता.

मग तात जव्हने आपल्या उच्च सिंहासनावरून अॅजॅक्सच्या हृदयात भय उत्पन्न केले तेव्हा तो सुन्न होऊन उभा राहिला व त्याने आपली ढाल मागे टाकून दिली---शत्रूच्या झुंडीकडे भीतीने पाहात एकाद्या वन्य प्राण्याप्रमाणे एकदा या बाजूला तर एकदा दुसऱ्याच बाजूला वळत, दबकत दबकत तो हलकेच मागेमागे होऊ लागला. जसे शेतकरी आपल्या शिकारी कुत्र्यांसह एखाद्या सिंहाला आपल्या गुरांच्या कोंडवाड्यातून हाकलतात, आणि आपल्या कळपातले निवडक जनावर त्याने पळवू नये म्हणून रात्री राखण करतात---तो अधाशीपणे उडी घेतो, पण व्यर्थ, कारण अनेक मजबूत हातांनी टाकलेले भाले त्याच्याभोवती दाटीने पडत असतात, तशीच पेटती लाकडे तो कितीही चवताळलेला असला तरी त्याला घाबरवतात, आणि मग जेव्हा सकाळ होते तेव्हा डाव फसल्याने संतप्त असा तो चोरपावलांनी हलकेच निघून जातो---अगदी तसाच अत्यंत अनिच्छेने व रागाने त्रोजन्सपुढे अॅजॅक्स मागे हटला, कारण अॅकिअन्सच्या नौकांना धोका पोचेल अशी त्याला धास्ती वाटत होती. किंवा जसा एकादा आळशी गर्दभ शेतात शिरून धान्याचे पीक खाऊ लागल्यावर पाठीवर खूप दांडकी मोडेपर्यंत मार खातो, पोरे त्याला झोडपतात पण तो त्यांना जुमानीत नाही, त्यांनी कितीही काठ्या घातल्या तरी त्याला काही होत नाही ; तरीपण त्याचे पोट भरले म्हणजे शेवटी ती त्याला शेताबाहेर हाकलतात---अगदी तसाच पाठलाग त्रोजन्स व त्यांचे मित्रपक्षीय यांनी थोर अॅजॅक्सचा केला, व त्याच्या ढालीच्या मध्यावर एकसारखे बाण मारले. मधून मधून तो मागे फिरे आणि चार हात करी व त्रोजन्सच्या दलांना मागे लोटी, आणि मग पुन्हा स्वतः माघार घेई ; पण त्याने त्यांच्यापैकी कोणालाही नौकांपर्यंत जाऊ दिले नाही. तो एकटा त्रोजन्स व अॅकिअन्सच्या दरम्यान उभा राहिला ; त्यांनी फेकलेल्या भाल्यांपैकी काही त्याच्या प्रचंड ढालीवर बसले, पण पुष्कळसे त्याच्या रक्ताची तहान असूनही त्याच्यापर्यंत पोहोचण्याआधीच त्याच्या उमद्या देहाला जखम न करता भूमीवर पडले.

आता जेव्हा यूइमॉनपुत्र शूर युरिपिलस याने पाहिले की अॅजॅक्स बाणांच्या वर्षावाने अत्यंत त्रस्त होत आहे, तेव्हा त्याने त्याच्यापाशी जाऊन आपला भाला शत्रूकडे फेकला. भाला फॉसिअसपुत्र अॅपिसॅऑनला पोटाखाली यकृतात बसून तो भुईसपाट झाला. मग युरिपिलसने त्याच्यावर झेप घेऊन त्याचे चिलखत खांद्यावरून ओढून काढले ; पण हे पाहून अॅलेक्झँड्रसने एक बाण मारला तो त्याच्या उजव्या मांडीला लागला. बाण मोडला पण त्याचे टोक जखमेतच राहून त्याच्या मांडीला ओढ लागली. म्हणून सोबत्यांच्या आश्रयाखाली तो

जीव बचावण्यासठी मागे हटताना दॅनाअन्सना उद्देशून ओरडला, “ माझ्या मित्रांनो, आरगॉसच्या राजवंशीयांनो व मंत्र्यानो, पाडाव होत असलेल्या अॅजॅक्स-च्या रक्षणार्थ धावून जा, तो लढाईतून जिवंत बाहेर पडेल की नाही याची मला शंका वाटते. तेव्हा या, इकडे धाव घ्या व तेलेमॉनपुत्र महान अॅजॅक्सला सोडवा.”

जखमी झाला असताना त्याने अशी हाक दिली; त्यावर दुसरे जवळ येऊन त्याच्याभोवती जमले आणि त्यांनी आपल्या ढाली त्याच्या बचावासाठी खांद्या-वरून वर उंच धरल्या. मग अॅजॅक्स त्यांच्याकडे गेला व आपल्या लोकांपाशी पोहोचताच उलट वळून बचावासाठी लढण्यास तयार राहिला.

याप्रमाणे पेटलेल्या आगीसारखे ते लढले. दरम्यान घामाने डवरलेल्या नेलिअसच्या घोड्या नेस्तॉरला व स्वप्रजापाल मॅकॅऑनला लढाईतून दूर नेत होत्या. ते अॅकिलिझने पाहिले व नीट लक्षात घेतले, कारण तो युद्धाची निकराची गर्दी व धडपड पाहात आपल्या नौकेच्या पिछाडीच्या भागावर उभा होता. नौकेवरून त्याने आपला सोबती पॅत्रोक्लस याला हाक मारली; ती ऐकून तो तंबूतून बाहेर आला तेव्हा मार्ससारखा दिसला—त्याच्यावर लौकरच पुढे जे आरिष्ट कोसळले त्याची सुरवात खरोखर येथेच होती. त्याने विचारले, “ अॅकिलिझ तू मला का बरे बोलावलेस ? माझ्याकडे तुझे काही काम आहे का ?” आणि अॅकिलिझने उत्तर केले, “ मेनिनिअसच्या उदात्त पुत्रा, माझ्या मनोमान्य पुरुषा, मी आता असे धरून चालतो की अॅकिअन्स लौकरच माझ्या गुडघ्यांपाशी प्रार्थना करायला येतील, कारण ते घोर संकटात सापडले आहेत. जा, पॅत्रोक्लस, व नेस्तॉरला विचार की रणांगणावरून जखमी अवस्थेत तो कोणाला वाहून आणीत आहे ; त्याची मला पाठ दिसली त्यावरून मी म्हणेन की तो इस्क्युलॅपिअसचा पुत्र मॅकॅऑन असावा, पण त्याचे तोंड मला दिसले नाही कारण ते घोडे माझ्या पुढून भरधाव पळत गेले.”

प्रिय सोबत्याने सांगितले त्याप्रमाणे पॅत्रोक्लसने केले, आणि अॅकिअन्सच्या नौका व तंबूवरून तो धावत निघाला.

नेस्तॉर व मॅकॅऑन नेलिअसपुत्राच्या तबूपाशी पोहोचल्यावर ते रथातून उतरले आणि युरिमेदॉन नावाच्या शिलेदाराने घोडे रथापासून सोडले. मग हे दोघे आपल्या अंगरख्यावरचा घाम वाळवण्यासाठी समुद्र काठच्या वाऱ्यात उभे राहिले व ते झाल्यावर आत जाऊन आपापल्या जागांवर बसले. अॅकिलिझने तेनेदॉस घेतल्यावेळी नेस्तॉरला बहाल केलेल्या रूपवती हेकॅमिदेने त्यांच्यासाठी अनेक वस्तू मिसळून एक खाद्यपदार्थ बनविला. ती शहाण्या आर्सिनोउसची

कन्या होती आणि मंत्रणेत सर्वांपेक्षा श्रेष्ठ म्हणून नेस्तॉरला ती ॲकिअन्सनी दिलेली होती. प्रथम तिने त्यांच्यासाठी एक सुबक व उत्तम घडणीचे नीलधातूचे पाय असलेले एक मेज ठेवले. त्याच्यावर एक ब्रॉझचे पात्र ; मद्याला स्वाद येण्यासाठी एक कांदा, मध आणि जवपिठाच्या वड्या होत्या. शिवाय वृद्धाने स्वदेशाहून बरोबर आणलेला अपूर्व कलाकुसरीचा एक पेलाही तेथे होता व त्याच्यावर सोन्याच्या गुंड्या बसवलेल्या असून त्याच्या चार कानांवर प्रत्येकी दोन सोनेरी कबुतरे दाणे खात असल्यासारखी कोरली होती, आणि त्याला दोन पाय होते. तो पेला भरला असताना दुसऱ्या कोणाला मेजावरून तो उचलणे सहज साधले नसते, पण नेस्तॉर अगदी लीलेने ते करू शकत होता. या पेल्यात त्या देवीसम सुंदर स्त्रीने प्रॅम्निअन मद्यात एक मिश्रण केले. शेळीच्या दुधापासून बनवलेला खारा चक्का ब्रॉझच्या किसणीवर किसून त्यात टाकला, मूठभर पांढऱ्या जवाचे पीठ घातले आणि याप्रमाणे ते मिश्रण तयार करून त्यांना ते पिण्यास दिले. ते पिऊन त्यांनी आपली तहान भागवल्यावर ते एकमेकांशी गप्पा मारू लागले व या क्षणाला पॅत्रोक्लस दाराशी आला.

जेव्हा वृद्धाने त्याला पाहिले तेव्हा तो चटकन जागेवरून उठला व पॅत्रोक्लसचा हात धरून त्याला तंबूत आणून त्याला आपल्यामध्ये बसण्यास त्याने सांगितले ; पण पॅत्रोक्लस जागच्याजागीच उभा राहून म्हणाला, "श्रेष्ठ महाशय, मला थांबता येणार नाही ; आत येण्यासाठी माझे मन तुम्हाला वळवता येणार नाही ; ज्याने मला पाठवले आहे तो वाटेल तशी गैरवागणूक चालवून घेणारा नाही, आणि त्याने मला तुम्हाला विचारण्यास सांगितले आहे की तुम्ही रणांगणावरून वाहून आणीत होतात तो जखमी मनुष्य कोण होता. आता मला स्वत:लाच दिसते आहे की तो स्वप्रजापाल मॅकॲऑन आहे. मला परत जाऊन ॲकिलिझला हे सांगितले पाहिजे. महाशय, आपण जाणताच की तो किती भयंकर मनुष्य आहे व दोष नसला तरीही तेथे दोष चिकटवण्यास तो किती तयार असतो ते !"

आणि नेस्तॉरने उत्तर दिले, "ॲकिअन्सपैकी किती जण जखमी झाले असतील ते जाणण्याची पर्वा ॲकिलिझला कशाला हवी ? आमच्या सैन्यात विषण्णतेचे जे साम्राज्य पसरले आहे त्याची त्याला क्षिति नाही. आमचे सर्वांत शूर सेनाप्रमुख जायबंदी होऊन पडले आहेत. तायदिअसपुत्र शूर दायोमिद जखमी झाला आहे, तसेच युलिसिस व ॲगॅमेम्नॉनही ; युरिपिलसच्या मांडीत बाण लागला आहे आणि मी हा इतक्यातच रणक्षेत्रावरून या माणसाला घेऊन येतो आहे. यालाही बाणाची जखम झाली आहे ; तरीही इतका शौर्यशाली असून ॲकिलिझ त्याची तमा बाळगीत नाही व त्याला अनुकम्पा कशी ती ठाऊकच

नाही. आम्ही काही केले तरी इलाज न चालून नौका पेटेपर्यंत व आम्ही एकावर एक पडून मरेपर्यंत का तो थांबणार आहे ? माझ्यापुरते सांगायचे झाल्यास माझ्यात आता अधिक शक्ति किंवा चिकाटीही उरली नाही ; काही गुरे पळवण्याच्या प्रकरणावरून आमच्यात व एलिसच्या लोकात लढाई झाली होती त्या दिवसात मी जसा तरुण व बलवान होतो तसा अजून असतो तर किती बरे होते ! त्यावेळी मी लूट हाकून आणीत असता एलिसमधला रहिवासी हायपॅरोकस याचा शूर पुत्र इतिमोनिअस याला मी ठार मारले ; आपल्या गाईंच्या रक्षणार्थ तो पुढच्या फळीत लढत असता माझ्या हाताने फेकलेला भाला त्याला लागला ; तेव्हा तो मरून पडला, आणि त्याच्याभोवतालचे ग्रामीण लोक फार भिऊन गेले. आम्ही त्या मैदानावरून अपार लूट हाकून नेली,––गुरांचे पन्नास कळप आणि तेवढेच मेंढरांचे ; तसेच डुकरांचेही पन्नास व तितकेच चौफेर पसरलेल्या बकऱ्यांचे ; घोड्यांपैकी आम्ही दीडशे काबीज केल्या ; सर्वच्या सर्व घोड्या व त्यातल्या पुष्कळांबरोबर धावणारी त्यांची शिंगरेही होती. ही सर्व जनावरे रात्रीची आम्ही नेलिअसच्या पायलस नगरीपर्यंत हाकून थेट आत नेली आणि नेलिअसला मनातून फार बरे वाटले, कारण मी पहिल्याप्रथमच मैदानात उतरलो असूनही इतके सगळे पशुधन जिंकून आणले होते. दिवस उजाडताच दूत घोषणा करीत फिरले की एलिसच्या जितक्या लोकांना जुने कर्ज वसूल करून घ्यायचे असेल त्यांनी पुढे यावे ; आणि प्रमुख पायलिअन्स लुटीचे वाटे करण्यास जमा झाले. एपिअन्सकडून ज्यांना भांडीकुंडी मालमत्ता वसूल करावयाची होती असे पुष्कळ होते, कारण आम्ही पायलसचे लोक थोडे होतो आणि अन्यायाने आमच्यावर जुलूम झालेला होता ; काही वर्षांपूर्वी हर्क्युलिझ आला होता व त्याने आमच्यावर चांगलाच हात टाकला होता, त्यामुळे आमचे सगळे उत्तम लोक मारले गेले होते. नेलिअसला बारा मुलगे होते पण एकटा मीच उरलो, बाकी सगळे ठार झाले ; या सगळ्याच्या भरंवश्यावर उर्मट होऊन एपिअन्सनी आम्हाला तुच्छ लेखले होते व आमचे पुष्कळ नुकसान केले होते. माझ्या पित्याने एक गुरांचा तांडा व एक मोठा मेंढरांचा कळप निवडला––एकुण तीनशे प्राणी आणि त्यांचे गुराखी व मेंढपाळही बरोबर घेतले कारण एलिसमध्ये त्याचे मोठे कर्ज येणे होते व ते म्हणजे पारितोषिके मिळवणारे चार घोडे ; ते घोडे व त्यांचे रथ स्पर्धासाठी गेले होते, व एक पवित्र तिवई, त्यांना जिंकायची होती ; पण ऑगिअस राजाने ते घेतले, आणि घोडे हाकणाराला ते गमावल्याचा खेद करीत परत धाडले. तो राजा जे बोलला व त्याने जे केले त्यामुळे नेलिअस रागावला होता आणि घोड्यांच्या बदल्यात त्याने

स्वत: मोठे मोल घेतले ; पण बाकीचे सारे त्याने वाटून टाकले ; कोणाही माणसाला त्याच्या संपूर्ण वाटयापेक्षा कमी पडू नये म्हणून त्याने काळजी घेतली.

याप्रमाणे सर्व गोष्टींची आम्ही व्यवस्था केली आणि नगरीभर देवांप्रीत्यर्थ यज्ञ केले ; पण तीन दिवसानंतर एपिअन्स मोठ्या संख्येचा एक जथा घेऊन आले ; त्यांच्याबरोबर ओळीने त्यांचे रथ होते व संपूर्ण शस्त्र-कवच-सिद्ध असे पोरसवदा व युद्धात अनभिज्ञ असे दोन मॉलिओनिज्ञ होते. आता पायलॉसच्या सीमेवर, ॲल्फिअस नदीच्या काठी खडकाच्या अगदी टोकावर वसलेले थ्रायोएसा नावाचे एक गाव आहे ; हे नष्ट करण्याचा त्यांचा विचार होता आणि म्हणून त्याच्या जवळपास त्यांनी छावणी ठोकली ; पण त्यांनी आपले सबंध मैदान ओलांडल्यानंतर, रात्रीची, ऑलिम्पसवरून मिनर्व्हा तीरासारखी खाली उतरली आणि तिने आम्हाला व्यवस्थित सैन्यरचना करण्यास आज्ञा दिली. पायलॉसमध्ये तिला लढण्यास उत्सुक सैनिक मिळाले, कारण लोकांचा युद्ध करण्याचा निश्चयच होता. नेलिअस मला शस्त्रसज्ज होऊ देत नव्हता, त्याने माझे घोडे लपवून ठेवले, कारण मला अजून युद्धाची काही माहिती नसणार असे त्याचे म्हणणे होते, तरीही मिनर्व्हाने लढाईची अशी योजना केली की जरी मी पदाती होतो तरी आमच्या अश्वदलामध्ये लढून त्यांच्यातल्या आघाडीच्या लोकांशी चढाओढ केली. ॲरिनिजवळ समुद्राला मिळणारी मिन्थेइअस म्हणून एक नदी आहे ; तिथे घोडेस्वार व (त्यांच्याबरोबर) मी सकाळपर्यंत थांबलो, आणि मग सकाळी पायदलाची पथकेही मोठ्या संख्याबलाने येऊन आमच्यामध्ये दाखल झाली. तेथून संपूर्ण शस्त्रसाजासह व नानाविध सामग्रीसह आम्ही दुपारच्या सुमारास अल्फिअस नदीच्या पवित्र जलौघापाशी आलो, आणि तेथे सर्वशक्तीमान जव्हला बळी अर्पण केले ; त्याचप्रमाणे ॲल्फिअसला एक बैल, दुसरा एक बैल नेपच्यूनला व कळपातली एक कालवड मिनर्व्हाला असेही बळी दिले. यानंतर आमच्या पथकातून आम्ही सायंभोजन केले व प्रत्येकजण शस्त्र-सज्ज, असे सगळे नदीकाठी विश्रांतीसाठी पहुडलो.

"एपिअन्सनी त्या नगरीला वेढा दिला होता आणि ती घेण्याचा त्यांचा निश्चय होता ; पण ते होण्याअगोदर त्यांच्यापुढे एक निकराची लढाई वाढून ठेवलेली होती. सूर्याची किरणे पृथ्वीवर पसरू लागली तेव्हा आम्ही जव्हची व मिनर्व्हाची प्रार्थना करून युद्धास जुंपलो, आणि लढा सुरू होताच स्वत:चा प्रतिस्पर्धी मारुन त्याचे घोडे घेणारा पहिला लढवय्या मी होतो. म्युलिअस हे त्या वीराचे नाव ; तो ऑगिअसचा जावई होता ; त्या राजाची सर्वांत थोरली मुलगी सुवर्णकेशा ॲगॅमिदे हिच्याशी त्याचे लग्न झाले होते. पृथ्वीच्या पाठीवर

उगवणाऱ्या प्रत्येक औषधी वनस्पतीचा गुणधर्म तिला ठाऊक होता. तिचा पती तो म्युलिअस माझ्या रोखाने येत असता मी त्याला भाला मारला व तो जेव्हा उलटापालटा होऊन धुळीत पडला, तेव्हा त्याच्या रथावर उडी मारून मी आघाडीच्या सैन्यश्रेणीत प्रवेश केला. अश्वदलाचा प्रमुख, त्यांच्यातला सर्वोत्तम पुरुष आडवा झालेला पाहून एपिअन्स दाही दिशांना पळत सुटले आणि मी त्यांच्यावर एकाद्या चक्री तुफानासारखा सोसाट्याने चालून गेलो. मी पन्नास रथ जिंकले व प्रत्येकातले दोन दोन लोक माझ्या भाल्याने मारून त्यांना धूळ चारली. ॲक्तॉरचे पुत्र, ते दोन मॉलिऑनिझदेखील मी मारले असते ; पण त्यांचा खराखुरा पिता भूकम्पाधीश नेपच्यून याने त्यांना दाट धुक्यात लपवून लढाईच्या गर्दीतून बाहेर नेले. हे झाल्यावर जव्हने आम्हा पायलिअन्सना महान विजय प्रदान केला ; कारण आम्ही शत्रूचा मैदानावरून दूरपर्यंत पाठलाग करून त्यांचे लोक मारले व त्यांची चिलखते काढून आणली ; अखेरीस आम्ही आमचे घोडे ब्युप्रॅसिअम या गव्हाने संपन्न अशा प्रदेशापर्यंत व ॲलिसिअन नावाची टेकडी असलेल्या ओलेनियन खडकापर्यंत दौडवीत नेले ; पण त्या ठिकाणाहून मिनर्व्हाने त्या लोकाना परत फिरवले. तेथे मी शेवटच्या माणसाला मारून त्याला तेथेच राहू दिले ; मग ॲकिअन्सनी आपले घोडे ब्युप्रॅसिअमहून परत पायलॉसला हाकले आणि देवातल्या जव्हला व मानवातल्या नेस्तॉरला धन्यवाद दिले.''

''असा मी माझ्याशी तुल्यबल लोकांमध्ये त्यांना सहाय्य करीत खेळीमेळीने नांदत होतो—अगदी नेहमी—त्यात कधी फेरबदल झाला नाही. पण ॲकिलिझला आपले सारे शौर्य स्वतःसाठीच राखून ठेवायचे आहे ; जेव्हा आमच्या सैन्याचे तुकडे तुकडे होतील तेव्हा भविष्यकाळात या वर्तनाबद्दल त्याला कटु पश्चाताप होईल. माझ्या भल्या मित्रा, थिआहून तुला ज्या दिवशी मेनिसिअसने ॲगॅमेम्नॉनकडे पाठवले तेव्हा त्याने तुला काय बजावले होते ? तेव्हा युलिसिस व मी आत घरात होतो, आणि तो तुला काय म्हणाला ते सगळे आम्ही ऐकले, कारण आम्ही सबंध ॲकिआभर सैन्यभरतीसाठी माणसे, उठाव करून गोळा करीत होतो, तेव्हा पेलिअसच्या शोभिवंत घरी आलो होतो, आणि त्यावेळी आम्हाला मेनितिअस व तू तेथे दिसलास, तसाच तुमच्याबरोबर ॲकिलिझही होता. वृद्ध उमराव वीर पेलिअस बाहेरच्या अंगणात कालवडीच्या मांड्यांची लठ्ठ हाडे मेघगर्जनांचा स्वामी जव्ह याच्या प्रीत्यर्थ भाजीत होता ; आणि हातात एक सुवर्णचषक धरून त्यातून अग्नीतल्या यज्ञाहुतीवर तो मद्यार्घ्य सोडीत होता. तुम्ही दोघे कालवडीचे तुकडे करण्यात गुंतला होतात आणि अगदी त्या क्षणाला

आम्ही दारात उभे राहिलो. तेव्हा ॲकिलिझ चटकन उठून उभा राहिला, त्याने आम्हाला हाताला धरून घरात नेले, मेजापाशी बसवले व अतिथी अपेक्षितात ती सत्कारसामग्री त्याने आमच्यापुढे ठेवली. जेव्हा मांस व मद्य खाऊन पिऊन आम्ही तृप्त झालो तेव्हा मी माझ्या मनातले काय म्हणायचे होते ते म्हणालो व तुम्हा दोघांनाही आमच्याबरोबर चलण्याचा आग्रह केला. तसे करण्यास तुम्ही तयार होताच, आणि त्या दोन वृद्धांनी निघताना तुम्हाला पुष्कळ व कठोर शिस्तबद्ध उपदेश केला. वृद्ध पेलिअसने आपला पुत्र ॲकिलिझ यास आज्ञा केली, 'नेहमी सर्वांत पुढे लढत रहात जा आणि बरोबरीच्यांवर कडी कर', आणि ॲक्तॉरपुत्र मेनितिअसने तुला हे असे सांगितले : तो म्हणाला, "माझ्या मुला, ॲकिलिझ तुझ्यापेक्षा उच्च कुळातला आहे, पण तो तुम्हा दोघात जरी गुणांनी पुष्कळच उजवा असला तरी वयाने तू वडील आहेस तेव्हा त्याला शहाणपणाची सल्ला देत जा, योग्य मार्गदर्शन कर, आणि मग तो तुझे ऐकत गेला की त्याचे स्वतःचेही भले होईल. याप्रमाणे तुझ्या पित्याने तुला बजावले होते पण तू ते सारे विसरला आहेस ; तरीही अजूनसुद्धा हे सगळे तू ॲकिलिझला सांग. बघ तो तुझे ऐकतो का. कुणास ठाऊक, स्वर्गस्थ देवांच्या मदतीने तू त्याचे मन वळवू शकशीलही. कारण मित्रांचा उपदेश ऐकणे नेहमीच बरे असते. तथापि जर तो एखाद्या पूर्वकौलामुळे भयशंकित असेल, किंवा त्याच्या मातेने जव्हकडून कळलेले त्याला काही सांगितले असेल, तर त्याला तुला धाडू दे व बाकीचे मिर्मिदॉन तुझ्याबरोबर येऊ देत—यदाकदाचित तुमच्यामुळे दॅनाअन्सना आशेचा किरण व वाचण्याची संधी मिळेलही ! आणि त्याचे चिलखत तुझ्यावर चढवून तुला त्याने युद्धावर पाठवावे, म्हणजे त्रोजन तुलाच ॲकिलिझ समजून लढायचे सोडून देतील ; असे झाले म्हणजे मग ॲकिअन्सच्या पुत्रांना जरा उसंत मिळेल. कारण ते लढाईच्या गर्दीत चांगलेच सापडले आहेत व लढत असता श्वास घ्यायलासुद्धा त्यांना फुरसत नसते. ताजातवाना असलेला तू थकलेल्या शत्रूला त्याच्या तटापर्यंत आणि आपल्या तंबू व नौकांपासून दूर सहज हाकलून लावू शकशील."

या त्याच्या शब्दांनी पॅत्रोक्लसचे हृदय हेलावले व तो नौकांच्या ओळींपुढून पळत इॲकसचा वंशज ॲकिलिझ याच्याकडे निघाला. युलिसिसच्या नौकांपाशी ॲकिअनांच्या सभेची व न्यायालयाची जागा आणि देवांना अर्पण केलेल्या वेदी होत्या. जेव्हा पॅत्रोक्लस तळमळत युलिसिसच्या नौकांपाशी आला तेव्हा त्याला तेथे युइमॉनपुत्र युरिपिलस भेटला ; तो मांडीत बाणाने जखम झाल्याने लंगडत लढाईतून दूर होत होता. त्याच्या डोक्यावरून व खांद्यावरून घाम

निथळत होता आणि जीवघेण्या जखमेतून काळे रक्त उसळून बाहेर येत होते, पण तो होता मात्र पूर्ण भानावर. त्याला पाहून त्याच्याबद्दल मेनितिअसपुत्राला अनुकम्पा वाटली आणि तो दयार्द्रपणे म्हणाला, "अहो, दॅनाअनांच्या मंदभाग्य राजवंशीयजनहो, व मंत्रीहो, तर मग आता तुमच्या नशिबी मित्रांपासून व मायभूमीपासून दूर असतांना त्रॉयच्या कुत्र्यांना तुमची चरबी चारणे आले काय ? सांग, उदात्त युरिपिलस, ॲकिअन्स महान हेक्तरला आटोक्यात ठेवू शकणार की आता त्याच्या भाल्यापुढे त्यांचे पतन होणार ?"

जखमी झालेल्या युरिपिलसने उत्तर दिले, "थोर पॅत्रोक्लस, ॲकिअन्सना आता काही आशा उरली नाही, ते आपल्या नौकांपाशी नष्ट होणार. आमच्यातले जेवढे म्हणून राजवंशीय होते ते सारे त्रोजनांकडून जमीनदोस्त होऊन व जखमी होऊन पडले आहेत आणि त्रोजन उत्तरोत्तर अधिकच बलवान होत आहेत. पण मला वाचव व तुझ्या नौकेकडे घेऊन चल ; माझ्या मांडीतला बाण कापून काढ ; कोमट पाण्याने जखमेवरचे काळे रक्त धुवून काढ, आणि तिच्यावर त्या प्रसिद्ध गुणकारी औषधी वनस्पतींचा लेप कर—त्यांची माहिती तुला ॲकिलिझने दिलेली आहे असे म्हणतात, व त्याला ती दिली सर्व मानवाश्वांमध्ये (सेन्तॉर) सच्छील अशा किरॉनने." कारण पोदॅलिरिअस व मॅकॲान या भीषग्वर्याबद्दल मी असे ऐकतो की एक आपल्या तंबूत जखमी होऊन पडला आहे व त्याला स्वतःलाच उपचाराची गरज आहे आणि दुसरा मैदानात त्रोजन्सशी लढत आहे."

मेनितिअसचा शूर पुत्र म्हणाला, "शूर युरिपिलस, या गोष्टी कशा काय होऊ शकणार ? मी काय बरे करणार ? ॲकिअन्सचा दृढाधार जो जेरिनीचा नेस्तॉर त्याच्याकडून थोर ॲकिलिझला संदेश देण्यासाठी मी चाललो आहे, पण तरीही, तुझ्या संकटाकडे मी दुर्लक्ष करणार नाही."

असे म्हणून त्याने त्याला कमरेभोवती हात घालून सावरून तंबूत नेले आणि एका सेवकाने त्याला पाहिल्यावर त्याला पडण्यासाठी जमिनीवर बैलाची चामडी पसरली. त्याच्यावर लांब पाय पसरून त्याने युरिपिलसला निजवले आणि तो तीक्ष्ण बाण त्याच्या मांडीतून कापून काढला. जखमेतले काळे रक्त त्याने कोमट पाण्याने धुवून काढले ; नंतर एक कडु वनस्पती ठेचून, ती दोन्ही हातांवर चोळून ती जखमेवर पसरली ; सर्व वेदना नष्ट करण्याचा गुण त्या गुणकारी वनस्पतीत होता. या उपायामुळे लौकरच जखम कोरडी पडली व रक्त वहायचे थांबले.

● ● ●

# सर्ग १२

तेव्हा इकडे तंबूत मेनितिअसपुत्र युरिपिलसच्या दुखापतीवर उपचार करीत होता, पण तिकडे आर्गाइव्हज, आरगॉसवासी व त्रोजन अजून प्राणपणाने लढत होते आणि खंदक व त्याच्यामागची उंच भिंत यांचा त्रोजन्सना फारवेळ प्रतिबंध होणार नव्हता. आर्गाइव्हजनी ती भिंत आपल्या नौकांच्या संरक्षणासाठी बांधली होती, आणि तिच्याभोवती तो खंदक यासाठी खणला होता की त्यांच्या नौका व त्याप्रमाणेच त्यांनी जिंकलेल्या बहुमोल लुटीचेही रक्षण व्हावे; पण त्यांनी देवांप्रीत्यर्थ महायज्ञ केले नव्हते. ते बांधकाम अमरांच्या संमतीविना झाले होते, आणि म्हणून ते टिकले नाही. जोपर्यंत हेक्तर जिवंत होता व ॲकिलिझ आपला राग मनात बाळगून होता, आणि जोपर्यंत प्राअॅमची नगरी पादाक्रांत झाली नव्हती तोपर्यंत ॲकिअन्सची ती प्रचंड भिंत भक्कमपणे उभी होती ; पण जेव्हा त्रोजन्समधले सर्वात शूर होते ते उरले नाहीत आणि तीच गत आर्गाइव्हजचीही झाली––अर्थात त्यांच्यातले थोडे अद्यापि जिवंत होते––शिवाय जेव्हा दहाव्या वर्षात नगरीची लूट होऊन ऑर्गाइव्हज आपल्या नौकांतून स्वदेशी परत गेले, तेव्हा नेपच्यून व ॲपॉलो यांनी ती भिंत नष्ट करण्यासाठी परस्पर विचारविनिमय केला, आणि इदा पर्वतापासून निघालेल्या व समुद्राला मिळणाऱ्या सर्व नद्यांचे प्रवाह त्या भिंतीवर वळवले : ऱ्हीसस, हेप्तॅपोरस, कॅरेझस, ऱ्होदिअस, ग्रेनिकस, इसोपस, सुभगा स्कॅमॅन्दर––त्याचप्रमाणे जिच्याकाठी अनेक ढाली, शिरस्त्राणे पडली होती आणि देवगणांच्या वंशाचे पुष्कळसे वीर धुळीत पडले होते ती सिमॉइस, या त्या नद्या होत्या. या सर्व नद्यांची मुखे फीबस ॲपॉलोने वळवून एकत्र केली आणि त्यांना नऊ दिवसपर्यंत त्या भिंतीवर वाहण्यास लावले ; त्याचवेळी जव्हने संततधार पाऊस पाडून ती भिंत लौकर समुद्रात धुपून जावी असे केले. स्वतः नेपच्यूनने हातात त्रिशूल घेऊन त्या कामाचे सर्वेक्षण केले आणि ॲकिअन्सनी इतक्या परिश्रमपूर्वक घातलेल्या पायाच्या तुळया व दगड समुद्रात फेकून दिले. हेलेस्पाँतच्या जोरदार प्रवाहाने त्याने सर्व बांधकाम भुईसपाट केले आणि मग याप्रमाणे भिंत नामशेष करून टाकल्यानंतर ती जेथे होती त्या जागेवर एक मोठा रेतीचा किनारा पसरून दिला. हे झाल्यावर त्याने नद्यांना परत त्यांच्या मूळच्या पात्रात वळवले.

हे, नेपच्यून व अॅपॉलो नंतरच्या काळात करणार होते. पण यासमयी त्या भिंतीभोवती युद्ध प्रक्षोभ चालूच होता; भिंतीवर पडणाऱ्या घावांनी तिच्यामधले लाकुडकाम निनादून उठत होते. जव्हच्या क्रोधाच्या फटक्यांनी दबून गेलेले आर्गाइव्हज विध्वंसाचा बलशाली प्रसारक हेक्तर याला घाबरून आपल्या नौकांपाशीच कडे करून बसले होते. तो पूर्वीसारखाच चक्रवाताच्या बळाने व त्वेषाने लढत होता जसा एकादा सिंह अथवा वनवराह हल्ला करणाऱ्या कुत्र्यांवर व माणसांवर उग्रपणे उलटतो, त्याच्या सन्मुख ते अभेद्य भिंतीसारखे खडे राहून त्याच्यावर भाल्यांचा वर्षाव करतात, त्याचे धैर्य अविचल आहे पण त्याचा हा दुर्दम्य आवेशच त्याचे मरण ओढवून घेणार आहे; अनेकदा पाठलाग करणाऱ्यांच्या अंगावर धावून जाऊन तो त्यांना उधळून टाकतो व तितक्याच वेळा ते माघार घेतात अगदी तसाच हेक्तर आपल्या सैन्यात फिरत, आपल्या लोकांना चेतवीत त्यांना खंदक ओलांडण्यास प्रोत्साहन देत होता.

पण घोडे खंदक पार करण्यास धजत नव्हते, ते काठावर खिकाळत उभे रहात, कारण खंदकाच्या रुंदीने त्यांची छाती दडपून जात होती. त्याच्यावरून उडी मारणे किंवा त्यातून जाणे त्यांना शक्य नव्हते कारण सर्वबाजूंनी त्याचे काठ उभय तीरांना पाण्यावर पुढे आले होते. काठावर हल्ला करणाऱ्या सर्वांपासून बचाव व्हावा म्हणून अॅकिअन्सनी रोवलेले अणकुचीदार खांब इतके जवळ जवळ व भक्कम होते, की घोडा त्यामधून जाऊन मागचा रथ ओढून नेणे शक्य नव्हते; पण जे पदाती होते त्यांनी खंदक ओलांडण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. मग पोलिदामाझ हेक्तरपाशी जाऊन म्हणाला, "हेक्तर, आणि त्रोजन्स व मित्रपक्षीयांचे तुम्ही इतर नायक हो, खंदकापार आपले घोडे हाकून नेण्याचा आपण प्रयत्न करणे वेडेपणा ठरेल; तो ओलांडणे फार कठिण जाईल, कारण तो अणकुचीदार खांबांनी भरला आहे; त्याच्या-पलीकडे भिंत आहे. तेव्हा आपले घोडे खंदकात उतरू शकणार नाहीत, आणि उतरले तरीसुद्धा काही उपयोग होणार नाही. शिवाय ही जागा अरुंद आहे व त्यामुळे आपल्याला अपाय होईल. जर खरोखरच महान जव्हच्या मनात त्रोजन्सना मदत करायचे, त्याच्या कोपाने अॅकिअन्सना संपूर्ण नष्ट करायचे असेल, तर त्यांना आताच व इथेच आरगॉसपासून दूर असताना मेलेले पाहण्यास मला स्वत:ला आनंदच होईल, पण त्यांनी पुन्हा हिंमत धरून, गोळा होऊन लढाई दिली आणि आपण नौकांपासून मागे धडपडत खंदकात हाकलेले गेलो, तर आपल्यातील एक माणूस देखील नगरीत परत जाऊन झालेला वृत्तांत कळवण्यास उरणार नाही. म्हणून आता, आपण सगळे मी म्हणतो तसे करू

या; आपले घोडे खंदकापाशी आपल्या शिलेदारांना धरून ठेऊ द्या, पण आपण संपूर्णपणे शस्त्रसज्ज होऊन एकजुटीने हेक्तरच्यामागे जाऊ, आणि जर त्यांच्या सर्वनाशाचा नियतीने योजलेला दिवस जवळ आला असेल तर ॲकिअन्स आपल्यापुढे टिकाव धरू शकणार नाहीत."

असे पोलिदामाझ बोलला, त्याच्या बोलण्याने प्रसन्न होऊन हेक्तर पूर्ण चिलखत चढवलेला असा रथावरून उडी घेऊन खाली आला; आणि त्याची ती कृती पाहून इतर त्रोजन्सही रथांवरून उतरले. मग प्रत्येकाने आपापल्या सारथ्याकडे घोडे सोपवून ते खंदकापाशी त्यांच्यासाठी तयार ठेवण्यास सांगितले. मग त्यांनी सैन्याची रचना भिन्न भिन्न पथकात केली, व असे झाल्यावर पाच टोळ्या करून ते नेत्यांच्या मागून गेले. हेक्तर व पोलिदामाझ बरोबर जे गेले ते सर्वात शूर व संख्येने सर्वाधिक असून भिंतीची फळी फोडून नौकांपाशी जाऊन लढण्याचा त्यांचा निर्धार होता. त्यांच्याबरोबर तिसऱ्या क्रमांकाचा सेनानी म्हणून सेब्रिओनिझही सामील झाला, कारण हेक्तरने आपला रथ एका कमी युद्धनिपुण सैनिकाकडे सोपवला होता. त्यानंतरचे पथक पॅरिस, ॲल्कॅथॉउस व ॲगेनॉर यांच्या नेतृत्वाखाली होते; तिसऱ्या पथकाचे नेते प्राॲमचे दोन पुत्र हेलेनस, देइफोबस हे असून त्यांच्याबरोबर वीर ॲसिअस होता. हा हिरतॅकसचा पुत्र आपल्या पित्याच्या सेलेइस नदीकडील भागात ज्यांची पैदास होते त्या प्रचंड काळ्या घोड्याच्या रथातून ॲरिस्बीहून आला होता. ॲंकिसिझचा शूर पुत्र इनिआज आणि युद्धाच्या सर्व कसबात कुशल असे आर्के-लोकस व ॲकॅमाज हे दोघे ॲन्तेमॉरपुत्र चौथ्या पथकाचे नेतृत्व करीत होते. मित्रपक्षीयांवरचा प्रमुख सार्पेदॉन असून स्वतःच्या खालोखाल ज्यांना तो शूर मानीत असे ते ग्लॉकस व ॲस्तेरोपिअस यांना त्याने बरोबर घेतले होते अर्थात् त्या सर्वापेक्षा तो स्वतः पुष्कळच प्रमाणात अधिक पराक्रमी होता. या लोकांनी एकमेकांना बैलाच्या कातड्याच्या ढालींनी सज्ज होण्यास मदत केली आणि ते थेट दॅनाअन्सवर चालून गेले, कारण त्यांना खात्री होती की शत्रू फार वेळ टिकाव धरू शकणार नाही, आणि म्हणून आपणच आधी नौकांवर हल्ला चढवावा !

बाकीच्या त्रोजन्स व मित्रपक्षीयांनी आता पेलिदामाझचा सल्ला मानला, पण हिरतॅकसपुत्र ॲसिअस आपले घोडे व आपला शिलेदार मागे ठेवण्यास तयार होईना. आपल्या मूर्ख धाडसीपणाच्या भरात दोन्हीबरोबर घेऊन तो पुढे नौकांकडे निघाला, आणि परिणामी आपला शेवट करून घेण्यास चुकला नाही. मोठ्या आनंदात व उत्साहात आपले घोडे व रथ बरोबर घेऊन,

वाऱ्याने सारखे झोडपल्या जाणाऱ्या इलिअसला तो पुन्हा कधी परत जायचा नव्हता. ते तो करू शकण्यापूर्वीच अपशकुनामध्ये याच्या मृत्यूची छाया त्याच्यावर पडून, द्युकॅलिअनचा उदात्त पुत्र आयदोमिनिअस याच्या भाल्याने तो रणांगणी पडला होता. नौकांच्या डाव्या पारवाकडे, ज्या बाजूने मैदानावरून अ‍ॅकिअन्स आपले रथ व घोडे परत आणीत असत, तिकडे त्याने रथ हाकला होता. या बाजूला रथातून येऊन त्याने पाहिले की दरवाजे सताड उघडे आहेत, दांडगा अडसर बाजूला काढलेला आहे कारण नौकांकडे पळून येणाऱ्या त्यांच्या सोबत्यांना सुलभ प्रवेश मिळावा म्हणून द्वाररक्षकांनी दारे उघडी ठेवली होती. येथे त्याने हेतुपुरःसर घोडे वळवले; त्याचे अनुयायी मोठ्याने आरोळ्या ठोकीत त्याच्या मागोमाग आले, कारण त्यांना खात्री वाटत होती की अ‍ॅकिअन्स काही आता फार वेळ प्रतिकार करू शकत नाहीत, व म्हणून आता नौकांवर हल्ला चढवावा. त्यांना कल्पनाही नव्हती की दरवाजात त्यांना सर्वात शूर नायकांपैकी दोघे, लढवय्या लॅपिथी जमातीचे अभिमानी पुत्र भेटतील. एक पिरिथोउसचा बलाढ्य मुलगा पोलिपितिझ व दुसरा प्राणघातक मार्सशी तुल्य असा लिओन्तिअस पर्वतावरच्या दोन उंच ओक वृक्षांसारखे हे दोघे दरवाजांपुढे उभे राहिले. विस्ताराने पसरणाऱ्या मुळांवर उंच मनोऱ्यासारखे वर गेलेल्या आणि वर्षानुवर्षे वाऱ्यापावसाशी झगडणाऱ्या त्या तरुश्रेष्ठांसारखे हे दोघे पुरुष महान अ‍ॅसिअसच्या आक्रमणाची विश्वासपूर्वक व न डगमगता वाट पाहात राहिले. त्याच्या आणि आयमेनस, ऑरेस्तिक, अ‍ॅसिअसपुत्र अ‍ॅदॅमाज, थुऑन नी इनोमॉस यांच्या नेतृत्वाखाली आलेले त्रोजन्स मोठ्याने रणगर्जना करून आपल्या सुक्या वृषभचर्माच्या ढाली डोक्यावर धरून थेट भिंतीकडे धावले. थोडावेळ ते दोन द्वाररक्षक आतच थांबले व त्यांनी नौकांच्या बचावासाठी भक्कम उभे राहण्यास अ‍ॅकिअन्सना प्रोत्साहन दिले; पण जेव्हा त्यांनी पाहिले की त्रोजन्स भिंतीवर हल्ला करीत आहेत व मदतीसाठी ओरडणाऱ्या दॅनाअन्सनांची दाणादाण उडत आहे, तेव्हा ते जोरात बाहेर आले आणि दरवाज्यांपुढे पर्वतावरच्या दोन रानडुकरांसारखे लढले. जसे माणसांच्या व कुत्र्यांच्या हल्ल्याला ते रानडुकर तोंड देतात व दोन्ही बाजुंना मुसंड्या मारून सभोवारचे सारे बन मुळापासून उपटून मोडून टाकतात व त्यांच्या सुळ्यांचे कडाकड आवाज ऐकू येत असतात––अखेर कोणीतरी घाव घालून त्यांचा शेवट करतो––अगदी त्याच प्रकारे चकाकत्या ब्राँझचा खडखडाट त्यांच्या वक्षांवर शस्त्रांचा वर्षाव होत असता झाला; कारण स्वपराक्रमावरच्या विश्वासाने व भिंतीवरील सोबत्यांच्या भरंवशावर ते अतित्वेषाने लढले.

वरच्या लोकांनी स्वतःच्या व आपल्या तंबू नौकांच्या रक्षणार्थ वरून मोठमोठे दगड आक्रमकांवर टाकले. एकाद्या झंझावाती वाऱ्याच्या झोताने काळ्या ढगातून हिमखंड भूमीकडे खेचून आणावे व त्याच्या वर्षावाने भूमीवर जाड थर जमावा तसाच दाट तो दगडांचा मारा झाला––व तशीच त्रोजन्स व अॅकिअन्सच्याही हातची शस्त्रे जमावाने पडत होती, प्रचंड दगड वरसू लागले की शिरस्त्राणे व ढाली खणखणत, आणि निराशेच्या भरात हिरतंकसपुत्र अॅसिअसने ओरडून दोन्ही मांड्यांवर हात आपटले. तो आक्रंदला, "तात जव्ह, खरोखरच तूही सर्वस्वी असत्यभाषी आहेस." आर्गाइव्हज् वीर आमच्यापुढे टिकणार नाहीत याची मी खात्री करून घेतली होती व पहावे तो वारीक कमरेच्या गांधिलमाशासारखे किंवा वाटेकडच्या खडकात आता ज्यांची मोहोळे आहेत अशा मधमाशासारखे––ज्या विवरात त्यांनी मोहोळे केली आहेत ती ते बचाव केल्याशिवाय राहू देत नाहीत, तर ती घेऊ पाहणाऱ्या साऱ्यांविरुद्ध आपल्या लहानग्यांच्या रक्षणासाठी लढतात––अगदी तसेच हे लोक, अवघे दोघेच तर आहेत, तरी दरवाज्यावरून हटवले जात नाहीत; उलट मारू किंवा मरू म्हणून खंबीरपणे उभेच आहेत.

तो असे जव्हला उद्देशून बोलला पण जव्हच्या मनावर त्याचा काही परिणाम झाला नाही कारण विजयाचे श्रेय हेक्तरला द्यायचे जव्हच्या मनात होते. दरम्यान बाकीचे त्रोजन्स इतर वेशींपाशी लढत होते. तथापि या साऱ्या गोष्टींबद्दल निवेदन करू शकण्यास मी काही कोणी देव नाही, कारण लढाई पेटलेल्या भट्टीसारखी त्या दगडी भिंतीभोवती सर्वत्र भडकली होती. आर्गाइव्हज जरी पेचात पडले होते तरी आपल्या नौकांचा बचाव करणे त्यांना भाग होते आणि अॅकिअन्सचे रक्षण करणारे सर्व देव मनात त्रस्त झाले होते; पण ते लॅपिथी जमातीचे लोक मात्र साऱ्या शक्तीनिशी लढतच राहिले.

तेव्हा पिरिथोउसचा प्रबलपुत्र पॉलिपितिझ याने दॅमासस याला भाल्याने त्याच्या गालावरून अडकवलेल्या शिरस्त्राणावर मारले, त्यावेळी शिरस्त्राण त्याचा बचाव करू शकले नाही, कारण भाल्याचे टोक आत शिरून, हाड फुटून आतील मेंदू विखरून गेला व तो वीर लढता लढता मेला. मग त्याने पायलॉन व आर्मेनस यांना मारले. मार्सवंशीय लिऑन्तिअस याने अॅन्तिमॅकसपुत्र हिप्पोमॅकस याच्या कमरपट्ट्यावर भाल्याने घाव घालून त्याचा प्राण घेतला. नंतर त्याने तलवार उपसून प्रथम अॅन्तिफॅतिझवर उडी घेऊन हातघाईच्या झुंजीत

त्याला मारले; तेव्हा तो उताणा भूमीवर पडला. त्याच्यानंतर यानेमेनॉन, आयमेनस व ऑरेस्तिझ यांना ठार करून एकामागून एक जमीनदोस्त केले.

त्या वीरांची चिलखते काढून घेण्यात ते गुंतले असता, पॉलिदॅमाज व हेक्तर यांच्या नेतृत्वाखालचे तरुण (आणि भिंतीचा भेद करून नौका पेटवून देण्याचा प्रयत्न करणारात यांचा सर्वात जास्त भाग होता व सर्वात शूर हेच होते.) काय करावे याविषयी अनिश्चित अवस्थेत अजून खंदकापाशीच उभे होते; कारण खंदक ओलांडण्याच्या खटपटीत ते असताना त्यांना देवांनी धाडलेले एक दुश्चिन्ह आकाशात दिसले होते—त्यांच्या सेनेच्या डाव्या फळीला वळसा घालीत उंच उडणारा एक गरुड: त्याच्या पंजात अजून जिवंत असलेला व सुटण्यासाठी धडपडणारा एक भयंकर रक्तवर्ण सर्प होता, तो सर्प सूड घेण्याच्या निश्चयाने वळवळत, वळसे घेत मागे डोके नेत गरुडास भिडण्यास धडपडत होता; अखेर त्याने गरुडाच्या मानेवर व छातीवर डंख मारले; तेव्हा वेदनेने गरुडाने त्याला सोडून देऊन सैन्याच्या मध्यभागी पडू दिले आणि तो कर्कश शब्द करीत वाऱ्याच्या दिशेने उडून गेला. ढाल धारण करणाऱ्या जव्हचे सूचक चिन्ह असा तो सर्प आपल्यात वळवळत पडलेला पाहून त्रोजन्स भयग्रस्त झाले, आणि पोलिदॅमाज हेक्तरजवळ जाऊन म्हणाला, "हेक्तर, जरी मी शहाणपणाने बोलत असलो तरीही आपल्या युद्धविषयक मसलतींच्या सभात तू नेहमी मला दोष देत असतोस. जर इतर लोकांपैकी एकाद्याने रणांगणावर किंवा मंत्रणासभेत तुझ्या इच्छेआड येणे हे तुला खरोखरच बरे वाटत नाही. त्यांनी नेहमी तुलाच पाठिंबा द्यावा असे तुला वाटत असते; तरीही मला जे सुयोग्य ठरेलसे वाटते ते मी बोलणारच. दॅनाअन्सशी त्यांच्या नौकांपाशी लढण्यासाठी आता आपण पुढे जाऊ नये; कारण, आपल्या सेनेच्या डाव्या फळीला वळसा घालून उंच उडणारा हा गरुड, ज्याच्या पंजात एक भयंकर रक्तवर्ण सर्प (आणि तोही जिवंत) होता, तो खरोखरच एक चिन्ह म्हणून खंदक ओलांडू पहाणाऱ्या त्रोजन्सकडे देवांनी पाठवलेला असेल, तर पुढे काय होईल ते मला ठाऊक आहे. गरुडाने सर्पावरची पकड सोडली, घरट्यातल्या पिलांकडे त्याला घेऊन जाण्यात त्या मादीला यश मिळाले नाही, आणि अगदी तशीच गत आपली होईल. जरी प्रचंड प्रयत्नाने आपण ॲकिअन्सचे दरवाजे व भिंत फोडून पार झालो व ते आमच्यापुढे हटले, तरी आपण आलेल्या मार्गाने सुरळितपणे परत जाणार नाही; आपले पुष्कळ लोक मागे रहातील व नौका वाचवण्यासाठी लढताना ॲकिअन्स त्यांना ठार मारतील. या प्रकरणात

प्रवीण व लोकांचा विश्वास संपादन केलेला कोणीही शकुनतज्ञ या चिन्हाचा अर्थ असाच वर्तवील".

हेक्तरने उग्रपणे त्याच्याकडे पाहिले व तो म्हणाला, "पॉलिदॅमाज, मला तू लावलेला अर्थ मान्य नाही. मनात आणलेस तर याहून काहीतरी चांगले तुला बोलता येईल. तथापि जर तू मनापासून बोलला असशील तर खरोखर मला वाटते स्वर्गातील देवांनी तुझी विवेकशक्ती हिरावून घेतली आहे. जव्हचे आदेश, सल्ला किंवा त्याने दिलेली वचने यांच्याकडे मी काही लक्ष देऊ नये असे तुला वाटते ? अरे ! त्याने तर वचनांच्या पुष्टीदाखल मस्तक खाली करून डोलवले होते. तुझे सांगणे की जव्हच्या आदेशापेक्षा रानकोंबड्याच्या उड्डाणाला मी जास्त मानावे! वा ! ते पक्षी फिक्कट प्रकाशाकडे उडतात की अंधाराकडे उडतात, किंवा ते माझ्या उजव्या हाताला आहेत की डाव्या, याची मला काय पर्वा? त्यापेक्षा मर्त्यांचा व अमरांचा राजा महान जव्ह याच्या आदेशांवर आपण भरवसा ठेवू या. मी एक, केवळ एकच शकून मानतो आहे तो हा की माणसाने स्वदेशासाठी लढावे. तू एवढा भितोस का? जरी आम्ही सगळे नौकांपाशी मारले गेलो तरी तू स्वतः ठार होण्याचा काही संभवच नाही, कारण तू दृढनिश्चयी नाहीस व धैर्यवानही नाहीस. तू लढणार नसलास व इतरांना तसे करण्यापासून आपल्या बोलण्याने परावृत्त करणार असलास तर तात्काल माझ्याच भाल्याला बळी पडशील".

असे बोलून तो पुढे निघाला व गगनभेदी गर्जना करून इतर त्याच्या मागे गेले. मग मेघगर्जनाधीप जव्हने एक प्रचंड वाऱ्याचा झोत इदा पर्वतांकडून नौकांकडे पाठवला! त्याने आणलेल्या धुळीने काही दिसेनासे होऊन ॲकिअन्स सुरक्षित असल्याच्या भ्रमात राहिले व हेक्तरची आणि त्रोजन्सची मोठीच सरशी झाली, कारण स्वतःच्या बळावर व जव्हने धाडलेल्या शुभलक्षणांवर विश्वास ठेवून त्यांनी ॲकिअन्सची भली थोरली भित फोडून पार जाण्यासाठी एकच उचल केली. भितीवरचे छाती इतके उंच कट्टे त्यांनी पाडले, बुरुजां-वरच्या भिंती उडवल्या, ॲकिअन्सनी भितीपुढे आधार म्हणून बांधलेले टेकू उध्वस्त केले; ते पाडल्यावर त्यांनी भितीतून पार होणे निश्चितच झाले होते; पण तरीही दॅनाअन्स त्यांच्यापुढे हटण्याचे मात्र काहीच चिन्ह दिसेना. त्यांच्या वृषभचर्माच्या ढालींनी त्यांनी बुरुजाभोवती संरक्षक भित उभारली व भिती-खाली शत्रूपैकी एखादा आला की त्याच्यावर हत्यारांचा मारा करणे चालूच ठेवले.

उभय ॲजॅक्स भितीभोवती सर्वत्र फिरत होते आणि ॲकिअन्सना प्रोत्साहन देत होते; काही जणांना त्यांनी गौरवले व चुकारपणा करताना दिसले त्यांची

वक्षकवचाने त्याचे संरक्षण केले नाही, भाला त्याच्या पोटात बसला व तो जड-शीळ असा भूमीवर पडला. मग आयदोमिनिअसने त्याच्या शेजारी उभे राहून दर्पोक्ती केली, "ऑथ्रिऑनिअस, दार्दनिसपुत्र प्राअॅमला त्याच्या मुलीसाठी तू जे करण्याचे वचन दिले आहेस, ते जर खरोखरच पुरे करून दाखवलेस तर तुझ्याइतके जगात दुसऱ्या कोणाचेच कौतुक मी करणार नाही. आम्हीही एक करार तुझ्याशी करतो; आमच्यात सामील होऊन ही शोभिवंत नगरी, इलिअम जर तू लुटशील, तर आम्ही अॅत्रिअस पुत्राची सर्वात सुंदर कन्या तुला देऊ, व तुझ्याशी लग्न लावून देण्यासाठी आरगॉसहून तिला येथे आणू; तेव्हा चल माझ्याबरोबर, म्हणजे आपल्याला नौकांमध्ये बसून लग्नविषयक करार करता येईल, आणि अनुनयाच्या देणग्यांबाबत आम्ही तुझ्याजवळ फार आग्रह धरणार नाही".

असे म्हणून आयदोमिनिअस त्याला पायाकडून धरून लढाईच्या गर्दीतून फरफटत नेऊ लागला; पण त्याच्या देहाचे रक्षण करण्यास अॅसिअस पाय उतार होऊन आपल्या घोड्यांपुढे आला; त्याचा शिलेदार हाकीत असलेले त्याचे घोडे त्याच्यामागे इतके जवळ होते की त्यांचा श्वास त्याला खांद्यावर जाणवत होता. आयदोमिनिअसला घाव घालून खाली पाडण्याची त्याला तीव्र इच्छा होती; पण तसे तो करण्याच्या आधीच आयदोमिनिअसने आपला भाला त्याच्या हनुवटीखाली कंठावर मारला व ब्रॉंझचे टोक थेट आरपार गेले. नौका बांधणाऱ्यांनी नौका बांधण्यासाठी लाकूड हवे म्हणून पाजळलेल्या कुऱ्हाडींनी पाडलेला एखादा ओक, पॉपलर किंवा पाईन वृक्ष जसा पर्वतांवर कोसळतो, अगदी तसाच तो संपूर्ण आडवा होऊन आपल्या रथा-घोड्यांपुढे, दात एकमेकांवर घाशीत, रक्त लांछित धूळीत मुठी रोवीत पडला. त्याचा सारथी भयग्रस्त होऊन गोंधळून गेला व घोडे वळवून निसटून जाण्याची त्याला छाती होईना; तेव्हा अॅन्तिलॉकसने त्याच्या शरीराच्या मध्यभागी भाला मारला; त्याच्या ब्रॉंझच्या वक्षकवचाने तो वाचला नाही, भाला पोटात बसला. रथावरून तो धापा टाकीत खाली पडला आणि महान नेस्तॉरचा पुत्र अॅन्तिलॉकस याने त्याचे घोडे त्रोजन्सकडून अॅकिअन्सकडे हाकून नेले.

मग अॅसिअसच्या मृत्यूबद्दल सूड घेण्यासाठी दैफोबस आयदोमिनिअसच्या जवळ आला व त्याने त्याच्यावर भाल्याचा नेम धरला; पण आयदोमिनिअसचे लक्ष होते व त्याने तो भाला चुकविला. कारण तो नेहमी वापरीत असलेली वृषभचर्माची व ब्रॉंझची, आतल्या बाजूस बाहू अडकवण्यासाठी दोन अडी असलेली ढाल त्याच्यापुढे संरक्षणार्थ होती. या ढालीच्या आश्रयाने तो खाली

वाकला आणि भाला त्याच्यावरून उडून गेला, पण तो ढालीला घासून गेल्याने ढाल खणकन निनादली; तथापि दैफोबसच्या बळकट हाताने फेकलेले ते शस्त्र व्यर्थ गेले नाही; प्रजापालक हिप्पॅससचा पुत्र हिप्सेनॉर याला कमरेखाली यकृतात ते लागले आणि त्याची गात्रे त्या घावाने लटकी पडली. त्याच्या शेजारी उभे राहून उच्च रवाने दैफोबसने दर्पोक्ती केली, "खरोखर ॲसिअस पडल्याचा सूड उगवला गेला नाही असे झाले नाही; प्रबल द्वाररक्षक हेदिझच्या घरात शिरताशिरताच, त्याला सोबतीला कोणीतरी मी पाठवला आहे याचा त्याला आनंद होईल".

अशी फुशारकी त्याने मारली व त्याचे बोलणे आर्गाइव्हजना झोंबले. दुसऱ्या कोणापेक्षाही उदात्त ॲन्तिलोकसला जास्त राग आला, पण दुःखाच्या भरात तो आपल्या मित्राला व सोबत्याला विसरला नाही. त्याच्यापाशी धावत जाऊन त्याच्या दोन्ही बाजूस पाय ठेवून उभा राहून आपल्या ढालीने त्याने त्याला झाकले; मग त्याच्या निष्ठावन्त साथीदारातले दोघेजण, एकिअसपुत्र मेसिस्तिअस व ॲलॅस्तॉर खाली वाकले व जोराने कण्हणाऱ्या त्या जखमी वीराला त्यांनी नौकांकडे उचलून नेले. तथापि आयदोमिनिअसने आपला प्रक्षोभ थांबवला नाही. कोणा त्रोजनला मरणाच्या कृष्ण छायेत गुरफटून टाकण्यासाठी किंवा ॲकिअन्सच्या नशिबी आलेला दुर्दिन टाळून टाकण्यासाठी स्वतः तरी धारातीर्थी पडण्यासाठी तो एकसारखा झगडतच राहिला. मग थोर इसितिझचा पुत्र ॲल्कॅथोउस पडला; तो ॲंकिसिझचा जावई होता; मातापित्यांची लाडकी व रुप, कलाकौशल्य व बुद्धीमत्ता याबाबतीत तिच्या पिढीत सर्वापेक्षा श्रेष्ठ अशी ती ॲंकिसिझकन्या हिप्पोदॅमैआ असल्याने अखिल त्रॉयमधील त्या शूरत्तम पुरुषाने तिला पत्नी करून घेतली होती—व त्यालाच आयदोमिनिअसच्या हाताने नेपच्यूनने पाडले, त्याच्या चमकदार डोळ्यांवर अंधेरी आणली व त्याचे बळकट हातपाय असे जखडून टाकले की त्याच्या, छातीच्या मध्यभागी आयदोमिनिअसने जेव्हा भाला मारला तेव्हा त्याला मागे किंवा बाजूला होता येईना; तो खांबासारखा किंवा उंच वृक्षासारखा निश्चल उभा राहिला. आतापर्यन्त जे लोखंडी कड्यांचे चिलखत त्याच्या देहाचे रक्षण करीत होते ते आता भग्न झाले व त्यातून भाला घुसून जात असता ते कर्कशपणे खणखणले. तो जडशीळ होऊन भूमीवर पडला व अजूनही स्पंदन करीत असलेल्या त्याच्या हृदयात घुसलेल्या भाल्याचा दांडा थरथरत राहिला; तो अखेर भयंकर मार्सने त्याचा अंत केल्यावरच थांबला. आयदोमिनिअसने त्याच्या देहाशी उभा राहून उच्च स्वराने फुशारकी मारली,

"दैफोवस, प्रौढी मिरवायची तुला जर लहरच आली आहे, तर मग तू एक माणूस मारलास त्याच्याबदली आम्ही तीन मारल्यावर आपण बरोबरी झाली म्हणून डाव सोडून देऊ या का? नाही, श्रीमान, तुम्ही स्वतःच माझ्याशी लढायला उभे रहा, म्हणजे तुम्हाला कळून येईल की इथे आलेला मी कोणत्या प्रकारचा जव्हच्या बीजाचा मनुष्य आहे! प्रथम जव्हने क्रीतचा मुख्य राज्यकर्ता मिनॉस याला जन्माला घातले; मग मिनॉसने त्याच्यावर पाळी आली तेव्हा जन्म दिला थोर द्युकॅलिअनला; क्रीतमधल्या पुष्कळ लोकांवर राज्य करण्यासाठी मला जन्माला घातले ते द्युकॅलिअनने, आणि आता तुझा, तुझ्या पित्याचा नी त्रोजन्सचा विनाशक होण्यासाठी माझ्या नौकांनी मला इकडे आणले आहे".

असे तो बोलला व दैफोवसची द्विधा वृत्ती झाली; परत जाऊन मदतीला दुसरा कोणी त्रोजन आणावा, की एकट्यानेच ते आव्हान स्वीकारावे? शेवटी त्याला सर्वोत्तम मार्ग हा दिसला की जाऊन ईनिआसला घेऊन यावे; ईनिआस त्याला सैन्याच्या मागच्या बाजूस उभा असलेला दिसला; तो प्रामवर रुष्ट झाला होता; कारण त्याच्या शौर्याची कृत्ये योग्य तो बहुमानाचा वाटा त्याला देऊन प्राअॅमने गौरविली नव्हती. त्याच्यापाशी जाऊन दैफोवस बोलला, "ईनिआस, त्रोजन्समधील पुरुष श्रेष्ठा, नात्याच्या बंधांची तुला काही चाड असेल तर तुझ्या बहीणीच्या नवऱ्याच्या देहाचे रक्षण करण्यास आता मला मदत कर; अॅल्कॅथॉउसचा देह सोडवून आणण्यास माझ्याबरोबर चल. तो तुझ्या बहिणीचा नवरा असल्यामुळे त्याने तुला त्याच्या घरी लहानाचा मोठा केला आहे व आता आयदोमिनिअसने त्याचा वध केला आहे."

या शब्दांनी त्याने ईनिआसच्या हृदयाला पाझर फोडला आणि ईनिआस महान पराक्रम करण्याची ईर्ष्या मनात धरून आयदोमिनिअसच्या शोधार्थ गेला. पण केवळ एक लहान मूल असल्यासारखा आयदोमिनिअस काही डगमगून जाणारा नव्हता; डोंगरातील एकाद्या एकांत स्थळी माणसांचा मोठा समूह चालून येण्याची वाट पहात असलेला रानडुकर एकदम उलटून, जसा मागे न हटता जागा धरून ठाम उभा राहतो, त्याच्या पाठीवरचे राठ केस ताठ उभे रहातात, त्याच्या डोळ्यात आग चमकते व शिकारी कुत्रे व माणसे यांच्या-विरुद्ध आपला बचाव करण्याच्या आतुरतेने तो आपले सुळे पाजळतो—अगदी तसाच विख्यात आयदोमिनिअस आपले स्थान भक्कमपणे धरून उभा राहिला व ईनिआज आला तरी तसूभर हलला नाही. त्याने आपल्या सोबत्यांना मोठ्याने हाक दिली; अॅस्कॅलॅफस, अफॅरिअस, दैपिरस, मेरिऑनिझ व

ॲन्तिलॉकस या साऱ्या शूर योद्धयांकडे पाहून तो ओरडला, " मित्रहो, इकडे या, व मला एकटा सोडू नका, लढाईत दुर्दम्यपणे शत्रूंचे जीव घेत जाणारा शीघ्रगती ईनिआज माझ्यावर चालून येत आहे, त्याच्याबद्दल माझ्या मनात फार भय आहे; शिवाय पुरुषाची शक्ती जेव्हा सर्वाधिक असते त्या यौवनाच्या ऐन भरात तो आहे; आजच्या त्याच्या वयाचा जर मी असतो तर आताच्या माझ्या मनाच्या निश्चयाच्या बळावर विजयाचे पारितोषिक एक त्याने किंवा मी तरी तात्काळ जिंकले असते ".

हे ऐकून ते सगळे खांद्यावर ढाली धरून एक जुटीने त्याच्यापाशी उभे राहिले. दुसऱ्या बाजूला ईनिआसने आपल्या सोबत्यांकडे पाहून त्यांना हाक दिली; दैफोवस, पॅरिस व ॲगॅनॉर हे त्याच्याप्रमाणेच ट्रोजन्सचे नेते होते; चरणे झाल्यावर पाणी पिण्यास एडक्यामागे मेंढरे जशी जातात तसे त्यांचे अनुयायी त्यांच्या पाठोपाठ गेले व ते दृश्य पाहून मेंढपाळ जसा संतुष्ट होतो तसाच ईनिआसही आपले लोक आपल्यामागे आलेले पाहून संतुष्ट झाला.

मग ॲल्कॅथॉउसच्या देहाभोवती लांब भाल्यांनी त्यांनी हातघाईची त्वेषाची लढाई केली; लढाईच्या रेटारेटीत एकमेकांवर नेम धरून मारलेले भाले ब्राँझच्या चिलखतांवर आपटून भयानक खणखणाट झाला, आणि ईनिआस व आयदोमिनिअस या दोन मार्सतुल्य वीरांनी तलवारीने व भाल्याने एकमेकांवर घाव घालण्याच्या ईर्ष्येत इतर सर्वांवर कडी करण्याची शर्थ केली. पहिल्याने ईनिआसने नेम धरला, पण आयदोमिनिअसची नजर सावध असल्याने त्याने भाला चुकवला, तेव्हा ईनिआसच्या बळकट हाताने वेगात फेकलेला तो भाला व्यर्थ जाऊन भूमीत पडून थरथरत राहिला. दरम्यान आयदोमिनिअसने ईनोमॉसला पोटाच्या मध्यावर वार करून त्याच्या कवचाची पट्टी तोडली; त्यामुळे त्याचा कोथळा उसळत बाहेर आला व धुळीत अस्ताव्यस्त पडताना हाताच्या पंज्यांनी त्याने भूमी आवळून धरली. आयदोमिनिअसने त्याच्या देहातून भाला उपसून काढला, पण त्याच्यावर तीक्ष्ण शूलाग्रांचा वर्षाव होत असल्यामुळे बाकीचे चिलखत त्याला काढून घेता आले नाही; शिवाय त्याची शक्ती आता ओसरत चालली होती, त्यामुळे त्याला आता हल्ला चढवणे शक्य होत नव्हते. स्वतःचे शस्त्र परत घेण्यास पुढे उडी मारता येत नव्हती किंवा अंगावर येणारी शस्त्रे चुकवण्यास बाजूला झुकता पण येत नव्हते; म्हणून जरी हातघाईच्या हाणामारीत तो स्वतःचा बचाव अजून करीत होता तरी त्याचे जड झालेले पाय त्याला लढाईतून त्वरेने बाहेर नेऊ शकत नव्हते. तो रणक्षेत्रावरून सावकाश माघार घेत असता दैफोवसने त्याच्या रोखाने एक

भाला फेकला, कारण त्याच्याविरुद्ध त्याचा द्वेष पूर्वीप्रमाणेच धुमसत होता. पण पुन्हा भाल्याचा धरलेला नेम चुकला, व भाला मार्सपुत्र ॲस्कॅलॅफसच्या खांद्यातून आरपार गेला व धुळीत अस्ताव्यस्त पडताना हाताच्या पंज्यांनी त्याने भूमी घट्ट धरली.

युद्धात भाग घेण्यास प्रतिबंध असलेल्या इतर देवांबरोबर, जव्हच्या आज्ञेनुसार, सोनेरी ढगांखाली ऑलिम्पसच्या शिखरांवर मार्स बसला होता; त्यामुळे त्या भीषणस्वर कठोर देवाला अजून आपला पुत्र पडल्याचे कळले नव्हते. दरम्यान त्या पडलेल्या देहाभोवती लोक हिरिरीने लढत होते. ॲस्कॅलॅफसच्या मस्तकावरचे शिरस्त्राण दैफोवसने ओढून काढले पण मेरिऑनिझने त्याच्यावर उडी घेऊन त्याच्या बाहूवर भाला मारला; त्यामुळे ते जाळीदार मुखकवच असलेले शिरस्त्राण त्याच्या हातातून खणखणत भूमीवर पडले. त्यावर मेरिऑनिझने त्याच्यावर गिधाडासारखी झेप घेऊन आपला भाला त्याच्या खांद्यातून उपसून काढला व आपल्या लोकांच्या आडोशाने माघार घेतली. मग दैफोवसचा सख्खा भाऊ पोलायतिझ याने भावाच्या कमरेला हातांचा विळखा घालून त्याला लढाईतून दूर उचलून नेऊन, रणक्षेत्राच्या मागच्या बाजूस जेथे त्याचे घोडे रथ व सारथ्यासह उभे होते तेथपर्यन्त पोहोचवले. बाहूच्या जखमेतून रक्तस्त्राव होत असल्याने विव्हळत व अत्यंत वेदनाग्रस्त अवस्थेत त्याला सारथ्याने रथातून नगरीकडे नेले.

बाकीचे इतर लढतच राहिले व युद्ध गर्जना अखण्डपणे आकाशात उठतच राहिली. कॅलेतॉरपुत्र ॲफॅरिअस याच्यावर उडी घेऊन ईनिआसने आपल्या बाजूस वळलेल्या त्याच्या कंठावर भाला मारला; त्याचे डोके तुटून एका बाजूला पडले व शिरस्त्राण आणि ढाल त्याच्याबरोबरच खाली कोसळली. आणि जीविताचा वैरी जो मृत्यु त्याचा निपात त्याच्या भोवताली झाला. ॲन्तिलॉकसने ही संधी हेरली, व तो वेगाने थोऊनकडे धावला आणि तो बाजूला वळत असताच त्याने त्याला जखमी केले; संबंध पाठीवरून मानेकडे जाणारी शीर खोलून त्याने ती संपूर्णपणे कापून टाकली आणि थोऊन सोबत्यांकडे विनवणीपूर्वक हात पसरीत धुळीत उताणा पडला. ॲन्तिलॉकसने त्याच्यावर उडी घेऊन उग्र व क्रुद्ध दृष्टीने सभोवार पाहात त्याच्या खांद्यावरून त्याचे चिलखत काढून घेतले. ट्रोजन्सनी सर्व बाजूंनी त्याला वेढले व त्याच्या रुंद चकचकीत ढालीवर त्यांनी घाव घातले पण त्याच्या शरीराला ते दुखापत करू शकले नाहीत, कारण नेस्तॉरपुत्रासभोवार जरी शूलाग्रांचा दाट वर्षाव होत होता तरी नेपच्यून त्याच्या संरक्षणार्थ उभा होता. तो शत्रूंमधून मोकळा कधीच होत

नव्हता, सदा लढाईच्या ऐन गर्दीतच रहात होता. त्याच्या भाल्याला विसावाच नव्हता, कोणाला तरी दुरुन मारण्यास किंवा कोणाच्या तरी जवळ भिडून लढण्यास तो इतका उत्सुक होता की आपला भाला समतोल धरून सर्व दिशांकडे तो त्याला सारखा रोखीत राहिला.

तो असा गर्दीत नेम धरीत असलेला ॲसिअसपुत्र ॲडॅमॉसला दिसला; तेव्हा त्याच्यावर धावून जाऊन त्याच्या ढालीच्या मध्यभागी ॲडॅमॉसने भाला मारला, पण नेपच्यूनने भाल्याच्या टोकाचा परिणाम होऊ दिला नाही कारण ॲन्तिलॉकसचा प्राण त्याला घेऊ देणे नेपच्यूनला मान्य नव्हते. तेव्हा भाल्याचा अर्धभाग जळक्या मेखेसारखा ॲन्तिलॉकसच्या ढालीत अडकून राहिला व दुसरा खाली पडला. मग ॲडॅमासने आपल्या लोकांच्या आड आश्रय घेण्याचा प्रयत्न केला पण मेरिऑनिझने त्याचा पाठलाग करून त्याच्यावर गुह्यभाग व नाभीच्या मधोमध भाला मारला; अशा जागेची जखम दुर्दैवी मर्त्य प्राण्यांना विशेष वेदनाकारी असते. वरील भाल्याने मेरिऑनिझने ॲडॅमॉसला जागच्या-जागी खिळवून ठेवले, आणि डोंगरावरील गुराखी दोरांनी व हिरव्या फोकांनी बांधून जबरीने ओढून नेत असलेल्या एकाद्या बैलासारखा ॲडॅमॉस त्या रुतलेल्या भाल्याभोवती धडपडत वळवळला. पण फार वेळ नव्हे, लौकरच मेरिऑनिझने येऊन आपला भाला त्याच्या देहातून उपसून काढला व त्याच्या डोळ्यांवर काळोखाची झापड आली.

मग हेलेनसने दैपिरसवर हातघाईच्या लढाईत एका प्रचंड थ्रेसिअन खड्गाचा वार केला तो त्याच्या कानशिलावर बसून त्या धक्क्याने त्याचे शिर-स्त्राण उडून खाली पडले व ॲकिअन पक्षाच्या बाजूने लढणाऱ्या एकाने पायाशी गडगडत आलेले ते शिरस्त्राण उचलून घेतले; पण दैपिरसचे डोळे मृत्यूच्या अंधारात केव्हाच मिटले होते.

या घटनेने मेनेलॉसला दुःख झाले व तो भाला परजीत, धाक दाखवीत हेलेनसवर चालून गेला; पण हेलेनसने आपले धनुष्य खेचले आणि दोघांनी एकाचक्षणी एकमेकांवर हल्ले केले, एकाने आपल्या भाल्याने तर दुसऱ्याने त्याच्या धनुष्यबाणाने. प्राॲमपुत्राचा बाण मेनेलॉसच्या चिलखताच्या वक्षक-वचाला लागला पण न रुतता तो घसरून बाजूला गेला; धान्य पाखडण्याचे रुंद सूप हलवीत असता घोंघावणाऱ्या वाऱ्याने व सुपाच्या हालचालीने फोलकट उडून जाऊन काळे पावटे किंवा डाळीचे दाणे जसे खळ्याच्या भूमीवर टपटप पडतात—अगदी तसाच तो बाण मेनेलॉसच्या संरक्षक कवचाला घसटून उडाला-पण मेनेलॉसने त्याची पाळी आल्यावर हेलेनसच्या धनुष्य धरणाऱ्या हाताला

जखम केली. मेनेलॉसचा भाला त्या हातातून आरपार जाऊन धनुष्यातच रुतला; त्यामुळे जीव वाचवण्यासाठी आपल्या लोकांच्या आडोशाने त्याला माघार घ्यावी लागली; अडकलेल्या भाल्याच्या वजनाने त्याचा हात त्याच्या बाजूला लोंबत राहिला होता; पण लौकरच अॅगेनॉरने भाला उपटून काढला व जखमी हात काळजीपूर्वक बांधून शिलेदाराजवळ असलेल्या लोकरीच्या झोळीत आधारासाठी अडकवून ठेवला.

मग त्याच्या दुर्भाग्याने भुरळ पाडून विनाशाकडे वळविलेल्या पिसॅन्दरने थेट मेनेलॉसवर चाल केली, कारण हे मेनेलॉस, तुझ्याशी लढताना धारातीर्थी पतन पावणे त्याच्या नशिबी होते. दोघे एकमेकांच्या अगदी जवळ आले असता अॅत्रिअसपुत्राने मारलेला भाला बाजूला वळून त्याचा नेम चुकला; मग पिसॅन्दरने शूर मेनेलॉसच्या ढालीवर घाव घातला पण ढालीचा भेद झाला नाही, कारण तिने भाला अडवून त्याचा दांडा मोडून काढला; तरीही पिसॅन्दर नाउमेद झाला नाही व त्याला अजूनही यशाची खात्री वाटत होती. पण अॅत्रिअसपुत्राने तात्काळ तलवार उपसून त्याच्यावर उडी घेतली; तेव्हा पिसॅन्दरने त्याच्या बाजूला ढालीखाली अडकवलेली तुळतुळीत ऑलिव्ह लाकडाच्या लांब दांड्याचा ब्राँझचा परशु हाती घेतला व दोघांनी एकमेकांवर चढाई केली. पिसॅन्दरने मेनेलॉसच्या तुरेदार शिरस्त्राणाच्या टोकावर प्रत्यक्ष तुऱ्याखालीच घाव घातला, आणि पिसॅन्दर त्याच्याकडे येत असताना मेनेलॉसने त्याच्या कपाळावर, जेथून नाक उभारत जाते तेथे भुवयांच्या मध्ये वार केला; तेव्हा हाडे तडकली आणि त्याची दोन रक्तबंबाळ बुब्बुळे त्याच्या पायाशीच धुळीत पडली. तो मागे जमिनीवर उताणा पडला व मेनेलॉसने त्याच्या देहावर टांच रोवून त्याचे चिलखत काढून घेत बढाई मारली, "कितीही गर्विष्ठ व युद्धासाठी सदैव हपापलेले असे तुम्ही असलात, तरी त्रोजन्सहो, तुम्हाला अॅकिअन्सच्या नौका सोडून अगदी तसेच जावे लागणार आहे; आणि जो कलंक व अपमान तुम्ही माझ्या स्वत:वर लादला आहात तो सारा तुमच्याही वाट्याला आल्याशिवाय राहणार नाही. भेकड लांडगिणीसारखे असणारे तुम्ही, अतिथ्याच्या अतिक्रमाचा प्रतिशोध घेणाऱ्या भीषण जव्हच्या कोपाला तुम्ही भ्याला नाही, पण तोच एक दिवस तुमची नगरी नष्ट करणार आहे. तुम्ही माझी लग्नाची बायको चोरलीत, आणि तिचे पाहुणे असताना दुष्टपणे पुष्कळशी संपत्ती पण पळवून नेलीत, आणि आता आमच्या नौकांवर तुम्ही आग घालण्याचे व आमच्या वीरांचे प्राण घेण्याचे बेत करता आहा. पण एक दिवस असा येईल की तुम्ही कितीही भडकून उठलात तरी तुम्हाला रोखण्यात

येईल. हे तात जव्ह, जो तू सर्व देवा-मानवांपेक्षा बुद्धीने श्रेष्ठ आहेस असे म्हणतात, आणि आमच्या आयुष्यात घडणाऱ्या साऱ्या गोष्टी ज्याच्या प्रेरणेने होतात, तो तू ट्रोजन्सवरच का कृपादृष्टी ठेवतोस? ते लोक इतके गर्विष्ठ व उद्दाम आहेत की त्यांना कधी युद्धाचा उबग येत नाही,; थोड्या वेळानंतर सगळ्या गोष्टी कंटाळवाण्या वाटू लागतात—झोप, प्रेम, मधुरगायन व रुबाबदार नृत्य—पण तरीही या गोष्टी अशा आहेत की माणसाला युद्धापेक्षा त्यांचे आकंठसेवन जास्त प्रिय व्हावे, पण ट्रोजन्स तर युद्धासाठीच सदा हपापलेले आहेत.''

असे म्हणून मेनेलॉसने, पिसॅन्दरच्या देहावरचे रक्तलांछित चिलखत काढून आपल्या लोकांकडे दिले; मग तो पुन्हा युद्धात आघाडीच्या फळीवरील लोकांच्या श्रेणीत सामील झाला.

मग पायलिमिनिझ राजाचा पुत्र हारपॅलिअन याने त्याच्यावर झेप घेतली; तो पित्याबरोबर ट्रॉयला लढण्यासाठी आला होता, पण तो स्वगृही पुन्हा परत गेलाच नाही. त्याने मेनेलॉसच्या ढालीवर मध्यभागी आपला भाला मारला; पण तो ढालीचा भेद करू शकला नाही, व जखमी होण्याच्या भीतीने सावधपणे भोवताली सर्वत्र पाहात तो जीव बचावण्यासाठी आपल्या लोकांच्या आडोशाने मागे झाला. तथापि तो रणक्षेत्र सोडीत असता मेरिऑनिझने त्याच्यावर नेम धरून एक ब्रॉंझच्या टोकाचा बाण त्याला मारला, तो त्याच्या उजव्या नितंबावर बसून हाडातून आरपार जाऊन हारपॅलिअनच्या मूत्राशयात शिरला; तेव्हा तो जागच्याजागी तेथेच बसला व आपल्या सोबत्यांच्या बाहुपाशात त्याने प्राण सोडले; तो एखाद्या किड्यासारखा भूमीवर ताणून पडला व त्याच्या जखमेतून वाहणाऱ्या रक्ताने भूमी भिजून गेली. त्या शूर पॅफ्लॅगॉनिअन्सनी योग्य ती काळजी घेऊन त्याची परिचर्या केली; त्याला उचलून त्यांनी त्याला त्याच्या रथावर ठेवले आणि खिन्नपणे ट्रॉयनगरीला रथ हाकीत नेले; त्याचा पिताही आक्रांताने रडत त्याच्याबरोबर गेला; पण त्याच्या मृत पुत्राला जिवंत करील अशी कोणतीही खंडणी अस्तित्वात नव्हती.

हारपॅलिअनच्या मरणाने पॅरिसला फार खेद झाला, कारण पॅफ्लॅगॉनिअन्सकडे तो जाई तेव्हा हारपॅलिअनचा तो पाहुणा असे; म्हणून मित्राच्या वधाचा सूड घेण्यासाठी त्याने बाणाचा नेम धरला; आता युकेनॉर नामक एक विशिष्ट मनुष्य होता. तो कॉरिंथमध्ये घर असणाऱ्या पॉलिदस या भविष्यज्ञ, शूर व सधन गृहस्थाचा पुत्र; तो नौकेतून समुद्रमार्गे ट्रॉयला आला तेव्हा इकडे आपल्या पुढे मरण वाढून ठेवले जाणार आहे याची त्याला पूर्ण जाणीव होती;

कारण त्याचा सज्जन वृद्ध पिता पॉलिदस याने पुष्कळदा त्याला सांगितले होते की एकतर त्याने घरी राहून भयानक रोगाला बळी पडावे नाहीतर ॲकिअन्सच्या सांगाती जाऊन त्रोजन्सच्या हातून मरावे. म्हणून तो लढण्यास न जाता तर ॲकिअन्सनी त्याच्यावर जो भारी दंड लादला असता तो टाळण्यासाठी आणि त्याबरोबरच रोगाच्या वेदना व हालअपेष्टा चुकवण्यासाठी त्याने युद्धार्थ ॲकिअनांबरोबर इकडे येण्याचा निर्णय घेतला होता. आता पॅरिसचा बाण त्याला कानाखाली जबड्यावर लागला, त्याबरोबर त्याच्या देहातून प्राण गेला व मृत्यूच्या अंधःकाराच्या प्रेतवस्त्रात तो गुरफटला गेला.

तेव्हा एकाद्या भडकल्या आगीसारखे ते लढले. पण आर्गाइव्हज युद्धाच्या डाव्या फळीवर आपल्या लोकांचा निःपात करीत आहेत हे अद्यापि हेक्तरच्या कानावर आले नव्हते व लक्षात भरले नव्हते; त्या भागात लौकरच ॲकिअन्सनी त्रोजनांवर संपूर्ण विजय मिळवला असता, कारण नेपच्यून महोत्साहाने त्यांना उत्तेजन देत व मदत करीत होता. म्हणून हेक्तरने दॅनाअन योद्धांच्या दाटीच्या श्रेणींचा भेद करून दरवाज्यातून व भिंतीतून प्रथम जेथे बळजबरीने प्रवेश केला होता तेच स्थान तो धरून राहिला. येथेच ॲजॅक्स व प्रॉतेसिलॉज यांच्या नौका सागरतीरावर ओढून घेतलेल्या होत्या. संरक्षक भिंत इतर भागांपेक्षा येथे जास्त ठेंगणी होती आणि इथे माणसांचे व घोड्यांचे झगडे अतित्वेषाने चालले होते. बिओशिअन्स व लांब अंड्या घालणारे आयोनिअन्स, लॉक्रिअन्स, थिआचे लोक व एपिअन्सचे विख्यात सेनादल—या सर्वांना नौकांकडे मुसंडी मारणारा हेक्तर आवरणे कठीण होत होते, आणि ते त्याला आपल्यापासून दूरही हाकू शकत नव्हते, कारण तो म्हणजे साक्षात एक आगीचीच भिंत होता. ॲथीनिअसन्सचे निवडक लोक आघाडीला होते व त्यांचा नेता पेतिऑसपुत्र मेनिस्थिअस होता; त्याच्याबरोबर फैदाज, स्तिरिअस व धिप्पाड बिआझ हे वीर होते; फिलिअसपुत्र मेगिझ, ॲम्फिऑन व ट्रेसिअस एपिअन्सचे सेनाप्रमुख होते, तर थिआच्या सैनिकांचे नायक मेदॉन व एकनिष्ठ पोदार्सिझ हे होते. यांच्यापैकी मेदॉन हा ऑइलिअसचा अनौरसपुत्र व ॲजॅक्सचा भाऊ होता; पण तो स्वतःच्या देशापासून दूर, फिलेसीला राहात असे, कारण त्याने आपली सावत्र आई ऑइलिअस पत्नी इरिओपिस हिच्या भावाला ठार मारले होते; दुसरा, पोदार्सिझ हा फिलॅकसपुत्र इफिक्लसचा मुलगा; हे दोघ थिअन्सच्या आघाडीला उभे राहून बिओशिअन्ससह नौकांचे रक्षण करीत होते.

ऑइलिअसपुत्र ॲजॅक्सने क्षणभरही तेलेमॉनपुत्र ॲजॅक्सची बाजू सोडली नाही, तर पडीत शेतात नांगर ओढताना दोन कृष्णवर्ण बैल जसा पराकाष्ठेचा

जोर करतात, त्यांच्या शिंगाच्या मुळांपासून निघालेल्या घामाच्या वाफा वर जात असतात, शेताच्या अंतिम कडेपर्यंत जमीन फोडीत जाताना दोघांना विभागणारे फक्त जू तेवढे असते---अगदी तसेच ते दोघे अॅजॅक्स खांद्याला खांदा लावून एकजुटीने उभे राहिले. जेव्हा तेलेमॉनपुत्र घामाने व श्रमाने बेजार होई तेव्हा त्याच्यावरचा ढालीचा भार हलका करण्यासाठी, अनेक शूर सोबती त्याच्यामागे जात, पण ऑइलिअस पुत्राच्या मागे लॉक्रिअन्स इतक्याजवळ जाऊ शकले नाहीत, कारण हातघाईच्या लढाईत त्यांना टिकाव धरता येत नव्हता. अश्वपुच्छ केशांचे तुरे असलेली ब्राँझची शिरस्त्राणे त्यांच्यापाशी नव्हती किंवा ढाली अथवा अॅश लाकडांचे दांडे असलेले भालेही नव्हते; ते धनुष्ये व पिळदार लोकरीच्या गोफणींनी शस्त्रसज्ज होऊन ट्रॉयला आले होते, आणि या दोन्हीतून बाणांचा व पाषाणांचा वर्षाव ते त्रोजनांच्या श्रेणी फोडण्यासाठी करीत होते. म्हणून अवजड शस्त्रास्त्रे धारण करणारे इतर योद्धे त्रोजनांच्या चढाईचा व हेक्तरच्या आक्रमाचा मुख्य भार सोशीत होते, आणि त्यांच्या आडोशाने मागून हे बाण व गोफण गोटे मारीत होते; आणि याप्रमाणे त्रोजन्सचा धीर सुटू लागला कारण बाणांनी त्यांच्यामध्ये गोंधळ माजवला.

लौकरच पॉलिडॅमाझने हेक्तरला पुढीलप्रमाणे संयुक्तिक सल्ला दिला नसता, तर नौका व तंबूपासून त्रोजन्स केविलवाण्या अवस्थेत, जिच्यावरून वारा सारखा वहात रहातो त्या इलिअम नगरीला परत हाकलले गेले असते; पण पॉलिडॅमाझ त्याला म्हणाला, "हेक्तर, दुसऱ्याचा सल्ला घेण्यासाठी तुझे मन वळवणे अशक्य आहे. स्वर्गस्थ शक्तींनी युद्धाच्या कलांचे तुला इतके भरपूर ज्ञान दिले आहे की त्यामुळे तुला वाटते की इतर सर्वांपेक्षा मंत्रणेतही आपण श्रेष्ठ असलो पाहिजे; पण याप्रमाणे सर्वच गोष्टीत अग्रगण्य असण्याचा दावा तुला करता येणार नाही. देव कुणाला उत्तम योद्धा करतात, तर दुसऱ्याला नर्तक किंवा गायक किंवा वीणावादक करतात; आणि आणखी एकाद्याच्या ठिकाणी जव्हने असे सुज्ञ सामंजस्य रुजवलेले असते की त्याचा फायदा अनेकांच्या रक्षणार्थ लोकांना मिळतो व स्वतः त्या माणसाला त्याबद्दल इतर कोणापेक्षाही अधिक असे बरेच काही ठाऊक असते. म्हणून जे सर्वांत परिणामी उत्तम ठरेल असे मला वाटते ते मी बोलणार आहे. एकाद्या अग्निमंडलासारखे लढाईने तुला घेरून टाकले आहे, आणि त्रोजन्स आता भिंतीच्या आतल्या बाजूस असून देखील काहीजण संपूर्ण शस्त्रास्त्र सज्ज असे दूर उभे आहेत, तर इतर विखुरलेले आणि शत्रूपेक्षा संख्याबलाने कमी असे नौकांपाशी लढत आहेत. म्हणून आता माघार घे, व तुझ्या सेनानायकांना तुझ्या भोवती

गोळा कर म्हणजे आपल्याला एकत्र विचारविनिमय करता येईल की नौकांवर आताच हल्ला चढवायचा व स्वर्गस्थ देव आपल्याला विजय प्रदान करील अशी आशा करायची, का अजून सुरक्षितपणे माघार घेणे शक्य आहे तोवर माघार घ्यायची. मला फार भय वाटते की कालच्या देण्याची फेड आज ॲकिअन्स पुरेपूर करतील, कारण त्यांच्या नौकांवर युद्धाला कधीही न कंटाळणारा एक योद्धा थांबून राहिलेला आहे व तो आणखी फार वेळ आता तुटकपणे दूर राहणार नाही. "

पॉलिदॅमाझ याप्रमाणे बोलला आणि त्याचे शब्द हेक्तरला पटले. संपूर्ण-कवचधारी असा तो वीर रथावरून उडी मारून म्हणाला, "पॉलिदॅमाझ सेनानायकांना येथे गोळा कर; मी तिकडे पलीकडे लढाईच्या गर्दीत जातो, पण त्या लोकाना माझ्या आज्ञा दिल्यावर लगेच परत येतो."

मग हिमावृत्त पर्वतासारखा उत्तुंग असा तो वीर वेगाने पुढे निघाला व मोठी आरोळी ठोकीत त्रोजन्सच्या व मित्रपक्षीयांच्या श्रेणीमधून त्वरेने गेला. त्याचा आवाज ऐकल्यावर ते सर्व घाईघाईने पॅन्थॉउसच्या श्रेष्ठ पुत्राच्या, पॉलिदॅमाझच्या भोवती गोळा होण्यास धावले; पण हेक्तर सर्वात पुढच्या लोकांकडे जात राहिला; तो सगळीकडे नजर टाकीत दैफोबस, राजपुत्र हेलेनस, ॲसिअसपुत्र ॲदॅमाज व हिरतॅकसपुत्र ॲसिअस हे कोठे दिसत आहेत का ते पाहात होता; पण ते जिवंत किंवा दुखापत न झालेले असे त्याला खरोखर यापुढे आढळणारच नव्हते; कारण शेवटी उल्लेखिलेले दोघे ॲकिअन नौकांच्या पिछाडयांना आर्गाइव्हज्‌नी ठार मारल्यामुळे पडले होते, तर बाकीचेही शत्रु-कडून जखमी होऊन पीडितावस्थेत होते; पण त्या भीषण युद्धाच्या डाव्या फळीकडे त्याला सुंदरी हेलनचा पती ॲलेक्झँद्रस दिसला. तो आपल्या लोकांना उत्तेजन देत लढण्यास चिथावीत होता. त्याच्याजवळ जाऊन हेक्तरने त्याची कानउघाडणी केली, "पापबुद्धे पॅरिस, दिसायला गोंडस पण बाईलवेडया, असत्यवाद्या, दैफोबस व राजा हेलेनस कोठे आहेत? ॲसिअसपुत्र ॲदामाज व हिरतॅकसपुत्र ॲसिअस कोठे आहेत? शिवाय ऑथ्रिओनिअसही कोठे आहे? इलिअमची वाट लागली आहे व आता त्या नगरीचे नक्कीच पतन होणार! "

ॲलेक्झँद्रसने उत्तर दिले, "ज्याच्यावर दोष ठेवता येईल असा कोणी उपलब्ध नसताना उगीचच दोष कशाला काढावा? दुसऱ्या एकाद्या दिवशी मी युद्धापासून कदाचित अलिप्त राहिलो असतो पण या आजच्यासारख्या कठीण दिवशी मी अलिप्त राहणे शक्यच नाही. कारण भ्याडाच्या कोणत्याच

लक्षणासहित माझ्या मातेने मला जन्माला घातलेले नाही. नौकांभोवती तू आपल्या लोकांना लढाईला जुंपून दिलेल्या क्षणापासून आम्ही येथे ठाम राहून दॅनाअन्सशी युद्ध करीत आहोत. ज्या आपल्या सोबत्यांविषयी तू मला विचारतो आहेस ते मृत झालेले आहेत. फक्त दैफोबस व राजा हेलेनस हे दोघेही हाताना जखम झाल्यामुळे रणक्षेत्र सोडून गेले आहेत. पण सॅटर्नपुत्राने त्यांना वचावून जिवंत ठेवले आहे. तेव्हा आता आम्ही जेथे जावे असे तुला वाटत असेल तिकडे आम्हाला घेऊन जाण्यास पुढे हो आणि आम्ही तुझ्यामागे अगदी मनापासून येतो. जोपर्यंत आमची शक्ती टिकून राहील तोपर्यंत तुला आम्ही तोंड-घशी पाडीत आहोत असे तुला कधी दिसणार नाही; पण मनातून कितीही जरी असले तरी माणसाच्या अंगी जेवढी कुवत असेल त्याहून जास्त काहीच तो करू शकत नाही."

या शब्दांनी त्याने आपल्या भावाचे समाधान केले आणि ते दोघे लढाईची गर्दी सर्वात दाट जेथे होती त्या भागात गेले; तेथे सेब्रिओनिझ, शूर पॉलिदॅमाझ, फॅल्सिझ, ऑर्थिअस, देवतुल्य पॉलिफितिझ, पॅलमीझ, ॲस्कॅनिअस या वीरांसह, सुपीक ॲस्कॅनिआतून आदल्या दिवशी इतर सैनिकांना विश्राम देण्यासाठी आलेला हिप्पोशनपुत्र मोरिझ हाही होता. मग जव्हने त्यांना लढण्यास चेतना दिली. एकाद्या भीषण वाऱ्याचे झोत गडगडाटी वादळाच्या पूर्वी जसे भूमीवर आघात करतात, खाऱ्या समुद्राला फटके मारून ते त्यांच्यात प्रचंड कल्लोळ उत्पन्न करतात, व एकामागून एक अशा किनाऱ्यावर आदळत येणाऱ्या, फेसाचे मुकुट कमानदार माथ्यावर धारण करणाऱ्या भव्य लाटा प्रबळ असतात—अगदी तशाच प्रकारे ते योद्धे वायुवेगाने कूच करू लागले. चमकत्या शस्त्र-संभाराने सज्ज अशा व्यूहरचना केलेल्या त्रोजनांच्या श्रेणींमागून श्रेणी आपल्या नेत्यांच्या मागे आघाडीवर गेल्या. त्यांच्या मार्गक्रमणात अग्रभागी प्राणघातक मार्सतुल्य प्राअॅमपुत्र हेक्तर आपली गोल ढाल पुढे धरून चालत होता. ती ढाल वृषभचर्माची असून ब्राँझच्या पत्र्यांनी मढवलेली होती, आणि त्याच्या मस्तकावर त्याचे चकाकते शिरस्त्राण होते. ढालीच्या आडोशाने पुढे पुढे पावले टाकीत तो प्रत्येक दिशेला जात होता; समोरच्या श्रेणींची फळी त्याच्या हल्ल्यापुढे कोठे मागे हटते का याची चाचणी ती करीत होता, पण ॲकिअन्सचे धैर्य तो विचलित करू शकला नाही. श्रेणीतून पुढे पदन्यास करून त्याला आव्हान देणारा पहिला योद्धा ॲजॅक्स होता. 'श्रीमान', त्याने हाक दिली, "असे पुढे या, असे आर्गाइव्हज्‌ना घाबरवण्याचा असा व्यर्थ विचार कशाला करता? आम्ही ॲकिअन्स उत्तम योद्धे आहोत, पण जव्हचा कोप आमच्यावर

प्रखर स्वरुपात कोसळला आहे. आमच्या नौका नष्ट करण्याचा खरोखरच तुम्ही दृढनिश्चय केला आहे असे दिसते, पण तुम्हाला रोखून धरतील असे आमच्याकडेही समर्थ हात आहेत; आणि आमच्या नौका नष्ट होण्याच्या आधीच तुमचीच सुंदरनगरी जिंकून आमच्याकडून लुटली जाईल. मैदानावरची धूळ उडवीत नगरीत तुम्हाला परत घेऊन जाताना ससाण्यापेक्षा तुमचे घोडे जलद धावावेत अशी जव्हला व सर्व देवांना प्रार्थना तुम्ही करण्याची वेळ जवळ आली आहे."

असे तो बोलत असता त्याच्या उजव्या हाताकडे जवळूनच एक पक्षी उडत गेला आणि ॲकिअन्सच्या सैनेने मोठी आरोळी दिली; कारण या शकुनाने त्यांना धीर आला होता. पण हेक्तरने उत्तर दिले, "ॲजॅक्स वढाईखोरा व असत्यवाद्या, आजच्या दिवसाच्या उदरी ॲकिअन्सच्या नाशाचे भविष्य आहे याची मला जितकी खात्री आहे तितकी, मी, ढाल धारण करणाऱ्या जव्हचा पुत्र व राणी ज्यूनो, आणि मिनर्व्हा व ॲपॉलो यांच्या समान मी माननीय सदैव राहीन या गोष्टीबद्दल मला खात्री असती तर किती बरे झाले असते! माझ्या भाल्यापुढे उभे राहण्याची तुझी छाती झाली तर तूही बाकीच्या ॲकिअन्सच्यामध्ये रणक्षेत्रीपडशील: तुझ्या गोंडस देहाला फाडून माझा भाला तुझ्या चरबीने व मांसाने आमच्या कुत्र्या गिधाडांना आकंठ भोजन घालील व तुझे ॲकिअन्सच्या नौकांपाशी पतन होईल."

या शब्दांनिशी तो पुढे निघाला व गगनभेदी आरोळी देऊन बाकीचे सैन्य त्याच्यामागे गेले, आर्गाइव्हज्नीही आपल्या बाजूने तसाच उच्चरव केला आणि आपल्या शौर्याबद्दलची आशंका त्यांच्या मनाला शिवली नाही. ट्रोजन सेनानायकांच्या आक्रमणाविरुद्ध ते भक्कमपणे उभे राहिले आणि उभय सेनादलांचा ओरडा आकाशात उंच जाऊन दीप्तीमान जव्हपर्यंत पोचला.

● ● ●

## सर्ग १४

नेस्तॉर मद्याचा चषक पुढे घेऊन मद्य प्राशन करीत बसला होता, पण युद्धाचा कल्लोळ त्याच्या कानावर पडल्यावाचून राहिला नाही, आणि तो इस्क्युलॅपिअसच्या पुत्राला म्हणाला, " अरे उच्चकुलीन मॅकॲऑन, या सगळ्याचा अर्थ तरी काय? आपल्या नौकांपाशी लढणाऱ्या लोकांच्या आरोळ्या अधिकाधिक मोठ्याने ऐकू येत आहेत; म्हणून तू येथे थांब व मद्य घेत बैस; दरम्यान सुंदर हेकॅमिदे तुझ्या स्नानासाठी पाणी तापवून तुझ्या अंगावरचे साखळलेले रक्त धुवून काढील. मी तात्काळ टेहळणीच्या जागी जाऊन सगळा प्रकार काय आहे ते पाहतो. "

बोलता बोलता त्याने आपला पुत्र थ्रॅसिमिदिझ याची ब्राँझच्या पत्र्याने चकाकणारी ढाल त्याच्या तंबूत पडली होती ती उचलून घेतली, कारण त्या पुत्राने पित्याची ढाल नेली होती. याने आपला भला भक्कम ब्राँझची शेंबी असलेला भाला हाती घेतला व तो बाहेर येताच त्याला दिसून आले की ॲकि-अन्सच्या सेनेची भयानक दाणादाण झालेली असून, आता त्यांच्या भितीचा पाडाव झाल्यामुळे ते वाट फुटेल तिकडे भांबावून पळून चालले होते व ट्रोजन्स त्यांचा पाठलाग करीत होते---जसे समुद्राला भारी उधाण आले असता लाटा स्तब्ध राहतात---भीषण वारे त्यांच्यावर कोणत्या बाजूने घाला घालणार आहेत ते त्या करडी नजर ठेवून पाहात राहतात---दरम्यान आहेत तेथेच स्थिर राहून इकडे तिकडे वळत नाहीत, अखेर एका विशिष्ट वायूचा झोत आकाशातून खाली झेप घेऊन त्यांना दिशा ठरवण्यास मदत करतो–अगदी त्या प्रकारेच, दॅनाअन्सच्या गर्दीत शिरावे की ॲगॅमेम्नॉनच्या शोधार्थ निघावे असे चिंतन तो वृद्ध करीत राहिला. अखेर ॲत्रिअसपुत्राकडे जाणे हाच सर्वोत्तम मार्ग असे त्याला वाटले; दरम्यान सेनादले एकमेकांशी लढत परस्परांचे प्राण घेत होती, व तलवारीभाल्यांचे प्रहार ते एकमेकांवर करीत असता त्यांच्या देहावरचे कठीण ब्राँझ खडखडत होते.

जखमी झालेले राजे, तायदिअसपुत्र, युलिसिस व ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉन हे आपल्या नौकांकडून येत असता नेस्तॉरला भेटले. त्यांच्या नौका सर्वांच्या आधी प्रथम किनाऱ्यावर ओढून लावल्यामुळे अगदी किनाऱ्यालगतच होत्या व सर्वात शेवटच्या नौकांमागे ती भिंत बांधण्यात आली होती, त्यामुळे आता

चालू असलेल्या भिंतीपासूनच्या लढाईपासून ते काहीसे दूर होते; समुद्रकिनारा रुंद असला तरी सर्वनौकांना जागा पुरण्याइतका नव्हता, आणि त्यामुळे सेनेच्या तळात दाटी झाली होती, तेव्हा त्यांनी नौकांच्या ओळी एकीमागे एक लावून आखाताच्या दोन टोकांमधली मुखातली सर्व जागा व्यापून टाकली होती. आपापल्या भाल्यांवर भार देत ते राजे लढाईचे सर्वेक्षण करण्यास येत होते, कारण ते फारच चिंताक्रांत होते; जेव्हा वृद्ध नेस्तॉर त्यांना भेटला तेव्हा ते फार कष्टी झाले. मग राजा ॲगॅमेम्नॉन त्याला म्हणाला, "नेलियसपुत्रा नेस्तॉर, ॲकिअन या नावाला गौरव प्राप्त करून देणाऱ्या, तू युद्ध सोडून इकडे का आलास? हेक्तरने त्रोजन्समध्ये जी फुशारकी मारली होती की आमच्या नौका पेटवून देऊन, आम्हाला ठार मारल्याखेरीज तो इलिअमला परतणार नाही, ती खरी होणार अशी भीती मला वाटते. तो असे बोलला होता व ते सारे आता खरे होत आहे. हाय! ॲकिलिझसारखे ॲकिअन्सपैकी इतरही माझ्यावर रागावले आहेत, व म्हणूनच ते आपल्या नौकांच्या पिछाडयांना लढाई करणे नाकारीत आहेत."

तेव्हा जेरिनीचा उच्च कुलीन वीर नेस्तॉर याने उत्तर दिले, "खरोखर तू म्हणतोस तसेच आहे; या क्षणाला ते सर्व खरे होत आहे व उच्च स्थानावरून मेघगर्जना करणारा जव्ह देखील ते निवारू शकत नाही. आपल्याला व आपल्या नौकांसाठी संरक्षक अभेद्य तटबंदी म्हणून जिच्यावर आपण विसंबलो ती भिंत कोसळून पडली आहे, आपल्या नौकांजवळ चिकाटीने व अविरतपणे त्रोजन्स लढत आहेत. कोणत्याही बाजूला पहा, ॲकिअन्सची पळापळ कुठल्या भागातून चालली आहे ते दिसत नाही; गोंधळ उडालेल्या गर्दीत ते मारले जात आहेत व रणगर्जना आकाशात उंचावर जात आहेत; मंत्रणेचा जर काही उपयोग असेल तर आपण आता काय केलेले योग्य ठरेल याचा विचार करू या; पण आपण स्वतः लढाईत भाग घेण्याचा सल्ला मी देत नाही, कारण जखमी झालेला मनुष्य लढू शकत नाही."

आणि राजा ॲगॅमेम्नॉन उत्तरला, "नेस्तॉर, जर त्रोजन्स खरोखरच आपल्या नौकांच्या पिछाडयांजवळ लढत असतील, आणि भिंत किंवा खंदक—ज्यांच्यावर दॅनाअन्सनी इतके कष्ट घेतले, व जे त्यांना, नौकाना व आपल्याला वचावणारे अभेद्य तटबंदीसारखे वाटत होते—ते जर निरुपयोगी ठरले असतील तर मग मला असे दिसते की जव्हची इच्छाच अशी असावी की, ॲकिअन्सनी येथे आरगॉसपासून दूर अपकीर्ती पदरी घेऊन नष्ट व्हावे. एकेकाळी आपले रक्षण करण्याची जव्हची इच्छा होती हे मला माहीत आहे व आता मला समजून

येत आहे की तो ट्रोजन्सना देवांसमान गौरवाप्रत चढवून, दुसऱ्या बाजूस त्याने आमचे हातपाय जणू बांधून टाकले आहेत. तेव्हा आता आपण सगळे मी म्हणतो तसे करू या; किनाऱ्यावर असलेल्या नौका खाली आणून त्या पाण्यावर ओढून घेऊ या; जर ट्रोजन्सनी निदान रात्री तरी लढण्यापासून विराम घेतला तर नौका रात्र पडेपर्यंत पाण्यात थोड्या दूर अंतरावर दगडांना घट्ट बांधून नांगरून ठेवू या; मग बाकीच्या नौका खाली ओढून घेता येतील. विनाशा-पासून रात्री जरी पळ काढला तरी त्यांत काही दोषार्ह नाही. पकडले जाऊन मारले जाण्यापेक्षा पळून जाऊन माणसाने जीव वाचावणे बरे."

त्याच्याकडे उग्र दृष्टीने पाहून युलिसिस म्हणाला, "अ‍ॅट्रिअसपुत्रा, हे तू काय बोलत आहेस? करंट्या, आमच्यापैकी प्रत्येक जण मरेपर्यंत, यौवना-पासून वार्धक्यापर्यंत निकराच्या युद्धाचेच जीवन जव्हने ज्यांच्या वाट्याला घातले आहे, त्या आम्हावर राज्यकर्ता असण्यापेक्षा तू दुसऱ्या एकाद्या व हीन सेनेचा अधिपती व्हायला हवा होतास! जी जिंकण्यासाठी आम्ही इतके कष्ट भोगले ती ट्रॉयनगरी तू अशीच सोडून जाणार आहेस काय? एकदम गप्प रहा, नाही तर, चांगला सल्ला कसा द्यावा हे जाणणारा, आरगॉसच्या सेनेएवढ्या मोठ्या सेनेचा राजा तोंडांतून जे शब्द कधी बाहेर पडू देणार नाही ते तुझे शब्द अ‍ॅकिअन्सपैकी दुसरा कोणी तरी ऐकील. तू आता जे काय म्हणत आहेस त्यावरून तुझ्या निर्णयशक्तीबद्दल मला तिरस्कार उत्पन्न झाला आहे. लढाईची धुमश्चक्री चालू असताना आपल्या नौका पाण्यावर ओढून काढून याप्रमाणे, जिंकीत असलेल्या ट्रोजनांच्या त्यांना सोईस्कर होईल असे आणखीच तावडीत आम्ही सापडावे असे तुझे म्हणणे आहे की काय? अरे, अशा करणीने सर्वनाश होईल. नौका पाण्यावर ओढल्या जात असलेल्या पाहिल्या की मग अ‍ॅकिअन्स लढणे चालू ठेवणार नाहीत. हल्ले थांबवून ते सारखे नौकांकडेच वळून पहात राहतील; तेव्हा श्रीमान प्रमुख, आपल्या मसलतीने आमचा सत्यानाश होईल."

अ‍ॅगॅमेम्नानने उत्तर दिले, "युलिसिस, तुझ्या दूषणाने माझ्या हृदयाला डंख झाला आहे. तथापि, अ‍ॅकिअन्सची इच्छा असो वा नसो, त्यांनी आपल्या नौका समुद्रात ओढून काढल्याच पाहिजेत अशी आज्ञा काही मी देत नाही. कोणीतरी, एखादा वृद्ध वा तरुण हा आपल्याला अधिक चांगला सल्ला देऊ शकला तर तो ऐकण्यास मला आनंदच वाटेल."

तेव्हा दायोमिद म्हणाला, "तसा एक पुरुष जवळच आहे. त्याला फार दूरपर्यन्त शोधायला जायला नको—जर तू माझे ऐकणार असशील व तुमच्यापैकी

वक्षकवचाने त्याचे संरक्षण केले नाही, भाला त्याच्या पोटात बसला व तो जड-शीळ असा भूमीवर पडला. मग आयदोमिनिअसने त्याच्या शेजारी उभे राहून दर्पोक्ती केली, "ऑथ्रिऑनिअस, दार्दानसपुत्र प्राअॅमला त्याच्या मुलीसाठी तू जे करण्याचे वचन दिले आहेस, ते जर खरोखरच पुरे करून दाखवलेस तर तुझ्याइतके जगात दुसऱ्या कोणाचेच कौतुक मी करणार नाही. आम्हीही एक करार तुझ्याशी करतो; आमच्यात सामील होऊन ही शोभिवंत नगरी, इलिअम जर तू लुटशील, तर आम्ही अॅत्रिअस पुत्राची सर्वात सुंदर कन्या तुला देऊ, व तुझ्याशी लग्न लावून देण्यासाठी आरगॉसहून तिला येथे आणू; तेव्हा चल माझ्याबरोबर, म्हणजे आपल्याला नौकांमध्ये बसून लग्नविषयक करार करता येईल, आणि अनुनयाच्या देणग्यांबाबत आम्ही तुझ्याजवळ फार आग्रह धरणार नाही ".

असे म्हणून आयदोमिनिअस त्याला पायाकडून धरून लढाईच्या गर्दीतून फरफटत नेऊ लागला; पण त्याच्या देहाचे रक्षण करण्यास अॅसिअस पाय उतार होऊन आपल्या घोड्यांपुढे आला; त्याचा शिलेदार हाकीत असलेले त्याचे घोडे त्याच्यामागे इतके जवळ होते की त्यांचा श्वास त्याला खांद्यावर जाणवत होता. आयदोमिनिअसला घाव घालून खाली पाडण्याची त्याला तीव्र इच्छा होती; पण तसे तो करण्याच्या आधीच आयदोमिनिअसने आपला भाला त्याच्या हनुवटीखाली कंठावर मारला व ब्रॉंझचे टोक थेट आरपार गेले. नौका बांधणाऱ्यांनी नौका बांधण्यासाठी लाकूड हवे म्हणून पाजळलेल्या कुऱ्हाडींनी पाडलेला एकादा ओक, पॉपलर किंवा पाईन वृक्ष जसा पर्वतांवर कोसळतो, अगदी तसाच तो संपूर्ण आडवा होऊन आपल्या रथा-घोड्यांपुढे, दात एकमेकांवर घाशीत, रक्त लांछित धूळीत मुठी रोवीत पडला. त्याचा सारथी भयग्रस्त होऊन गोंधळून गेला व घोडे वळवून निसटून जाण्याची त्याला छाती होईना; तेव्हा अॅन्तिलॉकसने त्याच्या शरीराच्या मध्यभागी भाला मारला; त्याच्या ब्रॉंझच्या वक्षकवचाने तो वाचला नाही, भाला पोटात बसला. रथावरून तो धापा टाकीत खाली पडला आणि महान नेस्तॉरचा पुत्र अॅन्तिलॉकस याने त्याचे घोडे त्रोजन्सकडून अॅकिअन्सकडे हाकून नेले.

मग अॅसिअसच्या मृत्यूबद्दल सूड घेण्यासाठी दैफोबस आयदोमिनिअसच्या जवळ आला व त्याने त्याच्यावर भाल्याचा नेम धरला; पण आयदोमिनिअसचे लक्ष होते व त्याने तो भाला चुकविला. कारण तो नेहमी वापरीत असलेली वृषभचर्माची व ब्रॉंझची, आतल्या बाजूस बाहू अडकवण्यासाठी दोन अडी असलेली ढाल त्याच्यापुढे संरक्षणार्थ होती. या ढालीच्या आश्रयाने तो खाली

वाकला आणि भाला त्याच्यावरून उडून गेला, पण तो ढालीला घासून गेल्याने ढाल खणकन निनादली; तथापि दैफोबसच्या बळकट हाताने फेकलेले ते शस्त्र व्यर्थ गेले नाही; प्रजापालक हिप्पॅससचा पुत्र हिप्सेनॉर याला कमरेखाली यकृतात ते लागले आणि त्याची गात्रे त्या घावाने लटकी पडली. त्याच्या शेजारी उभे राहून उच्च रवाने दैफोबसने दर्पोक्ती केली, "खरोखर ॲसिअस पडल्याचा सूड उगवला गेला नाही असे झाले नाही; प्रबल द्वाररक्षक हेदिझच्या घरात शिरताशिरताच, त्याला सोबतीला कोणीतरी मी पाठवला आहे याचा त्याला आनंद होईल".

अशी फुशारकी त्याने मारली व त्याचे बोलणे आर्गाइव्ह्जना झोंबले. दुसऱ्या कोणापेक्षाही उदात्त ॲन्तिलोकसला जास्त राग आला, पण दुःखाच्या भरात तो आपल्या मित्राला व सोबत्याला विसरला नाही. त्याच्यापाशी धावत जाऊन त्याच्या दोन्ही बाजूस पाय ठेवून उभा राहून आपल्या ढालीने त्याने त्याला झाकले; मग त्याच्या निष्ठावन्त साथीदारातले दोघेजण, एकिअसपुत्र मेसिस्तिअस व ॲलॅस्तॉर खाली वाकले व जोराने कण्हणाऱ्या त्या जखमी वीराला त्यांनी नौकांकडे उचलून नेले. तथापि आयदोमिनिअसने आपला प्रक्षोभ थांबवला नाही. कोणा त्रोजनला मरणाच्या कृष्ण छायेत गुरफटून टाकण्यासाठी किंवा ॲकिअन्सच्या नशिबी आलेला दुर्दिन टाळून टाकण्यासाठी स्वतः तरी धारातीर्थी पडण्यासाठी तो एकसारखा झगडतच राहिला. मग थोर इसितिझचा पुत्र ॲल्कॅथोउस पडला; तो अँकिसिझचा जावई होता; मातापित्यांची लाडकी व रुप, कलाकौशल्य व बुद्धीमत्ता याबाबतीत तिच्या पिढीत सर्वापेक्षा श्रेष्ठ अशी ती अँकिसिझकन्या हिप्पोदॅमैआ असल्याने अखिल त्रॉयमधील त्या शूरत्तम पुरुषाने तिला पत्नी करून घेतली होती--व त्यालाच आयदोमिनिअसच्या हाताने नेपच्यूनने पाडले, त्याच्या चमकदार डोळ्यांवर अंधेरी आणली व त्याचे बळकट हातपाय असे जखडून टाकले की त्याच्या, छातीच्या मध्यमागी आयदोमिनिअसने जेव्हा भाला मारला तेव्हा त्याला मागे किंवा बाजूला होता येईना; तो खांबासारखा किंवा उंच वृक्षासारखा निश्चल उभा राहिला. आतापर्यन्त जे लोखंडी कड्यांचे चिलखत त्याच्या देहाचे रक्षण करीत होते ते आता भग्न झाले व त्यातून भाला घुसून जात असता ते कर्कशपणे खणखणले. तो जडशीळ होऊन भूमीवर पडला व अजूनही स्पंदन करीत असलेल्या त्याच्या हृदयात घुसलेल्या भाल्याचा दांडा थरथरत राहिला; तो अखेर भयंकर मार्सने त्याचा अंत केल्यावरच थांबला. आयदोमिनिअसने त्याच्या देहाशी उभा राहून उच्च स्वराने फुशारकी मारली,

"दैफोवस, प्रौढी मिरवायची तुला जर लहरच आली आहे, तर मग तू एक माणूस मारलास त्याच्याबदली आम्ही तीन मारल्यावर आपण बरोबरी झाली म्हणून डाव सोडून देऊ या का? नाही, श्रीमान, तुम्ही स्वतःच माझ्याशी लढायला उभे रहा, म्हणजे तुम्हाला कळून येईल की इथे आलेला मी कोणत्या प्रकारचा जव्हच्या बीजाचा मनुष्य आहे! प्रथम जव्हने क्रीतचा मुख्य राज्यकर्ता मिनॉस याला जन्माला घातले; मग मिनॉसने त्याच्यावर पाळी आली तेव्हा जन्म दिला थोर द्युकॅलिअनला; क्रीतमधल्या पुष्कळ लोकांवर राज्य करण्यासाठी मला जन्माला घातले ते द्युकॅलिअनने, आणि आता तुझा, तुझ्या पित्याचा नी त्रोजन्सचा विनाशक होण्यासाठी माझ्या नौकांनी मला इकडे आणले आहे".

असे तो बोलला व दैफोवसची द्विधा वृत्ती झाली; परत जाऊन मदतीला दुसरा कोणी त्रोजन आणावा, की एकटयानेच ते आव्हान स्वीकारावे? शेवटी त्याला सर्वोत्तम मार्ग हा दिसला की जाऊन ईनिआसला घेऊन यावे; ईनिआस त्याला सैन्याच्या मागच्या बाजूस उभा असलेला दिसला; तो प्राअॅमवर रुष्ट झाला होता; कारण त्याच्या शौर्याची कृत्ये योग्य तो बहुमानाचा वाटा त्याला देऊन प्राअॅमने गौरविली नव्हती. त्याच्यापाशी जाऊन दैफोवस बोलला, "ईनिआस, त्रोजन्समधील पुरुष श्रेष्ठा, नात्याच्या बंधांची तुला काही चाड असेल तर तुझ्या वहीणीच्या नवऱ्याच्या देहाचे रक्षण करण्यास आता मला मदत कर; अॅल्कॅथॉउसचा देह सोडवून आणण्यास माझ्याबरोबर चल. तो तुझ्या बहिणीचा नवरा असल्यामुळे त्याने तुला त्याच्या घरी लहानाचा मोठा केला आहे व आता आयदोमिनिअसने त्याचा वध केला आहे."

या शब्दांनी त्याने ईनिआसच्या हृदयाला पाझर फोडला आणि ईनिआस महान पराक्रम करण्याची ईर्ष्या मनात धरून आयदोमिनिअसच्या शोधार्थ गेला. पण केवळ एक लहान मूल असल्यासारखा आयदोमिनिअस काही डगमगून जाणारा नव्हता; डोंगरातील एकाद्या एकांत स्थळी माणसांचा मोठा समूह चालून येण्याची वाट पहात असलेला रानडुकर एकदम उलटून, जसा मागे न हटता जागा धरून ठाम उभा राहतो, त्याच्या पाठीवरचे राठ केस ताठ उभे रहातात, त्याच्या डोळ्यात आग चमकते व शिकारी कुत्रे व माणसे यांच्याविरुद्ध आपला बचाव करण्याच्या आतुरतेने तो आपले सुळे पाजळतो—अगदी तसाच विख्यात आयदोमिनिअस आपले स्थान भक्कमपणे धरून उभा राहिला व ईनिआज आला तरी तसूभर हलला नाही. त्याने आपल्या सोबत्यांना मोठ्याने हाक दिली; अॅस्कॅलॅफस, अफॅरिअस, दैपिरस, मेरिऑनिझ व

ॲन्तिलॉकस या साऱ्या शूर योद्धयांकडे पाहून तो ओरडला, " मित्रहो, इकडे या, व मला एकटा सोडू नका, लढाईत दुर्दम्यपणे शत्रूंचे जीव घेत जाणारा शीघ्रगती ईनिआज माझ्यावर चालून येत आहे, त्याच्याबद्दल माझ्या मनात फार भय आहे; शिवाय पुरुषाची शक्ती जेव्हा सर्वाधिक असते त्या यौवनाच्या ऐन भरात तो आहे; आजच्या त्याच्या वयाचा जर मी असतो तर आताच्या माझ्या मनाच्या निश्चयाच्या बळावर विजयाचे पारितोषिक एक त्याने किंवा मी तरी तात्काळ जिंकले असते ".

हे ऐकून ते सगळे खांद्यावर ढाली धरून एक जुटीने त्याच्यापाशी उभे राहिले. दुसऱ्या बाजूला ईनिआसने आपल्या सोबत्यांकडे पाहून त्यांना हाक दिली; दैफोबस, पॅरिस व ॲगॅनॉर हे त्याच्याप्रमाणेच त्रोजन्सचे नेते होते; चरणे झाल्यावर पाणी पिण्यास एडक्यामागे मेंढरे जशी जातात तसे त्यांचे अनुयायी त्यांच्या पाठोपाठ गेले व ते दृश्य पाहून मेंढपाळ जसा संतुष्ट होतो तसाच ईनिआसही आपले लोक आपल्यामागे आलेले पाहून संतुष्ट झाला.

मग ॲल्कॅथॉउसच्या देहाभोवती लांब भाल्यांनी त्यांनी हातघाईची त्वेषाची लढाई केली; लढाईच्या रेटारेटीत एकमेकांवर नेम धरून मारलेले भाले ब्राँझच्या चिलखतांवर आपटून भयानक खणखणाट झाला, आणि ईनिआस व आयदोमिनिअस या दोन मार्सतुल्य वीरांनी तलवारीने व भाल्याने एकमेकांवर घाव घालण्याच्या ईर्ष्येत इतर सर्वांवर कडी करण्याची शर्थ केली. पहिल्याने ईनिआसने नेम धरला, पण आयदोमिनिअसची नजर सावध असल्याने त्याने भाला चुकवला, तेव्हा ईनिआसच्या बळकट हाताने वेगात फेकलेला तो भाला व्यर्थ जाऊन भूमीत पडून थरथरत राहिला. दरम्यान आयदोमिनिअसने ईनोमॉसला पोटाच्या मध्यावर वार करून त्याच्या कवचाची पट्टी तोडली; त्यामुळे त्याचा कोथळा उसळत बाहेर आला व धुळीत अस्ताव्यस्त पडताना हाताच्या पंज्यांनी त्याने भूमी आवळून धरली. आयदोमिनिअसने त्याच्या देहातून भाला उपसून काढला, पण त्याच्यावर तीक्ष्ण शूलाग्रांचा वर्षाव होत असल्यामुळे बाकीचे चिलखत त्याला काढून घेता आले नाही; शिवाय त्याची शक्ती आता ओसरत चालली होती, त्यामुळे त्याला आता हल्ला चढवणे शक्य होत नव्हते. स्वतःचे शस्त्र परत घेण्यास पुढे उडी मारता येत नव्हती किंवा अंगावर येणारी शस्त्रे चुकवण्यास बाजूला झुकता पण येत नव्हते; म्हणून जरी हातघाईच्या हाणामारीत तो स्वतःचा बचाव अजून करीत होता तरी त्याचे जड झालेले पाय त्याला लढाईतून त्वरेने बाहेर नेऊ शकत नव्हते. तो रणक्षेत्रावरून सावकाश माघार घेत असता दैफोबसने त्याच्या रोखाने एक

भाला फेकला, कारण त्याच्याविरुद्ध त्याचा द्वेष पूर्वीप्रमाणेच धुमसत होता. पण पुन्हा भाल्याचा धरलेला नेम चुकला, व भाला मार्सपुत्र ॲस्कॅलॅफसच्या खांद्यातून आरपार गेला व धुळीत अस्ताव्यस्त पडताना हाताच्या पंज्यांनी त्याने भूमी घट्ट धरली.

युद्धात भाग घेण्यास प्रतिबंध असलेल्या इतर देवांबरोबर, जव्हच्या आज्ञेनुसार, सोनेरी ढगांखाली ऑलिम्पसच्या शिखरांवर मार्स बसला होता; त्यामुळे त्या भीषणस्वर कठोर देवाला अजून आपला पुत्र पडल्याचे कळले नव्हते. दरम्यान त्या पडलेल्या देहाभोवती लोक हिरिरीने लढत होते. ॲस्कॅलॅफसच्या मस्तकावरचे शिरस्त्राण दैफोबसने ओढून काढले पण मेरिऑनिझने त्याच्यावर उडी घेऊन त्याच्या बाहूवर भाला मारला; त्यामुळे ते जाळीदार मुखकवच असलेले शिरस्त्राण त्याच्या हातातून खणखणत भूमीवर पडले. त्यावर मेरिऑनिझने त्याच्यावर गिधाडासारखी झेप घेऊन आपला भाला त्याच्या खांद्यातून उपसून काढला व आपल्या लोकांच्या आडोशाने माघार घेतली. मग दैफोबसचा सख्खा भाऊ पोलायतिझ याने भावाच्या कमरेला हातांचा विळखा घालून त्याला लढाईतून दूर उचलून नेऊन, रणक्षेत्राच्या मागच्या बाजूस जेथे त्याचे घोडे रथ व सारथ्यासह उभे होते तेथपर्यन्त पोहोचवले. बाहूच्या जखमेतून रक्तस्त्राव होत असल्याने विव्हळत व अत्यंत वेदनाग्रस्त अवस्थेत त्याला सारथ्याने रथातून नगरीकडे नेले.

बाकीचे इतर लढतच राहिले व युद्ध गर्जना अखण्डपणे आकाशात उठतच राहिली. कॅलेतॉरपुत्र ॲफॅरिअस याच्यावर उडी घेऊन ईनिआसने आपल्या बाजूस वळलेल्या त्याच्या कंठावर भाला मारला; त्याचे डोके तुटून एका बाजूला पडले व शिरस्त्राण आणि ढाल त्याच्याबरोबरच खाली कोसळली. आणि जीविताचा वैरी जो मृत्यु त्याचा निपात त्याच्या भोवताली झाला. ॲन्तिलॉकसने ही संधी हेरली, व तो वेगाने थोऊनकडे धावला आणि तो बाजूला वळत असताच त्याने त्याला जखमी केले; संबंध पाठीवरून मानेकडे जाणारी शीर खोलून त्याने ती संपूर्णपणे कापून टाकली आणि थोऊन सोबत्यांकडे विनवणीपूर्वक हात पसरीत धुळीत उताणा पडला. ॲन्तिलॉकसने त्याच्यावर उडी घेऊन उग्र व क्रुद्ध दृष्टीने सभोवार पाहात त्याच्या खांद्यावरून त्याचे चिलखत काढून घेतले. ट्रोजन्सनी सर्व बाजूंनी त्याला वेढले व त्याच्या रुंद चकचकीत ढालीवर त्यांनी घाव घातले पण त्याच्या शरीराला ते दुखापत करू शकले नाहीत, कारण नेस्तॉरपुत्रासभोवार जरी शूलाग्रांचा दाट वर्षाव होत होता तरी नेपच्यून त्याच्या संरक्षणार्थ उभा होता. तो शत्रूंमधून मोकळा कधीच होत

नव्हता, सदा लढाईच्या ऐन गर्दीतच रहात होता. त्याच्या भाल्याला विसावाच नव्हता, कोणाला तरी दुरुन मारण्यास किंवा कोणाच्या तरी जवळ भिडून लढण्यास तो इतका उत्सुक होता की आपला भाला समतोल धरून सर्व दिशांकडे तो त्याला सारखा रोखीत राहिला.

तो असा गर्दीत नेम धरीत असलेला ॲसिअसपुत्र ॲदॅमॉसला दिसला; तेव्हा त्याच्यावर धावून जाऊन त्याच्या ढालीच्या मध्यभागी ॲदॅमॉसने भाला मारला, पण नेपच्यूनने भाल्याच्या टोकाचा परिणाम होऊ दिला नाही कारण ॲन्तिलॉकसचा प्राण त्याला घेऊ देणे नेपच्यूनला मान्य नव्हते. तेव्हा भाल्याचा अर्धाभाग जळक्या मेखेसारखा ॲन्तिलॉकसच्या ढालीत अडकून राहिला व दुसरा खाली पडला. मग ॲदॅमासने आपल्या लोकांच्या आड आश्रय घेण्याचा प्रयत्न केला पण मेरिऑनिझने त्याचा पाठलाग करून त्याच्यावर गुह्यभाग व नाभीच्या मधोमध भाला मारला; अशा जागेची जखम दुर्दैवी मर्त्य प्राण्यांना विशेष वेदनाकारी असते. वरील भाल्याने मेरिऑनिझने ॲदॅमॉसला जागच्या-जागी खिळवून ठेवले, आणि डोंगरावरील गुराखी दोरांनी व हिरव्या फोकांनी बांधून जबरीने ओढून नेत असलेल्या एकाद्या बैलासारखा ॲदॅमॉस त्या रुतलेल्या भाल्याभोवती धडपडत वळवळला. पण फार वेळ नव्हे, लौकरच मेरिऑनिझने येऊन आपला भाला त्याच्या देहातून उपसून काढला व त्याच्या डोळ्यांवर काळोखाची झापड आली.

मग हेलेनसने दैपिरसवर हातघाईच्या लढाईत एका प्रचंड थ्रेसिअन खड्गाचा वार केला तो त्याच्या कानशिलावर बसून त्या धक्क्याने त्याचे शिर-स्त्राण उडून खाली पडले व ॲकिअन पक्षाच्या बाजूने लढणाऱ्या एकाने पायाशी गडगडत आलेले ते शिरस्त्राण उचलून घेतले; पण दैपिरसचे डोळे मृत्यूच्या अंधारात केव्हाच मिटले होते.

या घटनेने मेनेलॉसला दुःख झाले व तो भाला परजीत, धाक दाखवीत हेलेनसवर चालून गेला; पण हेलेनसने आपले धनुष्य खेचले आणि दोघांनी एकाचक्षणी एकमेकांवर हल्ले केले, एकाने आपल्या भाल्याने तर दुसऱ्याने त्याच्या धनुष्यबाणाने. प्राअॅमपुत्राचा बाण मेनेलॉसच्या चिलखताच्या वक्षक-वचाला लागला पण न रुतता तो घसरून बाजूला गेला; धान्य पाखडण्याचे रुंद सूप हलवीत असता घोंघावणाऱ्या वाऱ्याने व सुपाच्या हालचालीने फोलकट उडून जाऊन काळे पावटे किंवा डाळीचे दाणे जसे खळ्याच्या भूमीवर टपटप पडतात—अगदी तसाच तो बाण मेनेलॉसच्या संरक्षक कवचाला घसटून उडाला-पण मेनेलॉसने त्याची पाळी आल्यावर हेलेनसच्या धनुष्य धरणाऱ्या हाताला

जखम केली. मेनेलॉसचा भाला त्या हातातून आरपार जाऊन धनुष्यातच रुतला; त्यामुळे जीव वाचवण्यासाठी आपल्या लोकांच्या आडोशाने त्याला माघार घ्यावी लागली; अडकलेल्या भाल्याच्या वजनाने त्याचा हात त्याच्या बाजूला लोंबत राहिला होता; पण लौकरच अॅगेनॉरने भाला उपटून काढला व जखमी हात काळजीपूर्वक बांधून शिलेदाराजवळ असलेल्या लोकरीच्या झोळीत आधारासाठी अडकवून ठेवला.

मग त्याच्या दुर्भाग्याने भुरळ पाडून विनाशाकडे वळविलेल्या पिसॅन्दरने थेट मेनेलॉसवर चाल केली, कारण हे मेनेलॉस, तुझ्याशी लढताना धारातीर्थी पतन पावणे त्याच्या नशिबी होते. दोघे एकमेकांच्या अगदी जवळ आले असता ॲत्रिअसपुत्राने मारलेला भाला बाजूला वळून त्याचा नेम चुकला; मग पिसॅन्दरने शूर मेनेलॉसच्या ढालीवर घाव घातला पण ढालीचा भेद झाला नाही, कारण तिने भाला अडवून त्याचा दांडा मोडून काढला; तरीही पिसॅन्दर नाउमेद झाला नाही व त्याला अजूनही यशाची खात्री वाटत होती. पण ॲत्रिअसपुत्राने तात्काळ तलवार उपसून त्याच्यावर उडी घेतली; तेव्हा पिसॅन्दरने त्याच्या बाजूला ढालीखाली अडकवलेली तुळतुळीत ऑलिव्ह लाकडाच्या लांब दांड्याचा ब्राँझचा परशु हाती घेतला व दोघांनी एकमेकांवर चढाई केली. पिसॅन्दरने मेनेलॉसच्या तुरेदार शिरस्त्राणाच्या टोकावर प्रत्यक्ष तुऱ्याखालीच घाव घातला, आणि पिसॅन्दर त्याच्याकडे येत असताना मेनेलॉसने त्याच्या कपाळावर, जेथून नाक उभारत जाते तेथे भुवयांच्या मध्ये वार केला; तेव्हा हाडे तडकली आणि त्याची दोन रक्तबंबाळ बुब्बुळे त्याच्या पायाशीच धुळीत पडली. तो मागे जमिनीवर उताणा पडला व मेनेलॉसने त्याच्या देहावर टांच रोवून त्याचे चिलखत काढून घेत बढाई मारली, "कितीही गर्विष्ठ व युद्धासाठी सदैव हपापलेले असे तुम्ही असलात, तरी ट्रोजन्सहो, तुम्हाला ॲकिअन्सच्या नौका सोडून अगदी तसेच जावे लागणार आहे; आणि जो कलंक व अपमान तुम्ही माझ्या स्वतःवर लादला आहात तो सारा तुमच्याही वाट्याला आल्याशिवाय राहणार नाही. भेकड लांडगिणीसारखे असणारे तुम्ही, अतिथ्याच्या अतिक्रमाचा प्रतिशोध घेणाऱ्या भीषण जव्हच्या कोपाला तुम्ही भ्याला नाही, पण तोच एक दिवस तुमची नगरी नष्ट करणार आहे. तुम्ही माझी लग्नाची बायको चोरलीत, आणि तिचे पाहुणे असताना दुष्टपणे पुष्कळशी संपत्ती पण पळवून नेलीत, आणि आता आमच्या नौकांवर तुम्ही आग घालण्याचे व आमच्या वीरांचे प्राण घेण्याचे बेत करता आहा. पण एक दिवस असा येईल की तुम्ही कितीही भडकून उठलात तरी तुम्हाला रोखण्यात

येईल. हे तात जव्ह, जो तू सर्व देवा-मानवांपेक्षा बुद्धीने श्रेष्ठ आहेस असे म्हणतात, आणि आमच्या आयुष्यात घडणाऱ्या साऱ्या गोष्टी ज्याच्या प्रेरणेने होतात, तो तू ट्रोजन्सवरच का कृपादृष्टी ठेवतोस? ते लोक इतके गर्विष्ठ व उद्दाम आहेत की त्यांना कधी युद्धाचा उबग येत नाही,; थोड्या वेळानंतर सगळ्या गोष्टी कंटाळवाण्या वाटू लागतात–झोप, प्रेम, मधुरगायन व रुबाबदार नृत्य–पण तरीही या गोष्टी अशा आहेत की माणसाला युद्धापेक्षा त्यांचे आकंठसेवन जास्त प्रिय व्हावे, पण ट्रोजन्स तर युद्धासाठीच सदा हपापलेले आहेत."

असे म्हणून मेनेलॉसने, पिसॅन्दरच्या देहावरचे रक्तलांछित चिलखत काढून आपल्या लोकांकडे दिले; मग तो पुन्हा युद्धात आघाडीच्या फळीवरील लोकांच्या श्रेणीत सामील झाला.

मग पायलिमिनिझ राजाचा पुत्र हारपॅलिअन याने त्याच्यावर झेप घेतली; तो पित्याबरोबर ट्रॉयला लढण्यासाठी आला होता, पण तो स्वगृही पुन्हा परत गेलाच नाही. त्याने मेनेलॉसच्या ढालीवर मध्यभागी आपला भाला मारला; पण तो ढालीचा भेद करू शकला नाही, व जखमी होण्याच्या भीतीने सावधपणे भोवताली सर्वत्र पाहात तो जीव बचावण्यासाठी आपल्या लोकांच्या आडोशाने मागे झाला. तथापि तो रणक्षेत्र सोडीत असता मेरिऑनिझने त्याच्यावर नेम धरून एक ब्राँझच्या टोकाचा बाण त्याला मारला, तो त्याच्या उजव्या नितंबावर बसून हाडातून आरपार जाऊन हारपॅलिअनच्या मूत्राशयात शिरला; तेव्हा तो जागच्याजागी तेथेच बसला व आपल्या सोबत्यांच्या बाहुपाशात त्याने प्राण सोडले; तो एखाद्या किड्यासारखा भूमीवर ताणून पडला व त्याच्या जखमेतून वाहणाऱ्या रक्ताने भूमी भिजून गेली. त्या शूर पॅफ्लॅगॉनिअन्सनी योग्य ती काळजी घेऊन त्याची परिचर्या केली; त्याला उचलून त्यांनी त्याला त्याच्या रथावर ठेवले आणि खिन्नपणे ट्रॉयनगरीला रथ हाकीत नेले; त्याचा पिताही आकांताने रडत त्याच्याबरोबर गेला; पण त्याच्या मृत पुत्राला जिवंत करील अशी कोणतीही खंडणी अस्तित्वात नव्हती.

हारपॅलिअनच्या मरणाने पॅरिसला फार खेद झाला, कारण पॅफ्लॅगॉनिअन्सकडे तो जाई तेव्हा हारपॅलिअनचा तो पाहुणा असे; म्हणून मित्राच्या वधाचा सूड घेण्यासाठी त्याने बाणाचा नेम धरला; आता युकेनॉर नामक एक विशिष्ट मनुष्य होता. तो कॉरिंथमध्ये घर असणाऱ्या पॉलिदस या भविष्यज्ञ, शूर व सधन गृहस्थाचा पुत्र; तो नौकेतून समुद्रमार्गे ट्रॉयला आला तेव्हा इकडे आपल्या पुढे मरण वाढून ठेवले जाणार आहे याची त्याला पूर्ण जाणीव होती;

कारण त्याचा सज्जन वृद्ध पिता पॉलिदस याने पुष्कळदा त्याला सांगितले होते की एकतर त्याने घरी राहून भयानक रोगाला बळी पडावे नाहीतर ॲकिअन्सच्या सांगाती जाऊन त्रोजन्सच्या हातून मरावे. म्हणून तो लढण्यास न जाता तर ॲकिअन्सनी त्याच्यावर जो भारी दंड लादला असता तो टाळण्यासाठी आणि त्याबरोबरच रोगाच्या वेदना व हालअपेष्टा चुकवण्यासाठी त्याने युद्धार्थ ॲकिअनांबरोबर इकडे येण्याचा निर्णय घेतला होता. आता पॅरिसचा बाण त्याला कानाखाली जबड्यावर लागला, त्याबरोबर त्याच्या देहातून प्राण गेला व मृत्यूच्या अंधःकाराच्या प्रेतवस्त्रात तो गुरफटला गेला.

तेव्हा एकाद्या भडकल्या आगीसारखे ते लढले. पण आर्गाइव्हज युद्धाच्या डाव्या फळीवर आपल्या लोकांचा निःपात करीत आहेत हे अद्यापि हेक्तरच्या कानावर आले नव्हते व लक्षात भरले नव्हते; त्या भागात लौकरच ॲकिअन्सनी त्रोजनांवर संपूर्ण विजय मिळवला असता, कारण नेपच्यून महोत्साहाने त्यांना उत्तेजन देत व मदत करीत होता. म्हणून हेक्तरने दॅनाअन योद्धांच्या दाटीच्या श्रेणींचा भेद करून दरवाज्यातून व भिंतीतून प्रथम जेथे बळजबरीने प्रवेश केला होता तेच स्थान तो धरून राहिला. येथेच ॲजॅक्स व प्रॉतेसिलॉज यांच्या नौका सागरतीरावर ओढून घेतलेल्या होत्या. संरक्षक भिंत इतर भागांपेक्षा येथे जास्त ठेंगणी होती आणि इथे माणसांचे व घोड्यांचे झगडे अतित्वेषाने चालले होते. बिओशिअन्स व लांब अंड्या घालणारे आयोनिअन्स, लॉक्रिअन्स, थिआचे लोक व एपिअन्सचे विख्यात सेनादल—या सर्वांना नौकांकडे मुसंडी मारणारा हेक्तर आवरणे कठीण होत होते, आणि ते त्याला आपल्या-पासून दूरही हाकू शकत नव्हते, कारण तो म्हणजे साक्षात एक आगीचीच भिंत होता. ॲथीनिअसन्सचे निवडक लोक आघाडीला होते व त्यांचा नेता पेतिऑसपुत्र मेनिस्थिअस होता; त्याच्याबरोबर फैदाज, स्तिरिअस व धिप्पाड बिआझ हे वीर होते; फिलिअसपुत्र मेगिझ, ॲम्फिऑन व ड्रेसिअस एपिअन्सचे सेनाप्रमुख होते, तर थिआच्या सैनिकांचे नायक मेदॉन व एकनिष्ठ पोदार्सिझ हे होते. यांच्यापैकी मेदॉन हा ऑइलिअसचा अनौरसपुत्र व ॲजॅक्सचा भाऊ होता; पण तो स्वतःच्या देशापासून दूर, फिलेसीला राहात असे, कारण त्याने आपली सावत्र आई ऑइलिअस पत्नी इरिओपिस हिच्या भावाला ठार मारले होते; दुसरा, पोदार्सिझ हा फिलॅकसपुत्र इफिक्लसचा मुलगा; हे दोघ थिअन्सच्या आघाडीला उभे राहून बिओशिअन्ससह नौकांचे रक्षण करीत होते.

ऑइलिअसपुत्र ॲजॅक्सने क्षणभरही तेलेमॉनपुत्र ॲजॅक्सची बाजू सोडली नाही, तर पडीत शेतात नांगर ओढताना दोन कृष्णवर्ण बैल जसा पराकाष्ठेचा

जोर करतात, त्यांच्या शिंगाच्या मुळांपासून निघालेल्या घामाच्या वाफा वर जात असतात, शेताच्या अंतिम कडेपर्यंत जमीन फोडीत जाताना दोघाना विभागणारे फक्त जूं तेवढे असते---अगदी तसेच ते दोघे ॲजॅक्स खांद्याला खांदा लावून एकजुटीने उभे राहिले. जेव्हा तेलेमॉनपुत्र घामाने व श्रमाने बेजार होई तेव्हा त्याच्यावरचा ढालीचा भार हलका करण्यासाठी, अनेक शूर सोबती त्याच्यामागे जात, पण ऑइलिअस पुत्राच्या मागे लॉक्रिअन्स इतक्याजवळ जाऊ शकले नाहीत, कारण हातघाईच्या लढाईत त्यांना टिकाव धरता येत नव्हता. अश्वपुच्छ केशांचे तुरे असलेली ब्राँझची शिरस्त्राणे त्यांच्यापाशी नव्हती किंवा ढाली अथवा ॲश लाकडांचे दांडे असलेले भालेही नव्हते; ते धनुष्ये व पिळदार लोकरीच्या गोफणींनी शस्त्रसज्ज होऊन ट्रॉयला आले होते, आणि या दोन्हीतून बाणांचा व पाषाणांचा वर्षाव ते ट्रोजनांच्या श्रेणी फोडण्यासाठी करीत होते. म्हणून अवजड शस्त्रास्त्रे धारण करणारे इतर योद्धे ट्रोजनांच्या चढाईचा व हेक्तरच्या आक्रमाचा मुख्य भार सोशीत होते, आणि त्यांच्या आडोशाने मागून हे बाण व गोफण गोटे मारीत होते; आणि याप्रमाणे ट्रोजन्सचा धीर सुटू लागला कारण बाणांनी त्यांच्यामध्ये गोंधळ माजवला.

लौकरच पॉलिडॅमाझने हेक्तरला पुढीलप्रमाणे संयुक्तिक सल्ला दिला नसता, तर नौका व तंबूपासून ट्रोजन्स केविलवाण्या अवस्थेत, जिच्यावरून वारा सारखा वहात रहातो त्या इलिअम नगरीला परत हाकलले गेले असते; पण पॉलिडॅमाझ त्याला म्हणाला, "हेक्तर, दुसऱ्याचा सल्ला घेण्यासाठी तुझे मन वळवणे अशक्य आहे. स्वर्गस्थ शक्तींनी युद्धाच्या कलांचे तुला इतके भरपूर ज्ञान दिले आहे की त्यामुळे तुला वाटते की इतर सर्वांपेक्षा मंत्रणेतही आपण श्रेष्ठ असलो पाहिजे; पण याप्रमाणे सर्वच गोष्टीत अग्रगण्य असण्याचा दावा तुला करता येणार नाही. देव कुणाला उत्तम योद्धा करतात, तर दुसऱ्याला नर्तक किंवा गायक किंवा वीणावादक करतात; आणि आणखी एकाद्याच्या ठिकाणी जव्हने असे सुज्ञ सामंजस्य रुजवलेले असते की त्याचा फायदा अनेकांच्या रक्षणार्थ लोकांना मिळतो व स्वतः त्या माणसाला त्याबद्दल इतर कोणापेक्षाही अधिक असे बरेच काही ठाऊक असते. म्हणून जे सर्वांत परिणामी उत्तम ठरेल असे मला वाटते ते मी बोलणार आहे. एकाद्या अग्निमंडलासारखे लढाईने तुला घेरून टाकले आहे, आणि ट्रोजन्स आता भिंतीच्या आतल्या बाजूस असून देखील काहीजण संपूर्ण शस्त्रास्त्र सज्ज असे दूर उभे आहेत, तर इतर विखुरलेले आणि शत्रूपेक्षा संख्याबलाने कमी असे नौकांपाशी लढत आहेत. म्हणून आता माघार घे, व तुझ्या सेनानायकांना तुझ्या भोवती

गोळा कर म्हणजे आपल्याला एकत्र विचारविनिमय करता येईल की नौकांवर आताच हल्ला चढवायचा व स्वर्गस्थ देव आपल्याला विजय प्रदान करील अशी आशा करायची, का अजून सुरक्षितपणे माघार घेणे शक्य आहे तोवर माघार घ्यायची. मला फार भय वाटते की कालच्या देण्याची फेड आज ॲकिअन्स पुरेपूर करतील, कारण त्यांच्या नौकांवर युद्धाला कधीही न कंटाळणारा एक योद्धा थांबून राहिलेला आहे व तो आणखी फार वेळ आता तुटकपणे दूर राहणार नाही. ''

पॉलिडॅमाझ याप्रमाणे बोलला आणि त्याचे शब्द हेक्तरला पटले. संपूर्ण-कवचधारी असा तो वीर रथावरून उडी मारून म्हणाला, ''पॉलिडॅमाझ सेनानायकांना येथे गोळा कर; मी तिकडे पलीकडे लढाईच्या गर्दीत जातो, पण त्या लोकाना माझ्या आज्ञा दिल्यावर लगेच परत येतो. ''

मग हिमावृत्त पर्वतासारखा उत्तुंग असा तो वीर वेगाने पुढे निघाला व मोठी आरोळी ठोकीत त्रोजन्सच्या व मित्रपक्षीयांच्या श्रेणीमधून त्वरेने गेला. त्याचा आवाज ऐकल्यावर ते सर्व घाईघाईने पॅन्थॉउसच्या श्रेष्ठ पुत्राच्या, पॉलिडॅमाझच्या भोवती गोळा होण्यास धावले; पण हेक्तर सर्वात पुढच्या लोकांकडे जात राहिला; तो सगळीकडे नजर टाकीत दैफोबस, राजपुत्र हेलेनस, ॲसिअसपुत्र ॲडॅमाज व हिरतॅकसपुत्र ॲसिअस हे कोठे दिसत आहेत का ते पाहात होता; पण ते जिवंत किंवा दुखापत न झालेले असे त्याला खरोखर यापुढे आढळणारच नव्हते; कारण शेवटी उल्लेखिलेले दोघे ॲकिअन नौकांच्या पिछाडयांना आर्गाइव्हज्‌नी ठार मारल्यामुळे पडले होते, तर बाकीचेही शत्रु-कडून जखमी होऊन पीडितावस्थेत होते; पण त्या भीषण युद्धाच्या डाव्या फळीकडे त्याला सुंदरी हेलनचा पती ॲलेक्झँड्रस दिसला. तो आपल्या लोकांना उत्तेजन देत लढण्यास चिथावीत होता. त्याच्याजवळ जाऊन हेक्तरने त्याची कानउघाडणी केली, ''पापबुद्धे पॅरिस, दिसायला गोंडस पण बाईलवेडया, असत्यवाद्या, दैफोबस व राजा हेलेनस कोठे आहेत? ॲसिअसपुत्र ॲडामाज व हिरतॅकसपुत्र ॲसिअस कोठे आहेत? शिवाय ऑथ्रिओनिअसही कोठे आहे? इलिअमची वाट लागली आहे व आता त्या नगरीचे नक्कीच पतन होणार! ''

ॲलेक्झँड्रसने उत्तर दिले, ''ज्याच्यावर दोष ठेवता येईल असा कोणी उपलब्ध नसताना उगीचच दोष कशाला काढावा? दुसऱ्या एकाद्या दिवशी मी युद्धापासून कदाचित अलिप्त राहिलो असतो पण या आजच्यासारख्या कठीण दिवशी मी अलिप्त राहणे शक्यच नाही. कारण भ्याडाच्या कोणत्याच

लक्षणासहित माझ्या मातेने मला जन्माला घातलेले नाही. नौकांभोवती तू आपल्या लोकांना लढाईला जुंपून दिलेल्या क्षणापासून आम्ही येथे ठाम राहून दॅनाअन्सशी युद्ध करीत आहोत. ज्या आपल्या सोबत्यांविषयी तू मला विचारतो आहेस ते मृत झालेले आहेत. फक्त दैफोबस व राजा हेलेनस हे दोघेही हाताना जखम झाल्यामुळे रणक्षेत्र सोडून गेले आहेत. पण सॅटर्नपुत्राने त्यांना वचावून जिवंत ठेवले आहे. तेव्हा आता आम्ही जेथे जावे असे तुला वाटत असेल तिकडे आम्हाला घेऊन जाण्यास पुढे हो आणि आम्ही तुझ्यामागे अगदी मनापासून येतो. जोपर्यंत आमची शक्ती टिकून राहील तोपर्यंत तुला आम्ही तोंडघशी पाडीत आहोत असे तुला कधी दिसणार नाही; पण मनातून कितीही जरी असले तरी माणसाच्या अंगी जेवढी कुवत असेल त्याहून जास्त काहीच तो करू शकत नाही."

या शब्दांनी त्याने आपल्या भावाचे समाधान केले आणि ते दोघे लढाईची गर्दी सर्वात दाट जेथे होती त्या भागात गेले; तेथे सेब्रिओनिझ, शूर पॉलिडॅमाझ, फॅल्सिझ, ऑर्थिअस, देवतुल्य पॉलिफितिझ, पॅल्मीझ, ॲस्कॅनिअस या वीरांसह, सुपीक ॲस्कॅनिआतून आदल्या दिवशी इतर सैनिकांना विश्राम देण्यासाठी आलेला हिप्पोशनपुत्र मोरिझ हाही होता. मग जव्हने त्यांना लढण्यास चेतना दिली. एकाद्या भीषण वाऱ्याचे झोत गडगडाटी वादळाच्या पूर्वी जसे भूमीवर आघात करतात, खाऱ्या समुद्राला फटके मारून ते त्यांच्यात प्रचंड कल्लोळ उत्पन्न करतात, व एकामागून एक अशा किनाऱ्यावर आदळत येणाऱ्या, फेसाचे मुकुट कमानदार माथ्यावर धारण करणाऱ्या भव्य लाटा प्रबळ असतात-- अगदी तशाच प्रकारे ते योद्धे वायुवेगाने कूच करू लागले. चमकत्या शस्त्रसंभाराने सज्ज अशा व्यूहरचना केलेल्या ट्रोजनांच्या श्रेणींमागून श्रेणी आपल्या नेत्यांच्या मागे आघाडीवर गेल्या. त्यांच्या मार्गक्रमणात अग्रभागी प्राणघातक मार्सतुल्य प्रायॅमपुत्र हेक्तर आपली गोल ढाल पुढे धरून चालत होता. ती ढाल वृषभचर्माची असून ब्राँझच्या पत्र्यांनी मढवलेली होती, आणि त्याच्या मस्तकावर त्याचे चकाकते शिरस्त्राण होते. ढालीच्या आडोशाने पुढे पुढे पावले टाकीत तो प्रत्येक दिशेला जात होता; समोरच्या श्रेणींची फळी त्याच्या हल्ल्यापुढे कोठे मागे हटते का याची चाचणी तो करीत होता, पण ॲकिअन्सचे धैर्य तो विचलित करू शकला नाही. श्रेणीतून पुढे पदन्यास करून त्याला आव्हान देणारा पहिला योद्धा ॲजॅक्स होता. 'श्रीमान', त्याने हाक दिली, "असे पुढे या, असे आर्गाइव्हज्‌ना घाबरवण्याचा असा व्यर्थ विचार कशाला करता? आम्ही ॲकिअन्स उत्तम योद्धे आहोत, पण जव्हचा कोप आमच्यावर

प्रखर स्वरुपात कोसळला आहे. आमच्या नौका नष्ट करण्याचा खरोखरच तुम्ही दृढनिश्चय केला आहे असे दिसते, पण तुम्हाला रोखून धरतील असे आमच्याकडेही समर्थ हात आहेत; आणि आमच्या नौका नष्ट होण्याच्या आधीच तुमचीच सुंदरनगरी जिंकून आमच्याकडून लुटली जाईल. मैदानावरची धूळ उडवीत नगरीत तुम्हाला परत घेऊन जाताना ससाण्यापेक्षा तुमचे घोडे जलद धावावेत अशी जव्हला व सर्व देवांना प्रार्थना तुम्ही करण्याची वेळ जवळ आली आहे."

असे तो बोलत असता त्याच्या उजव्या हाताकडे जवळूनच एक पक्षी उडत गेला आणि ॲकिअन्सच्या सैनेने मोठी आरोळी दिली; कारण या शकुनाने त्यांना धीर आला होता. पण हेक्तरने उत्तर दिले, "ॲजॅक्स वढाईखोरा व असत्यवाद्या, आजच्या दिवसाच्या उदरी ॲकिअन्सच्या नाशाचे भविष्य आहे याची मला जितकी खात्री आहे तितकी, मी, ढाल धारण करणाऱ्या जव्हचा पुत्र व राणी ज्यूनो, आणि मिनर्व्हा व ॲपॉलो यांच्या समान मी माननीय सदैव राहीन या गोष्टीबद्दल मला खात्री असती तर किती बरे झाले असते! माझ्या भाल्यापुढे उभे राहण्याची तुझी छाती झाली तर तूही बाकीच्या ॲकिअन्सच्यामध्ये रणक्षेत्रीपडशील; तुझ्या गोंडस देहाला फाडून माझा भाला तुझ्या चरबीने व मांसाने आमच्या कुत्र्या गिधाडांना आकंठ भोजन घालील व तुझे ॲकिअन्सच्या नौकांपाशी पतन होईल."

या शब्दांनिशी तो पुढे निघाला व गगनभेदी आरोळी देऊन बाकीचे सैन्य त्याच्यामागे गेले, आर्गाइव्हज्नीही आपल्या बाजूने तसाच उच्चरव केला आणि आपल्या शौर्याबद्दलची आशंका त्यांच्या मनाला शिवली नाही. ट्रोजन सेनानायकांच्या आक्रमणाविरुद्ध ते भक्कमपणे उभे राहिले आणि उभय सेनादलांचा ओरडा आकाशात उंच जाऊन दीप्तीमान जव्हपर्यंत पोचला.

❁ ❁ ❁



# सर्ग १४

नेस्तॉर मद्याचा चषक पुढे घेऊन मद्य प्राशन करीत बसला होता, पण युद्धाचा कल्लोळ त्याच्या कानावर पडल्यावाचून राहिला नाही, आणि तो इस्क्युलॅपिअसच्या पुत्राला म्हणाला, " अरे उच्चकुलीन मॅकॲऑन, या सगळ्याचा अर्थ तरी काय? आपल्या नौकांपाशी लढणाऱ्या लोकांच्या आरोळ्या अधिकाधिक मोठ्याने ऐकू येत आहेत; म्हणून तू येथे थांब व मद्य घेत बैस; दरम्यान सुंदर हेकॅमिदे तुझ्या स्नानासाठी पाणी तापवून तुझ्या अंगावरचे साखळलेले रक्त धुवून काढील. मी तात्काल टेहळणीच्या जागी जाऊन सगळा प्रकार काय आहे ते पाहतो. "

बोलता बोलता त्याने आपला पुत्र थ्रॅसिमिदिझ याची ब्रॉंझच्या पत्र्याने चकाकणारी ढाल त्याच्या तंबूत पडली होती ती उचलून घेतली, कारण त्या पुत्राने पित्याची ढाल नेली होती. याने आपला भला भक्कम ब्रॉंझची शेंबी असलेला भाला हाती घेतला व तो बाहेर येताच त्याला दिसून आले की ॲकि-अन्सच्या सेनेची भयानक दाणादाण झालेली असून, आता त्यांच्या भिंतीचा पाडाव झाल्यामुळे ते वाट फुटेल तिकडे भांबावून पळून चालले होते व ट्रोजन्स त्यांचा पाठलाग करीत होते––जसे समुद्राला भारी उधाण आले असता लाटा स्तब्ध राहतात–––भीषण वारे त्यांच्यावर कोणत्या बाजूने घाला घालणार आहेत ते त्या करडी नजर ठेवून पाहात राहतात––दरम्यान आहेत तेथेच स्थिर राहून इकडे तिकडे वळत नाहीत, अखेर एका विशिष्ट वायूचा झोत आकाशातून खाली झेप घेऊन त्यांना दिशा ठरवण्यास मदत करतो–अगदी त्या प्रकारेच, दॅनाअन्सच्या गर्दीत शिरावे की ॲगॅमेम्नॉनच्या शोधार्थ निघावे असे चिंतन तो वृद्ध करीत राहिला. अखेर ॲत्रिअसपुत्राकडे जाणे हाच सर्वोत्तम मार्ग असे त्याला वाटले; दरम्यान सेनादले एकमेकांशी लढत परस्परांचे प्राण घेत होती, व तलवारीभाल्यांचे प्रहार ते एकमेकांवर करीत असता त्यांच्या देहावरचे कठीण ब्रॉंझ खडखडत होते.

जखमी झालेले राजे, तायदिअसपुत्र, युलिसिस व ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉन हे आपल्या नौकांकडून येत असता नेस्तॉरला भेटले. त्यांच्या नौका सर्वांच्या आधी प्रथम किनाऱ्यावर ओढून लावल्यामुळे अगदी किनाऱ्यालगतच होत्या व सर्वांत शेवटच्या नौकांमागे ती भिंत बांधण्यात आली होती, त्यामुळे आता

चालू असलेल्या भिंतीपासूनच्या लढाईपासून ते काहीसे दूर होते; समुद्रकिनारा रुंद असला तरी सर्वनौकांना जागा पुरण्याइतका नव्हता, आणि त्यामुळे सेनेच्या तळात दाटी झाली होती, तेव्हा त्यांनी नौकांच्या ओळी एकीमागे एक लावून आखाताच्या दोन टोकांमधली मुखातली सर्व जागा व्यापून टाकली होती. आपापल्या भाल्यांवर भार देत ते राजे लढाईचे सर्वेक्षण करण्यास येत होते, कारण ते फारच चिंताक्रांत होते; जेव्हा वृद्ध नेस्तॉर त्यांना भेटला तेव्हा ते फार कष्टी झाले. मग राजा ॲगॅमेम्नॉन त्याला म्हणाला, "नेलियसपुत्रा नेस्तॉर, ॲकिअन या नावाला गौरव प्राप्त करून देणाऱ्या, तू युद्ध सोडून इकडे का आलास? हेक्तरने त्रोजन्समध्ये जी फुशारकी मारली होती की आमच्या नौका पेटवून देऊन, आम्हाला ठार मारल्याखेरीज तो इलिअमला परतणार नाही, ती खरी होणार अशी भीती मला वाटते. तो असे बोलला होता व ते सारे आता खरे होत आहे. हाय! ॲकिलिझसारखे ॲकिअन्सपैकी इतरही माझ्यावर रागावले आहेत, व म्हणूनच ते आपल्या नौकांच्या पिछाडचांना लढाई करणे नाकारीत आहेत."

तेव्हा जेरिनीचा उच्च कुलीन वीर नेस्तॉर याने उत्तर दिले, "खरोखर तू म्हणतोस तसेच आहे; या क्षणाला ते सर्व खरे होत आहे व उच्च स्थानावरून मेघगर्जना करणारा जव्ह देखील ते निवारू शकत नाही. आपल्याला व आपल्या नौकांसाठी संरक्षक अभेद्य तटबंदी म्हणून जिच्यावर आपण विसंबलो ती भिंत कोसळून पडली आहे, आपल्या नौकांजवळ चिकाटीने व अविरतपणे त्रोजन्स लढत आहेत. कोणत्याही बाजूला पहा, ॲकिअन्सची पळापळ कुठल्या भागातून चालली आहे ते दिसत नाही; गोंधळ उडालेल्या गर्दीत ते मारले जात आहेत व रणगर्जना आकाशात उंचावर जात आहेत; मंत्रणेचा जर काही उपयोग असेल तर आपण आता काय केलेले योग्य ठरेल याचा विचार करू या; पण आपण स्वतः लढाईत भाग घेण्याचा सल्ला मी देत नाही, कारण जखमी झालेला मनुष्य लढू शकत नाही."

आणि राजा ॲगॅमेम्नॉन उत्तरला, "नेस्तॉर, जर त्रोजन्स खरोखरच आपल्या नौकांच्या पिछाडचांजवळ लढत असतील, आणि भिंत किंवा खंदक—ज्यांच्यावर दॅनाअन्सनी इतके कष्ट घेतले, व जे त्यांना, नौकाना व आपल्याला वचावणारे अभेद्य तटबंदीसारखे वाटत होते—ते जर निरुपयोगी ठरले असतील तर मग मला असे दिसते की जव्हची इच्छाच अशी असावी की, ॲकिअन्सनी येथे आरगॉसपासून दूर अपकीर्ती पदरी घेऊन नष्ट व्हावे. एकेकाळी आपले रक्षण करण्याची जव्हची इच्छा होती हे मला माहीत आहे व आता मला समजून

येत आहे की तो ट्रोजन्सना देवांसमान गौरवाप्रत चढवून, दुसऱ्या बाजूस त्याने आमचे हातपाय जणू बांधून टाकले आहेत. तेव्हा आता आपण सगळे मी म्हणतो तसे करू या; किनाऱ्यावर असलेल्या नौका खाली आणून त्या पाण्यावर ओढून घेऊ या; जर ट्रोजन्सनी निदान रात्री तरी लढण्यापासून विराम घेतला तर नौका रात्र पडेपर्यंत पाण्यात थोडचा दूर अंतरावर दगडांना घट्ट बांधून नांगरून ठेवू या; मग बाकीच्या नौका खाली ओढून घेता येतील. विनाशा-पासून रात्री जरी पळ काढला तरी त्यांत काही दोषार्ह नाही. पकडले जाऊन मारले जाण्यापेक्षा पळून जाऊन माणसाने जीव वचावणे वरे."

त्याच्याकडे उग्र दृष्टीने पाहून युलिसिस म्हणाला, "ॲट्रिअसपुत्रा, हे तू काय बोलत आहेस? करंट्या, आमच्यापैकी प्रत्येक जण मरेपर्यंत, यौवना-पासून वार्धक्यापर्यंत निकराच्या युद्धाचेच जीवन जव्हने ज्यांच्या वाटचाला घातले आहे, त्या आम्हावर राज्यकर्ता असण्यापेक्षा तू दुसऱ्या एकाद्या व हीन सेनेचा अधिपती व्हायला हवा होतास! जी जिंकण्यासाठी आम्ही इतके कष्ट भोगले ती ट्रॉयनगरी तू अशीच सोडून जाणार आहेस काय? एकदम गप्प रहा, नाही तर, चांगला सल्ला कसा द्यावा हे जाणणारा, आरगॉसच्या सेनेएवढचा मोठचा सेनेचा राजा तोंडांतून जे शब्द कधी बाहेर पडू देणार नाही ते तुझे शब्द ॲकिअन्सपैकी दुसरा कोणी तरी ऐकील. तू आता जे काय म्हणत आहेस त्यावरून तुझ्या निर्णयशक्तीबद्दल मला तिरस्कार उत्पन्न झाला आहे. लढाईची धुमश्चक्री चालू असताना आपल्या नौका पाण्यावर ओढून काढून याप्रमाणे, जिकीत असलेल्या ट्रोजनांच्या त्यांना सोईस्कर होईल असे आणखीच तावडीत आम्ही सापडावे असे तुझे म्हणणे आहे की काय? अरे, अशा करणीने सर्वनाश होईल, नौका पाण्यावर ओढल्या जात असलेल्या पाहिल्या की मग ॲकिअन्स लढणे चालू ठेवणार नाहीत. हल्ले थांबवून ते सारखे नौकांकडेच वळून पहात राहतील; तेव्हा श्रीमान प्रमुख, आपल्या मसलतीने आमचा सत्यानाश होईल."

ॲगॅमेम्नानने उत्तर दिले, "युलिसिस, तुझ्या दूषणाने माझ्या हृदयाला डंख झाला आहे. तथापि, ॲकिअन्सची इच्छा असो वा नसो, त्यांनी आपल्या नौका समुद्रात ओढून काढल्याच पाहिजेत अशी आज्ञा काही मी देत नाही. कोणीतरी, एखादा वृद्ध वा तरुण हा आपल्याला अधिक चांगला सल्ला देऊ शकला तर तो ऐकण्यास मला आनंदच वाटेल."

तेव्हा दायोमिद म्हणाला, "तसा एक पुरुष जवळच आहे. त्याला फार दूरपर्यन्त शोधायला जायला नको—जर तू माझे ऐकणार असशील व तुमच्यापैकी

कोणापेक्षाही मी केवळ लहान म्हणूनचे माझ्या बोलण्याने रुष्ट होणार नसशील, तर बोलतो; जातकुळीच्या दृष्टीनें मी उच्चकुलीन जनकाचा पुत्र आहे; थीब्ज् येथे समाधी असलेला तायदिअस माझा पिता. पॉर्थिअसला कुलदीपक असे तीन मुलगे होते, त्यांच्यापैकी ॲग्रिअस व मेलाज हे प्ल्यूरॉन व खडकाळ कॅलिदॉनला वसती करून राहिले. तिसरा उमराव वीर ईन्यूस हा माझा पितामह; तो त्या सर्वांपेक्षा शूर होता. ईन्यूस स्वदेशीच राहिला पण माझ्या पित्याने (जव्ह व इतर देवांच्या संकेतानुसार) देशांतर केले व तो आरगॉसला आला. त्याने ॲड्रॅस्तसच्या घराण्यातील मुलीशी लग्न केले आणि त्याचे घर अत्यंत समृद्ध होते, कारण धान्य पिकवणाऱ्या संपन्न भूमीची व फळबागांची मोठी मालमत्ता त्याच्याकडे असून शिवाय पुष्कळ मेंढरेंही होती. त्याखेरीज भाला चालविण्यात तो साऱ्या ऑर्गाइव्हज्पेक्षा प्रवीण होता. या साऱ्या गोष्टी खऱ्या की खोटया ते तुम्ही ऐकलेल्या हकीकतीवरून तुम्हाला पडताळता येईल. म्हणून मी जेव्हा योग्य तेच बोलेन तेव्हा मी जणू भ्याड किंवा हीन कुळाचा आहे म्हणून माझ्या बोलण्याची अवहेलना करण्याचे तुम्हाला कारण नाही. माझे म्हणणे असे की आपण जरी जखमी झालेलो असलो तरी प्राप्त कर्तव्य म्हणून आपण रणक्षेत्रात उतरलेच पाहिजे. तेथे पोहोचल्यावर प्रत्यक्ष मारामारीबाहेर व भाल्यांच्या टप्प्यापलीकडे आपण राहू; कारण आधीच झालेल्या जखमात नवीन जखमांची भर नको; पण इतराना आपल्याला प्रोत्साहन देता येईल. जे आपला रोष थोंबाळीत व आतापर्यन्त युद्धातून अलिप्त राहिले आहेत आशांना आपण उत्तेजित करू शकू."

याप्रमाणे तो बोलला; त्यावर त्याने सुचविल्याप्रमाणेच त्यांनी केले व ॲगॅमेम्नॉन राजाच्या पुढाकाराने ते निघाले.

दरम्यान नेपच्यूनचे काही परिस्थितीकडे दुर्लक्ष झाले नव्हते. तेव्हा तो एका म्हाताऱ्याचे रुप घेऊन त्यांच्याजवळ आला. त्याने ॲगॅमेम्नॉनचा उजवा हात आपल्या हातात घेऊन म्हटले, "ॲत्रिअसपुत्रा, ॲकिअन्सची पळापळ होऊन ते मारले गेले हे पाहून मला वाटते आता ॲकिलिझला आनंद झाला असेल, कारण पश्चाताप कसा तो त्याला अजिबात माहितच नाही. त्याचा अनिष्ट शेवट होवो व स्वर्गस्थ देव त्याचा सत्यानाश करोत. तुझ्यापुरते म्हणशील, तर धन्य देव तुझ्यावर इतक्या निष्ठुरपणे चिडलेले नाहीत, तर अजूनही पुन्हा एकदा त्रोजन्सचे राजपुरुष व मंत्री मैदानावरची धूळ उंच उडवतील व नौका-तंबू कडून त्यांच्या नगरीकडे पळून जात असलेले तुला दिसतील."

असे म्हणून त्याने एक प्रचंड रणगर्जना केली व तो वेगाने मैदानाकडे गेला. त्याच्या भरदार छातीमधून निघालेला गंभीर आवाज नऊ किंवा दहा हजार लोक युद्धाच्या ऐन धुमश्चक्रीत असतांना ओरडावेत एवढा मोठा होता. आणि तो ऐकून ॲकिअन्सना युद्ध चालू ठेवीत अखण्डपणे लढण्यासाठी नवा हुरुप आला.

ऑलिम्पसच्या एका शिखरावर उभ्या असलेल्या सुवर्ण सिंहासनस्वामिनी ज्यूनोने खाली पाहिले व तिचा भाऊ तसाच दीरही असणारा नेपच्यून लढाईच्या गर्दीत घाईघाईने इतस्ततः संचार करीत असलेला पाहून तिच्या मनाला समाधान झाले. मग अनेक निर्झरिणी असलेल्या इदा पर्वतराजीच्या सर्वोच्च शिखरावर बसलेल्या जव्हकडे तिने दृष्टी वळविली व त्याच्याबद्दल तिला घृणा वाटली. त्याला कसे फसवावे याचा ती विचार करू लागली, आणि अखेर तिने ठरविले की सगळ्यात नामी मार्ग म्हणजे भारी वस्त्रांनी स्वतःला शृंगारावे व इदाला जावे–या हेतूने की जव्ह आपणावर मोहित होऊन आपले प्रणयलिंगन घेण्याची त्याला इच्छा होईल; त्यात तो दंग झाला म्हणजे मग त्याच्या डोळ्यांवर व इंद्रियांवर गोड व निश्चित निद्रेची भुरळ हळूहळू पाडणे शक्य होईल.

म्हणून तिचा पुत्र व्हल्कन याने तिच्यासाठी बांधलेल्या महालाकडे ती गेली; त्याने महालाची दारे एका गुप्त किल्लीने अशी कौशल्याने बंद केली होती की दुसऱ्या कोणत्याही देवाला ती उघडणे शक्य नव्हते. तेथे प्रवेश करून तिने दारे लावून घेतली, स्वर्गीय अमृतजलाने आपल्या सुंदर देहावरचा सर्व मळ स्वच्छ केला; नंतर अमृततुल्य, अत्यंत मृदु व खास तिच्यासाठी सुगंधित केलेले ऑलिव्ह तेल अंगाला लावले–ते ब्राँझची फरशी असलेल्या जव्हच्या प्रासादात नुसते शिपडले असते तरी त्याच्या आमोदाने स्वर्ग व पृथ्वीचे विश्व व्यापले असते इतके सुवासिक होते. त्याचे मर्दन तिने आपल्या कोमल त्वचेला केल्यानंतर तिने आपल्या अमर मस्तकावरून रुळणाऱ्या सोनेरी सुंदर केशकलापाच्या पेडांची वेणी घातली. तिच्यासाठी परम नैपुण्याने नानाप्रकारचे भरतकाम करून मिनर्व्हाने बनवलेले अद्‌भूतवस्त्र तिने परिधान केले व ते वक्षस्थळाभोवती सोन्याच्या फाशांनी दृढ केले. आणि शंभर गोंडे असलेला पट्टा कमरेभोवती बसवला; मग कानाच्या पाळ्यांच्या छिद्रांमधून अत्यंत आकर्षक रीत्या चमकणारी तीन तेजस्वी लोलक असलेली कर्णभूषणे घातली व एक सुंदर नवीन अवगुंठन मस्तकावर टाकले. तिने पायांवर पादत्राणे बांधली, आणि असा मनपसंत व निर्दोष शृंगार झाल्यावर महालाबाहेर पडून तिने व्हीनसला हाक मारली. तिला एकीकडे घेऊन ती म्हणाली, " प्रिय बाळे, मी तुला काही सांगणार आहे

ते तू करशील, का मी दॅनाअन पक्षाची व तू त्रोजन्सच्या बाजूची म्हणून करण्याचे नाकारशील ? "

उत्तरार्थी जव्हकन्या व्हीनस बोलली, " ज्यूनो, देवींच्या आदरणीय राज्ञी, प्रबल सॅटर्नच्या कन्ये, तुला काय हवे ते सांग; ते मला जर करता आले, व ते करणे शक्य कोटीतील असले तर मी ते तुझ्यासाठी तात्काळ करीन."

मग ज्यूनोने तिला एक खोटीच गोष्ट बनवून सांगितली, ती म्हणाली, "सार्‍या मर्त्य व अमर गोष्टी तुझ्या पायाशी ज्या अभिचारमंत्रांनी येतात त्यापैकी काही मोहिनीमंत्र तू मला द्यावेस अशी माझी इच्छा आहे. आपण सारे देव ज्यापासून उत्पन्न झालो, त्या ओशिॲनसकडे व थेटिस मातेकडे, पृथ्वीच्या अंतिम सीमेवर मी जात आहे; त्यांनी न्हिआकडून मला आपल्याकडे आणून घरात ठेवले, माझा सांभाळ केला व लहानाची मोठी केली–केव्हा म्हणशील, तर ज्यावेळी जव्हने महान सॅटर्नला पृथ्वी व समुद्राच्याही खाली असलेल्या खोल विवरात बंदीवान केले होते तेव्हा, त्यांच्या दोघात समेट करून देण्यासाठी मला जाऊन त्यांना भेटायला हवे; त्यांची भांडणे चालली होती, आणि दोघे परस्परांवर इतकी रागावली आहेत की कितीतरी दिवस उलटून गेले पण त्यांनी एक शय्या केलेली नाही. मी जर त्यांची समजूत घातली व त्यांचे एकमेकांशी पूर्ववत प्रेमाचे नाते जोडून दिले जर त्यांना माझ्याविषयी कृतज्ञता वाटेल व दोघे माझ्यावर नंतर निरंतर प्रेम ठेवतील."

त्यावर हास्यप्रेमी व्हीनस म्हणाली, " तुझे म्हणणे मला नाकारता येत नाही व मी ते नाकारता कामाही नये, कारण आमचा राजा जो जव्ह त्याच्या बाहुपाशात विसावण्याचा तुला हक्क आहे."

असे बोलत असता तिने आपल्या वक्षस्थलावरून लोकविलक्षण भरतकाम केलेला एक पट्टा सोडवला; प्रेम, वासना, व अत्यंत व्यवहारचतुर माणसाचीही विवेकबुद्धी हिरावून घेणारी स्तुतीची मधुर भाषा–असे तिचे सारे मोहिनीमंत्र त्या पट्ट्यात विणलेले होते. तो पट्टा ज्यूनोला देऊन ती म्हणाली, " माझे सर्व मोहिनीमंत्र ज्यात आहेत असा हा पट्टा घे व तो तुझ्या वक्षस्थळाजवळ खोच. तू हा अंगावर बाळगलास म्हणजे तुझे उद्दिष्ट मग ते काहीही असो–सफल झाल्याशिवाय राहणार नाही याची मी तुला खात्री देते."

हे ऐकून ज्यूनोने स्मित केले व सस्मित मुद्रेनेच तो पट्टा आपल्या वक्षस्थला-शेजारी खोचला.

मग व्हीनस परत जव्हच्या प्रासादात गेली व ज्यूनो तीरासारखी ऑलिम्पसच्या शिखरांवरून खाली उतरली. पिएरिआ व सुंदर एमाथिआ

यांच्यावरून पुढे पुढे जात ती थ्रेसिअन घोडेस्वारांच्या हिमावृत्त पर्वत श्रेणीं-पाशी येऊन पोचली. त्यांच्या सर्वोच्च शिखरांवरून वेगाने मार्गक्रमण करताना तिने भूमीवर पाऊलही ठेवले नाही. ॲथॉसला आल्यावर समुद्राच्या लाटांवरून तशीच पुढे उदात्त थोआसच्या लेम्नॉस नगरीपर्यन्त ती गेली. तेथे तिला मृत्यूचा सख्खा भाऊ निद्रादेव भेटला. त्याचा हात धरून ती म्हणाली, "निद्रादेवा, मर्त्य व अमरांवर सारखाच अधिकार गाजवणारा असा तू आहेस; जर पूर्वी कधी माझे काम केले असशील, तर आताही कर, मग मी सदैव तुझ्याशी कृतज्ञ राहीन. मी जव्हला आलिंगन दिले असताना त्याचे तीक्ष्ण डोळे तू झोपेच्या अमलाखाली मीट, मग मी तुला कधीही न भंगणारे असे सुंदर सोन्याचे आसन देईन. जन्मापासूनच वक्रचरण असलेला माझा पुत्र व्हल्कन ते तुझ्यासाठी तयार करील, आणि तू मेजापाशी बसताना तुझे सुकुमार पाय टेकण्यासाठी एक पादपीठही तो तुला देईल."

तेव्हा निद्रा देवाने उत्तर दिले, "अखिल देवतांच्या महान राज्ञी, प्रतापी सॅटर्नच्या कन्ये ज्यूनो, देवांपैकी दुसऱ्या कोणालाही, फार काय ज्याच्यापासून सर्व देवांचा उगम त्या ओशिॲनसच्या जलौघानालाही गुंगवून झोपवण्यास मला काहीसुद्धा हरकत वाटणार नाही, पण जव्हने आज्ञा केल्याखेरीज त्याच्याजवळ जाण्याची किंवा त्याला झोप आणण्याची माझी छाती नाही. ट्रोजन्सची नगरी लुटल्यावर इलिअमहून नौकेने समुद्रपर्यटनाला जव्हचा बलशाली पुत्र हर्क्युलिझ निघाला होता, त्यादिवशी तू सांगितलेले केल्याबद्दल एक चांगलाच धडा मला आधीच मिळालेला आहे. त्यावेळी तुझ्या म्हणण्याखातर ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या मनावर मी स्वतःचेच सुखद आच्छादन घालून त्याला आरामात निद्रिस्त केले. दरम्यान तू हर्क्युलिझ विरुद्ध एक कट रचून क्रुद्ध वायूंच्या झोतांनी सागराला फटके मारून हर्क्युलिझला त्याच्या साऱ्या मित्रांपासून दूर, कॉस या सुंदर नगरीपर्यन्त नेलेस. जव्ह जागा झाल्यावर भयंकर संतापला व देवांची घरभर फेकाफेक करू लागला; तो विशेषतः मला शोधीत होता, आणि मानव व देव दोघांनाही सारखेच हतबल करणाऱ्या रात्रीने मला वाचवले नसते तर जव्हने मला अवकाशांमधून खाली समुद्रात भिरकावून दिले असते, व पुन्हा कधी माझे नावही ऐकू आले नसते. मी रात्रीकडे पळालो व जव्ह माझ्यावर इतका रागावलेला असूनही त्याने माझा शोध सोडून दिला, कारण रात्रीला रुष्ट करण्याचे त्याला धैर्य नव्हते. आणि आता जे करण्याचे धाडस माझ्याच्याने होणार नाही तेच करण्यास तू मला पुन्हा सांगत आहेस."
आणि ज्यूनो म्हणाली, "निद्रादेवा, असल्या कल्पना तू डोक्यात का शिरवून

घेतो आहेस ? स्वतःच्या पुत्रास मदत करण्यास जव्ह जितका आतुर होता तितका त्रोजनांसाठी होईल असे का तुला वाटते? चल, तुझे लग्न सर्वात तरुण कलादेवतांपैकी एकीशी मी लावून देते म्हणजे मग ती तुझी स्वतःची अशी कायमची होईल—पॅसिथिआशी, तिच्याशी लग्न व्हावे अशी किती दिवसापासून तुझी इच्छा आहे."

हे ऐकून निद्रादेवाला संतोष झाला, व त्याने उत्तर दिले, "मग स्तिकस नदीच्या भयानक प्रवाहाची शपथ घेऊन तसे वचन मला दे; एक हात उदार पृथ्वीवर ठेव व दुसरा चकाकत्या समुद्रावर, म्हणजे खाली वास करणारे सॅटर्नसह सर्व देव आपले साक्षी राहतील; आणि तू खरोखरच सर्वात तरूण कलादेवतांपैकी एक, पॅसिथिआ मला देशील याची खबरदारी घे—जिच्याशी लग्न करायची मला किती दिवसापासून इच्छा होती, ती पॅसिथिआ."

त्याने म्हटल्याप्रमाणे ज्यूनोने केले; तिने शपथ घेतली व अधोलोकीच्या तायतन्सनामक सर्व देवांना साक्षीस आवाहन केले. तिने शपथ पूर्ण केल्यानंतर उभयतांनी दाट धुक्यात स्वतःला गुरफटून घेऊन लेम्नॉस व इम्ब्रस मागे टाकून वेगाने पण सहजगत्यापुढे मार्गक्रमण केले. लौकरच विपुल निर्झर व वन्य-पशुमाता इदा-पर्वत राजीप्रत व लेक्तमपाशी ती दोघे पोहोचली, आणि तेथे समुद्र सोडून भूमीवरून जाऊ लागली तेव्हा वनवृक्षांच्या माथ्यांनी त्यांच्या पायांखाली सौम्य सळसळ स्वर केला. येथे निद्रादेव थांबला व जव्हच्या नजरेस पडण्याच्या आत, संबंध इदापर्वतावरील आकाशात सर्वात उंच डोके काढणाऱ्या पाईन वृक्षावर चढला. फांद्यांमागे लपून, देव ज्याला कॅल्सिस पण मानव सिमिदिस म्हणतात त्या पर्वत संचारी मधुरस्वर गायकपक्ष्याचे रुप घेऊन तो बसला. मग ज्यूनो गॅरगॅरस या इदाच्या सर्वोच्च शिखरावर गेली व मेघनियन्ता जव्ह याची दृष्टि तिच्यावर गेली. तिला पहाताच तिच्या-सह पहिली आलिंगने उपभोगताना, व प्रिय मात्यापित्यांना काही कळू न देता परस्परांशी रममाण होताना जी तीव्र कामवासना त्यांच्यात प्रादुर्भूत झाली होती त्याच वासनेने तो आता पेटून उठला. तिच्याजवळ जाऊन त्याने विचारले, "ऑलिम्पसहून इकडे व तीही रथ किंवा घोडे यांचे वाहन न वापरता, तू काय इच्छा मनात बाळगून आली आहेस ?"

मग ज्यूनोने त्याला एक खोटी हकीकत बनवून सांगितली. ती म्हणाली, "ज्याच्यापासून सर्व देवांचा उगम होतो त्या ओशिॲनसकडे व माता थेटिसकडे पृथ्वीच्या अंतिम सीमेवर मी जाते आहे. त्यांनी मला घरात ठेवून घेतली, माझा सांभाळ केला, व मला लहानाची मोठी केली; त्यांच्यामध्ये समेट करून

द्यायला मला जाऊन त्यांना भेटले पाहिजे; त्यांच्यात भांडणे चालली आहेत व दोघे परस्परावर इतकी रागावली आहेत की दीर्घकालावधीत त्यांची एकशय्या झालेली नाही. मला भूमी व समुद्रावरून घेऊन धावत जाऊ शकले असते ते घोडे बहुनिर्झरा इदाच्या सर्वात खालच्या फाटचांवर ठेवले आहेत, आणि मी मुद्दाम ऑलिम्पसहून तुझा विचार घेण्यासाठी आले आहे. तुला न कळवता ओशिअॅनसच्या घरी गेले असते तर मागाहून तू माझ्यावर रागावशील अशी मला भीति वाटली."

आणि जव्ह म्हणाला, "ज्यूनो, ओशिअॅनसला भेट देण्यास तुला दुसरी वेळ निवडता येईल—तूर्त आपण प्रणयक्रीडेत मग्न होऊ या, व परस्परांचा उपभोग घेऊ या. याक्षणी मी तुझ्यासाठी जितका कामाक्रान्त झालो आहे तितका कुठल्याही देवीसाठी वा मानवी स्त्रीसाठी अजूनपर्यन्त कधीही झालो नव्हतो. जेव्हा इक्सिऑन-पत्नीसाठी प्रेमाकुल होऊन मी तिच्या उदरी मंत्रणेत देवतुल्य अशा पिरिथोउसचा गर्भसंभव केला तेव्हा, किंवा नाजुक घोटचांची अॅक्रिसिअस कन्या दॅनाइ हिच्यावर मोहित होऊन तिच्याठिकाणी विख्यात वीर पर्सिअस याचा गर्भसंभव झाला तेव्हाही किंवा नंतर फीनिक्स-कन्येला माझ्यापासून मिनॉस व ऱ्हॅडॅमॅन्थस हे पुत्र झाले तेव्हा; मग सेमिली व मग थिब्ज्मधली अल्कमिना, जिला माझा सिंहहृदयपुत्र हर्क्युलिझ झाला; सेमिली मानव जातीला दिलासा देणाऱ्या बॅक्कसची माता झाली; शिवाय राणी सेरिझ होती, तशीच रुपवती लेतो आणि आता तू—पण आता तुझ्यावर झालो आहे तितका आसक्त त्यांच्यापैकी कोणावरही मी कधीच झालो नव्हतो."

उत्तरार्थी ज्यूनोने पुन्हा त्याला एक असत्य सबब सांगितली, "महाभयंकारी सॅटर्नपुत्रा", ती उद्गारली, "तू काय म्हणतो आहेस? जेथे अजिबात आडोसा नाही अशा या इदा पर्वताच्या माथ्यावर आपण परस्परांचा उपभोग घ्यावा असे तुझे म्हणणे आहे की काय? अमर देवांपैकी एकाद्याने आपल्याला एकशय्या करताना पाहून दुसऱ्यांना सांगितले तर? मग लोक निंदेचा असा गदारोळ उठेल की तुझ्या आलिंगनामधून मुक्त झाल्यानंतर पुन्हा तुझ्या घरात कोणाच्या दृष्टीस पडण्याची सोय मला राहणार नाही; पण तुझी तशी इच्छाच असेल तर तुझ्या पुत्राने माझ्यासाठी तयार केलेला एक महाल आहे व त्याला चांगले भक्कम दरवाजे बसवले आहेत; तुला हवे असेल तर आपण तेथे जाऊन शय्येचा आश्रय करू या."

आणि जव्हने उत्तर केले, "ज्यूनो, देव किंवा दानव तुला पाहील ही धास्ती तुला नको, कारण मी आपल्या दोघांभोवती दाट सोनेरी ढगाचे असे काही

आवरण घालीन की प्रत्यक्ष सूर्य देखील त्याच्या दीप्तिमान, भेदक किरणांनी सुद्धा त्या ढगातून आरपार पाहू शकणार नाही."

असे बोलून सॅटर्नपुत्राने आपल्या भार्येला मिठीत धरले, तेव्हा भूमीतून कोवळ्या गवताचे अंकुर फुटून त्यांच्यासाठी मृदुशय्या तयार झाली, तिच्यावर चकाकत्या दवबिंदूंनी नटलेली कमळे, क्रॉकस व हायसिंथची फुले होती. आणि ती इतकी जाड व मऊ होती की त्या शय्येने भूमीपासून बऱ्याच वर त्या दोघाना उचलून धरले. येथे दोघे पहुडली व वरून ज्याच्यातून लकाकते दवबिंदू पडत आहेत अशा सुंदर सोनेरी ढगाने त्यांना आवरण घातले.

तेव्हा याप्रमाणे सर्व वस्तुमात्रांचा जनक इदाच्या शिखरावर शांतपणे विश्राम घेता झाला; झोपेने व प्रीतीने त्याला तात्काल आक्रान्त केले होते, व त्याच्या बाहुपाशात त्याने आपली पत्नी कवटाळली. दरम्यान निद्रादेवाने ॲकिअन्सच्या नौकांकडे पृथ्वीपरिवेष्टा भूकन्याधिपती नेपच्यून याला सर्व वृत्तान्त सांगण्यासाठी प्रयाण केले. तो भेटताच निद्रादेव त्याला म्हणाला, "नेपच्यून, आता तुला अगदी मनःपूर्वक डॅनाअन्सना साह्य करता येईल, व थोड्या वेळापुरता का होईना, जव्ह झोपला आहे तोपर्यन्त तरी, त्यांना विजय मिळवून देता येईल. मी त्याला गोड निद्रा आणली आहे व ज्यूनोने नादी लावून त्याला स्वतःशी एकशय्या करण्यास प्रवृत्त केले आहे."

आता निद्रादेव गेला व मानवजातीत इतस्ततः संचार करीत आपले काम करू लागला; मागे राहिलेला नेपच्यून डॅनाअन्सना मदत करण्यास पूर्वीपेक्षाही उत्सुक झाला व तीरासारखा पुढच्या श्रेणीत जाऊन ओरडला, "आर्गाइव्हज् हो, आमच्या नौका जिंकून कीर्तिमंडित होण्याचे यश आपण प्राॲमपुत्र हेक्तरला मिळू देणार आहोत काय? ॲकिलिझ अजूनही रुष्ट होऊन आपल्या नौकांवर आहे हे पाहून हेक्तरने तसे करण्याचा संकल्प उच्चारला आहे. ॲकिलिझशिवाय आपले अगदी ठीक चालेल—मात्र आपण एकमेकांना धीर देऊन आधार देत राहिले पाहिजे. म्हणून आता मी म्हणतो तसे आपण सारे करू या.

आपल्याला मिळेल ती सर्वात उत्तम व मोठ्यात मोठी ढाल प्रत्येक जण घेऊ, आपापली शिरस्त्राणे चढवू आणि आपले सर्वात लांब भाले हाती धरून एकदम बाहेर पडू; मी तुमच्या अग्रभागी राहीन व प्राॲमपुत्र हेक्तर कितीही चरफडला तरी आपल्या विरुद्ध यशस्वी प्रतिकार करण्यास धजणार नाही. जर कुणा भल्या खंबीर सैनिकापाशी लहानशीच ढाल असली तर ती त्याने आपल्यापेक्षा कमी युद्ध कुशल माणसाला द्यावी व स्वतःसाठी मोठी ढाल घ्यावी."

याप्रमाणे तो बोलला व त्यांनी तो म्हणाला तसेच केले. तायदिअसपुत्र, युलिसिस व अॅगॅमेम्नॉन जरी जखमी झाले होते तरीही त्यांनी इतरांची व्यवस्थित रचना केली आणि शस्त्रास्त्रांची अदलाबदल घडवून आणण्यासाठी ते सर्वत्र फिरले; सर्वात शूर असले त्यांनी सर्वोत्तम शस्त्रास्त्रे घेतली व कमी प्रतीची शस्त्रे नैपुण्यात कमी असलेल्या लढवैय्यांना दिली. ब्राँझची चिलखते चढवून झाल्यानंतर अग्रभागी असलेल्या नेपच्यूनच्या मागून त्यांनी प्रगमन केले. त्याने आपल्या बलवान मुठीत तीक्ष्ण धारेचे व विजेसारखे तळपणारे भीषण खड्ग धरले होते; लढाईच्या चकमकीत त्या खड्गाच्या मार्गात येणाऱ्याचे दुर्दैवच ओढवायचे! त्याच्या भीतीने थरथर कापत सर्व लोक त्यापासून दूरचे राहात.

दुसऱ्या बाजूस हेक्तरने त्रोजन्सची व्यवस्थित रचना केली. त्यानंतर नेपच्यून व हेक्तर यांनी एकमेकांशी घोर युद्ध केले–त्रोजन्सच्या पक्षाकडून हेक्तरने व आर्गाइव्हजच्या पक्षाकडून नेपच्यूनने लढा दिला. उभय दले भिडली तेव्हा प्रचंड हलकल्लोळ झाला. समुद्राच्या लाटा अॅकिअन्सच्या नौकांकडे व तंबूकडे पुढे पुढे घरंगळत येत राहिल्या. पण एकमेकांवर उडी घेणाऱ्या त्रोजन्स व अॅकिअन्सनी ज्या प्रचंड आरोळ्या मारल्या त्यांच्याहून बोरिआसच्या प्रचंड झोतांनी ढकललेल्या जाणाऱ्या लाटा काही किनाऱ्यावर अधिक मोठ्याने गर्जत नाहीत. किंवा डोंगरावर पुरत्या पेटलेल्या वणव्याच्या ज्वाळा काही जास्त भीषणपणे गुरगुरत नाहीत, अथवा पराकाष्ठेने सोसाटणारा वाराही ओक वृक्षांच्या शेंड्यांमधून उच्छाद करीत जातानाही अधिक रानटी स्वरात डरकाळ्या फोडीत नाही!

प्रथम हेक्तरने त्याच्याकडे संपूर्ण वळलेल्या अॅजॅक्सवर भाला मारला व त्याचा नेम चुकला नाही; पण अॅजॅक्सच्या छातीवर जेथे ढालीचा पट्टा व चांदीने जडवलेल्या तलवारीचा पट्टा एकावर एक आले होते तेथे भाला बसून त्याचा देह बचावला, आपली भाला फेक अशी फुकट गेलेली पाहून हेक्तर संतापला व आपल्या लोकांच्या आडोशाने मागे झाला; तो असा माघार घेत असता, लढणाऱ्या लोकांच्या पायाखाली पडलेल्या पुष्कळशा दगडातला–किनाऱ्यावर ओढून ठेवलेल्या नौकांना टेकणे देण्यासाठी ते दगड आणलेले होते, त्यातलाच एक उचलून तेलॅमॉनपुत्र अॅजॅक्सने हेक्तरच्या ढालीच्या कडेच्या वरती त्याच्या मानेपाशी तो मारला; त्या आघाताने हेक्तर भोवऱ्यासारखा वाटोळा फिरला व सर्व दिशांना झोकांड्या खाऊ लागला. तात जव्हच्या विद्युत्क्षेपाने उन्मळून एकादा ओकवृक्ष जसा एकदम कोसळून आडवा होतो व गंधकाचा भयंकर दर्प सुटतो–एकादा मनुष्य जवळ उभा असला तर त्याची त्रेधा उडल्याखेरीज राहात

नाही, कारण वीज पडणे ही एक मोठी भीषण घटना असते—अगदी तसाच हेक्तर भूमीवर पडून त्याच्या तोंडात धूळ गेली; त्याचा भाला हातातून पडला पण ढाल व शिरस्त्राण मात्र अंगावर पक्की बांधलेली होती; पडताना त्याच्या ब्रॉझच्या चिलखताचा त्याच्याभोवती खणखणाट झाला.

ॲकिअन्सपुत्र मोठा ओरडा करीत त्याच्याकडे धावत आले; त्याला ओढून नेण्याची त्यांना उमेद होती आणि त्यांनी आपल्या शूलाग्रांचा त्रोजन्सवर वर्षाव केला, पण त्यांच्यापैकी कोणीही त्याला जखमी करू शकले नाही. कारण अगोदरच पॉलिदॅमाज, ईनिआस व ॲगेनॉर या राजपुत्रांनी तसेच लिसिअन्सचा प्रमुख सार्पेदॉन व थोर ग्लॉकस यांनी त्याला घेरून झाकून टाकले होते; इतरांपैकीही कोणाचे त्याच्याकडे दुर्लक्ष झाले नव्हते, आणि ते सर्वजण संरक्षणासाठी आपल्या गोल ढाली त्याच्यावर धरीत होते. मग त्याच्या सोबत्यांनी भूमीवरून उचलून त्याला वाहून लढाईतून दूर, जेथे रथ व सारथ्यासह त्याचे घोडे त्याच्यासाठी उभे होते तेथे मागच्याबाजूस नेले; विव्हळत व वेदना भोगीत असलेल्या अवस्थेत त्याला मग सारथ्याने रथातून नगरीकडे नेले; अमर जव्हपासून उत्पन्न झालेल्या झांथसच्या सुंदर प्रवाहावरील उतारापाशी पोहोचल्यावर लोकांनी त्याला रथावरून काढून भूमीवर निजवले व त्याच्या अंगावर पाणी ओतले; पाण्याचा स्पर्श होताच तो पुन्हा श्वासोच्छ्वास करू लागला व त्याने डोळे उघडले, मग उठून गुडघे टेकून बसून तो रक्त ओकला, पण पुन्हा मागे भूमीवर पडला, व पुन्हा अंधेरी येऊन त्याने डोळे मिटले, कारण दगडाच्या घावाने तो अजूनही जडबधिरच झालेला होता.

हेक्तर रणांगण सोडून जात असलेला आर्गाइव्हजनी जेव्हा पाहिला तेव्हा त्यांना हुरुप आला व अधिकच त्वेषाने ते त्रोजन्सवर तुटून पडले. शीघ्रगति ऑइलिअसपुत्र ॲजॅक्सने एनॉप्सपुत्र सॅत्निअसवर झेप घेऊन त्याला भाल्याने जखम करून लढचाला सुरवात केली. सॅलिओइस नदीकाठी एनॉप्स गुरे वळीत असता एका सुंदर जलअप्सरेला त्याच्यापासून हा सॅत्निअस झाला होता. त्याच्यापाशी येऊन ऑइलिअसपुत्राने कुशीत वार करून त्याला लोळवले, आणि त्याच्या देहाभोवती त्रोजन्स व दॅनाअन्स यांच्यामध्ये घनघोर लढाई भडकली. त्याच्यावर झालेल्या हल्ल्याचा सूड घेण्यासाठी पॅन्थॉउसपुत्र पॉलिदॅमाज जवळ आला व त्याने ॲरेलिकसपुत्र प्रोथोइनॉर याला उजव्या खांद्यावर जखमी केले; तो भयंकर भाला त्याच्या खांद्यातून आरपार गेला व धुळीत पडताना त्याने पंजांनी भूमीचा आधार घेण्याचा प्रयत्न केला. त्याच्या देहावर ठाण मांडून पॉलिदॅमाजने उच्च रवाने प्रौढी मिरविली, "पॅन्थॉउसपुत्राच्या मजबूत हाताने

फेकलेला भाला व्यर्थ गेला नाही म्हणायचा. एका आर्गाइव्हने आपल्या देहात त्याला आश्रय दिला आहे व खाली हेदिझच्यागृही जाताना तो भाला त्याला टेकण्याच्या काठीसारखा कामी येईल."

या वढाईने आर्गाइव्हज् रागाने वेडे झाले. तेलॅमॉनपुत्र ॲजॅक्स दुसऱ्या कोणापेक्षाही जास्त रागावला, कारण प्रोथोइनॉर त्याच्या अगदी जवळ पडला होता; तेव्हा माघार घेत असलेल्या पॉलिडॅमाजवर नेम धरून त्याने भाला मारला, पण पॉलिडॅमाजने बाजूला झुकून आपला जीव बचावला व भाला ॲन्तेनॉरपुत्र आर्केलॉकसवर बसला, कारण स्वर्गस्थ देवांनी त्याचा नाश चिंतिला होता; मानेतून डोके वर निघते तेथे कण्याच्या सर्वात वरच्या सांध्यात तो भाला लागून माने मागचे दोन्ही स्नायू त्याने तोडले आणि तंगड्यांच्या व गुडघ्यांचाही आधी आर्केलॉकसचे शिर, तोंड नी नाकपुड्या भूमीवर पोहोचल्या. पॉलिडॅमाजला ॲजॅक्स ओरडून म्हणाला, "विचार कर पॉलिडॅमाज, व मला खरे सांग की, प्रॉथॉइनार इतकाच या माणसाला मारून फायदा होण्याजोगा आहे की नाही; तो सधन व संपन्न कुटुंबातला दिसतो; कदाचित उमराव वीर ॲन्तेनॉरचा एकादा भाऊ किंवा मुलगा असावा; कारण हा दिसण्यात पुष्कळच त्याच्यासारखा आहे."

पण तो कोण होता हे त्याला पुरे ठाऊक होते आणि त्रोजन्सना त्याच्या वधामुळे फार क्रोध आला. मग ॲकॅमाज भावाच्या देहावर दोन्ही बाजूस पाय ठेवून उभा राहिला व त्याने तो देह ओढून नेण्याच्या प्रयत्नात असलेल्या प्रोमॅकस या विओशिअनाला भाल्याने जखमी केले. मग त्याच्या देहाशी उभा राहून मोठ्या आवाजात फुशारकी मारीत तो म्हणाला, "आरगॉस धनुर्धरांनो, तुम्ही कितीही वढाई मारलीत तरी लक्षात ठेवा केवळ आम्हालाच कष्ट व पीडा भोगाव्या लागणार आहेत असे नाही तर आमच्यासारखेच तुमच्यापकीही काहीजण येथे धारातीर्थी पडतील. प्रोमॅकस पहा कसा माझ्या भाल्याने पराभूत होऊन चिरनिद्रा घेत आहे. माझ्या भावाच्या रक्ताचे मोल मिळण्यास फार विलंब लागला नाही; म्हणून माणूस रणक्षेत्री पडला तर त्याबद्दल सूड उगवण्यासाठी घरात एखादा भाऊ बंद मागे असला तर त्याने त्याबद्दल धन्यता मानणे योग्यच होय."

त्याच्या टोमण्यांनी आर्गाइव्हज्ना चीड आली व दुसऱ्या कोणापेक्षा पेनेलिऑस विशेषच क्रुद्ध झाला. त्याने ॲकॅमाजवर उडी घेतली, पण ॲकॅमाज आपल्या जागेवर राहिलाच नाही; पण पेनेलिआसने फॉर्बासपुत्र इलिऑनिअसला ठार मारले; फॉर्बास एक सधन, मेंढ्यांच्या कळपांचा धनी होता, त्याला मर्क्युरीने

अनुग्रहीत करून दुसऱ्या कोणाही त्रोजनापेक्षा अधिक संपत्ती दिली होती. इलिऑनिअस हा त्याचा एकुलता एकपुत्र होता, व आता त्याला पेनेलिऑसने भुवईखाली जखमी करून त्याच्या डोळ्याचे बुब्बुळ खोबणीतून फाडून काढले; भाला डोळ्यातून आरपार जाऊन मानेच्या बुंध्यात घुसला, आणि दोन्ही हात पुढे पसरून तो खाली पडला. मग पेनेलिऑसने तलवार उपसून त्याच्या मानेवर वार केला, त्यामुळे शिर व शिरस्त्राण दोन्ही गडगडत डोळ्यात गेलेल्या भाल्यासह खाली भूमीवर आली. मग त्याने पॉपीच्या शेंगेसारखे ते मुंडके उंच धरून त्रोजन्सना दाखविले व ओरडून त्यांच्यापुढे प्रौढी मिरविली, "त्रोजन्सहो, उच्चकुलीन इलिऑनिअसच्या मातापित्यांना त्याच्यासाठी घरात शोक मनवायला सांगा, कारण आम्ही आर्गाइव्हज् जेव्हा त्रॉयहून नौकांसह परत जाऊ, तेव्हा अॅलेगॅनॉरपुत्र प्रोमॅकसच्या पत्नीला तिच्या प्रिय पतीच्या आगमनाने आनंदित होण्याची कधीच वेळ येणार नाही."

तो बोलत असता त्याना भीतीने ग्रासले व प्रत्येक मनुष्य सुरक्षिततेसाठी कोठे पळावे हे पाहण्यास आजूबाजूला पाहू लागला.

हे ऑलिम्पसनिवासिनी कलादेवताहो, आता मला सांगा की भूकम्पाधिपती नेपच्यूनने युद्धाची बाजी उलटविल्यानंतर रक्तलांछित लूट घेऊन जाणारा आर्गाइव्हजपैकी पहिला कोण होता? एकनिष्ठ मिसिअन्सचा नायक गिर्तिअस-पुत्र हिर्तिअस याला जखमी करणारा तेलॅमॉनपुत्र अॅजॅक्स हा पहिला होता. अॅन्तिलॉकसने फॅल्सिझ व मेमेरस यांना मारले तर मेरिऑनिझने मोरिझ व हिप्पोशन यांचे जीव घेतले. त्यूसरनेही प्रॉथोउन व पेरिफेतिझ यांची वाट लावली. मग अॅत्रिअसपुत्राने स्वप्रजापालक हायपरेनॉरला कुशीत जखम केली व ब्राँझचे अग्र आत फाडीत गेल्याने कोथळा उसळत बाहेर आला. त्यामुळे जिथे जखम झाली होती त्या ठिकाणातूनच त्याचे प्राण त्वरेने बाहेर पडले व त्याचे डोळे मृत्यूच्या काळोखात मिटले. दुसऱ्या कोणापेक्षाही ऑइलिअसपुत्र अॅजॅक्सने अधिक लोक मारले, कारण जव्हने शत्रुसेनेत भयप्रसार केल्यावर पळून जाणाऱ्यांचा पाठलाग करण्यात त्याच्याइतका वेगवान पुरुष दुसरा कोणी नव्हता.



## सर्ग १५

पण जेव्हा पळून जाणारे ट्रोजन खंदकाच्या व त्यात पुरलेल्या शूळांच्या पलीकडे गेले व बरेचसे दॅनाअनांच्या हातून मारले गेले, तेव्हा उरलेले पराभूत व भयम्लान स्थितीत आपल्या रथांपाशी पोहोचल्यावर थांबले. आता इदाच्या शिखरांवर जव्ह जागा झाला, तेथे सुवर्णसिंहासना ज्यूनोसह तो पहुडला होता; तो उठून उभा राहून पाहतो तो ट्रोजनांमध्ये घाबरगुंडी उडालेली व त्यांना सैरावैरा पिटाळून लावीत असलेल्या अॅकिअनांमध्ये राजा नेपच्यून, हे दृश्य त्याला दिसले. त्याला सोबत्यांच्या घोळक्यात भूमीवर पडलेला हेक्तरही दिसला; तो कष्टाने श्वास घेत होता, त्याला शुद्धबुद्ध नव्हती व तो रक्त ओकीत होता; कारण त्याच्यावर दगडाचा प्रहार करणारा काही सर्वात दुबळा असलेला अॅकिअन नव्हता!

देवा-मानवांच्या जनकाला त्याची करूणा आली व त्याने उग्रदृष्टीने ज्यूनोकडे पाहिले. तो म्हणाला, "ज्यूनो, खोडसाळ वंचके, मला स्पष्ट दिसत आहे की, तू हेक्तरला चलाखीने युद्धातून बाहेर काढून त्याच्या सेनेची दाणादाण करविली आहेस. तुला चोप द्यावासा मला वाटत आहे, म्हणजे तुझ्या नीच कपटाचे फळ प्रथम तूच भोगशील. एकेकाळी तुला मी टांगून ठेवली होती त्याची तुला आठवण नाही का? तुझ्या पायांना दोन ऐरणी बांधून, कुणालाही तोडता येणार नाही अशा सोन्याच्या साखळीने तुझे हात जखडून टाकून ढगांच्यामध्ये हवेत तुला अधांतरी लटकत ठेवली होती. ऑलिम्पसमधले सारे देव प्रक्षुब्ध झाले होते, पण तुला सोडवायला तुझ्यापर्यन्त त्यांना पोहोचता येत नव्हते. त्यांच्यापैकी कोणी माझ्या तावडीत सापडला की, त्याला पकडून स्वर्गाच्या उंबरठ्यावरून मी त्याला भिरकावून देत होतो, व तो बेभान होऊन खाली पृथ्वीवर पडत होता; तरीही ज्या उदात्त हर्क्युलिझला तू व बोरिआसने मिळून वादळांना लाच देऊन दुष्टपणे समुद्रांपलीकडे कॉसला नेले होतेत, त्याच्यासाठी सतत वाटणाऱ्या चिंतेपासून माझे मन मुक्त झाले नाही; पण मी त्याला सोडवले आणि प्रचण्ड वीरकृत्ये करणारा असा तो असूनही मीच त्याला पुन्हा आरगॉसला परत आणले. मी ही आठवण तुला यासाठी करून देत आहे की तू असा कपटीपणा यापुढे सोडून देण्यास शिकावेस, व जी प्रेमालिंगने

देऊन मला ठकवण्यास तू येथे आली आहेस त्यातून तुला कितपत लभ्यांश होऊ शकेल ते तुला कळावे."

तो बोलत असता ज्यूनो चळचळा कापू लागली आणि म्हणाली, "वरचा स्वर्ग व खालची पृथ्वी माझे साक्षी असोत, तसेच स्तिक्स नदीचे जलप्रवाह ही—आणि धन्य देव घेऊ शकतात अशी सर्वात गंभीर शपथ ही आहे—नव्हे, मी तुझ्या स्वतःच्या सर्वशक्तिमान मस्तकाची व आपल्या प्रथमसंगम-शय्येची ही—ज्या गोष्टींवरून मला कधीही खोटी शपथ घेणे शक्य नाही—शपथ घेते की माझ्या कुठल्याही कारवाईमुळे नेपच्यून हेक्तरला व त्रोजन्सला शिक्षा व अँकिअनांना मदत करायला प्रवृत्त झालेला नाही; अँकिअन्स त्यांच्या नौकांपाशी अगदी जेरीस आलेले पाहिल्याने वाईट वाटून फक्त स्वतःच्या हेलावण्यानेच त्याने हे सारे केले आहे. मी जर त्याला मंत्रणा देत असते तर तू सांगितल्याप्रमाणेच करण्यास त्याला सुचवले असते."

देवा-मानवांचा जनक स्मित करून उत्तरला, "देवसभेत आपण मसलती-साठी बसतो तेव्हा, ज्यूनो, तू जर मला नेहमी पाठिंबा दिलास तर, नेपच्यूनला, आवडो वा न आवडो, लौकरच तुझ्या माझ्या विचाराशी सहमत व्हावे लागेल. मग जर तू खरे बोलत असशील व तेही मनापासून, तर सर्व सामान्य देवांमध्ये जा, व आयरिसला व धनुर्विद्यास्वामी अँपॉलोला सांग की माझे त्यांच्याशी काम आहे—आयरिसला म्हणावे की तिने अँकिअन सेनेत जाऊन नेपच्यूनला लढाई सोडून स्वगृही जाण्यास सांगावे, व अँपॉलोला कळव की त्याने हेक्तरला पुन्हा युद्धात लढायला पाठवून त्याला नवशक्ती द्यावी; म्हणजे तो सध्या स्वतःला होत असलेल्या वेदना विसरून अँकिअनाना गोंधळ घोटाळ्यात परत हटवीत, ते पेलिअसपुत्र अँकिलिझच्या नौकांपाशी येऊन पडतील असे करील. मग अँकिलिझ आपला सोबती पॅत्रोक्लस याला लढण्यास पाठवील, व त्याने अनेक योद्धे, व त्यांतच माझा स्वतःचा उदात्त पुत्र सार्पेदॉन यांना मारल्यानंतर इलिअमसमोर हेक्तर त्याचा प्राण घेईल. पॅत्रोक्लसच्या मरणाचा सूड घेण्या-साठी अँकिलिझ हेक्तरचा वध करील, आणि त्यावेळेपासून मी असे घडवून आणीन की अँकिअन्स चिकाटीने त्रोजन्सना मागे रेटीत नेतील—अखेर मिनर्व्हाची मसलत फलद्रूप करून ते इलिअम जिंकतील. पण जोपर्यंत पेलिअसपुत्राची इच्छा मी पूर्ण केली नाही, तोपर्यंत मी माझा राग सोडणार नाही किंवा कोणाही देवाला दॅनाअन्सना साह्य करू देणार नाही; कारण ज्या दिवशी थेतिसने माझ्या गुडघ्यांना स्पर्श करून तिच्या पुत्राला यशाचा मान मिळावा अशी याचना केली, त्या दिवशी मी मान झुकवून तिला तसे अभिवचन दिले आहे."

त्याच्या म्हणण्याला मान देऊन ज्यूनो उत्तुंग इदावरून महान ऑलिम्पसला गेली; ज्याची कल्पनाशक्ती त्याला विस्तीर्ण भूखंडावरून घेऊन जाते, व जो स्वत:शी म्हणतो, "आता मी येथे राहीन किंवा तेथेही," व जो सर्व प्रकारच्या गोष्टींचा लाभ करून घेऊ शकतो, अशा माणसाच्या चित्ताच्या वेगाने उड्डाण करीत ज्यूनो उत्तुंग ऑलिम्पसला आली, व जव्हच्या प्रासादात गोळा झालेल्या देवांमध्ये गेली. त्यांनी जेव्हा तिला पाहिले तेव्हा सगळे तिच्यापाशी आले व अभिवादनार्थ त्यांनी आपले पेले तिच्या पुढे केले,. तिने इतरांना सोडून सुंदर थेमिसने पुढे केलेला पेला घेतला, कारण तीच धावत प्रथम देवराज्ञीकडे आली होती. तिने विचारले, "ज्यूनो, तू येथे का आली आहेस? व तू सचिंत दिसतेस–तुझा पती सॅटर्नपुत्र याने तुला भिवविले आहे की काय?"

आणि ज्यूनोने उत्तर दिले, "थेमीस, त्याबद्दल काही विचारु नकोस; माझ्या पतीचा स्वभाव किती अहंकारी नी निर्दय आहे ते तुला माहीतच आहे. देवांना मेजापाशी आणून बसव; माझ्या पतीने कोणत्या दुष्ट योजना नक्की केल्या आहेत ते तेथे तुला व सर्व अमरांना ऐकता येईल; जरी आता सर्व कितीही शांतपणे भोजनोत्सव करीत असले तरी मर्त्य नी अमर, अनेकजण त्या ऐकल्यावर रागावतील."

असे म्हणून ज्यूनो खाली बसली व जव्हच्या साऱ्या निवासात देव अस्वस्थ झाले. तिच्या ओठावर स्मित विहरत होते पण कपाळाला चिंतेच्या आठ्या पडल्या होत्या, व ती रागाने उद्गारली, "जव्हवर असे खुळेपणाने रागावणारे आपण मूर्खच आहोत; त्याच्याकडे जाऊन त्याला बळाने किंवा विनवणीने अडविण्याची आपण इच्छा करीत राहतो; पण तो अलिप्त असा बसून कोणाचीही क्षिती बाळगीत नाही; कारण दुसऱ्या कोणाही अमरापेक्षा आपण पुष्कळच जास्त बलवान आहोत हे त्याला माहीत आहे. तेव्हा तुमच्यापैकी प्रत्येकाकडे जी काही अनिष्टे तो स्वेच्छेने धाडील त्यांच्यात समाधान मानून घ्या. मला वाटते मार्सला त्यांची चुणुक मिळालेलीच आहे–कारण त्याचा पुत्र ॲस्कॅलॅफस, ज्या मानवावर सर्वापेक्षा जास्त, उत्कटतेने त्याने माया केली व ज्याचा पिता आपण हे तो मान्य करतो, तो पुत्र लढाईत पडला आहे."

हे ऐकताच मार्सने आपल्या दोन बळकट मांड्यांवर तळहात आपटून रागाने म्हटले, "अहो तुम्ही स्वर्गनिवासी देवहो, तर मी ॲकिअन्सच्या नौकांपाशी जाऊन माझ्या पुत्राच्या मरणाचा सूड घेतला तर मला दोष देऊ नका; मग जरी त्याचा परिणाम जव्हने माझ्यावर विद्युत्क्षेप करून मला प्रेतांच्यामध्ये रक्तात व धुळीत लोळवण्यात झाला तरी चालेल."

असे बोलता बोलताच त्याने 'विप्लव' व 'पिछेहाट' हे आपले घोडे रथाला जोडण्यास आज्ञा दिली आणि दरम्यान आपले चिलखत चढवले. यावर देवांची सुरक्षितता धोक्यात आल्याच्या आशंकेने भयभीत झालेली मिनर्व्हा स्थानावरून त्वरित उठून चटकन बाहेर गेली नसती, तर इतर अमरांविरुद्ध आणखी जास्त उग्र व दुर्दम्य वैर भावनेने जव्ह खवळून उठला असता. तिने जाऊन मार्सच्या डोक्याचे शिरस्त्राण व पाठीची ढाल ओढून काढली, आणि त्याच्या दणकट हातातून ब्राँझचा भाला काढून घेऊन एका बाजूला ठेवला; मग ती त्याला म्हणाली, "मतिभ्रष्टा, तू आपल्यावर सत्यानाश ओढवून घेत आहेस; कान असून तुला ऐकू येत नाही अथवा सारा विवेक व समज घालवून बसला आहेस तू. ऑलिम्पिआवासी जव्हच्या संगतीतून थेट इकडे आल्यावर ज्यूनो काय म्हणाली ते तू ऐकले नाहीस का? आम्हा इतर सर्वांना अपार अपाय घडविल्यानंतर, सर्व प्रकारचे हाल स्वतः सोसून झाल्यावर, पीडित व दीन अशा अवस्थत आलिम्पसला परत आणला जावा अशी इच्छा आहे का तुला? जव्ह तात्काल ट्रोजन्स व अॅकिअन्सना मन मानील तसे वागायला सोडून देईल व आम्हाला शिक्षा करायला ऑलिम्पसला येईल, व अपराधी निरपराधी न पाहता एकामागून एकाला पंजात पकडून धरील. म्हणून पुत्राच्या मरणाबद्दलचा तुझा राग बाजूला ठेव. त्याच्याहून चांगले चांगले लोक किती तरी मारले गेले आहेत आधीच व नंतरही मरतील पुष्कळ, आणि कोणालाही सबंध कुटुंबातल्या प्रत्येकाचे काही रक्षण करता येत नाही."

असे बोलून तिने मार्सला त्याच्या स्थानावर परत नेले. दरम्यान ज्यूनोने अॅपॉलोला व देवदूती आयरिस यांना बाहेर बोलावले. त्यांना ती म्हणाली, "तुम्ही तात्काल इदा पर्वतावर जव्हकडे जावे अशी त्याची इच्छा आहे; तुम्ही त्याला भेटल्यानंतर तुम्हाला तो जसे सांगेल तसे तुम्ही करायचे आहे."

त्यानंतर त्यांना सोडून ज्यूनो आत येऊन पुन्हा स्वस्थानापन्न झाली, आणि आयरिस नी अॅपॉलो त्वरेने आपल्या मार्गाला लागले. जेव्हा ते निर्झरबहुला, वन्यपशुमाता इदा पर्वत राजीप्रत पोहोचले तेव्हा सर्वोच्च गॅरगॅरस शिखरावर बसलेला, मस्तकाभोवती मुकुटाप्रमाणे सुगंधी ढग वेढलेला असा जव्ह त्यांना दिसला. त्याच्या संमुख दोघे उभी राहिली व त्याच्या पत्नीने दिलेल्या आज्ञेचे पालन इतक्या सत्वर त्यांनी केले म्हणून त्यांच्यावर तो प्रसन्न झाला.

प्रथम तो आयरिसशी बोलला, "शीघ्रगती आयरिस, जा, व मी सांगतो ते नेपच्यून राजाला जसेच्या तसे निवेदन कर. त्याला म्हणावे लढणे सोडून

दे, आणि एकतर देवांच्या संगतीत संमीलित हो, नाही तर खाली समुद्रात जा. जर त्याने निरोपाकडे दुर्लक्ष केले व माझा आज्ञाभंग केला, तर मी आक्रमण केल्यास माझ्याविरुद्ध टिकून राहण्याइतका बलशाली तो आहे का याचा त्याने नीट विचार करावा. मी त्याच्यापेक्षा वडील व जास्त प्रबल आहे; तरीही इतर सर्व देव ज्याला भिऊन असतात त्या माझ्याबरोबरीने स्वत: उभा ठाकण्यास तो भीत नाही! ''

वायूप्रमाणे चपळ आयरिसने त्याची आज्ञा पाळली व थंड गारा किंवा हिमखंड ढगातून बोरिआसच्या प्रचंड झोताने जसे उडत जातात तशी ती आकाशमार्गे महान भूकम्पकारकापाशी आली. मग ती म्हणाली, '' हे कृष्णकेशा, पृथ्वीला मिठीत कवळून धरणाऱ्या राजा, जव्हकडून तुला एक संदेश घेऊन मी आले आहे. त्याचे सांगणे आहे की तू लढाई सोडून देऊन एकतर देवांच्या संगतीत सम्मीलित व्हावेस नाहीतर खाली समुद्रात जावेस; तथापि तू जर हे न मानता त्याची अवज्ञा केलीस, तर तो म्हणतो की खाली येथे येऊन तो तुझ्याशी युद्ध करील. त्याच्या तावडीत न सापडता तू दूर रहावेस अशी त्याची सूचना आहे; कारण तो वयाने वडील व तुझ्यापेक्षा पुष्कळच जास्त बलवान आहे, आणि तरीही ज्या त्याला इतर सर्व देव भिऊन वागतात त्याच्या बरोबरीने स्वतः उभा ठाकायला तू भीत नाहीस! ''

हे ऐकून नेपच्यूनला फार राग आला व तो म्हणाला, '' महान स्वर्गाशपथ! त्याच्याबरोबरीने मानार्ह मी असताना त्याने माझ्याविरुद्ध हिंसाचाराची दहशत घातली असेल, तर, कितीही बलवान असला, तरी तो करू शकेल त्याहून जास्त बडबडत आहे. ऱ्हिआला सॅटर्नपासून झालेले आम्ही तीन भाऊ-भाऊ होतो, जव्ह, मी व खालच्या जगाचा राजा हेदिझ. स्वर्ग व पृथ्वीचे तीन भाग करण्यात आले होते, आणि आम्हापैकी प्रत्येकाला समान भाग मिळायचा होता. जेव्हा आम्ही चिठ्ठ्या टाकल्या तेव्हा माझ्या वाट्याला समुद्रात कायम वास्तव्य आले; पृथ्वीखालच्या काळोखाचे राज्य हेदिझने घेतले, व वायु, आकाश व मेघ हा वाटा जव्हला मिळाला. पण पृथ्वी व महान ऑलिम्पस ही सर्व भावांची समाईक मालमत्ता आहे. म्हणून जव्हच्या इच्छेप्रमाणे मी चालणार नाही. तो कितीही प्रबळ असला तरी त्याने आपल्या तिसऱ्या वाट्यातच समाधान मानून रहावे; मी कोणी नगण्य असल्यासारखा माझ्या अंगावर हात टाकण्याचा धाक त्याने दाखवू नये. ज्यांना त्याच्या आज्ञा पाळल्याशिवाय गत्यंतरच नाही त्या त्याच्या पुत्रांसाठी व मुलींसाठी त्याने आपल्या बढाया राखून ठेवाव्या. ''

वायूप्रमाणे चपळ अशा आयरिसने विचारले, "नेपच्यून, हा मग्रूर व नमते घेण्यास तयार नसलेला निरोप खरोखरच का मी जाऊन जव्हला सांगायचा, की तू आपल्या उत्तराचा फेरविचार करणार आहेस? शहाणे लोक वाद-विवादाला तयार असतात व एरिनीझ् नेहमी जास्त वयाच्या व्यक्तींच्या पक्ष-पाती असतात."

नेपच्यूनने उत्तर दिले, "देवी आयरिस, तुझे बोलणे अगदी प्रसंगोचित आहे. दूतीने इतका विवेक दाखविणे ही योग्य गोष्ट आहे. तरीही कोणी आपल्या बरोबरीच्या व सारखेच विस्तृत साम्राज्य असणाऱ्या दुसऱ्याला असे संतापून दूषण द्यावे ही गोष्ट माझ्या काळजाला घरे पाडणारी आहे. तथापि आता मी रुष्ट झालो असलो तरी जरा नमते घेतो; या उप्पर एवढेच सांगतो आणि सांगतोय् ते अगदी पोटतिडिकेने की माझ्याप्रमाणेच लूट मिळवण्यात नेतृत्व करणारी मिनर्व्हा, ज्यूनो, मर्क्युरी व राजा व्हल्कन यांच्याही इच्छेला न जुमानता जर जव्हने दुरारोह इलिअमनगरीस बचावले, आणि ती जिंकून लुटण्याची महान विजयश्री ॲकिअन्सला लाभू दिली नाही, तर त्याने समजून असावे की तो आमचा दुराराध्य रोष ओढवून घेईल."

आता नेपच्यून रणक्षेत्र सोडून समुद्राखाली गेला व ॲकिअन्सना त्याची अनुपस्थिती तीव्रपणे जाणवली. मग जव्ह अॅपॉलोला म्हणाला, "प्रिय फीबस, हेक्तरकडे जा, कारण पृथ्वी आपल्या मिठीने वेढणारा नेपच्यून माझी कठोर अवकृपा टाळण्यासाठी आता समुद्राखाली गेला आहे. जर त्याने तसे केले नसते तर अधोलोकी सॅटर्नसह जे देव आहेत त्यांना आमच्यातील लढाईचा वृत्तांत ऐकण्याची पाळी आली असती; आपला राग आवरून माझ्या तावडी-बाहेर तो राहिला ही आम्हा दोघांच्याही दृष्टीने चांगली गोष्ट आहे, कारण नाही तर, त्याच्याशी झगडण्यात मला फार त्रास झाला असता. तेव्हा तुझी गोंडेदार ढाल घे व ती तिरिमिरीने हलव म्हणजे ॲकिअन वीर पार घाबरून जातील. शिवाय हे दूरवर शर मारणाऱ्या, शूर हेक्तरला तू आपल्या छत्रा-खाली घे आणि ॲकिअन्स त्यांच्या नौकांपर्यंत व हेलेस्पॉतपर्यंत पळून जातील अशा प्रकारची साहस कर्मे करण्यास त्याला उत्तेजित कर. त्यानंतर ॲकिअन्सना त्याच्या आपत्तीतून उसन्त कशी मिळेल याचा मी नीट विचार करीन."

ॲपॉलोने पित्याची आज्ञा पाळली व कपोतनाशक व सर्व पक्ष्यांत वेगवान अशा श्येनपक्षासारखा तो इदाच्या शिखरावरून उडून गेला. हेक्तर नुकताच शुद्धीवर आलेला व भूमीवर पडलेला नसून आता उठून बसलेला त्याला दिसला. भोवतालचे लोक हेक्तरने आता ओळखले आणि ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या

इच्छेने नवजीवन प्राप्त झालेल्या क्षणापासून त्याचा घाम व श्वासाची धाप थांबली होती. त्याच्याजवळ उभा राहून अ‍ॅपॉलो म्हणाला, "प्राअ‍ॅमपुत्रा हेक्तर, तू इतका क्लान्त का, आणि येथे इतरांपासून दूर का येऊन पडला आहेस? तुझ्यावर काही अरिष्ट ओढवले का?"

हेक्तरने क्षीण आवाजात उत्तर दिले, "आणि आता मला असे विचारणारे दयाळू श्रीमान, देवांपैकी कोण आहात आपण? आपल्याला माहीत नाही का की अ‍ॅकिअन्सच्या नौकांपाशी अ‍ॅजॅक्सच्या सोबत्यांचा संहार मी करीत असता त्याने माझ्या छातीवर दगड मारून लढाईतून निवृत्त होण्यास मला भाग पाडले? मला तर खात्रीच वाटली की आजच्याच दिवशी मी शेवटचा श्वास घेऊन खाली हेदिझच्या गृही जाणार."

मग राजा अ‍ॅपॉलो त्याला म्हणाला, "धीर धर, सॅटर्नपुत्राने एक प्रबल साह्यकर्ता तुझ्या बाजूला उभा राहून तुझे रक्षण करण्यास इदाहून धाडला आहे, तो म्हणजे मीच, सुवर्णखड्गधर फीबस अ‍ॅपॉलो, जो आजपर्यंत केवळ तुझाच नव्हे तर तुझ्या नगरीचाही पालक आहे. म्हणून आता तुझ्या सारख्यांना त्यांचे रथ मोठ्या समूहांनी नौकांकडे हाकून नेण्याची आज्ञा दे. त्यांचा मार्ग निष्कंटक करण्यास मी तुझ्या घोड्यांपुढे चालत जाईन व अ‍ॅकिअन्सना पळवून लावीन."

असे बोलत असता त्याने त्या स्वप्रजापालकाचे ठिकाणी महान बल निविष्ट केले, आणि तबेल्यातला पूर्ण पोसलेला घोडा बंध तोडून मैदानावरून ऐटीत दौडत नदीवर स्नानाच्या सवयीच्या जागी जसा जातो—तो मस्तीत डोके वर उडवतो, व घोड्या चरत असतात त्या कुरणाकडे शक्तीच्या दिमाखात भर-वेगाने जाताना त्याची आयाळ खांद्यावर ओघळते—अगदी तसाच हेक्तर, देवाचे बोलणे ऐकल्यावर सारथ्यांना पुढे पुढे जाण्यास उत्तेजन देऊन स्वत: पायांनी शक्य तेवढ्या वेगाने रणांगणाकडे धावला. शृंगधारी सांबराने किंवा रानबकऱ्याने, खडकाच्या किंवा झुडपांच्या जाळीच्या खाली आश्रय घेतल्यामुळे त्याच्यावर ग्रामीण शेतकऱ्यांनी शिकारी कुत्रे सोडले असूनही त्यांना तो सापडत नाही, पण मग ओहो! त्यांच्या आरोळ्यांनी उठलेला एक दाढीसारख्या आयाळीचा सिंह त्यांच्या वाटेत उभा राहतो, व मग त्यांना शिकारीत जसे स्वारस्य उरत नाही, तशीच स्थिती अ‍ॅकिअन्सची झाली; तलवारी व दोन्ही टोकांना अणकुचीदार टोके असलेले भाले चालवीत अजूनही ते समूहाने हल्ला चढवीत होते, पण हेक्तरला स्वत:च्या लोकात वावरताना जेव्हा त्यांनी पाहिले तेव्हा ते भ्याले, व त्यांच्या काळजांनी पार ठाव सोडला.

मग अँद्रिमॉनपुत्र थोऑस, इतोलिअनांचा नेता, निष्णात शस्त्रक्षेपक, हातघाईच्या लढाईतही चिकाटीचा व मतभेदांच्या प्रसंगी अजिंक्य असा वादविवादपटु, हा बोलू लागला. पूर्ण कळकळीनें व सदिच्छापूर्वक पुढील भाषण स्वकीयांना उद्देशून त्याने केले, ' अरे! स्वर्गाची आण, मी आता काय पाहात आहे? हा पुन्हा जिवंत झालेला, हा हेक्तरच नव्हे काय? तेलेमॉनपुत्र ॲजॅक्सने त्याला ठार केले अशी प्रत्येकाची खात्री होती, पण देवांपैकी कोणीतरी त्याला पुन्हा काळाच्या दाढेतून सोडवलेले दिसते. अगोदरच आम्हा दॅनाअनांपैकी पुष्कळसे त्याने मारले आहेत, व मला वाटते अजूनही तो पुष्कळ मारील; कारण ज्व्हचा वरदहस्त त्याच्यावर असला पाहिजे, अन्यथा युद्धाच्या पुरोभागी इतक्या आत्मविश्वासपूर्वक मिरवण्याची त्याची कधीच छाती होणार नाही. तेव्हा आता मी म्हणतो तसे आपण सारे करु या; आपल्या सैन्याच्या मुख्य भागाला नौकांकडे मागे हटण्याची आज्ञा देऊ, पण जे स्वत:ला सैन्याचे भूषण असे सर्वोत्तम लढवय्ये म्हणवणारे असतील त्यांनी जागीच दृढ राहून, हेक्तर आपल्या समीप आल्यावर आपल्या भाल्यांच्या टोकांनी त्याला अडवता येते की नाही ते पाहावे. मला वाटते की मग दॅनाअनांच्या भर गर्दीत घुसून हल्ला चढवण्याचा प्रयत्न करण्यापूर्वी तो सूज्ञपणे फेरविचार करील."

असे तो बोलला व त्याने सांगितल्याप्रमाणेच त्यांनी केले. ॲजॅक्स व आयदोमिनिअस राजाभोवतालचे सैनिक, शिवाय त्यूसर, मेरिऑनिझ व मार्सतुल्य मेगिझ यांचे अनुयायी, यांनी आपले सर्वोत्कृष्ट लोक गोळा केले आणि त्यांनी हेक्तर व त्रोजन्सशी लढाई चालू ठेवली व सैन्याचा मुख्य भाग ॲकिअनांच्या नौकांकडे मागे हटला.

अग्रभागी खंबीरपणे लांब टांगा टाकीत हेक्तर चालला असता त्रोजनांनी दाट समूहाने पुढे नेट लावला. हेक्तरपुढे खांद्याभोवती ढगाचे आवरण घेऊन फीबस ॲपॉलो जात होता. लोहकर्मकार व्हल्कनने मानवांच्या मनात भीति उत्पन्न करण्यासाठी ज्व्हला दिलेली एक केसाळ झालरीची भयानक ढाल त्याने उंच धरली होती; ती हातात घेऊन तो त्रोजनांचे नेतृत्व करीत होता. आरगॉसवासी एकजूट करून आपल्या जागी भक्कमपणे पाय रोवून राहिले. दोन्ही बाजूंनी रणगर्जना आकाशापर्यन्त उंच पोचल्या व धनुष्यांच्या दोरांपासून बाण सारखे उडत राहिले. अनेक भाले मजबूत हातांनी वेगान फेकले जाऊन अनेक शूर योद्धयांच्या देहात रुतले, तर काही भाले मानवाच्या चविष्ट मांसाचा आस्वाद घेऊन आकंठ रक्त पिण्यापूर्वीच अर्ध्या मार्गावर मध्येच भूमीवर पडले. तोपर्यन्त फीबस ॲपॉलोन आपली ढाल न हलवता, नि:शब्द धरली होती,

तोपर्यन्त उभय पक्षांच्या शस्त्रांचा उचित परिणाम होऊन लोक मरून पडत होते पण जेव्हा दॅनाअनांच्या थेटसमोर ती ढाल हलवून त्यान आपली प्रचंड रणगर्जना केली, तेव्हा त्यांचा धीर खचला व ते आपली पूर्वीची पराक्रमक्षमता विसरले. गुराखी जाग्यावर नसताना गुरांच्या तांड्यावर किंवा मेंढरांच्या कळपावर दोन वन्य पशू उडी घेतात तेव्हा जशी त्यांची अवस्था होते तशीच दॅनाअनांची असाहाय्य अवस्था झाली, कारण ॲपॉलोने त्यांना पार घाबरवून टाकले आणि हेक्तरला व त्रोजनांना यश मिळवून दिले.

मग लढाई जास्त विस्कळित झाली व जिथे साधेल तेथे लोकांनी एकमेकांना मारले. हेक्तरने बिओशिअनांचा नेता स्तिकिअस व मेनेस्थिअसचा मित्र व सोबती आर्सिसिलॉस या दोघांचे प्राण घेतले. ईनिआसने मेदॉन व आयॅसस यांना ठार केले; त्यातला पहिला ऑइलिअसचा अनौरस पुत्र व अॅजॅक्सचा भाऊ, पण तो स्वदेशापासून दूर फिलेसीत राहात असे, कारण त्याने त्याची सावत्र आई आइलिअस पत्नी इरिओपिस हिच्या एका नातगलाचा वध केला होता. आयॅसस हा बूकॉलॉसपुत्र स्फेलसचा मुलगा अॅथनिअनांचा नेता झाला होता. पॉलिदॅमाजने लढाईच्या आघाडीवर मेसिस्तिअस व पोलायतिझ एकिअस यांना मारले, तर अॅगेनॉरने क्लोनिअसला. सर्वात पुढच्या पळून जाणारातील दैऑकसला पॅरिसने पाठीमागून खांद्याच्या खालच्या भागात वार केला व भाल्याचे टोक त्याच्या देहातून आरपार गेले.

या वीरांची चिलखते जेते लुटून घेत असता अॅकिअन अस्ताव्यस्तपणे खंदका-कडे व त्यात रोवलेल्या अणुकुचीदार खांबांकडे पळत होते आणि ते अखेर त्यांच्या भिंतीच्या आत हाकलले गेले. मग हेक्तर त्रोजनांना उद्देशून ओरडला "नौकांकडे पुढे चला व लूट जागच्याजागी राहू द्या. जर मला कोणी मनुष्य नौकांपासून दूर, भिंतीच्या दुसऱ्या बाजूला मागे थांबून राहात असलेला दिसला तर त्याला मी ठार करवीन; त्याच्या नात्यातल्या स्त्री-पुरुषांना त्याचे अंत्य-संस्कार करण्यास मिळणार नाहीत; आमच्या नगरीसमोर कुत्री त्याच्या प्रेताचे फाडून तुकडे तुकडे करतील."

असे बोलताना त्याने आपल्या घोड्यांच्या खांद्यांवर चाबूक ओढला व सर्व श्रेणीतल्या त्रोजन्सना हाक दिली. त्रोजनांनी गगनभेदी घोषणा केली, व आपले घोडे त्याच्या घोड्यांच्या खांद्याना खांदे भिडवून दौडवले. फीबस अॅपॉलो त्यांच्या पुढे गेला व खोल खंदकाचे दोन्ही काठ लाथा मारून खंदकात पाडून त्याने एक मोठा रुंद पूल बनवला; माणूस आपली शक्ति अजमावून पाहताना भाला जितका दूर फेकतो तितक्या रुंदीचा तो पूल होता. आपली

दुर्दम्य ढाल घेऊन ॲपॉलो पुढे निघाला व त्याच्यामागून त्रोजन सेनापथके पुलावरून पुरासारखी लोटली. सागरतीरावर खेळणारे मूल वाळूचे घर बांधून मग ते लाथेने पाडून जसे नष्ट करते तितक्या सहजपणे त्याने ॲकिअनांची भिंत लाथेने पाडली. अशातऱ्हेने हे ॲपॉलो, तू कष्ट व आपत्तींचा आरगॉस-वासीयांवर वर्षाव करून त्यांना भयग्रस्त व संभ्रान्त केलेस.

याप्रमाणे ॲकिअन त्यांच्या नौकांपाशी कोंडीत सापडले व एकमेकाना हाका मारीत स्वर्गाकडे हात उंचावून प्रत्येक मनुष्य उच्चरवाने ओरडू लागला. त्यांच्यातल्या कोणाहीपेक्षा जास्त तळमळीने प्रार्थना केली, ती ॲकिअनांचा बलस्तंभ जेरिनीचा नेस्तॉर याने; तारकांकित आकाशाच्या घुमटाकडे हात उचलून तो म्हणाला, "तात जव्ह, जर कधी कोणी गहू पिकवणाऱ्या आरगॉस-मध्ये, सुखरुप घरी परत येण्यासाठी, तुला प्रार्थून, तुझ्याप्रीत्यर्थ मेंढयांची वा कालवडींच्या मांडयांची लठ्ठ हाडे यज्ञाग्नीत आहुती म्हणून अर्पण केली असतील व तेव्हा रुकारार्थी तू त्याच्यापुढे मस्तक वाकवले असशील, तर ते आता लक्षात आण आणि त्रोजनांना याप्रमाणे ॲकिअनावर विजयी होऊ देऊ नकोस."

सर्वांच्या मार्गदर्शक जव्हने मोठ्याने मेघगर्जना करून वयस्क नेलिअस-पुत्राच्या प्रार्थनेला उत्तर दिले. त्रोजनांनी जेव्हा जव्हची मेघगर्जना ऐकली तेव्हा त्यांनी अधिकच प्रखरपणे ॲकिअनांवर हल्ला चढवला. वादळाने समुद्र खवळून उठला असताना–कारण वाऱ्याच्या जोरामुळेच लाटा इतक्या प्रचंड होतात–नौका प्राकारावर लाट जशी आदळून फुटते, अगदी तसेच त्रोजन्स भिंतीवरून ओरडत पार झाले व त्यांनी आपले रथही पुढे घुसवले. उभय-पक्षात दोन टोकांच्या भाल्यांनी हातघाईची लढाई झाली–त्रोजन त्यांच्या रथावरून लढत होते तर ॲकिअन आपल्या नौकांवर चढून, नौकापृष्ठांवर पडलेल्या लांब दांडयांच्या भाल्यांनी प्रतिकार करीत होते. ब्राँझचे जोडसांधे असणारे हे ब्राँझने मढवलेले भाले सागरी युद्धासाठी सदा तयार ठेवलेले असत.

आता जोपर्यन्त ॲकिअन्स व त्रोजन्स भिंतीच्या आसपास लढत होते पण आत येऊन नौकांपर्यन्त पोहोचले नव्हते, तोपर्यन्त पॅत्रोक्लस भल्या युरिपिलसच्या तंबूत बसून राहिला होता व त्याला संभाषणाने रिझवीत त्याच्या जखमेवर वेदनाहारक वनस्पतींचा लेप लावीत होता. परंतु जेव्हा त्याने भिंतीतल्या भगदाडामधून त्रोजन गर्दीने आत घुसताना व ॲकिअन्स कल्लोळ करीत धावरून इकडे तिकडे पळताना पाहिले, तेव्हा तो मोठ्याने ओरडला व मांडयांवर तळ-हात आपटून वैतागाने बोलला, "युरिपिलस, तुला माझी निकडीने गरज आहे हे मी जाणतो, पण आता अधिक वेळ तुझ्याजवळ मला राहता येत नाही, कारण

निकराची लढाई तिकडे चाललेली आहे; आता एकादा सेवक तुझी परिचर्या करील. मला मात्र अत्यंत त्वरेने ॲकिलिझकडे जाऊन लढण्यासाठी त्याला शक्य झाल्यास प्रवृत्त केलेच पाहिजे; कुणास ठाऊक स्वर्गस्थ देवांच्या मदतीने मी त्याचे मन वळवू शकेनही. मित्राची सल्ला ऐकून घेणे हे माणसाला साजून दिसते."

असे बोलून तो आपल्या वाटेला लागला, ॲकिअन खंबीरपणे जागा धरून राहून त्रोजनांच्या आक्रमणाचा प्रतिकार करीत होते, पण जरी शत्रू संख्येने कमी होते तरीही नौकांपासून त्यांना ॲकिअन मागे हटवू शकत नव्हते. तसेच त्रोजनही ॲकिअनांची फळी मोडून त्यांच्या तंबूमध्ये व नौकांमध्ये शिरू शकत नव्हते. मिनर्व्हाने सर्व प्रकारच्या उपयुक्त कला शिकवलेल्या एकाद्या कसबी कारागिराच्या हाती, सुताराची मापण्याची दोरी नौकेच्या लाकूड कामातील फळीला समपातळीला जशी अचूक कड देते, तशाच समपातळीवर एका नौके-भोवती काहीजण आणि दुसरीभोवती दुसरे असे ते उभयता लढत होते त्यावेळी उभयपक्षातील विग्रहाचा अंतिम परिणाम होता.

हेक्तर थेट ॲजॅक्सवर धावून गेला व दोघे एकाच नौकेपाशी त्वेषाने लढले. ॲजॅक्सला मागे हटवून नौका पेटवण्यास हेक्तर पुढे सरसावू शकत नव्हता, उलट स्वर्गस्थ शक्तींनी ज्या स्थानी हेक्तरला आणले होते तेथून त्याला घालवण्यास ॲजॅक्सही समर्थ होत नव्हता.

मग क्लितिअसपुत्र कॅलेतॉर नौकेकडे अग्नी आणीत असता ॲजॅक्सने त्याच्या छातीत भाला मारला. कॅलेतॉर जडशीळ होऊन भूमीवर पडला, व त्याच्या हातातून पलिता गळाला. आपला भाऊबंद नौकेपुढे पडलेला पाहून हेक्तर ओरडला, "त्रोजन्स, लिसिअन्स व गर्दीच्या लढाईतले निष्णात दार्दानिअनांनो, झुंजण्यात थोडीही कमतरता येऊ देऊ नका; मात्र क्लितिअसपुत्राला सोडवून आणा, नाहीतर तो आता पडलेला पाहून ॲकिअन त्याचे चिलखत काढून घेतील."

नंतर त्याने ॲजॅक्सवर नेम धरून भाला फेकला, पण नेम चुकून तो ॲजॅक्सचा अनुयायी लिकोफ्रॉन याला लागला; हा मुळचा सिथेराचा, पण सिथेरिअनांपैकी एक माणूस मारल्यामुळे तो ॲजॅक्सकडे येऊन राहिला होता. हेक्तरचा भाला त्याच्या डोक्यावर कानाखाली बसला व तो नौकेच्या अग्रभागावरून उलटा-पालटा कोसळून निष्प्राण असा भूमीवर पडला. ॲजॅक्स संतापाने थरथर कापत आपल्या भावाला म्हणाला, "त्यूसर, माझ्या भल्या सोबत्या, सिथेराहून आपल्याकडे राहायला आलेला, व ज्याला आपण आपल्या मातापित्यांइतकाच

मान देत होतो असा आपला विश्वासू साथी मॅस्तॉरपुत्र भूमीवर पडला आहे; हा आताच हेक्तरने त्याला ठार केला. तू तावडतोब आपले प्राणघातक बाण व फीबस अॅपॉलोने तुला दिलेले धनुष्य घेऊन ये."

त्याचे बोलणे ऐकून त्यूसर आपले धनुष्य व बाणांचा भाता घेऊन त्वरेने त्याच्याकडे गेला. तात्काळ त्याने त्रोजनांवर शरवर्षाव केला, आणि त्यातला एक बाण आपल्या घोड्यांची देखभाल करीत असलेल्या व लगाम हातातच धरलेल्या पिसेनॉरपुत्र क्लॅतस याला लागला; हा पॅन्थॉउसचा उदात्तपुत्र जो पॉलिदॅमाज त्याचा सोबती; युद्धाच्या धुमश्चक्रीत ऐन मध्यभागी हा हेक्तरला व त्रोजनांना उत्तम साह्य करीत होता, पण आता त्याच्यावर अरिष्ट ओढवले होते व ते निवारणे ज्यांनी आनंदाने पत्करले असते त्यांच्यातला एकही ते अरिष्ट निवारू शकला नाही, कारण बाण त्याच्या मानेच्या अगदी मागेच बसला होता. तो आपल्या रथावरून पडला व त्याच्या घोड्यांनी बाजूला झुकताना रिकामा रथ हिंदकळवला. राजा पॉलिदॅमाजने काय झाले ते पाहिले व सर्वाआधी तो घोड्यांपाशी आला; त्याने ते घोडे प्रोशिअॅओनपुत्र अॅस्तिनॉउसकडे सोपवले आणि अवधान राखून घोडे जवळपासच ठेव अशी त्याला आज्ञा केली. मग युद्धात परत जाऊन त्याने अग्रश्रेणीतली आपली जागा परत घेतली.

नंतर त्यूसरने हेक्तरवर दुसऱ्या एका बाणाने नेम धरला. आणि जर तो बाण सोडून तेथल्यातेथेच हेक्तरला त्याने ठार केले असते तर मग नौकांपाशी जास्त लढाईही झाली नसती; तथापि हेक्तरवर पाहरा करणाऱ्या जव्हची नजर त्यूसरवर होती. आणि जव्हने त्याला विजयापासून वंचित केले, नेम धरून तो धनुष्याची दोरी मागे खेचीत असता जव्हने ऐनवेळी ती तोडली; त्यामुळे बाण भलतीकडेच गेला व धनुष्य त्याच्या हातातून गळून पडले. रागाने कापत त्यूसर भावाला म्हणाला, "पहा, आपण जे सारे करतो त्यात स्वर्गस्थ शक्ती कसा मोडता घालतात ते! त्यांनी माझी धनुष्यरज्जु तोडली व माझ्या हातातून धनुष्य हिसकावले–तरी आज सकाळीच अनेक बाण सोडण्याच्या कामी यावी म्हणून मी नवी दोरी बसवली होती."

तेलेमॉनपुत्र अॅजॅक्सने उत्तर दिले, "माझ्या भल्या सोबत्या, राहू देत तुझे धनुष्य आणि तुझे बाण; कारण दॅनाअन्सशी दुष्टावा साधण्यासाठी जव्हने ती शस्त्रं निरुपयोगी केली आहेत. तुझा भाला घे, खांद्याला ढाल लाव, आणि स्वतःही त्रोजनांशी लढ व इतरांनाही लढण्यास प्रोत्साहन दे. या क्षणापुरते कदाचित ते जिंकतील, पण जसे लढायला पाहिजे तसे आपण लढलो तर नौका जिंकून घेणे त्यांना कठिण पडेल."

मग त्यूसरने आपले धनुष्य नेऊन तंबूत ठेवले. त्याने एक चार चामडी जडवलेली जाड ढाल खांद्यावर अडकवली. शत्रूंना भिववीत सारखा डोलणारा अश्वपुच्छकेशांचा तुरा असलेले व उत्तम घडवलेले असे शिरस्त्राण त्याने आपल्या सुभग मस्तकावर ठेवले, आपला ब्रॉझची शेंबी असलेला दुर्दम्य भाला मुठीत पकडला आणि तात्काल तो अॅजॅक्सच्या बाजूला येऊन उभा राहिला.

त्यूसरच्या धनुष्याचा त्याला पुढे काही उपयोग होणार नाही हे जेव्हा हेक्तरने पाहिले तेव्हा तो ओरडून त्रोजन व लिसिअनांना म्हणाला, "त्रोजनहो, लिसिअनहो व गर्दीच्या लढाईत पटाईत दार्दानिअनहो, मर्दासारखे वागा, आणि मित्रहो, तुमची धमक येथे नौकांपाशी दाखवा, कारण त्यांच्या एका नायकाचे शस्त्र जव्हच्या हाताने निकामी झालेले मला दिसत आहे. जव्ह लोकांना साह्य केव्हा करीत असतो व पुढेही साह्य करण्याचा त्याचा विचार केव्हा असतो ते सहज दिसून येते, तसेच तो त्यांना खाली केव्हा पाडीत असतो व त्यांच्यासाठी काहीही करणार नसतो हेही सहज कळते; तो आता आपल्या बाजूला आहे व आरगॉसवासीयांना विरोध करीत आहे. म्हणून नौकांभोवती गर्दी करा व लढा. जर तुमच्यातल्या कोणाला भाल्याचा किंवा तलवारीचा घाव लागला व तो प्राणास मुकला, तर त्याला मरु द्या; स्वदेशासाठी लढत मरणाराचे मरण हे मानाचे मरण आहे, आणि त्याच्या मागे त्याची बायकापोरे सुखरुप राहतील, त्याच्या घराची व मालकी हक्काच्या भूमीची लूट होणे टळेल, मात्र अॅकिअनांना व त्यांच्या नौकांना येथून हाकलून परत त्यांच्या स्वदेशाकडे घालवता आले पाहिजे."

या शब्दांनी त्याने त्या सर्वांच्या ठायी हुरुप व धीर आणला. दुसऱ्या पक्षात अॅजॅक्सने आपल्या सोबत्यांना आग्रहाचे आवाहन केले, "धिःक्कार असो तुम्हाला, आरगॉसवासीयांनो! आपला नाश यऊन ठेपला आहे. तो टाळायचा असेल तर शत्रुला आपल्या नौकापासून हुसकून लावूनच आपला बचाव केला पाहिजे. हेक्तरने जर आपल्या नौका जिंकून घेतल्या तर भूमिमार्गाने आपल्याला स्वदेशी परत जाता येईल असे का वाटते तुम्हाला? आपल्या नौकादलाला आग लावायला तो त्याच्या सबंध सेनेला उत्साहाने उत्तेजन देत आहे ते तुम्हाला ऐकू येत नाही काय? तो त्यांना असेही बजावीत आहे की ते नृत्य सभारंभाला नव्हे तर लढाईला आले आहेत हे त्यांनी लक्षात ठेवावे. असेल नसेल त्या साऱ्या बळानिशी निकराने त्यांना लढा देणे हा एकच मार्ग आपल्याला आता आहे; आपल्यापेक्षा निकृष्ट लोकांकडून आपल्या नौकांपाशी घेरले जाऊन दीर्घकाल

अनिश्चित असा लढा लढत राहण्यापेक्षा, एकदाच जीवन मरणाची पर्वा न करता झुंज देऊन काय ती दैवाची परीक्षा पाहू या."

या त्याच्या बोलण्याने त्या सर्वांमध्ये धैर्य व चैतन्य स्फुरले; मग हेक्तरने फोसिअन्सचा नेता पेरिमिदिझ याचा पुत्र स्केदिअस मारला, आणि अॅजॅक्सने अॅन्तेनॉरपुत्र, पदाती-नायक लॅओदॅमासचा जीव घेतला, फिलिअसपुत्राचा सोबती व अभिमानी एपिअनांचा प्रमुख, सिलिनीचा ओतस यास पॉलिदॅमाजने ठार मारले. ते पाहून मेगिझने त्याच्यावर उडी घेतली, पण पॉलिदॅमाज खाली झुकला व मेगिझचा नेम चुकला कारण पॅन्थॉउसच्या मुलाला युद्धात मरू देण्यास अॅपॉलो तयार नव्हता. पण तो भाला क्रीझमसला छातीच्या मध्यावर लागला व तो जडपण भूमीवर पडताच मेगिझने त्याचे चिलखत काढून घेतले. त्या क्षणाला लॅम्पसपुत्र दॉलॉप्स या शूर वीराने मेगिझवर झेप टाकली. लॅम्पस हा लॅओमेदॉनचा पुत्र शौर्यासाठी विख्यात होता व त्याचा मुलगा दॉलॉप्सही युद्धाच्या सर्व अंगात प्रवीण होता. त्याने मग फिलिअसपुत्रावर अगदी जवळ चढाई करून त्याच्या ढालीच्या मध्यभागी प्रहार केला; पण धातूच्या पट्टयांनी घडवलेल्या उत्तम कवचाने लिफिअसपुत्राला वाचवले; हे कवच फिलिअसने एफिरा व सेलेइस नदीच्या प्रदेशातून आणले होते; त्या भागात तो ज्याच्या पाहुणा होता त्या युफेतिझ राजाने युद्धात वापरून स्वसंरक्षण करण्यासाठी हे कवच फिलिअसला दिले होते, आता त्याच्या मुलाला जीव वाचवण्यास ते उपयोगी पडले. मग मेगिझने आपल्या भाल्याने दॉलॉप्सच्या ब्रॉंझच्या शिरस्त्राणावरील सर्वात वरच्या टोकाचा छेद करून नवीनच तांबडा रंग दिलेला अश्वपुच्छकेशाचा तुरा धुळीत लोळवला, त्याचे लढणे पुढे चालू असता व जयाची त्याला खात्री असताच त्याच्या मदतीस मेनेलॉस आला; व दॉलॉप्सला नकळत त्याच्या बाजूला गेला; मग त्याने त्याच्या खांद्यात मागून इतक्या त्वेषाने भाल्याचे टोक खुपसले की ते आरपार छातीत घुसून दॉलॉप्स कोसळून खाली पडला; मग त्याचे चिलखत काढून घेण्यासाठी ते दोघे त्याच्याजवळ जाऊ लागले, पण हेक्तरने आपल्या साऱ्या भावांना मदतीस बोलावले, आणि हिकॅतॲॉनचा पुत्र शूर मेलॅनिपस याची विशेषच कानउघाडणी केली. हा युद्ध सुरु होण्यापूर्वी पेर्कोतीमध्ये आपल्या गुरांचे कळप चारीत असे. पण दॅनाअनांच्या नौका जेव्हा आल्या तेव्हा तो इलिअमला परत गेला, तेथे त्रोजनांमध्ये त्याने प्रतिष्ठा प्राप्त करून घेतली आणि प्राअॅमजवळ तो रहात असताना प्राअॅम त्याला स्वतःच्या मुलासारखे वागवी. आता हेक्तरने त्याला दूषण दिले. तो म्हणाला, "काय रे मेलॅनिपस, आम्ही असा चुकारपणा का करीत

आहोत? आपल्या भाऊबंदाच्या मरणाची दखल तू मुळीच घेत नाहीस की काय? ते दॉलॉप्सचे चिलखत काढून घ्यायचा प्रयत्न करीत आहेत ते तुला दिसत नाही काय? माझ्यामागून चल; आता या आरगॉसवासीयांशी दुरून लढण्यात अर्थ नाही; तर आपण हातघाईनेच त्यांना भिडले पाहिजे—एक तर आपण त्यांना मारीपर्यन्त, नाही तर ते तरी इलिअमचे तट जिंकून नगरीच्या लोकांचा संहार करीपर्यन्त आपण झुंजले पाहिजे."

असे बोलत बोलत तो पुढे झाला आणि वीर मेलॅनिपस त्याच्या मागोमाग गेला. दरम्यान तेलेमॉनपुत्र अॅजॅक्स आर्गाइव्हज्‌ना पुढे सरसावण्यास उत्तेजन देत होता. "माझ्या मित्रांनो", तो म्हणत होता, "मर्दासारखे वागा व अपकिर्तीला भिऊन असा, एकमेकांबद्दल आदर वाटेल अशी लढाईत कामगिरी करा. एकमेकांबद्दलच्या सद्‌भावनांची बूज ठेवणारे मारले जातील असा संभव कमी ती न ठेवणारे मारले जातील हेच जास्त शक्य; पण पळून जाण्यात मात्र लाभही नाही किंवा कीर्तीही नाही."

याप्रमाणे त्यांनी लोकांना आग्रहाने आवाहन केले, पण त्रोजनांना मागे रेटण्याचा त्या लोकांचा निश्चय आधीच झाला होता. त्याचे शब्द त्यांच्या काळजाला भिडले व नौकांभोवताली जणु ब्राँझच्या भितीसारखे कूसच त्यांनी उभे केले; त्यावेळी जव्ह त्रोजनांना चेतवीत होता. उच्चस्वराने रणगर्जना करणाऱ्या मेनेलॉसने अॅन्तिलॉकसला प्रोत्साहन दिले, तो म्हणाला, "अँतिलॉकस तू तरणाबांड आहेस व तुझ्याहून शीघ्रगती किंवा अधिक पराक्रमी वीर अॅकिअनां-मध्ये दुसरा कोणी नाही. एकाद्या त्रोजनवर झडप घालून त्याचा प्राण घेता येतो का पहा."

अॅन्तिलॉकसला असे चिथवल्यानंतर तो तेथून घाईने निघून गेला व अॅन्तिलॉकसने तात्काळ आघाडीच्या ओळीतून तीरासारखे पुढे जाऊन भाल्याचा नेम धरून सावधपणे सभोवार पाहिले. त्याचा भाला फेकला जात असताच त्रोजन्स मागे हटले. पण त्याच्या हातून वेगाने सुटलेला तो शूल निष्प्रभ झाला नाही, हिकेतॅऑनचा अभिमानी पुत्र मेलॅनिपस पुढे येत असता त्याच्या छातीवर स्तनाग्रापाशी घाव बसला व तो जडपणे भूमीवर पडत असता त्याचे चिलखत त्याच्याभोवती खणखणले. छपण्याच्या जागेतून बाहेर पडून पळत असता शिकाऱ्याचा नेम लागून मेलेल्या हरणावर शिकारी कुत्रा जसा उडी घेतो तशी उडी मजबूत अॅन्तिलॉकसने, हे मेलॅनिपस, तुझ्यावर तुझे चिलखत काढून घेण्यासाठी टाकली; पण उदात्त हेक्तरने ते पाहिले आणि लढाईच्या दाटीमधून पळत तो त्याच्यापाशी आला. अॅन्तिलॉकस जरी शूर

योद्धा होता तरी हेक्तरला तोंड देण्यासाठी तो थांबला नाही, तर आपण अपराध केला आहे याची जाणीव असलेल्या वन्य पशूसारखा तो पळाला, ते जंगली जनावर जसे एकाद्या कुत्र्याला किंवा गुरे वळणाऱ्या माणसाला मारल्यावर, स्वतःवर हल्ला करण्यासाठी माणसे गोळा होण्याच्या आधीच पळत सुटते,तसाच नेस्तॉर-पुत्र पळाला आणि गगनभेदी आरोळी देऊन हेक्तरने व त्रोजनांनी आपल्या शस्त्रांचा वर्षाव त्याच्या दिशेने केला पण तो आपल्या सोबत्यांपाशी पोहोचेपर्यन्त मागे वळला नाही की पळायचाही थांबला नाही.

जव्हच्या आज्ञांचे पालन करण्यासाठी सिंहासारखे उग्र त्रोजन अजूनही नौकांकडे लोटत होते; जव्ह त्यांना नवनव्या साहस कर्मासाठी सारखा प्रोत्साहित करीत होता, तर आर्गाइव्हज्चे धैर्य मात्र मृतप्राय करून तो त्यांचा पराभव उत्तेजित त्रोजनांकडून करवीत होता, कारण प्राअॅमपुत्र हेक्तरला यशश्री देण्याचा व त्याला नौकांवर अग्निक्षेप करू देण्याचा त्याचा उद्देश होता पण तोहि थेतिसने त्याला केलेली अधर्म्य विनंती पुरी करीपर्यन्तच तो असे करणार होता. म्हणून पेटलेल्या नौकेचा जाळ दिसेपर्यन्त तो वाट पाहात राहिला. आग दिसण्याच्या त्या क्षणापासून तो अशी योजना करणार होता की त्रोजन्स नौकांपासून मागे हटवले जातील व विजय अॅकिअनांना मिळेल. या हेतूने जव्हने आधीच उत्सुक असलेल्या प्राअॅमपुत्र हेक्तरला नौकांवर आक्रमण करण्याची स्फूर्ती दिली. मार्ससारखा किंवा पर्वतांवरील दाट अरण्यातील वाटांवर भडकलेल्या आगी-सारखा हेक्तरचा त्वेष होता. त्याच्या तोंडाला फेस येत होता. त्याच्या भीषण भुवयांखाली त्याची दृष्टी उग्र झाली होती व लढण्याच्या आवेशात त्याचे शिरस्त्राण कानशिलांवर थरथरत होते. स्वर्गातला जव्ह त्याच्या बाजूने होता व जरी तो अनेकांविरुद्ध एकटा लढत होता, तरी जव्हने त्याला जय व कीर्ति प्रदान केली, कारण त्याच्या नशिबी लौकरच मरण यायचे होते. एव्हापासूनच पेलिअसपुत्राच्या हातून त्याच्या नाशाची घटिका, पॅलास मिनर्व्हा त्वरेने जवळजवळ आणीत होती. तथापि आता हेक्तरने शत्रूच्या श्रेणी जेथे दाट दिसतील व शस्त्रसज्जता उत्तम दिसेल, तेथे त्यांची फळी फोडण्याचा प्रयत्न चालू ठेवला; पण त्याने काहीही केले तरी तो त्यांचा भेद करू शकला नाही; कारण ते एकाद्या चौरस मनोऱ्यासारखे किंवा वाऱ्याच्या व गर्जत धडका देणाऱ्या लाटांच्या कोपाचा धैर्याने सामना करणाऱ्या, धूसर सागरातून निघून उंच गेलेल्या कड्यासारखे ठाम राहिले. अग्नीच्या ज्वाळांसारखा तो त्यांच्या-वर सर्व दिशांनी तुटून पडला. जेव्हा वाऱ्याने व तुफानाने पर्वतासारखी उत्तुंग झालेली लाट नौकेवर आपटून तिला फेसाने खोलवर झाकून टाकते,

डोलकाठीपाशी भयानक वारे गरजतात, तेव्हा नाविकांचे धैर्य भीतीने खचून जाते, आणि ते पूर्णपणे नष्ट होण्यापासून अगदी थोडक्यात बचावतात अगदी त्याप्रमाणेच ॲकिअनांचे धैर्य आतल्या आत खचत होते; किंवा विस्तीर्ण जला-शयाच्या कडेला सखल तृणभूमीवर हजारो गाईंचा कळप चरत असता एकादा क्रूर सिंह त्यांच्यावर हल्ला करतो, कळपाचे रक्षण कसे करावे हे कितीही विचार केला तरी गुराख्याला कळत नाही, कुंठित गति होऊन तो एकदा कळपाच्या आघाडीला तर एकदा पिछाडीला धावतो, दरम्यान सिंह गाईंच्या गर्दीत घुसून झडप घालून एकीला घट्ट धरतो व बाकीच्या साऱ्या भीतीने थरथरा कापतात अगदी तसेच ॲकिअन, हेक्तरमुळे व तात ज्व्हमुळे सर्वस्वी भयाकुल झाले. तथापि हेक्तरने केवळ मिसिनीच्या पेरिफितिझचाच जीव घेतला; राजा युरिस्थिअसच्या आज्ञा बलशाली हर्क्युलिसला कळवण्याचे काम करणाऱ्या कॉप्रिअसचा पेरिफितिझ हा मुलगा; पण प्रत्येक बाबतीत हा बापापेक्षा पुष्कळच श्रेष्ठ पुरुष होता; तो शीघ्रगती, शौर्यशाली वीर व मिसिनीच्या अग्रगण्य शहाण्या लोकांपैकी एक होता. पण हेक्तरला एक जय मिळविण्याची संधी दिली ती याने; कारण तो, मागे वळत असता पायापर्यन्त पोहोचणाऱ्या व शूलांपासून निवारणाऱ्या स्वतःच्याच ढालीच्या कडेला अडखळला, आणि डोक्याभोवती शिरस्त्राण खणखणतानाच जमिनीवर उताणा पडला. तो पडताना पाहून हेक्तरने त्याच्यापाशी जाऊन त्याच्या छातीत भाला खुपसला व त्याच्या सोबत्यांच्या जवळच त्याला ठार केले. त्यांना कितीही हळहळ वाटली तरी ते त्याला मदत करु शकले नाहीत, कारण ते स्वतःच हेक्तरला भयंकर भीत होते.

ते आता नौकांपाशी पोहोचले होते आणि किनाऱ्यावर आधी ओढून आणलेल्या नौकांचे अग्रभाग त्यांच्या सर्व बाजूंना होते, पण ट्रोजनांचा लोंढा त्यांच्यामागून आला. नौकांच्या पहिल्या ओळीतून आर्गाइव्ह्ज् मागे रेटले गेले, पण त्यांच्या तंबूंपाशी त्यांनी आपली फाटाफूट किंवा पांगापांग होऊ न देता भक्कम ठाण मांडले, लाजेचे व भीतीचे त्यांच्यावर दडपण पडले होते. ते एकमेकांना उद्देशून सारखे ओरडत राहिले आणि ॲकिअनांचा भक्कम आधारस्तंभ जेरिनीचा नेस्तॉर सर्वांत मोठ्याने ओरडत, प्रत्येक माणसाला त्याच्या मातापित्यांची शपथ घालून खंबीरपणे उभे राहण्यास विनवीत होता.

त्याने उच्चरवाने म्हटले, "मित्रहो, मर्दासारखे वागा व एकमेकांबद्दलच्या चांगल्या मतांचा मान ठेवा. तुमची मुलेबाळे, तुमच्या बायका, तुमची मालमत्ता, व जिते असोत की मृत—तुमचे आई-बाप यांचा विचार सगळेजण मनात आणा.

ते इथे नसले तरी त्यांच्यावतीने मी तुम्हाला विनवतो की भक्कमपणे जागेवर रहा व पळण्यासाठी पाठी फिरवू नका. ''

या शब्दांनी त्याने सर्वांच्या ठिकाणी धैर्य व हिंमत जागृत केली. मिनर्व्हाने त्यांच्या दृष्टीवरचे अंधेराचे दाट पटल उचलले व त्यांच्यावर पुष्कळ प्रकाश पडला—नौकांच्या बाजूंवर, तसाच लढाई चालू असलेल्या जागेवरही तसाच प्रकाश पडला. त्यांना हेक्तर व त्याचे सारे लोक, युद्धात भाग न घेता पिछाडीस असलेले, त्याचप्रमाणे नौकांपाशी लढणारे, दोन्ही दिसू लागले.

इतरांबरोबर माघार घेणे अॅजॅक्सला मानवण्याजोगे नव्हते, तो एका नौकेच्या पृष्ठावरून दुसऱ्यावर, टांगा टाकीत फिरत होता; त्याच्या हाती एक बारा हात लांबीचा, धातूंच्या वलयांनी जोडलेला प्रचंड सागरी शूल होता. एकादा अश्वारोहण विद्येच्या कसबात निष्णात जसा चार घोडे एकत्र जोडून, त्यांना हमरस्त्याने ग्रामीण प्रदेशाकडून एकाद्या मोठ्या नगरीत भर वेगात दौडवीत आणतो–त्याला पाहून अनेक पुरुष व स्त्रिया आश्चर्य करतात, कारण तो सारखा आपला घोडा बदलीत असतो, भरधाव दौडणाऱ्या घोड्यांतल्या एकाच्या पाठीवरून दुसऱ्याच्या पाठीवर एकदाही पाय चुकू न देता उड्या मारीत असतो तसाच अॅजॅक्स एका नौकेच्या काष्ठ फलकावरून दुसऱ्यावर भराभर पावले टाकीत होता. आणि त्याचा आवाज स्वर्गापर्यन्त पोहोचत होता. तो दॅनाअनांना ओरडून आज्ञा करीत होता आणि आपल्या नौका व तंबुंचे रक्षण करा असे त्यांना आग्रहाने सांगत होता; आणि हेक्तरही त्रोजन योद्ध्यांच्या मध्यवर्ती मुख्य गटात फार वेळ थांबला नाही, तर नदीजवळ भक्ष्य खात असलेल्या रानपक्ष्यांच्या——बदकांच्या, करकोच्यांच्या किंवा दीर्घग्रीव हंसांच्या थव्यावर एकादा भुऱ्या रंगाचा गरुड जशी खाली येऊन झेप घेतो, तसाच हेक्तर कृष्ण पुरोभाग असलेल्या एका नौकेकडे थेट वेगाने धावून गेला, कारण जव्हच्या महाप्रतापी हस्ताने त्याला पुढे जाण्यास प्रवृत्त केले आणि त्याच्या अनुयायांना त्याच्यामागे जाण्यास उत्तेजित केले.

आणि आता नौकांपाशी पुन्हा बेफाम झुंज चालली. कोणाला वाटले असते की लढणार लढावयास ताजेतवाने व न थकलेले असे येत आहेत इतक्या तिरिमिरीने ते लढले आणि त्यांच्या मनात होते ते असे: विनाशातून वाचू असा अॅकिअनांना विश्वास वाटत नव्हता; आपली अखेर ओढवली असे त्यांना वाटत होते; तर नौका पेटवून देऊन अॅकिअनांचा तलवारींनी निकाल लावायचा, या उत्कंठापूर्ण उमेदीने ज्याच्या छातीची धडधड वाढली नाही असा एकही त्रोजन नव्हता.

असे उभयपक्षांचे विचार चालले होते. मग हेक्तरने एका नौकेच्या पिछाडीवर घाला घातला; या उत्तम नौकेने प्रॉतेसिलॉसला त्रॉयला आणले होते, पण त्याला स्वदेशी परत वाहून मात्र तिने कधीच नेले नाही. या नौके-भोंवताली दॅनाअन व त्रोजन यांच्या दरम्यान एक दाटीवाटीची, हातघाईची झुंज झाली.

दुरून धनुष्यबाणांनी वा भाल्यांनी ते लढत नव्हते, तर एकमेकांना भिडून, एकाच हेतूने प्रेरित होऊन, एकमेकांवर आपल्या प्रतापी खड्‌गांनी व दोन्ही बाजूना टोके असणाऱ्या शूळांनी, त्याचप्रमाणे धारदार परशूंनी आणि छोट्या कुऱ्हाडींनीही ते घाव हाणीत होते. त्यांच्या लढ्यात लोखंडी मुठी व म्याने असलेली अनेक भक्कम धारदार शस्त्रे हातातून किंवा खांद्यावरून खाली पडली आणि रक्ताचे लोट वाहून भूमी तांबडी झाली. नौकाभाग हाती पकडल्यावर तो न सोडता त्याच्या वांकदार पृष्ठभागाला घट्ट धरून हेक्तर त्रोजनांना ओरडून म्हणाला, "अग्नि आणा, आणि सगळेजण एका आवाजात रणगर्जना उठवा, जव्हने बाकीच्या साऱ्या दिवसांचे मोल भरून येईल असा दिवस आता आपल्याला दिला आहे. स्वर्गस्थ शक्तीच्या इच्छेविरुद्ध ज्या नौका इकडे आल्या त्या आपण आज ताब्यात घेऊ. या नौका आपल्या अनंत हालांना कारणीभूत झाल्या आहेत. कारण आम्हाला मंत्रणा देणारानी भ्याडपणामुळे जेव्हा मी नौकांपाशी युद्ध करणार होतो तेव्हा मला मागे ओढून धरले व सैन्याला माझ्या मागे येण्यास प्रतिबंध केला; जरी आमची निर्णयशक्ती जव्हने तेव्हा खरोखरच विकृत केली असली, तरी यावेळी तो स्वतःच मला आज्ञा करून पुढे जाण्यास प्रोत्साहन देत आहे."

तो याप्रमाणे बोलत असता त्रोजनांनी जास्तच वेवाने ॲकिअनांवर उड्या घेतल्या आणि नंतर ॲजॅक्स आपली जागा धरून राहू शकला नाही. त्याच्याकडे फेकल्या जाणाऱ्या बाणांनी व भाल्यांनी त्याच्यावर कुरघोडी करून त्याचा अंत निश्चित करून ठेवला. म्हणून नौकेच्या पिछाडीचा उंचावरचा काष्ठ फलक सोडून तो मागे वल्हवणारे बसतात त्या सात फूट लांबीच्या फळीवर उतरला. तेथे तो टेहळणी करीत उभा राहिला व नौकांकडे अग्नी घेऊन येणाऱ्या प्रत्येक त्रोजनला त्याने भाल्याने अडवून धरले. हा सगळा वेळ उंचात उंच आवाज चढवून दॅनाअनांना निकड लावणे त्याने चालूच ठेवले. "माझ्या मित्रांनो, दॅनाअन वीरांनो, मार्सच्या सेवकांनो, मर्दासारखे वागा, मित्रहो, आणि साऱ्या शक्तिनिशी प्राणपणाने लढा. यानंतर आपल्याला दुसरे कोणी सहाय्यक मिळण्याची आशा आहे का? का ही संरक्षक भिंत निवाऱ्याला

आहे त्याहून अधिक खात्रीने संरक्षण देणारी भिंत मिळणार आहे? आटोक्यात असणारे असे एकही मजबूत नगर इथे नाही, की जेथून आपल्याला ताज्या दमाचे सैनिक आणून पारडे आपल्या बाजूला झुकवता येईल. शस्त्रसज्ज त्रोजनांच्या रणमैदानावर आपण असून आपल्यामागे सागर आहे. आपण आपल्या स्वदेशापासून दूर आहोत. म्हणून आपल्या बाहुबलाने निकराने लढण्यातच आपला एकमेव मुक्तीमार्ग आहे."

याप्रमाणे बोलत असता त्याने अधिकच त्वेषाने आपला भाला परजला, आणि हेक्तरच्या सांगण्यावरून कोणी त्रोजन अग्नि घेऊन नौकांकडे जाऊ लागला, की त्याच्यावर लक्ष ठेवून त्याला तो आपल्या लांब भाल्याने भोसकू लागला. याप्रमाणे हातघाईच्या झगड्यात त्याने बारा लोक नौकांपुढे ठार केले.

• • •

## सर्ग १६

असे ते प्रॉतेसिलॉसच्या नौकेभोवती लढले. मग एकाद्या उंच कड्यावरून पडणाऱ्या स्फटिकशुद्ध प्रवाहाच्या निर्झराप्रमाणे आसवे डोळ्यातून ओसंडत असलेला पॅत्रोक्लस ॲकिलिझच्याजवळ गेला. त्याला असे रडताना पाहून ॲकिलिझला वाईट वाटले व तो म्हणाला, "पॅत्रोक्लस, एकाद्या खुळ्या बाळा-सारखा तू येथे रडत का उभा आहेस? मूल धावत आईजवळ येते व आपल्याला उचलून घ्यावे म्हणून विनवते, आई घाईत असली तरी तिचे वस्त्र धरून तिला थांबवते, व आईने उचलून घेईपर्यन्त आसवे ओघळणारे मुख वर करून तिच्याकडे पाहाते––अगदी तशीच आसवे, पॅत्रोक्लस, तू आता गाळीत आहेस. मिर्मि-दॉनांना किंवा मला काही सांगायचे आहे कां तुला? की तुला एकट्यालाच माहीत असलेली काही वार्ता थिआहून आली आहे? लोक सांगतात की मिर्मिदॉनांपैकी ॲक्तॉरपुत्र मेनिशिअस अजून जिवंत आहे, तसाच ईकसपुत्र पेलिअसही–हे दोघे गमावले तरच आपल्या दोघांना कटू खेद व्हावा; का स्वतः-च्याच अरेरावी कृत्यामुळे नौकांपाशी ज्याप्रकारे ते मारले जात आहेत त्या आर्गाइव्हज्साठी तू दुःख करतो आहेस? माझ्यापासून काही लपवून ठेवू नकोस, तर मला काय ते सांग म्हणजे आपणा दोघांनाही त्याबद्दल सारे कळेल."

तेव्हा हे उच्च कुलीन वीरा पॅत्रोक्लस, तू एक दीर्घ निश्वास टाकून उत्तर दिलेस, "पेलिअसपुत्रा ॲकिलिझ, ॲकिअनांच्या अग्रगण्य कैवारी वीरा, रागावू नकोस; पण आर्गाइव्हजवर कोसळलेल्या अरिष्टामुळे मी रडतो आहे. आता-पर्यन्त त्यांचे जे संरक्षक वीर होते ते सारे खड्गाने किंवा भाल्याने जखमी होऊन नौकांजवळ पडून आहेत. तायदिअसपुत्र शूर दायोमिदला भाल्याचा घाव लागला आहे तर विख्यात युलिसिस व ॲगॅमेम्नॉन यांना तलवारीच्या जखमा झाल्या आहेत. पुन्हा युरिपिलसला मांडीत बाण लागला आहे; निष्णात वैद्य या वीरांवर उपचार करीत त्यांच्या जखमा बऱ्या करीत आहेत; हे ॲकिलिझ, अजूनही तुला दया येत नाही का? स्वतःच्या भल्या नावाला काळिमा आणणारा तुझ्यासारखा असा आवेगीरोष मनात बाळगीत राहण्याचे माझ्या नशिबी कधीही न येवो. आता जर तू आरगॉसवासीयांना विनाशापासून बचावले नाहीस तर भविष्यकाळच्या कथाकथनात तुझ्याबद्दल चांगले कोण बोलेल? तुला दया माहीतच नाही; उच्च कुलीन वीर पेलिअस तुझा

पिता नव्हता आणि थेतिसही तुझी माता नव्हती, तर धूसर समुद्राच्या पोटी सरळसोट डोंगर कड्यांनी तुला जन्माला घातले असावे ! म्हणूनच तू इतका क्रूर व कठोर झालास. तथापि, जर एकादा भविष्यविषयक कौल कळला असल्यामुळे, किंवा जव्हच्या तोंडून कळलेली एकादी गोष्ट तुझी माता थेतिस हिने तुला सांगितल्यामुळे, तू स्वतःला रोखून धरलेले असशील तर निदान मला व माझ्याबरोबर मिर्मिदॉनांना धाड, म्हणजे मग दॅनाअनांची सुटका आम्हाला करता येते का ते मी पाहतो. शिवाय तुझे चिलखत मला वापरू दे, म्हणजे ते पाहून त्रोजन मलाच तू आहेस असे समजतील आणि रणातून पळ काढतील. त्यामुळे जेरीस आलेल्या अॅकिअन पुत्रांनाही जरा श्वास घ्यायला उसंत मिळेल—नाहीतर लढत असताना त्यांना उसंत मिळणे कठीणच. आम्ही ताज्या दमाचे गडी थकलेल्या लोकांना आपल्या नौकांपासून व तंबूंपासून परत त्यांच्या नगरीकडे कदाचित लौकरच हाकलून लावू शकू."

आपण काय मागत आहोत हे त्याला माहित नव्हते आणि त्यालाही पण कल्पना नव्हती की आपण स्वतःच्या नाशासाठीच प्रार्थना करीत आहोत. अॅकिलिझचे मन फार द्रवले आणि त्याने म्हटले, "उदात्त पॅत्रोक्लस, तू काय बोलतो आहेस हे ? कुठल्याही भाकिताच्या पूर्वज्ञानाने मी अडलेला नाही. किंवा जव्हच्या मुखातले कोणतेही शब्द माझ्या मातेने मला सांगितलेले नाहीत. पण माझ्यापेक्षा जास्त सत्ताधारी आहे म्हणून माझ्या स्वतःच्याच दर्जाच्या एकाने मला लुबाडण्याचे धाडस करावे ही गोष्ट माझ्या जिवाला फार लागली आहे. मी जे काही सर्व आजवर केले आहे, त्यानंतर घडलेले हे माझ्या सहनशक्ती पलीकडे आहे. जी मुलगी अॅकिअनांच्या पुत्रांनी माझ्यासाठी निवडली, जी एक नगरी लुटल्यावर माझ्या भालाईतगिरीचे फलस्वरूप म्हणून मी जिंकली तीच, मी एकादा सामान्य भटक्या असल्याप्रमाणे अॅगमेम्नॉन राजाने माझ्याकडून काढून घेतली. तरीही मी म्हणतो झाले गेले जाऊ दे; कोणाही माणसाने आपला राग कायमचा ठेवू नये; लढाई व युद्धघोष माझ्या स्वतःच्या नौकांपाशी पोहोचेपर्यन्त माझा राग मावळणार नाही असे मी म्हणालो होतो; तरीही आता माझे चिलखत खांद्यावर चढव व तुझ्या नेतृत्वाखाली मिर्मिदॉनांना लढाईत घेऊन जा. कारण त्रोजनांचा कृष्णमेघ आपल्या नौकावर बेफामपणे कोसळला आहे; आर्गाइव्हज् समुद्रकिनाऱ्यापर्यन्त मागे हटवले गेले आहेत, अरुंद जागेत कोंडले गेले आहेत, आणि त्रॉयच्या साऱ्या लोकांना त्यांच्यावर हल्ला चढवायचा हुरूप आला आहे, कारण त्यांच्या आसपास माझ्या शिरस्त्राणाचा चेहरा झाकणारा जाळीदार पडदा चमकताना त्यांना दिसत नाही.

तो त्यांना दिसला असता तर ते पळून जात असताना त्यांच्यातल्या मृतांच्या देहांनी भरून गेली नाही अशी एकही खाडी की नाला राहिला नसता. आणि अॅगॅमेम्नॉन राजा जर माझ्याशी न्यायाने वागला असता तर अगदी तसेच घडून आले असते. आता परिस्थिती अशी आहे की त्रोजनांनी आमच्या सेनेवर घाला घातला आहे. तायदिअसपुत्र दायोमिद दॅनाअनांच्या रक्षणार्थ भाला चालवीत नाहीच्; पण प्राणघातक हेक्तरचा आवाज मात्र तो त्रोजनांना आज्ञा देतांना माझ्या कानात घणघणत आहे; व त्रोजन अॅकिअनांवर जय मिळवीत आपल्या रणगर्जनांनी सारे मैदान भरून टाकीत आहेत. पण काही असले तरी, पॅत्रोक्लस, त्यांच्यावर तुटून पडे व नौकादल वाचव. नाहीतर त्रोजन ते पेटवून देतील व आपल्याला परत जाणे अशक्य करतील. तथापि मी आता सांगतो तसे कर, म्हणजे तू माझ्यासाठी सर्व दॅनाअन्सकडून थोर बहुमान मिळवून घेऊ शकशील आणि ते ती मुलगी मला परत देऊन वरती मूल्यवान उपाहारही देतील. अशा तऱ्हेचा हा मार्ग आहे. त्रोजनांना नौकांपासून तू हाकून लावलेस म्हणजे पुन्हा परत ये. जरी ज्यूनोच्या मेघगर्जनाकारी पतीने विजय तुझ्या आटोक्यात आणून ठेवला, तरी माझ्या गैर-हजेरीत त्रोजनांशी आणखी पुढे लढू नको; नाहीतर जे कीर्तिश्रेय मला मिळायले हवे त्याच्यापासून तू मला वंचित करशील; आणि केवळ युद्धलालसेने त्रोजनांना ठार करीत राहू नको; तसेच अॅकिअनांचे त्रॉयवर चालून जाण्यासाठी नेतृत्व करू नको, नाही तर ऑलिम्पसच्या अमर देवांपैकी एकादा तुझ्यावर घाला घालील–कारण फीबस अॅपोलोचा त्यांच्यावर फार लोभ आहे; संकटांतून नौका मुक्त केल्यास की परत ये, व मैदानावरची लढाई दुसऱ्याना चालू ठेऊ दे. तात जव्हच्या, मिनर्व्हाच्या व अॅपोलोच्या शपथ, असं वाटत की त्रोजनांपैकी एकही मनुष्य जिवंत उरू नये–तसा ऑर्गाइव्हज्‌पैकीही, पण आपण दोघेच उरावे, व त्रॉयच्या मुखावरचे ते अवगुंठन फाडून बाजूला करावे."

याप्रमाणे त्यांनी संभाषण केले, पण दरम्यान शस्त्रास्त्रांच्या वर्षावामुळे अॅजॅक्सला आपले स्थान धरून राहणे शक्य राहिले नाही; जव्हची इच्छा आणि त्रोजनांचे शूल यांच्यापुढे त्याचा टिकाव लागेना. त्याच्या कानशिला-भोवती चमकणाऱ्या शिरस्त्राणावर आणि त्याच्या चेहऱ्याचे रक्षण करणाऱ्या कपोल कवचांवर अखंडपणे होणाऱ्या हत्याराच्या घावांचा सारखा खणखणाट होत होता. शिवाय इतका वेळपर्यन्त ढाल सावरून धरण्याच्या शिणाने त्याचा डावा खांदा अवघडला होता; तरीही त्याच्यावर मनमानेतो शस्त्रांच्या फेकी करूनही शत्रू त्याला जागा सोडायला लावू शकत नव्हता. त्याला

कसावसाच श्वास घेता येत होता. देहाच्या साऱ्या रंध्रांतून घाम गळत होता. त्याला पळाचीही उसंत नव्हती, आणि सर्व बाजूंनी त्याला संकटावर संकटांनी वेढले होते.

आणि आता, ऑलिम्पसप्रासादनिवासिनी कलादेवतांनो, मला सांगा की अॅकिअन्सच्या नौकांवर आग कशी फेकण्यात आली? हेक्तर अगदी जवळ आला व त्याने आपले महाखड्ग अॅजॅक्सच्या अॅश लाकडाच्या भाल्यावर चालवून दांड्याला टोक बसवलेल्या जागेमागेच भाल्याचे दोन तुकडे केले; आता अॅजॅक्स-पाशी टोक नसलेला भाला मात्र राहिला व ब्राँझचे टोक उडून काही अंतरावर खणखणत भूमीवर पडले. या प्रकारात स्वर्गस्थ शक्तींचा हात आहे हे अॅजॅक्सने ओळखले; सर्वस्वी अरक्षित अवस्थेत त्याला टाकून जव्ह त्रोजनांचा विजय इच्छीत होता हे लक्षात येऊन जेव्हा तो भयचकित झाला, तेव्हा तो मागे झाला व त्रोजनांनी नौकेवर आग फेकली व नौका तात्काल ज्वालांनी वेढली गेली.

आता नौकेच्या पिछाडीभोवती जाळ भडकून उठला, तेव्हा अॅकिलिझने आपल्या दोन मांड्यांवर तळवे आपटून म्हटले, "ऊठ, उच्चकुलीनवीरा, कारण शत्रूने लावलेल्या आगीचा उजेड आपल्या नौकांपाशी मला दिसत आहे; ऊठ, नाहीतर ते आपल्या नौका नष्ट करतील आणि आपल्याला माघार घेण्यासाठी कुठलाच मार्ग उरणार नाही. आपले चिलखत तात्काळ चढव तोपर्यन्त मी आपल्या लोकांना एकत्र बोलावतो."

तो बोलत असता पॅत्रोक्लसने चिलखत चढवले; प्रथम त्याने चांगल्या कारागिरीची व चांदीचे फासे घोट्यांपाशी बसविलेली कवचे पोटऱ्यांवर बांधली; त्यानंतर त्याने इकस पुत्राचे मूल्यवान धातुखचित खडे जडवलेले वक्षकवच चढवले. चांदीच्या फुल्या बसवलेली ब्राँझची तलवार त्याने खांद्या-वर अडकवली आणि मग त्याची मजबूत ढालही. त्याच्या सुभग डोक्यावर त्याने शिरस्त्राण घातले. त्याची घडण उत्तम असून धाक दाखवीत डोलणाऱ्या अश्वपुच्छकेसांचा तुरा त्याच्या टोकावर बसवलेला होता. आपल्या हातांनी चालवायला सोयीचे पडतील असे दोन दुर्दम्य भाले त्याने मुठीत पकडले, पण महान अॅकिलिझचा भाला मात्र त्याने घेतला नाही; तो इतका दणकट व वळकट होता की अॅकिअन्सपैकी कोणालाही तो चालवता येत नव्हता; पण अॅकिलिझला मात्र तो सहज चालवता येई. हा तो माऊंट पेलिअनवरच्या अॅशच्या लाकडाचा भाला, जो किरॉनने डोंगर माथ्यावर कापून घडवून, वीरां-मध्ये मृत्यूचे वितरण करण्यास अवश्य असे साधन म्हणून पेलिअसला दिला होता. पॅत्रोक्लसने अत्यंत त्वरेने घोडे जुंपण्यास ऑतोमेदॉनला सांगितले,

कारण अ‍ॅकिलिझच्या खालोखाल याला तो मानीत होता, आणि लढाईत याच्याच आधाराचा तो पुरा भरवसा ठेऊन राही. तेव्हा ऑतोमेदॉनने वायूसारखे पळणारे दोन वेगवान वारु, झॅन्थस नी बॅलिअस हे धुरेला जोडले; ओशिॲनस नदीच्याकाठी चरताना पोदार्गी या राक्षसीला पश्चिम वायूपासून झालेले घोडे ते हेच. बाजूच्या धुरेला त्याने पेडॅसस हा उमदा घोडा जुंपला; तो एइशन नगरी लुटली तेव्हा अ‍ॅकिलिझने जिंकून आणला होता, आणि तो घोडा जरी मर्त्य होता तरी अमर अश्वांच्या बरोबरीचे स्थान तो मिळवू शकला असता.

दरम्यान अ‍ॅकिलिझ तंबूमधून सर्वत्र फिरला व त्याने आपल्या मिर्मिडॉन्सना चिलखते चढवण्यास सांगितले. पर्वतावर मारलेल्या शृंगधारी सांबरावर ताव मारणाऱ्या, रक्ताने जवडे रंगलेल्या उग्र व अधाशी लांडग्याप्रमाणे जे आपल्या लांब पातळ जिभांनी स्वच्छ झऱ्याचे पाणी पिण्यास कळपाने जातात आणि ज्यांच्या अंगांना रक्ताचा व हत्येचा दर्प येत असतो; ज्यांना भय कसे ते ठाऊक नाही, कारण त्यांना चिथावणारी क्षुधा असते-अगदी त्यांच्यासारखेच मिर्मिडॉन्सचे नेते व मंत्री ईकसच्या द्रुतगती वंशजाच्या भल्या शिलेदाराभोवती गोळा झाले आणि त्यांच्यामध्ये, सैनिक व अश्व दोघांनाही उत्तेजन देत स्वतः अ‍ॅकिलिझ उभा राहिला.

उदात्त अ‍ॅकिलिझने पन्नास नौका ट्रॉयला आणल्या होत्या, आणि त्यातल्या प्रत्येकीत पन्नास वल्हेकरी होते. त्यांच्यावर विश्वासार्ह असे पाच नायक त्याने ठेवले होते आणि तो स्वतः सर्वांवर अधिकारी होता. पहिल्या पथकाचा प्रमुख, स्वर्गाहून वाहत येणाऱ्या स्पर्केइअस नदीचा पुत्र, चकाकते कवच धारण करणारा मेनेस्थिअस होता. पेलिअसकन्या दसुंरी पॉलिदोराच्या पोटी अखंडधारा स्पर्केइअसपासून तो जन्माला आला होता; मानवीचा देवाशी समागम होऊन झालेला असूनही त्याला पेरिअरिझपुत्र बोरसचा मुलगा म्हणत, कारण त्याची आई विवाहित पत्नी म्हणून बोरसपाशी रहात होती व तिच्या प्राप्तीसाठी बोरसने खूप संपत्ती दिली होती. दुसऱ्या पथकाचा नेता उदात्त युदोरस होता; हा पॉलिमेली या अविवाहित स्त्रीचा मुलगा; ती फिलास या ढंगदार नर्तकाची मुलगी; सुवर्णशरधारिणी, धडाडीची शिकारी, दायाना हिच्या प्रीत्यर्थ झालेल्या नृत्योत्सवात गाणाऱ्या स्त्रियांमध्ये असलेल्या तिला पाहून आरगॉसच्या प्रतापी हंता तिच्यावर मोहित झाला होता-म्हणून तो, अभीष्ट वरदाता मर्क्युरी तिच्यासह वरच्या मजल्यावरील महालात जाऊन तिच्याशी गुप्तपणे रममाण झाला; त्यावर त्याच्यापासून तिला असाधारणपणे शीघ्रगामी व युद्धात शूर असा धीरोदात्त पुत्र युदोरस झाला. जेव्हा प्रसूतिवेदनांची

अधिष्टात्री देवता इलिथ्युइआ हिने त्याला सूर्यप्रकाशात आणले व त्याने सूर्यबिंब पाहिले, तेव्हा एकेक्लिझ या अॅक्तॉरपुत्राने त्या अर्भकमातेला बायको करून घेतली आणि तिच्या प्राप्तीसाठी पुष्कळ संपत्ती दिली, पण नातवाचे संगोपन पॉलिमिलीचा पिता फिलाज याने केले, सर्वतोपरी सांभाळ केला व स्वतःच्या पुत्रासारखा त्याच्यावर जीव लावला. तिसऱ्या पथकाचा पुढारी मीमॅलसपुत्र पिसॅन्दर हा अॅकिलिझचा सोबती पॅत्रोक्लस याच्या खालोखाल मिर्मिदॉनांमधील सर्वात उत्तम भालाईत होता. वृद्ध उच्चकुलीन वीर फीनिक्स चौथ्या पथकाचा व लर्मिअसचा उदात्त पुत्र अॅल्सिमेदॉन हा पाचव्याचा, असे प्रमुख होते.

अॅकिलिझने आपले सैनिक निवडले व सर्वांना त्यांच्या प्रमुखांकडे स्थाने नेमून दिली. नंतर त्याने खडसावून बजावले, 'मिर्मिदानांनो, माझ्या रागाच्या काळात तुम्ही नौकांवर होतात तेव्हाच्या तुमच्या त्रोजनांविरुद्ध धमक्यांची आठवण करा', तेव्हा तुम्ही सगळे माझ्याबद्दल तक्रार करीत होता; तुम्ही म्हणत होता, "निष्ठुर पेलिअसपुत्रा, तुझ्या आईने तुला अंगावर पित्तरस पाजून वाढवला असेल, म्हणून तू इतका निर्घृण झाला आहेस; तू येथे आम्हाला आमच्या इच्छेविरुद्ध नौकांवर डांबून ठेवतोस; जर तू इतक्या निर्दयपणे वागणार असशील तर आम्ही सागरावरून स्वदेशी परत जावे ते बरे! पुष्कळदा तुम्ही जमा होऊन मला असा दोष दिला आहात. तुम्ही ज्यासाठी इतके दिवस झुरत होतात त्या शस्त्र गाजवण्याच्या महान वीरकृत्यांची वेळ आता आली आहे; तेव्हा प्रत्येक जण त्रोजनांशी लढण्यासाठी उत्साहाने छातीचे कोट करा."

या शब्दांनी त्या सर्वांमध्ये त्याने धैर्य व चैतन्य आणले आणि आपल्या राजाचे शब्द ऐकून त्यांनी आपली पथके रांगांना रांगा भिडवून आणखीच घनदाट केली. वाऱ्यांपासून निवारा देणार असलेल्या एकाद्या उत्तुंग भवनाच्या भिंतीत गवंडी बसवतो त्या दगडासारखी शिरस्त्राणे व मध्यभागी उंचवटे असलेल्या ढाली एकमेकांच्या अगदी नजीक आल्या. ढालीशी ढालीची व शिरटोपांची शिरटोपाशी, तशीच माणसांशी माणसाची दाटी झाली. ते इतके जवळ जवळ होते की त्यांच्या शिरस्त्राणांच्या चकाकत्या बाजूवरील अश्वपुच्छकेसांचे तुरे त्यांनी माना वाकवताच एकमेकांना लागत होते.

त्या सर्वांच्यासमोर दोन पुरुषांनी आपले चिलखत चढवले—पॅत्रोक्लस व ऑतोमिदॉन यांनी; व्यक्ती दोन असल्या तरी मिर्मिदॉन्सचे नेतृत्व करण्यात त्यांचे एकमत होते. मग अॅकिलिझ आपल्या तंबूत गेला आणि नौकेवर घेऊन जाण्यास रौप्यचरणी माता थेतिस हिने जी मजबूत पेटी त्याला दिली होती

व जी अंगरखे, थंडीच्या निवारणार्थ डगले व चांगली जाड कांबळी यांनी तिने भरून दिली होती, तिचे झाकण त्याने उघडले. या पेटीत त्याचा एक दुर्मिळ कलाकुसरीचा पेला होता, त्याचा पिण्यासाठी वापर स्वतःशिवाय कोणी करायचा नाही व तात जव्हशिवाय दुसऱ्या कोणा देवाला त्यातून अर्घ्यदान करायचे नाही असा त्याचा नेम होता. पेटीतून तो पेला काढून त्याने तो गंधकाने स्वच्छ केला; त्यानंतर शुद्ध पाण्याने तो धुतला आणि मग स्वतःचे हात धुवून त्यात मद्य काढले. मग अंगणाच्या मध्यभागी उभा राहून त्याने प्रार्थना केली, आकाशाकडे पाहून मद्याचा अर्घ्य दिला; आणि मेघगर्जनाप्रिय जव्हचे त्याच्याकडे पूर्ण लक्ष होते. ॲकिलिझ मोठ्याने बोलला, "दोदोना स्वामी, पेलॅस्गींच्या दूरस्थ देवा, जेथे न धुतलेल्या पायांचे व जमिनीवर झोपणारे तुझे भविष्यकथक तुझ्याभोवती राहतात त्या शीत दोदोनाच्या अधिष्ठात्या जव्ह राजा, जर तू पूर्वी मी केलेली प्रार्थना ऐकली असशील व ॲकिअनांवर अरिष्टे आणून माझा मान राखला असशील, तर आता या आणखी पुढच्या प्रार्थनेचे फळ मला प्रदान कर. जेथे माझ्या नौका नांगरून पडल्या आहेत त्या या ठिकाणीच मी राहीन; पण बहुसंख्य मिर्मिडॉनांच्या अग्रभागी माझ्या सोबत्याला मी लढाईत धाडीन; हे सर्वसाक्षी जव्ह, त्याला यश मिळो हे मागणे मला दे; तुझे धैर्य त्याच्या हृदयात प्रविष्ट कर की ज्यायोगे हेक्तरला समजून येईल की, माझा शिलेदार एकट्याने लढण्याइतका मर्द आहे, की मी स्वतः युद्धाच्या तुमुलात प्रवेश करीन तेव्हाच तेवढी त्याची मर्दुमकी दुर्दम्य ठरते! त्यानंतर त्याने नौकांपासून लढाईची गर्दी व रणगर्जना हाकलून काढल्या म्हणजे तो चिलखतासह व जवळ भिडून लढणाऱ्या त्याच्या सोबत्यांसह सुखरूप परत यावा हे वरदान कर."

अशी प्रार्थना त्याने केली आणि सर्वांच्या सल्लागार जव्हने त्याची हाक ऐकली. मागण्यांचा काही भाग त्याने खरोखरच प्रदान केला. पण संपूर्ण मागणे मानले नाही. पॅत्रोक्लसने लढाई व झुंज नौकांपासून मागे रेटावी हे मागणे मान्य केले, पण त्याला सुखरूप लढाईतून बाहेर आणणे नाकारले.

पेयनिषेक करून व अशी प्रार्थना केल्यावर ॲकिलिझ परत तंबूत गेला व त्याने पेला पुन्हा आपल्या पेटीत ठेवून दिला.

मग फिरून तो बाहेर आला, कारण त्रोजन व ॲकिअन यांच्यामध्ये चालणारी हिरिरीची लढाई पाहण्याची त्याला अजून आवड होती.

दरम्यान त्रोजनांवर मोठ्या उमेदीने झेप घेईपर्यन्त पॅत्रोक्लसभोवतालचे सशस्त्र पथक पुढे पुढे जात राहिले. ते गांधिलमाशांसारखे झुंडीनी निघाले.

रस्त्याच्या कडेला गांधील माशांची मोहोळी असतात—वेडपट पोरांना त्यांना चिडवण्यात गंमत वाटते—त्यामुळे कोणीही जाणाऱ्या-येणाऱ्याला गांधील माशीचा दंश होण्याचा संभव असतो; नाहीतर एकादा वाटसरू रस्त्याने जाताना त्यांना चुकून डिवचतो; त्याबरोबर प्रत्येक गांधीलमाशी आपल्या लहानग्यांच्या बचावासाठी त्वेषाने उडून बाहेर येते—अगदी तशाच तिरिमिरीने व हिंमतीने मिर्मिदॉन आपल्या नौकांतून जमावाने बाहेर पडले व त्यांची रणगर्जना स्वर्गापर्यन्त पोहोचली. मोठ्यात मोठा आवाज काढून पॅत्रोक्लस आपल्या लोकांना म्हणाला, "मिर्मिदॉनहो, पेलिअसपुत्र ॲकिलिझचे अनुयायी हो, मर्दासारखे वागा, मित्रहो, सारी शक्ती व धैर्य पणाला लावून लढा, म्हणजे मग पेलिअसपुत्रासाठी आपण यश मिळवू तो आर्गाइव्हजच्या नौकादलात कितीतरी अग्र श्रेणीचा पुरुष आहे तो आणि त्याचे शत्रूला भिडून लढणारे अनुयायीही सर्व श्रेष्ठ आहेत—सर्वात शूर अशा या ॲकिअनांचा मान न राखण्यात आपला किती मूर्खपणा झाला ते आता ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉन राजाला कळून येईल."

या शब्दांनी त्याने त्या सर्वांच्या मनात हुरुप व नवचैतन्य आणले, आणि त्यांनी एकजुटीने त्रोजनांवर घाला घातला. ॲकिअनांच्या घोषस्वरांनी पुन्हा नौका निनादल्या, आणि त्रोजनांनी जेव्हा आपापल्या चिलखतांनी चमकून उठणारे मेनिशिअसचा शूर पुत्र आणि त्याचा शिलेदार पाहिले तेव्हा ते डगमगले व त्यांच्या पथकात गोंधळ माजला; कारण त्यांना वाटले की पेलिअसच्या द्रुतगतीपुत्राने आता आपला राग बाजूला ठेवला असावा व ॲगॅमेम्नॉनशी त्याचा समेट झाला असावा; म्हणून प्रत्येकजण जीव वाचवण्यासाठी पळून कुठे जावे याचा विचार करीत सभोवार पाहू लागला.

पॅत्रोक्लसने प्रथम भाल्याचा नेम मारला तो प्रॉतेसिलॉजच्या नौकेच्या पिछाडीस माणसांची दाटी होऊन जी झुंबड उडाली होती तिच्यात, तो लागला. पिरीक्मिझला त्याच्या नेतृत्वाने ॲमिदॉनहून व ॲक्सिअस नदीच्या रुंद प्रवाहाजवळच्या परिसरातून पिओनिअन घोडेस्वार युद्धाला आले होते; त्याच्या उजव्या खांद्यात भाला बसला आणि विवळून तो मागे धुळीत पडला. त्यामुळे त्याच्या लोकात गोंधळ उडाला, कारण त्या सर्वातला उत्कृष्ट योद्धा, असा जो त्यांचा नेता, त्यालाच ठार मारून पॅत्रोक्लसने त्यांना भयभीत केले. याप्रमाणे त्यांना त्याने नौकांपासून हाकलले आणि त्यावेळी भडकलेली आग विझवली; अर्धवट जळालेली ती नौका त्याने तशीच तेथे राहू दिली. आता गगनभेदी कोलाहलात त्रोजन मागे ढकलले गेले आणि त्यांच्यामागे दॅनाअनही

आपल्या नौकांवरून अखंडपणे जयघोष करीत मोठ्या संख्येने धावले. ज्या-प्रमाणे गरजणारे मेघ एकत्रित आणणारा जव्ह एकाद्या उत्तुंग पर्वतावर दाट वितान पसरतो व मग जेव्हा सारी शिखरं, समुद्रात घुसलेली भूशिरे व वनस्थली बरसणाऱ्या आकाशातील अत्यंत चमकत्या प्रकाशात उठून दिसतात, त्याप्रमाणेच नौकांवरून आग घालवून दिल्यानंतर त्या चमकू लागल्या. आता दॅनाअनांनी, उसंत झाल्यामुळे, थोडा वेळ श्वास घेतला; पण युद्धाचा जोर अजून संपला नव्हता; कारण त्रोजन सर्वस्वी बाताहत होऊन मागे हटले नव्हते, तर अजून झुंजतच होते व केवळ निकराच्या मारामारीनेच, धरलेल्या ठिकाणांपासून त्यांचे उच्चाटण होत होते.

मग लढाई जास्त विस्कळित झाली, आणि जेव्हा व जसे साधेल तसे सेनानायक एकमेकांना मारीत होते. मेनिशिअसच्या शूर पुत्राने प्रथम आपला भाला अरलिकस मागे वळत असताच त्याच्या मांडीत खुपसला; टोक आरपार गेले व हाड मोडले; त्यामुळे तो पुढे तोंडघशी पडला. दरम्यान मेनेलॉसने थोआसला छातीत प्रहार केला; ढालीच्या कडेपाशी छातीच्या उघड्या भागावर तो लागला व थोआस मरून पडला. ॲम्फिक्लस आपल्यावर हल्ला करण्याच्या बेतात असलेला फिलिअसपुत्राने पाहिला व तो तसे काही करण्याच्या आधीच, त्याच्या मांडीच्या वरच्या भागात, जिथे स्नायू इतर भागांपेक्षा जाड असतात, तेथे नम धरून त्याने भाला मारला, तो पायाची सर्व स्नायूबंधने फाडून गेला व ॲम्फिक्लसचे डोळे मृत्यूच्या अंधारात मिटले. नेस्तॉरच्या पुत्रांपैकी एकाने ॲन्तिलॉकसने ॲतिम्निअसच्या घशातून आरपार भाल्याचे टोक घुसवले व तो खाली पडला, तेव्हा भावाच्या मरण्याचा सूड घेण्यासाठी मॅरिसने ॲन्ति-लॉकसवर हातघाईच्या झगड्यासाठी उडी घेतली व भाला हातात धरून भावाच्या देहाच्या दोन्ही बाजूस पाय रोवून तो उभा राहिला; पण शूर थ्रॅसिमिडिझ त्याच्यापेक्षा चपळ ठरला. त्याने घाव घालण्याआधीच त्याच्यावर त्याने खांद्याशी प्रहार केला, त्याचा नेम अचूक होता व त्याच्या भाल्याने मॅरिसच्या बाहूच्या मुळातले सारे स्नायू थेट हाडापर्यन्त फाडून काढले, त्यामुळे तो जडपणे भूमीवर पडला व मृत्यूच्या अंधःकारात त्याचे नेत्र मिटले; असे ते सार्पेडॉनचे दोन उमदे सोवती नेस्तॉरच्या दोन पुत्रांच्या हातून मारले जाऊन पाताळलोकी एरिबसकडे गेले. अनेकांच्या नाशास कारण झालेल्या किमीरा या दुर्जय राक्षसी प्राण्याला वाढविणाऱ्या ॲत्रिसॉदॉरसचे ते दोघे लढवय्ये मुलगे होते. ऑइलिअसपुत्र ॲजॅक्सने चेंगराचेंगरीत अडकलेल्या क्लिओबलसवर उडी घेऊन त्याला जिवंत धरले पण मानेवर तलवारीचा घाव घालून त्याला तेथल्या

तेथेच ठार केले. त्याच्या रक्ताचा उग्र दर्प तलवारीला येऊ लागला आणि कृष्ण-मृत्यूने व दैवाच्या प्रबळ हाताने त्याला पकडीत धरून त्याचे डोळे मिटले.

पेनेलिऑस व लायकॉन आता निकट युद्धार्थ एकमेकांना भिडले कारण त्यांनी एकमेकांवर फेकलेल्या भाल्यांचे नेम चुकले होते; त्यांच्या भाला फेकी निष्फळ झाल्यामुळे आता दोघांनी तलवारी उपसल्या. पेनेलिऑसच्या शिरस्त्राणाच्या तुरेदार टोकावर लायकॉनने घाव घातला पण त्याची तलवार मुठीजवळ तुटली, पण पेनेलिऑसने लायकॉनवर केलेला वार मात्र मानेवर कानाखाली बसून पाते इतके खोल गेले की केवळ कातडीलाच तुटलेले डोके लटकत राहिले व त्याच्या शरीरात प्राणाची धुगधुगीही उरली नाही. मेरिऑनिझने पाय उतार होऊन अॅकॅमॉसचा पाठलाग केला व तो रथावर चढण्याच्या बेतात असता त्याला गाठून त्याच्या उजव्या खांद्यातून भाला घुसवला; त्यामुळे अॅकॅमाज रथावरून उलटापालटा होऊन खाली कोसळला व मृत्यूच्या अंधारात त्याचे डोळे मिटले. आयदोमिनिअसने एरिमासच्या मुखात भाला खुपसला; त्याचे ब्रॉंझचे टोक करकरत थेट पार मेंदूच्या खाली शुभ्र हाडांना फोडीत गेले, दात सगळे ठोकरले गेले व एरिमाजच्या दोन्ही डोळ्यातून रक्त उफाळून बाहेर आले; तसेच त्याच्या तोंडातून व नाकपुड्यातूनही खदखदत ते बाहेर आले, आणि मरणाच्या काळोखाने त्याला परिवेष्टित केले.

याप्रमाणे दॅनाअनांच्या सैनिकप्रमुखानी प्रत्येकी आपापला माणूस मारला. मेंढपाळाच्या हलगर्जीपणामुळे मुख्य कळपापासून दूर गेलेली करडे किंवा कोकरे टेकडीच्या उतारावर एकटी असलेली पाहून बुभुक्षित, वखवखलेले लांडगे त्यांच्यावर जशी झडप घालतात–कारण त्या बछड्यांना आपला बचाव करता येत नाही–तसेच आता दॅनाअन त्रोजनांवर तुटून पडले आणि त्रोजन घाबरगुंडी उडून अभद्रसूचक आकान्त करीत पळाले व इतःपर लढण्याची खुमखुमी त्यांच्यात अजिबात उरली नाही.

दरम्यान महान अॅजॅक्सने हेक्तरच्या देहात भाला खुपसण्याचा प्रयत्न चालू ठेवला; पण हेक्तर इतका कुशल होता की त्याने आपले रुंद खांदे आपल्या बलीवर्द चामड्याच्या ढालीमागे नीट झाकून घेतले होते; सूंसूं करीत येणाऱ्या बाणांवर व भाल्यांच्या जड धडकीवर त्याची सावध अशी सतत नजर होती. त्यादिवसाच्या जयापजयाचे पारडे आता फिरले आहे हे त्याने पुरते ओळखले; तरीही तो आपल्या स्थानी दृढ राहून आपल्या सोबत्यांचा बचाव करण्याचा प्रयत्न करीत होता. जव्ह सोसाट्याचा वारा तयार करीत असता निरभ्र आकाशात ऑलिम्पसवरून एकादा ढग वर जावा तशाच त्रेधातिरपिटीत

पराजित झालेले त्रोजन पळाले व त्यांच्या माघार घेण्यात काही शिस्त किंवा पद्धत राहिली नाही. हेक्तरच्या वेगवान वारुंनी त्याला त्याच्या शस्त्रसंभारासहित युद्धातून बाहेर वाहून नेले, आणि त्याने खोल खंदकाच्या कोंडीत सापडलेले त्रोजन सैन्य त्यांच्या मनाविरुद्ध मागे सोडले. धुरेला जुंपलेल्या कित्येक घोड्यांच्या जोड्यांनी रथाचा दांडा मोडून टाकून पळून जातांना आपल्या धन्यांचे रथ मागेच ठेवले. दॅनाअन्सना आवेशाने हाक देऊन त्रोजनांचा अत्यंत त्वेषाने पॅत्रोक्लसने पाठलाग केला; त्रोजन आता एकत्रित एकजुटीने राहिले नव्हते व भयाकुल आरोळ्या ठोकीत पळापळ करीत, येण्याजाण्याच्या साऱ्या वाटांवर त्यांनी गर्दी केली, त्यांनी उडवलेल्या धुळींच्या ढगांनी आकाशावर कृष्णच्छाया आली आणि तंबूंकडून व नौकांकडून नगरीकडे पळून जाण्याच्या कामी घोड्यांनी आपल्या शरीरातील शक्तीचा कणन्‌कण वेचला.

जेथे जेथे बरचसे सैनिक अस्ताव्यस्त पळताना आढळले तेथे तेथे पॅत्रोक्लसने आपले घोडे वळवले व आपल्या अनुयायांना पुढे सरसावण्यास उत्तेजन देणे चालू ठेवले. चारी बाजूंना रथ मोडून पडत होते आणि बरेचसे योद्धे आपल्या रथांवरून कोसळून पॅत्रोक्लसच्या रथाच्या चाकांखाली येऊन पडत होते. पॅत्रोक्लसचे अमर घोडे ही देवांनी पेलिअसला दिलेली देणगी होती. ते वेगाने धावत धावत एका उडीत खंदक ओलांडून जात. पॅत्रोक्लसला हेक्तरला गाठण्याची तीव्र इच्छा होती. कारण हेक्तरला भाल्याने ठार करण्याचा त्याचा दृढनिश्चय झालेला होता. पण हेक्तरचे घोडे त्याला त्वरेने रणमैदानातून दूरवर घेऊन चालले होते. जेव्हा जेव्हा मानव आपल्या न्यायालयात विपरीत निर्णय देऊन, स्वर्गस्थ शक्तींचे संकेत झुगारून, न्यायाला हाकून देतात, तेव्हा तेव्हा त्यांना शिक्षा करण्यासाठी जव्ह शिकस्तीचा पाऊस पाडतो. मग त्या शरदऋतूतील दिवशी अंधारात बुडलेली विकल पृथ्वी न्यायालयापुढे मान वाकवते--सगळ्या नद्या पूर्ण भरून वाहू लागतात--

कृष्णसागराला मिळण्यासाठी पर्वतांवरून गर्जत, बेधडक उडी ठोकणारे जलप्रवाह खाली पडून नव्या नव्या वाटा आपल्या आवेगाने फोडीत जातात व मानवांच्या दैनंदिन कार्यक्रमाची दशा होऊन जाते--अगदी अशाच आवेगाने व जोराने त्रोजनांचे घोडे धावत होते.

आता सर्वात जवळची सेनापथके पॅत्रोक्लसने वेगळी पाडून त्यांना परत नौकांकडे हाकलीत नेले. ते नगरीला पोहोचण्यासाठी शर्थ करीत होते, पण हा त्यांना ते करू देत नव्हता, आणि नदी, नौका व भिंत यांच्यामध्ये सापडलेल्या त्यांच्यावर तो चाल करून आला. रणांगणी पडलेल्या अनेक

सोबत्यांच्या मरणाचा त्याने तेव्हा सूड उगवला. प्रथम त्याने प्रोनोउसच्या ढालीच्या कडेजवळ उघडया पडलेल्या छातीवर भाला मारला व तो जडपणे भूमीवर पडला. मग त्याने एनॉप्सपुत्र थेस्टॉरवर झेप घेतली; तो आपल्या रथात अंगाचे मुटकुळे करुन बसला होता, कारण त्याला काय करावे ते समजेनासे झाले होते व लगाम त्याच्या हातातून हिसकावले गेले होते. त्याच्यापाशी जाऊन पॅत्रोक्लसने त्याच्या उजव्या बाजूच्या जबडयात भाला खुपसला; याप्रमाणे त्याच्या दातात भाला अडकवून भाल्यानेच त्याला त्याने रथाच्या कडेवरून ओढून काढले--जसा समुद्रात शिरलेल्या खडकाच्या टोकावर बसलेला कोणी मनुष्य गळाने व दोरीने पाण्यातून एकादा बळकट मासा ओढून काढतो. अगदी तसेच आ वासलेल्या थेस्टॉरला त्याने रथातून ओढून भूमीवर पालथे पाडले व तोंडघशी पडतापडताच त्याचा प्राण गेला. हे पाहून एरिलॉस त्याच्यावर हल्ला करण्यास येत असता पॅत्रोक्लसने त्याच्या डोक्यावर नेमका एक दगड हाणला; तेव्हा त्याच्या शिरस्त्राणात त्याचा मेंदू पार तुटून फुटून तो भूमीवर उलटापालटा कोसळला आणि मृत्यूवेदनांची पकड त्याच्यावर बसली. मग पॅत्रोक्लसने एकामागून एक एरिमस, अॅम्फोतेरस, एपाल्तिझ, लेपोलेमस, दॅमॅस्तॉरपुत्र एकिअस, पिरिझ, इफिअस, युइप्पस आणि आर्गिआसपुत्र पॉलिमेलस या वीरांना लोळवले.

आता आपले सोबती, बिनपट्टयाचे डगले घालणारे लोक मेनिशिअसपुत्र पॅत्रोक्लसकडून पराभूत होताना सार्पेडॉनने पाहिले तेव्हा त्याने लिसिअनांची कानउघाडणी केली; "धि:कार असो तुम्हाला! कुठे पळून जाता आहा तुम्ही? आपल्या अंगचे पाणी जरा दाखवा, मी स्वत: त्या माणसाशी लढाईत भिडून पत्ता लावतो की हा इतका बरचढ आहे तरी कोण? त्याने आपली फार हानी केली आहे व पुष्कळ शूरांना भूमीवर निजवले आहे."

बोलता बोलता त्याने आपल्या रथावरून उडी टाकली व हे पाहून पॅत्रोक्लसनेही भूमीवर उडी घेतली. मग उत्तुंग पर्वतावरच्या दुर्गमस्थानी गरुडतुल्य-चोचींची व आकडेदार पंज्याची गिधाडे किंचाळत एकमेकांचे लचके तोडतात तसे दोघे एकमेकांवर मोठयाने आरोळ्या ठोकीत धावून गेले.

कारस्थानी सॅटर्नचा पुत्र त्यांच्याकडे दयार्द्रपणे खाली पाहून त्याची पत्नी व भगिनीही असणाऱ्या ज्यूनोला म्हणाला, "अरेरे, ज्याच्यावर माझे इतके जिवाभावाचे प्रेम आहे त्या सार्पेडॉनच्या नशिबी पॅत्रोक्लसच्या हाती मरण असावे ना? त्याला लढाईतून उचलून बाहेर काढून लिसिआच्या सुपीक भूमीत अनाहत असा सुखरूप नेऊन ठेवावा की आताच त्याला

मेनिशिअसपुत्राच्या हातून युद्धात पडू द्यावा——या दोन्हीतून काय करावे याबद्दल माझे मन द्विधा झाले आहे."

आणि ज्यूनोने उत्तर दिले, "महाभयावह सॅटर्नपुत्रा, तू हे काय म्हणत आहेस ? ज्याचा शेवट दैवाने केव्हाच ठरविलेला आहे त्या मर्त्य मानवाला मृत्यूच्या जबड्यातून तू पळवून नेणार आहेस ? तुझी इच्छा असेल तसे कर, पण आम्ही सगळेच तुझ्या मताचे असणार नाही. मी पुढे असे म्हणते व ते म्हणणे मनावर बिंबवून घे, की जर तू सार्पेदॉनला त्याच्या घरी सुरक्षित पाठविलास तर देवातला कोणी दुसराही, आपला पुत्र लढाईतून सुरक्षित बाहेर काढण्याची इच्छा करील; कारण ट्रॉयभोवती देवांचे अनेक पुत्र लढत आहेत, आणि तू प्रत्येकाचा मत्सर तुझ्या कृत्याने जागृत करशील. तथापि, जर तुझी त्याच्यावर माया असली व त्याची तुला दया येत असली, तर त्याला खरोखरच पॅट्रोक्लसच्या हाती आधी रणी पडू दे; पण त्याच्या देहातून प्राण जाताच त्याला रणांगणावरून घेऊन जाण्यास मृत्यूला व मधुर निद्रेला पाठव; ती दोघे त्याला लिसिआच्या विस्तीर्ण प्रदेशात नेतील; तेथे त्याचे भाऊ व भाऊबंद त्याचे दफन करतील व वर मातीचा ढीग व स्तंभ उभारून मृतास उचित असा सन्मान त्याचा करतील."

देवामानवांच्या पित्याने हे कबूल केले; परंतु स्वगृहापासून दूर, ट्रॉयच्या संपन्न मैदानावर पॅट्रोक्लस ज्याचा प्राण घेणार होता त्या आपल्या पुत्राच्या सन्मानार्थ जव्हने भूमीवर रक्ताचा पाऊस पाडला.

ते जेव्हा आता एकमेकांच्या जवळ आले तेव्हा पॅट्रोक्लसने सार्पेदॉनचा शूर शिलेदार थ्रॅसिदिमस याच्या ओटी पोटावर घाव घालून त्याला ठार मारले. मग सार्पेदॉनने पॅट्रोक्लसवर भाला नेम धरून फेकला पण भाला त्याला न लागता पेडॅसस या त्याच्या घोड्याच्या उजव्या खांद्यावर बसला आणि घोडा मोठ्याने किंकाळी फोडून जीव जाईपर्यन्त धुळीत विव्हळत पडला. मग दुसरे दोन घोडे उधळू लागले; रथाचा दांडा तडकला आणि त्यांच्याबरोबर धुरेला जोडलेला घोडा पडल्यामुळे ते घोडे लगामात गुंतून अडकले; पण ऑटोमेडॉनला अशावेळी काय करायचे ते ठाऊक होते; एक पळही न दवडता त्याने आपल्या बळकट मांडीच्या बाजूला लटकणारे तीक्ष्ण पाते उपसले व बंध कापून तिसऱ्या घोड्याला मोकळे केले; त्यावर दुसऱ्या दोन घोड्यांनी स्वत:ला सावरले आणि लगामावर जोराने नेट लावून ते पुन्हा जोडीने लढाईत घुसले.

सार्पेदॉनने आता दुसऱ्यांदा पॅट्रोक्लसवर नेम धरला. पण भाला पुन्हा चुकला; त्याचे टोक पॅट्रोक्लसला न लागता त्याच्या डाव्या खांद्यावरून गेले.

मग पॅत्रोक्लसने आपल्यापरीने नेम धरला व ही त्याची वेगाची भाला फेक व्यर्थ गेली नाही; कारण जेथे शरीरमध्याचे अखंडस्पंदी हृदयाभोवती वेष्टण असते तेथेच नेमका सार्पेदॉनवर घाव पडला. नौकांच्या काष्टांसाठी लाकुड-तोडयांनी कुऱ्हाडीचे घाव घातलेल्या एकाद्या ओक किंवा सिल्व्हर पॉपलर अथवा उत्तुंग पाईन वृक्षासारखा सार्पेदॉन कोसळला—अगदी तसाच आपल्या रथापुढे व घोडयांपुढे आपादमस्तक पसरून कण्हत रक्तरंजित धुळीत मुठी वळू लागला. सिंह एका उडीत झेप टाकून एकाद्या गुरांच्या कळपातील एकाद्या प्रचंड काळया बैलाला आपल्या जबडयात जखडतो तेव्हा तो बैल जसा डरकाळया फोडीत त्याच्या पकडीत मरतो—अगदी तसाच पॅत्रोक्लसच्या हातांनी रणात पडलेला तो लिसिअन योद्धयांचा नेता मरणाच्या जबडयात तडफडू लागला. त्याने आपल्या विश्वासून सोबत्याला हाक घालून म्हटले, "ग्लॉकस, माझ्या बंधो, वीरांतल्या श्रेष्ठ वीरा, तुझी सारी शक्ती पणाला लाव; वीर सैनिकाला शोभेलसे लढण्यासाठी कधी घेतली नसशील अशी साऱ्या बळानिशी उडी घे. प्रथम लिसिअन सेनानायकात सर्वत्र फिरून त्यांना सार्पेदॉनसाठी लढण्याचा आदेश दे; मग तू स्वतःही माझे चिलखत लुटीपासून बचावण्यासाठी युद्ध कर. जर ॲकिअनांनी ते चिलखत मी त्यांच्या नौकांपाशी रणात पडलो असता यावेळी माझ्याकडून लुटले, तर माझे नाव यापुढे आणि निरंतर तुला भुतासारखे पछाडील. तुझ्याकडून शर्थ कर व माझ्या साऱ्या लोकांना एकत्र बोलाव."

तो बोलत असता मृत्यूने त्याचे डोळे मिटवून टाकले. त्याच्या छातीवर टांच रोवून पॅत्रोक्लसने त्याच्या शरीरातला भाला उपसून काढला, त्याबरोबर त्याची ज्ञानेंद्रियेही शरीरातून बाहेर पडली व पॅत्रोक्लसने भाल्याचे अग्र सार्पेदॉनच्या जीवाबरोबरच बाहेर काढले. जवळच आपल्या स्वामीने आपल्याला वाऱ्यावर सोडून दिलेले पाहून भयंकर भयभीत होऊन पिसाळल्यासारखे फूत्कार करणाऱ्या घोडयांना मिर्मिदॉन्सनी धरून ठेवले.

सार्पेदॉनचे शब्द ऐकून ग्लॉकस दुःखाने व्याकुळ झाला, कारण त्याला काहीही मदत करणे त्याला शक्य नव्हते. त्याला आपल्या एका हाताला दुसऱ्या हाताने आधार द्यावा लागत होता, कारण तो भिंतीवर हल्ला करीत असता, भिंतीचे संरक्षण करणाऱ्या त्यूसरने मारलेल्या बाणामुळे झालेल्या जखमेच्या त्याच्या हाताला फार वेदना होत होत्या. म्हणून त्याने दूरवर बाण मारणाऱ्या ॲपोलोची प्रार्थना केली, "हे देवराज, लिसिआच्या संपन्न भूमीतून असो किंवा त्रॉयमधून असो—जिथे असशील तेथे तुझ्या पीठावरून माझी प्रार्थना ऐक; कारण आतांच्या माझ्यासारख्या संकट ग्रस्ताची प्रार्थना तू सर्वस्थानी ऐकू शकतोस. मला

क्लेशप्रद जखम झाली आहे, वेदनेने माझा हात दुखत आहे, रक्त वाहणे थांबवता येत नाही आणि दुखापतीने माझा सारा हात लुळा पडला आहे, त्यामुळे मला माझे खड्ग् धरता येत नाही किंवा शत्रूच्या गर्दीत घुसून झुंजही देता येत नाही जरी आमचा राजा जोव्हपुत्र सार्पेदॉन मारला गेला आहे तरी देखील मला काही करता येत नाही, जव्हने आपल्या पुत्राचे संरक्षण केले नाही, म्हणून हे देवराज, तू माझी जखम बरी कर. वेदनेचे शमन कर व लिसिअनांना उत्तेजन देण्याचे आणि रणी पडलेल्या स्वामीच्या देहाभोवती त्यांच्यासह लढण्याचे अशा दोन्ही कामी बळ दे."

अशी प्रार्थना त्याने केली आणि अॅपोलोने ती ऐकली. त्याने त्याच्या वेदनेचा उपशम केला, जखमेतल्या काळ्या रक्ताचा प्रवाह थांबवला व त्याला नवी शक्ति दिली. हे सारे ग्लॉकसच्या लक्षात आले व प्रतापी देवाने आपली प्रार्थना ऐकली याची त्याला कृतज्ञ जाणीव झाली. तेव्हा तात्काळ त्याने लिसियाच्या सेनानायकांमध्ये जाऊन त्यांना सार्पेदॉनच्या देहाभोवती लढण्यास बोलाविले. त्यांच्यामधून नंतर ट्रोजनांमध्ये जाऊन त्याने पॅन्थौसपुत्र पॉलिदॅमास व अॅगेनॉर यांना तसेच सांगितले; मग तो ईनिआस व हेक्तर यांच्या शोधार्थ गेला आणि ते भेटले तेव्हा त्यांना म्हणाला, "हेक्तर, तू आपल्या मित्रपक्षीयाना अजिबात विसरला आहेस; ते इथे मित्रांपासून व घरापासून दूर असे तुझ्याखातर इथे खितपत पडतात व तू त्यांना आधार देण्यास काहीही करीत नाहीस. लिसिआचा जो साक्षात सत्त्वस्वरूप तसाच बलस्वरूपही होता, तो लिसिअन योद्ध्यांचा नेता सार्पेदॉन पडला; पॅट्रोक्लसच्या भाल्याच्याद्वारे मार्सने त्याला आडवा केला. मित्रहो, त्याच्या बाजूला उभे रहा व मिर्मिदॉनांना त्याचे चिलखत ओरबडून नेऊ देऊ नका, किंवा नौकांपाशी जे सारे डॅनाअन आपण भाल्यांनी भोसकले त्यांच्या सूडाखातर त्याच्या देहाचा अवमान त्यांना करू देऊ नका."

तो असे बोलला त्याबरोबर ट्रोजन आत्यंतिक व अनावर शोकात बुडाले; कारण सार्पेदॉन जरी परदेशीय होता तरी त्यांच्या नगरीचा तो एक मुख्य आधार होता; कारण त्याच्याबरोबर खूप लोक होते आणि स्वतः तो सर्वांचा अग्रणी होता. सार्पेदॉनच्या पतनामुळे संतापलेल्या हेक्तरच्या पुढाकाराने ते सारे ट्रोजन तात्काल सर्व सामर्थ्यानिशी डॅनाअन्सवर चालून गेले, तर मेनिशिअसपुत्र पॅट्रोकसच्या बेडर हिमतीने अॅकिअनांनाही प्रोत्साहन मिळाले. तो प्रथम–ज्या उभय अॅजॅक्सांना खरे म्हणजे काही सांगायचीही गरज नव्हती–त्यांना म्हणाला, "अॅजॅक्सहो, जी मर्दुमकी तुम्ही सर्वदाच दाखविलेली आहे ती किंवा

त्याहूनही अधिक दाखवण्याची आता तुम्हाला संतोषदायक प्रवृत्ती होवो– ॲकिअनांच्या भिंतीवरून सर्वांच्या अगोदर उडी मारून येणारा सार्पेदॉन आता पडला आहे; त्याचा देह घेऊन त्याची आपण विटंबना करू या, त्याच्या खांद्या-वरून चिलखत ओरबाडून काढू या व जर त्याचे सोवती तो देह सोडवून नेण्याचा प्रयत्न करू लागले तर त्यांना ठार मारू या."

आधी जे लोक स्वतःच पूर्ण उत्सुक होते त्यांना तो असे बोलला; तेव्हा एका बाजूने त्रोजन व लिसीआवासी आणि दुसऱ्या बाजूने मिर्मिदॉन व ॲकिअन्स दोघांनीही आपली पथके अधिक प्रबळ केली आणि ते सार्पेदॉनच्या देहाभोवती एकसारखे आरडाओरडा करीत जिवावर उदार होऊन लढले. ते एकमेकांना भिडले तेव्हा त्यांच्या शस्त्रास्त्रांचा खणखणाट प्रचंड होता, आणि जव्हने आपल्या पुत्राच्या देहावरील लढाई अधिक त्वेषपूर्ण व्हावी म्हणून लढतीवर दाट अंधार पाडला.

सुरवातीला त्रोजनांनी ॲकिअनांवर थोडी आघाडी मिळवली, कारण मिर्मिदॉन्सपैकी एक सर्वोत्तम योद्धा मारला गेला, तो होता एपिगिअस भद्रनगरी बुदिअमचा काही काळ राजा असलेल्या थोर ॲगॅक्लिझचा पुत्र; पण नंतर लौकरच स्वतःच्या एका शूर भाऊबंदाला मारल्यामुळे त्याने पेलिअस व थेतिस यांच्याकडे आश्रय घेतला होता, त्यांनी त्याला उत्कृष्ट अश्वभूमी म्हणून विख्यात असलेल्या इलिअमकडे, ॲकिलिझच्या नेतृत्वाखाली त्रोजनांशी लढण्यासाठी पाठवले. त्याने सार्पेदॉनचा देह उचलला असतानाच हेक्तरने त्याच्या डोक्यात दगड घातला, व शिरस्त्राणाच्या आतल्या आत त्याच्या मेंदूचा चेंदामेंदा होऊन तो सार्पेदॉनच्या देहावर तोंडघशी पडला व तेथेच मरण पावला. सोबत्याच्या मरणाने पॅत्रोक्लस कोपाविष्ट झाला आणि डॉव्‌पक्षी किंवा स्टार्लिंग पक्षी यांच्या घोळक्यावर झडप घालणाऱ्या ससाण्यासारखा सैन्याच्या पुढच्या रांगातून वेगाने गेला. अगदी त्या ससाण्याच्याच त्वरेने सोबत्याच्या मृत्यूचा सूड उगविण्यासाठी, हे उदात्त पॅत्रोक्लस, तू थेट त्रोजन्स व लिसिअन यांच्यावर धावून गेलास. तात्काळ त्याने इथिमेनिझपुत्र स्थेनेलॉस याच्या मानेवर दगडाने प्रहार करून मानेला पाठीच्या कण्याशी व डोक्याशी जोडणारी स्नायू-बंधन तोडली, यावर हेक्तर व त्याच्या लोकांची पुढली फळी मागे हटली. एखाद्या पारितोषिकासाठीच्या स्पर्धेत किंवा युद्धातही मनुष्य शूल जितका लांब फेकू शकेल. तितक्या अंतरावर ॲकिअनांपुढे त्रोजन मागे हटले. त्यांना पुन्हा सरसावण्याला उद्युक्त करणारा पहिला वीर होता लिसिअनांचा नायक ग्लॉकस; त्याने बॅथिक्लिझला मारले; हा हेलासमध्ये राहणाऱ्या व मिर्मिदॉनां-

पैकी जो सर्वात सधन होता त्या कॅल्कॉनचा पुत्र. हा बॅथिक्लिझ ग्लॉकसचा पाठलाग करीत त्याला धरणार तेवढयात ग्लॉकसने उलटून आपला भाला थेट त्याच्या छातीच्या मध्यभागी खुपसला; तेव्हा बॅथिक्लिझ जडपण भूमीवर पडला, व इतक्या उमद्या माणसाच्या मरणाने अॅकिअनांना घोर निराशने ग्रासले, तर त्रोजन विजयोत्साहात मोठया जमावाने सार्पेदॉनच्या मृतदेहाभोवती येऊन ठेपले. तरीही आपल्या पराक्रमाची जाणीव होऊन अॅकिअनांनी सरळ त्यांच्यावर चाल केली.

मग मरिऑनिझने एका शिरस्त्राणधारी त्रोजन योद्धयास ठार केले, तो होता लॅओगॉनस, लोकांकडून देवासारखा मान मिळत असलेल्या इदापर्वतस्थ जव्हच्या पुजाऱ्याचा पुत्र. मेरिऑनिझने त्याच्या कानाखाली व जबडयाखाली घाव घातला त्यामुळे त्याच्या देहातून प्राण निघून जाऊन मृत्यूची छाया त्याच्यावर पसरली. नंतर इनिआसने मेरिऑनिझवर तो पुढ येत असता त्याच्या ढाली-खाली त्याला मारण्याच्या अपेक्षेने नेम धरून भाला फेकला; पण तो येत असलेला पाहून मेरिऑनिझ पुढे ओणवा झाला व तेव्हा तो भाला त्याच्या अंगावरून जाऊन त्याचे टोक भूमीत रुतले व मार्सने त्यातला जोर काढून घेईपर्यन्त त्याचा दांडा थरथरत राहिला. अशाप्रकारे तो भाला इनिआसच्या हातून वेगाने सुटून, फुकट जाऊन भूमीवर थरथरत पडला. ईनिआस रागावून म्हणाला, "मेरिऑनिझ, तू नर्तक चांगला आहेस; पण जर माझा भाला तुला लागला असता तर त्याने तुझा त्वरित शेवट लावला असता."

आणि मेरिऑनिझने उत्तर दिले, "ईनिआस, तू कितीही शूर असलास तरी तुझ्याविरुद्ध लढण्यास येणाऱ्या प्रत्येक जणाचा शेवट काही तुला लावता येणार नाही. तू माझ्यासारखा एक नुसता मर्त्यमानवच आहेस; व तू कितीही बलवान आणि आत्मनिर्भर असलास तरी तुझ्या ढालीच्या मध्यावर मी माझा भाला मारला तर मी त्वरित तुला पराजित करीन आणि तू आपला प्राण उमद्या अश्वांचा स्वामी हेदिझ याला देशील."

यावर मेनिशिअसपुत्राने त्याला छेडले, तो म्हणाला, "मेरिऑनिझ, जरी तू वीर असलास तरी असे बोलू नयेस; टोमणे मारणाऱ्या भाषणांनी काही त्रोजनांना या मृत देहापासून दूर घालवता येणार नाही. तसे होण्यापूर्वी त्यांच्यापैकी कांहींना भूमीखाली अगोदर जावे लागेल; लढाईत घावच घातले पाहिजेत; शब्द फक्त मंत्रणेच्या उपयोगी . तेव्हा तू युद्ध कर व तोंडातून शब्द काढू नको."

असे बोलत असताच तो सर्वांच्या पुढे निघाला, व हा वीरही त्याच्यासह पुढे झाला. पर्वतातील एकाद्या वनमार्गावर लाकुडतोडयांच्या कुऱ्हाडीचे

थडाथड घाव जसे दूरवर ऐकू जातात, अगदी तसाच खणाखणीचा आवाज आता भूमीवर उठला–ब्रॉझच्या चिलखतांच्या आणि दणकट वृषभ चामड्याच्या ढालींच्या धडकांचे ध्वनी, लोक एकमेकांवर आपल्या खड्गांनी व दोन्ही टोके तीक्ष्ण असणाऱ्या भाल्यांनी प्रहार करीत असताना ऐकू येत होते. सार्पेदॉनला ओळखून काढण्यास यावेळी माणसाला तीक्ष्ण डोळ्यांची जरूर होती—इतका तो आपादमस्तक भाले, रक्त व धूळ यांनी झाकून गेला होता. वसन्तऋतूत दुधाच्या भरून ओसंडून जाणाऱ्या भांड्याभोवती जशा माशा घोंघावतात तशी लोकांनी त्या देहाभोवती गर्दी केली–अगदी तसेच ते सार्पेदॉनाच्याभोवती गोळा झाले; आणि जव्हनेही पळभरसुद्धा आपली तीक्ष्ण दृष्टि त्या लढाईवरून टळू दिली नाही; तर तो सगळा वेळ तिकडे पाहातच राहिला; कारण आता पॅत्रोक्लसचा जीव घेण्यास कुठला मार्ग उत्तम तो ते मनाशी ठरवीत होता. तो विचार करीत होता की सार्पेदॉनच्या देहाभोवतीच्या लढाईत पॅत्रोक्लसचा शेवट करण्यास व त्याचे कवच काढून घेण्यास हेक्तरला आताच संधी द्यावी, की अजूनही पॅत्रोक्लसला त्रोजनांना आणखी पीडू द्यावे. अखेर त्याला सर्वोत्तम मार्ग हा वाटला की पेलिअसपुत्र ॲकिलिझ याच्या त्या शूर शिलेदाराने आधी हेक्तरला व त्रोजनांना नगरीकडे परत हाकावे आणि पुष्कळांचे प्राण घ्यावे म्हणून प्रथम त्याने हेक्तरला गलित धैर्य केले; त्यामुळे तो रथावर चढून पळाला व इतर त्रोजनानाही त्याने पळण्यास सांगितले; कारण त्याला दिसले की जव्हचा जयापजयाचा ताजवा त्याच्याविरुद्ध झुकला आहे. शूर लिसिअनही आता ठामपणे जागा धरून राहीनात; प्रेतांच्या ढिगाऱ्यात छातीत घाव बसलेला आपला राजा पडलेला पाहून ते हताश झाले होते–कारण सॅटर्नपुत्राने लढाई निकरास आणली तेव्हा पुष्कळ लोक मरून त्याच्यावर पडले होते. तेव्हा ॲकिअनांनी सार्पेदॉनचे चकचकीत चिलखत त्याच्या खांद्यावरून ओढून काढले आणि मेनिशिअसच्या शूर पुत्राने ते नौकांकडे नेण्यासाठी आपल्या लोकांना दिले. मग वादळी ढगाचा स्वामी जव्ह ॲपॉलोला म्हणाला, "प्रिय फीवस जा, तुला विनंती करतो आहे मी. सार्पेदॉनला शस्त्रांच्या टप्प्यापार ने; त्याच्या देहावरचे काळे रक्त पुसून काढ आणि मग त्याला दूर घेऊन जा; जेथे नदीत त्याला धुता येईल तेथे ॲम्ब्रोसिआने त्याचे विलेपन कर व अमरवस्त्रे त्याच्या देहावर घाल. हे झाल्यावर मृत्यू आणि निद्रा या चपळ दूतांच्या स्वाधीन त्याला कर; ते त्याला थेट लिसिआच्या संपन्न भूमीला नेतील; तेथे त्याचे भाऊ व भाऊबंद त्याचे दफन करतील आणि मृताच्या उचित सन्मानासाठी त्याच्या स्मरणार्थ त्याच्यावर मातीचा ढिगारा व स्तंभ दोन्ही उभारतील."

याप्रमाणे तो बोलला. अॅपॉलोने आपल्या पित्याची आज्ञा पाळली आणि इदाच्या शिखरावरून खाली येऊन त्याने लढाईच्या गर्दीत प्रवेश केला. तात्काल त्याने सार्पेदॉनला शस्त्रांच्या टप्प्याबाहेर नेले, आणि नंतर दूरपर्यन्त वाहून नेऊन नदीत स्नान घातले. अॅम्ब्रोसिआने विलेपन केले व अमर वस्त्रांनी आच्छादले. हे झाल्यावर त्याने त्याला मृत्यू व निद्रा या दोन शीघ्रवेगी दूतांच्या स्वाधीन केले व त्यांनी लौकरच त्याला लिसिआच्या संपन्नभूमीत नेऊन ठेवले.

दरम्यान पॅत्रोक्लसने हृदयातील अहंकाराने व मूर्खपणाने प्रेरित होऊन आपल्या घोड्यांना व ऑतोमेदॉनला ओरडून हाकारीत त्रोजन व लिसिअन यांचा पाठलाग केला. त्याने जर पेलिअसपुत्राचा आदेश तेवढा पाळला असता तर तो मरणापासून बचावून दुखापत न होता परतला असता. पण जव्हच्या योजना मानवी बुद्धीच्या आवाक्यापलीकडे असतात. तो शूर पुरुषालाही पळायला लावील व जयश्री त्याच्याहातून पटकन काढून घेईल; किंवा कदाचित पुन्हा तो त्याला लढाईस प्रवृत्त करील–जसे त्याने आता पॅत्रोक्लसच्या मनात अतिउत्साह उत्पन्न करून त्याला लढायला लावले होते.

हे पॅत्रोक्लस, देवांनी जेव्हा तुझी व तुझ्या नियतीची गाठ घालून देण्यासाठी तुला याक्षणी पाचारले तेव्हा तुझ्या हातून पहिला व शेवटचा कोण मारला गेला? प्रथम अॅद्रेस्तस, ऑतोनौस, एकेक्लस, पेरिमस हा मेगॅजचा पुत्र, एपिस्तॉर व मेलॅनिपस यांना मारल्यानंतर त्याने मारले एलॅसस, म्युलिअस व पायलार्तिझ–इतके त्याने ठार केले, पण बाकीच्यांनी पळून जाऊन आपले प्राण वाचवले.

यावेळी पॅत्रोक्लसचा बेत हाणून पाडून त्रोजन्सना साह्य करण्यासाठी जर फीबस अॅपॉलो तटावर ठामपणे उभा राहिला नसता तर पॅत्रोक्लसच्या हस्ते अॅकिअनांनी त्रॉय घेतले असते, कारण त्याचा भाला सगळीकडे झेपा घेत होता. उंच तटाच्या एका कोनावर पॅत्रोक्लसने तीनदा हल्ला केला आणि स्वतःच्या अमर हातांनी त्याच्या ढालीवर प्रहार करीत तिन्हीवेळा अॅपॉलोने तो हटवून परतवला. आणखी चौथ्याही खेपेला पॅत्रोक्लस एखाद्या देवासारखा चालून येत असता अॅपॉलो भीषण आवाजात ओरडून त्याला म्हणाला, "मागे हट, उदात्त वीरा पॅत्रोक्लस, त्रोजन लोक प्रमुखांची नगरी सर करून लुटणे तुझ्या नशिबात नाही. आणि तुझ्यापेक्षा पुष्कळच श्रेष्ठ पुरुष असणाऱ्या अॅकिलिझच्या-ही नशिबी ते लिहिलेले नाही." हे ऐकून पॅत्रोक्लसने थोड्या अंतरापर्यन्त माघार घेतली व अॅपॉलोचा कोप टाळला.

दरम्यान हेक्तर आपल्या अश्वांसह स्कीआन वेशींजवळ थांबला होता; तो संभ्रमात पडला होता, की पुन्हा रथ नगरीबाहेर हाकून युद्ध चालू ठेवावे की

बाहेरच्या सैन्याला वेशीच्या आत बोलवून घ्यावे. असा तो साशंक असताना फीबस अॅपॉलो अॅसिअसनामक एका तरुण व दमदार वीराच्या रुपाने त्याच्याजवळ आला; अॅसिअस हा हेक्तरच्चा मामा, हेक्युबाचा सख्खा भाऊ, सँगॅरिअस नदीच्या प्रवाहाजवळ फ्रिजिआत राहणाऱ्या दायमासचा पुत्र; त्याचे रूप धारण केलेला जव्हपुत्र अॅपॉलो आता हेक्तरला म्हणाला, "हेक्तर, तू लढणे का सोडलेस? हे तुझ्याकडून वाईट काम झाले, मी तुझ्यापेक्षा जितका कमी प्रभावी आहे तितका अधिक प्रभावी असतो तर तुला लौकरच तुझ्या ढिलाईबद्दल पस्तावण्यास लावले असते. थेट पॅत्रोक्लसवर रथ हाकून ने, दैवाची इच्छा असेल तर अॅपॉलो तुला त्याच्यावर विजय मिळवून देईल व तू त्याला मारशीलही."

असे म्हणून तो देव युद्धाच्या धुमश्चक्रीत परत गेला आणि हेक्तरने सेब्रिओनिझला रथ पुन्हा लढाईत घालण्याची आज्ञा केली. अॅपॉलो आर्गाइव्हज् मध्ये फिरला व त्यांना त्याने अत्यंत भयभीत केले, उलट हेक्तरला व त्रोजनांना त्याने विजय मिळवून दिला. हेक्तरने इतर दॅनाअन्सना सोडून देऊन, त्यांच्यातला एकही माणूस न मारता सरळ पॅत्रोक्लसकडे रथ हाकला. मग पॅत्रोक्लसने रथावरून डाव्या हातात भाला व उजव्या हातात धरता येईल तेवढा मोठा टोकदार धोंडा घेऊन भूमीवर उडी मारली. तो स्थिर उभा राहिला व त्याने जो दगड फेकला तो कोणालातरी लागल्याशिवाय दूर गेला नाही, फेक फुकट गेली नाही, कारण दगड रथाचे लगाम हातात धरून बसलेल्या हेक्तरच्या सारथ्याला, सेब्रिओनिजला लागला. हा प्राअॅमचा एक अनौरस पुत्र. याच्या कपाळावर तो धोंडा बसला. हाडाचा चुरा होऊन कपाळ डोक्यात घुसले व त्याचे डोळे निखळून त्याच्या पायाशी पडले. सूर मारल्यासारखा तो आपल्या रथावरून मरून खाली पडला व त्याच्या ठायी प्राण उरले नाहीत. हे उच्चकुलीनवीरा पॅत्रोक्लस, त्याच्यादेहाजवळ उभा राहून तू तेव्हा प्रौढी मिरवलीस; तू म्हणालास, "छातीवर शुभहस्त ठेऊन सांगतो–किती छान सूर मारला याने! वाहवा, किती चपळ आहे हा! आम्ही सागरावर असतो तर या गड्याने नौकेवरून सूर मारून खवळलेल्या पाण्यातूनही साऱ्या नाविकांची पोटे भरण्याइतकी कालवे वर आणली असती; कारण आपल्या रथावरून त्याने भूमीवर फारच सुरेख सूर मारला आहे. तेव्हा असे दिसते की त्रोजनांमध्ये पाणबुडयेही आहेत."

असे बोलता बोलता त्याने सेब्रिऑनिझवर अशी झडप घातली, की गुरांच्या प्रांगणावर हल्ला करणारा सिंह जशी घालतो पण छातीवर घाव बसल्यावर स्वतःच्या धैर्यानेच जसा तो सिंह फशी पडतो तशी त्याची गत झाली. अरे पॅत्रोक्लस, त्या सिंहासारखीच त्वेषाने तू उडी घेतलीस. हेक्तरनेही आपल्या

रथावरून भूमीवर उडी घेतली. त्या दोघा वीरांनी नंतर सेब्रिऑनिझच्या देहाभोवती लढाई केली. जसे दोन भुकेले सिंह एकाद्या उंच पर्वतावर त्यांनी मारलेल्या काळविटासाठी त्वेषाने एकमेकांशी लढतात---अगदी तसेच मेनितिअसपुत्र पॅत्रोक्लस व शूर हेक्तर या थोर वीरांनी सेब्रिऑनिझच्या कलेवराजवळ एकमेकांवर कटोकटीचे घाव व वार केले. त्या प्रेताचे डोके एकदा धरल्यानंतर हेक्तर ते सोडीना तर प्रेताचे पाय पॅत्रोक्लसने घट्ट पकडून ठेवले, आणि इतर दॅनाअन व त्रोजन यांच्यातही निकटाचे युद्ध जुंपले. पर्वतांवरच्या एकाद्या घनदाट अरण्यावर मारा करणारे पूर्ववायू व दक्षिण वायू जसे एकमेकांना झोडपून काढतात--बीचचे, अॅशचे व विस्तारलेल्या कॉर्नेल वृक्षांचे शेंडे एकमेकांवर आघात करताना गरजतात, आणि फांद्या तडकताना व मोडताना एकू यतात--अगदी तसेच त्रोजन व अॅकिअन एकमेकांवर उड्या घेऊन एकमेकांशी हाणामारी करीत होते, आणि दोघांपैकी कोणीच हटत नव्हते. सेब्रिऑनिझच्या देहाभोवती अनेक तीक्ष्ण भाले भूमीवर पडले व अनेक पक्षधारी बाण धनुष्याच्या दोरीपासून सुटून उडाले; तसेच त्या देहाभोवतालच्या झगड्यात पुष्कळ मोठाले दगड पुष्कळ ढालीवर हाणले गेले; पण आता आपल्या सारथ्यकर्माविषयी निरवधान, भला थोरला, व अस्ताव्यस्त पसरलेला असा तो सेब्रिऑनिझ मात्र भल्या थोरल्या भिरभिरत्या धुळीच्या ढगात पडून राहिला.

जोपर्यन्त मध्याकाशी सूर्य अजून उंचावर होता तोपर्यन्त उभय पक्षांची शस्त्रे सारखीच प्राणघातक ठरत होती, आणि लोक मरून पडत होते; पण माणसे नांगरापासून बैल सोडवतात अशा वेळेकडे जेव्हा सूर्य खाली जाऊ लागला, तेव्हा अॅकिअन, त्यांच्याबद्दलच्या पूर्वी बांधलेल्या साऱ्या आडाख्यांपेक्षा जास्त प्रबळ ठरले. कारण त्यांनी त्रोजनांच्या शूलाच्या व कल्लोळाच्या टप्प्याबाहेर सेब्रिऑनिझला ओढून काढले आणि त्याच्या खांद्यावरून चिलखत काढून घेतले. मग पॅत्रोक्लसने क्रूर कर्मे मनात आणून व भयानक गर्जना करून मार्ससारखी त्रोजनांवर उडी घेतली आणि तीन वेळा नऊ लोक ठार केले, पण तो एकाद्या देवासारखा चौथ्या खेपेस जेव्हा येत होता, तेव्हाच हे पॅत्रोक्लस, तुझ्या अंताची घटका भरत आली होती, कारण स्वतः फीबसने तुझ्याशी पुऱ्या निग्रहाने युद्ध केले. युद्धाच्या भरगर्दीत फिरत असता पॅत्रोक्लसने त्याला पाहिले नाही, कारण तो दाट अंधाराने वेढलेला होता, आणि त्या देवाने त्याला मागून पाठीवर व त्याच्या रुंद खांद्यावर तळ हाताने प्रहार केला, त्यामुळे त्याच्या डोळ्यांपुढे चक्कर आली. फीबस अॅपॉलोने त्याचे शिरस्त्राण ठोकरून डोक्यावरूना उडवले व ते खडखड करीत घोड्यांच्या टापांखाली घरंगळत गेले; तेथे त्य

जिरेटोपाचे अश्वपुच्छकेशाचे तुरे सारे धुळीने व रक्ताने माखले गेले. खरोखर पूर्वी कधीही त्या शिरस्त्राणाची अशी अवस्था झाली नव्हती, कारण देवतुल्य वीर ॲकिलिझच्या मस्तकाचे व शोभीवंत कपाळाचे संरक्षण करण्यास ते कामी येत होते. तथापि आता झ्यूसने ते हेक्तरला वापरण्यासाठी दिले. तथापि हेक्तरचा अंतही आता समीपच होता. पॅत्रोक्लसच्या हातातील तो एवढा दांडगा व वळकट, ब्रॉझच्या शेंबींचा भाला मोडला, तर आपादमस्तक त्याला झाकणारी ढाल तिच्या पट्टयासह भूमीवर पडली आणि ॲपॉलोने त्याच्या वक्षकवचाचे बंध सोडवले.

यानंतर त्याच्या बुद्धीवर तिला झाकून टाकणारे पटल आले; त्याचे हातपाय निकामी झाले व तो सुन्न झाल्यासारखा उभा राहिला; तेव्हा त्याच्या काळातला सर्वोत्तम भालाईत, तसेच सर्वात उत्कृष्ट घोडेस्वार व सर्वात चपळ धावणारा असा दार्दानिआनिवासी पॅन्थौसचा पुत्र युफॉर्बस त्याच्यामागून आला व खांद्याच्या मधोमध त्याच्या पाठीत त्याने भाल्याचा घाव घातला. या माणसाने रणात आपल्या रथावर आरुढ होऊन येताच वीस लोकांना पाय उतार करून ठेवले होते—इतका तो सर्व युद्धकलात निपुण होता—त्यानेच, हे उच्चकुलीन पॅत्रोक्लस, प्रथम तुझ्या अंगात शस्त्र खुपसले, पण त्याने तुला पुरता चीत केले नाही. मग युफॉर्बस, जखमेतून आपला ॲशकाष्ठाचा भाला उपसून काढून परत गर्दीत पळाला; ठामपणे उभा राहून आता निःशस्त्र झालेला पॅत्रोक्लस आपल्यावर हल्ला करील याची वाट पहात थांबण्याची त्याला छाती झाली नाही. पण पॅत्रोक्लस त्या देवाने मारलेल्या तडाख्याने, तसाच भाल्याच्या जखमेने घावरा व गलित गात्र झाला होता; तेव्हा तो जिवाच्या भयाने आपल्या लोकांच्या आडोशाखाली मागे झाला. यावर तो जखमी होऊन मागे हटत असलेला पाहून हेक्तर सैनिकांमधून नेटाने रेटारेटी करीत पुढे आला व त्याच्या अगदी जवळ येताच त्याच्या ओटीपोटात त्याने भाला मारून भाल्याचे ब्रॉझ अग्र आरपार घुसवले; त्यामुळे पॅत्रोक्लस जडपणे भूमीवर पडला आणि ॲकिअनांना परम शोक झाला. पर्वतांवर एकाद्या लहानशा झऱ्याचे पाणी पिऊ पाहणारे दोघे सिंह व वनवराह त्वेषाने त्यासाठी झुंजल्यावर, जेमतेम श्वास घेण्याइतपत त्या भयानक वराहाला सिंहाने जेर केले असावे—अगदी त्याप्रमाणेच इतक्या लोकांना ठार केलेल्या शूर मेनितिअसपुत्राचा प्राण प्राअॅमपुत्र हेक्तरने जवळून वार मारून घेतला आणि ते करताना बढाई मारली, तो म्हणाला, "पॅत्रोक्लस, तुला वाटले तू आमची नगरी लुटशील, आमच्या त्रोजन स्त्रियांचे स्वातंत्र्य हिरावून घेऊन त्यांना तुमच्या नौकातून तुमच्या देशाकडे पळवून नेशील, मूर्ख

कुठला! त्यांचे संरक्षण करायला हेक्तर व त्याचे वेगवान अश्व सदा परम प्रयास करीत होते. दास्याचा दिन त्यांच्यापासून दूर ठेवणारा साऱ्या त्रोजन योद्धयांमधला अग्रणी मी आहे; तुझ्याबद्दल म्हणशील, तर गिधाडे येथे तुला फाडून खातील. बापुड्या अभाग्या, अॅकिलिझही त्याच्या साऱ्या शौर्यानिशी तुला निरुपयोगी ठरला; तरी मला वाटते तू त्याला सोडून निघालास तेव्हा त्याने तुला बजावून सांगितले होते की "प्राणघातक हेक्तरचा रक्ताने माखलेला अंगरखा त्याच्या अंगावरच फाडल्याखेरीज उच्चकुलीन वीरा पॅत्रोक्लस, नौकांकडे परत येऊ नको." असेच, मला वाटते, त्याने तुला काम सोपवले होते, आणि तुझ्या मूर्ख मनाने अंतर्यामी 'हो' म्हटले होते."

मग अंगातून प्राण बाहेर ओसरत असता, हे कुलीन वीर पॅत्रोक्लस, तू उत्तरलास, "हेक्तर, हवी तशी तू पोकळ प्रौढी मिरव, कारण सॅटर्नपुत्र जव्ह आणि अॅपॉलो यांनी तुला जय प्रदान केला आहे. माझा इतका सहज पराभव केला तो त्यांनी; व त्यांनीच माझ्या खांद्यावरचे कवच काढून घेतले आहे; तुझ्यासारख्या वीस जणांनी जरी माझ्यावर हल्ला केला असता तरी ते सगळे माझ्या भाल्याला बळी पडले असते. दैव आणि लेतोचा पुत्र यांनी माझ्यावर मात केली आहे व मर्त्य मानवांपैकी युफॉर्बसने; माझा जीव घेण्यात तुझा क्रम केवळ तिसरा आहे. मी पुढे असे सांगतो व माझे सांगणे मनावर ठसवून घे की तूही आता थोड्याच काळापर्यन्त जगशील; मरण व तुझ्या अंताचा दिवस तुझ्या अगदी निकट आले आहेत, आणि इकसपुत्र अॅकिलिझच्या हाताने ते तुला खाली लोळवतील."

तो असे बोलल्यावर त्याचे डोळे मृत्यूच्या छायेत मिटले; त्याचा जीव देह सोडून आपल्या दुःखद दुर्दैवाबद्दल शोक करीत आणि पौरुषाच्या जोमाचा व यौवनाचा निरोप घेत खाली हेदिझच्या गृहाकडे भ्रमण करीत गेला. जरी तो मेला होता तरीही हेक्तर त्याला उद्देशून बोलला, "पॅत्रोक्लस, असा माझ्या अंताचे भाकित तू का करीत आहेस? कुणास ठाऊक, रूपसंपन्न थेतिसचा पुत्र अॅकिलिझ माझा भाला लागून एकादेवेळी माझ्या आधीही मरेल!"

असे बोलत असता त्याने मृतदेहावर पाय ठेवून जखमेतून आपला ब्राँझचा भाला उपसून काढला व तो देह मागे ढकलून तसाच उताणा पडू दिला. नंतर तो भाला हातात धरून ईकसच्या वेगवान वंशजाचा शिलेदार जो ऑतोमेदॉन त्याच्यामागे गेला, कारण त्याला मारून खाली पाडण्याची त्याला तीव्र इच्छा होती; पण पेलिअसला बहुमोल देणगी म्हणून देवांनी दिलेल्या अमर अश्वांनी रणावरून ऑतोमेदॉनला त्वरित वाहून नेले होते.

• • •

## सर्ग १७

ॲत्रिअस पुत्र शूर मेनेलॉसला आता पॅत्रोक्लज पतन पावल्याचे समजले, आणि पुढच्या श्रेणींमधून वाट काढून तो संपूर्ण कवचधारी असा त्या मृतदेहाच्या दोन्ही बाजूस पाय रोवून उभा राहिला. गाय आपल्या पहिल्या वासरावर जशी हंबरत उभी राहते तसा पीतकेश मेनेलॉस पॅत्रोक्लसवर राखणीला उभा ठाकला, त्याने आपली गोल ढाल व भाला आपल्यापुढे धरला, समोर येण्याचे धाडस करणाऱ्या कोणालाही ठार करण्याचा त्याचा निश्चय होता. पण पॅन्थॉसपुत्राचेही त्या देहाकडे लक्ष होते; तो मेनेलॉसपाशी येऊन म्हणाला, "ॲत्रिअसपुत्रा मेनेलॉस, मागे हो, व ही रक्तरंजित लूट तशीच राहू दे; त्रोजन्स व त्यांचे शूर दोस्तपक्षीय यांच्यापैकी पॅत्रोक्लसला भाला भोसकणारा पहिला मी होतो; म्हणून मला त्रोजन्समध्ये माझी होणारी कीर्ति पुरी लाभू दे, नाहीतर मी नेम धरून तुझा प्राण घेईन."

याला मेनेलॉसने अत्यंत रागाने उत्तर केले, "तात ज्व्हची शपथ, फुशारकी मारणे ही वाईट गोष्ट आहे. पॅन्थॉसच्या गर्विष्ठ पुत्रांपेक्षा चित्ता अधिक धीट नाही, नाही सिंह, किंवा सर्व प्राण्यात भयंकर व बेडर असा क्रूर वनवराह-देखील नाही ! तरीही डॅनाअनांमधला सर्वात हीन दर्जाचा सैनिक मला मानून व मला कःपदार्थ लेखून मला रोखणाऱ्या हैपेरेनॉरने काही आपल्या तारुण्याचे पुरे दिवस पाहिले नाहीत. त्याच्या बायकोला, आईबापांना तोष-वायला त्याचे स्वतःचे पाय काही त्याला परत घेऊन गेले नाहीत. जर तू मला अडवलेस तर अगदी तसाच तुझाही शेवट मी करीन; तेव्हा परत जा गर्दीत, माझ्यासमोर येऊ नकोस, नाहीतर तुझी धडगत राहणार नाही. गोष्ट घडून गेल्यावर मूर्खदेखील शहाणा होऊ शकतो."

पण युफॉर्बस त्याचे ऐकत नव्हता; तो म्हणाला, "आता मात्र मेनेलॉस, ज्याच्या देहावर तू बढाई मारलीस व ज्याच्या बायकोला तिच्या लग्नमंडपातच तू विधवा करून त्याच्या मात्यापित्यांना अपरंपार शोक घडवलास त्या माझ्या भावाच्या मरणाचे मोल तू खचित देणार. मी तुझे शीर व कवच पॅन्थौस व थोर फ्रॉंतिसच्या हातात देऊन त्या बिचाऱ्या लोकांचे सांत्वन करीन. या प्रकरणाचा सोक्षमोक्ष युद्ध करून, माझ्या बाजूने किंवा माझ्या विरुद्ध लावण्याची वेळ आली आहे."

हे बोलत असता त्याने मेनेलॉसच्या ढालीवर थेट घाव घातला, पण भाला आरपार गेला नाही कारण ढालीने भाल्याचे टोक वळवले. मग मेनेलॉसने नेम धरीत तात जव्हची प्रार्थना केली; युफोर्बस मागे होत होता आणि मेनेलॉसने भाला मर्म स्थळी पुरता आत घुसविण्यासाठी आपले पुरे वजन त्याच्यावर घालून युफोर्बसच्या घशाच्या मुळावर घाव घातला. भाल्याचे टोक मानेतून आरपार गेले आणि तो जडपणे भूमीवर पडत असता त्याचे चिलखत त्याच्याभोवती खडखड वाजले. कला सुंदरींच्या केसांसारखे असलेले त्याचे केस व चांदीसोन्याच्या पट्टयांनी मोठ्या कौशल्यांनी बांधलेली त्याची झुलपे सारी रक्ताने माखून गेली. एकाद्याने एक उत्तम ऑलिव्हचे झाड खुल्या, ऐसपैस व भरपूर पाण्याच्या जागेत वाढवावे, त्याची वाढ सर्वोत्कृष्ट होईल अशी उमेद वाटावी व जरी सर्व दिशांनी वायू त्याच्यावर मारा करीत असला तरी त्याने त्याचा पांढरा फुलोरा फुलवावा; पण एकाद्या अत्युग्र वादळाने त्याच्यावर घाला घालून झंझावाताच्या तडाक्याने ते भूमीवर आडवे पाडावे–अगदी तसेच मेनेलॉसने देखण्या तरुण युफोर्बसला मारले व त्याचे चिलखत काढून घेतले किंवा एखादा आक्राळविक्राळ सिंह आपल्याशक्तीच्या दिमाखात पर्वतावर चरणाऱ्या गुरांच्या कळपातल्या सर्वोत्तम कालवडीला जवड्यात जखडतो–प्रथम त्याच्या वळकट जवड्यांनी तिची मान मोडतो, आणि मग तिच्या रक्तावर व आतड्यांवर ताव मारतो, गुराखी व कुत्रे त्याच्याविरुद्ध आरडाओरडा करतात, पण ते दूर उभे राहतात, त्याच्याजवळ येण्याचे त्यांना धैर्य होत नाही कारण ते भीतीने फिके पडलेले असतात--अगदी तसेच शौर्यशाली मेनेलॉसला तोंड देण्याचे धाडस कोणाच्याने होत नव्हते; मग पॅन्थॉसपुत्राचे चिलखत ॲत्रिअसपुत्र अगदी सहज घेऊन गेला असता, पण मग फीबस ॲपॉलो रागावला, व सिकॉनांचा प्रमुख मेन्तिझ याचे रूप घेऊन त्याने मेनेलॉसवर हल्ला करण्यास हेक्तरला चिथावले. तो म्हणाला, "हेक्तर, तू आता ईकसच्या उदात्त पुत्राच्या घोड्यांमागे त्याचा पाठलाग करीत धावत आहेस, पण ते तुला घेता येणार नाहीत; ते आटोक्यात ठेवून हाकणे अमर आईचा पुत्र जो ॲकिलिझ त्याच्याखेरीज अन्य मर्त्य मानवाला शक्य नाही. दरम्यान ॲत्रिअसपुत्र मेनेलॉस पॅत्रोक्लसच्या देहाभोवती पाय रोवून उभा राहिला आहे व सर्वांत श्रेष्ठ त्रोजन जो पॅन्थॉसपुत्र युफॉर्बस याला त्याने मारले आहे, तो आता कधीही लढू शकणार नाही."

तो देव नंतर लढाईच्या धुमश्चक्रीत व कोलाहलात परत गेला, पण हेक्तरच्या जिवावर दुःखाची कृष्णच्छाया पडली. त्याने सैनिकांच्या श्रेणींमधून पाहिले

व युफॉर्बस भूमीवर पडलेला असून त्याच्या जखमेतून रक्त वाहातच राहिलेले आणि त्याचे चिलखत मेनेलॉस काढीत असलेले त्याला दिसले. यावर त्याने एकाद्या अग्निज्वाळेसारखा आघाडीकडे मार्ग काढला; त्याचे चकाकते चिलखत त्याच्या अंगावर होते व तो मोठ्याने ओरडत होता. जेव्हा तो आवाज ॲत्रिअस पुत्राने ऐकला तेव्हा निराशेने तो स्वगत म्हणाला, "अरेरे, मी काय करू? माझ्यासाठी लढताना पडलेल्या पॅत्रोक्लसचे चिलखत त्रोजनांना मी काढून नेऊ देता कामा नये, नाहीतर एकाद्या दॅनाअनने माझे ते कृत्य पाहिले तर तो माझा धिःकार करील; तरीपण जर माझ्या प्रतिष्ठेखातर हेक्तर व त्रोजन यांच्याशी मी एकाकी लढलो तर ते मला भारी ठरतील, कारण हेक्तर त्यांना आपल्याबरोबर मोठ्या संख्येने आणीत आहे. तथापि मी असे दोलायमान का असावे? देवाने ज्याच्याशी मैत्री केली त्याच्याशी स्वर्गाला न जुमानता माणूस लढला तर तो लौकरच पस्तावेल. मी हेक्तर पुढून माघार घेतली तर कोणीही दॅनाअनने त्याबद्दल मला निंदू नये, कारण स्वर्गाचा वरद हस्त त्याच्या बाजूला आहे. तरीही जर मला ॲजॅक्स भेटला तर तो व मी हेक्तरशी व स्वर्गाशीही लढू——मात्र आम्हाला पॅत्रोक्लसचा देह पेलिअसपुत्र ॲकिलिझसाठी वचावता आला पाहिजे. अनेक आपत्तींपैकी हीच कमी अनिष्ट कारक होईल."

असा तो द्विधामनःस्थितीत असताना हेक्तर अग्रभागी असलेले त्रोजन त्याच्यासमीप आले. तेव्हा एखादा आयाळधारी सिंह गुरांच्या प्रांगणातून कुत्र्यांकडून व माणसांच्या भाल्यांकडून आरडा ओरडयात पाठलाग झाल्यावर डगमगून तिरसटल्यासारखा चोरपावलांनी जसा निघून जातो–अगदी तसाच मागे वळून पॅत्रोक्लसच्या देहापासून ॲत्रिअसपुत्र दूर हटला. जेव्हा आपल्या माणसांच्या समूहात आल्यावर तेलेमॉनपुत्र बलवान ॲजॅक्स कोठे दिसतो का ते त्याने चौफेर न्याहाळून पाहिले, तेव्हा लौकरच तो लढाईच्या अगदी डाव्या कडेला लढताना व आपल्या लोकांना लढाई चालू ठेवण्यास प्रोत्साहन देताना त्याला दिसला, कारण त्या लोकात फीबस ॲपॉलोने मोठी घाबरगुंडी उडवून दिली होती. मेनेलॉस त्याच्यापाशी धावत जाऊन म्हणाला, "ॲजॅक्स, माझ्या सन्मित्रा, तात्काल माझ्यासह मृत पॅत्रोक्लसकडे चल,; शक्य होईल तर त्याचा देह आपल्याला ॲकिलिझकडे घेऊन जाता येईल–त्याचे चिलखत म्हणशील, तर ते हेक्तरने आधीच घेतले आहे."

या शब्दांनी ॲजॅक्सचे हृदय हेलावले आणि त्यांनी आघाडीच्या श्रेणींमधून मार्ग काढला व त्याच्याबरोबर मेनेलॉस गेला. पॅत्रोक्लसचे चिलखत ॲजॅक्सने काढून घेतले होते व त्याच्या मृत देहाचे डोके कापून घेऊन धड त्रॉयच्या कुत्र्यांपुढे

टाकायला तो प्रेत ओढून नेत होता. पण अॅजॅक्स आपली ढाल भिंतीसारखी पुढे धरून त्याच्याजवळ आला, त्यावर हेक्तर आपल्या लोकांच्या आडोशाने मागे झाला व पॅत्रोक्लसचे चिलखत स्वत: जिंकलेले एक महान जयचिन्ह म्हणून नगरीत घेऊन जायला त्रोजन्सकडे देऊन त्याने रथावर उडी घेतली. तेव्हा आपल्या रुंद ढालीने पॅत्रोक्लसचा देह झाकून त्याच्या दोन्ही बाजूस पाय रोवून अॅजॅक्स उभा राहिला; अरण्यात आपल्या छाव्यांसह विसावलेल्या सिंहापाशी शिकारी येतात तेव्हा आपल्या उग्रतम शक्तीच्या तोऱ्यात व क्रौर्यात तो सिंह डोळे झाकून टाकील इतके आठ्या घातलेले कपाळ खाली ओढून घेऊन जसा आपल्या छाव्यांच्या रक्षणार्थ त्यांचे देह आच्छादून उभा ठाकतो–अगदी तसाच पॅत्रोक्लसच्या देहावर अॅजॅक्स उभा राहिला, आणि त्याच्या बाजूला हृदयात आत्यंतिक दु:ख वागवीत अॅत्रिअसपुत्र मेनेलॉस उभा राहिला.

मग हिप्पोलॉकसपुत्र ग्लॉकस हेक्तरकडे अत्यंत कुपित नजरेने पाहून त्याला कठोर दूषण देत म्हणाला, "हेक्तर, तू आव मोठ्या शौर्याचा आणतोस, पण लढाईत तू खेद वाटण्या इतका उणा पडतोस. तुझ्यासारख्या पळपुट्याचा एवढ्या मोठ्या कीर्तीवर मुळीच हक्क नाही. इलिअममध्ये जन्मलेल्या तुझ्या स्वत:च्याच लोकांच्या हातांनी तू आपली नगरी व दुर्ग आता कसा वाचवू शकशील याचा विचार कर; कारण तुझ्याबाजूने लढायला आता लिसिआवासीय तुला मिळणार नाहीत–कारण त्यांनी घेतलेल्या अखंड कष्टांसाठी त्यांना काय धन्यवाद मिळाले ते त्यांना दिसतेच आहे. जो तुमचा पाहुणा तसाच युद्धातला साथी होता, त्या सार्पेदॉनला दॅनाअनांकडून लुटला जाऊन त्यांचा वळी होण्यास तू सोडून दिल्यानंतर, श्रीमान, त्याच्याहून कमी प्रतिष्ठेच्या माणसाला मदत करण्यासाठी तुम्ही काही कराल हे संभवनीय आहे काय ? सार्पेदॉन जिवंत होता तोवर त्याने तुमच्या नगरीची व तुमची उत्तम सेवा केली; तरीही त्याचा देह कुत्र्यांपासून बचावणे तुमच्या मनाला मानवले नाही. लिसिआवासीयांनी माझा सल्ला जर ऐकला तर ते स्वदेशी जातील व त्रॉयनगरीच्या नशिबी काय असेल ते भोगायला तिला सोडून देतील. स्वत:च्या देशासाठी लढणाऱ्या व त्याच्यावर आक्रमण करू पाहणारांना सतावणाऱ्या लोकांच्या अंगी जे साहसी निर्भय तेज संचारते, त्यातले थोडे तरी जर त्रोजनांच्या ठिकाणी असेल तर आपण तावडतोब पॅत्रोक्लसला उचलून ईलिअममध्ये नेऊ. जर या मृत मनुष्याला हलवून प्रायॅमच्या नगरीत आपण घेऊन जाऊ शकलो, तर आरगॉस-वासी तत्परतेने सार्पेदॉनचे चिलखत परत करतील व त्याचा देहही आपल्याला मिळेल. कारण ज्याचा शिलेदार आता मारला गेला आहे–तो व त्याचे

हातघाईच्या युद्धात लढणारे अनुयायी–ॲकिअन्सच्या नौकांपाशी असणाऱ्या अग्रगण्य पुरुषांपैकी आहेत. तरीही ॲजॅसच्याविरुद्ध उभे राहण्याचे, त्याच्या डोळ्याला डोळा देऊन त्याला तोंड देण्याचे धैर्य भोवताली युद्ध चालले असताही तुला झाले नाही; कारण तो तुझ्याहून शूर पुरुष पडलाना !"

त्याच्याकडे रागेरागे पाहात हेक्तर म्हणाला, "ग्लॉकस, तुला याहून अधिक कळायला हवे. आतापर्यन्त तुला लिसिआतल्या दुसऱ्या कोणाही माणसापेक्षा जास्त समजुतदार म्हणून मी मानीत होतो, पण आता मी ॲजॅक्सला भितो असे तू म्हटल्याने मला तुझा तिरस्कार वाटतो. मला युद्धाची किंवा रथांच्या हलकल्लोळाची भीति नाही, पण आपल्या मानसापेक्षा जव्हची इच्छा प्रबळ आहे. जव्ह एकाद्यावेळी बलवान पुरुषालाही माघार घेण्यास लावून विजय त्याच्या हातातून छिनावून घेतो तर दुसऱ्यावेळी तो त्याला लढण्यास प्रवृत्त करतो. तेव्हा माझ्या मित्रा, इकडे ये, माझ्या बाजूला उभा रहा व पहा की खरोखर मी दिवसभर तू म्हणतोस तसा भ्याडपणा करतो, की पॅत्रोक्लसच्या देहाभोवती लढण्यापासून दॅनाअनांपैकी काही सर्वात धीट लोकांनाही प्रतिकार करून रोखून ठेवतो."

असे बोलतानाच त्याने मोठ्याने ओरडून त्रोजनांना आवाहन केले, "त्रोजनांनो, लिसियावासीयांनो व हातघाईने लढणारे दार्दानिआवासीयहो, मर्दपणा दाखवा, मित्रहो, आणि मी पॅत्रोक्लसला मारून घेतलेले ॲकिलिझचे चिलखत चढवतो तोपर्यन्त हिरिरीने लढाई द्या."

असे बोलून हेक्तर रणक्षेत्र सोडून ॲकिलिझचे चिलखत त्रॉयकडे नेत असलेल्या, पण अजून लांब न गेलेल्या आपल्या लोकांमागे वेगाने धावत गेला. त्या दुःखदायी युद्धातून बाहेर पडून थोडावेळ बाजूला उभे राहून त्याने आपले चिलखत बदलले. स्वतःचे चिलखत त्याने इलिअमच्या बलिष्ट नगरीकडे व त्रोजनांकडे पाठवले आणि देवांनी पेलिअसला दिलेले व त्याने आपले वय झाल्यावर पुत्राला दिलेले, पण ते वार्ध्यक्यापर्यन्त त्या पुत्राला वापरता न आलेले पेलिअसपुत्राचे अमर चिलखत त्याने स्वतःच्या देहावर चढवले.

हेक्तर बाजूला उभा राहून पेलिअसपुत्राचे कवच धारण करीत असल्याचे जेव्हा बादळी मेघांचा स्वामी जव्ह याने पाहिले तेव्हा त्याने मान हलवली व तो स्वतःशी पुटपुटला, "अरेरे, बिचारा अभागी! अरे, तू, अनेक दुसरे वीर ज्याच्यापुढे चळचळा कापतात त्या वीरवराचे कवच धारण करीत आहेस, पण जी दुर्गती आधीच तुझ्या सन्निध ओढवली आहे तिची तुला मुळीच कल्पना नाही. त्याच्याइतक्या शूर व बलवान सोबत्याला तू ठार मारले आहेस,

पण त्याच्या शिरावरून व खांद्यावरून तू त्याचे चिलखत काढून घेतलेस हे बरे झाले नाही. मी तुला आता परमशक्तीशाली करतो खरा, पण त्याउलट अशी गोष्ट होणार आहे की, पेलिअसपुत्राचे चिलखत अँन्ड्रोमॅकीपुढे ठेवण्यास तू लढाईतून परत येणार नाहीस."

सॅटर्न पुत्राने आपल्या दुश्चिन्ह दर्शक भृकुटी, वाकवून धनुष्याकार केल्या आणि हेक्तर ते चिलखत अंगावर चढवीत असता त्याच्याठायी मार्सने प्रवेश करून त्याचे सर्व शरीर शक्तीने व शौर्याने भरून टाकले. मोठ्याने आरोळी मारून तो मित्रपक्षीयात पदक्षेप करीत गेला आणि त्याच्याभोवती त्याचे चिलखत असे चमकले की सर्वांना तो स्वतः थोर पेलिअसपुत्रासारखाच दिसला. त्यांच्यामध्ये इतस्ततः फिरून त्याने त्यांना प्रोत्साहन दिले. मेस्थलिझ, ग्लॉकस, मेदॉन, थर्सिलोकस, अॅस्तेरोपिअस दैसिनॉर व हिप्पोथौस, फोर्सिझ, क्रेमिअस आणि शकुन निवेदक एन्नोमस, या सर्वांना निकडीचे आवाहन करीत तो म्हणाला, "अन्य नगरीहून सहस्त्रांनी येथे आलेल्या मित्रपक्षीयांनो, माझे म्हणणे ऐका, माझ्याभोवती गर्दी असावी म्हणून काही मी तुम्हाला येथे प्रत्येकाच्या वेगवेगळ्या नगरीमधून बोलावलेले नाही, तर मनापासून निष्ठेने लढून तुम्ही उग्र अॅकिअन्सपासून त्रोजनांच्या बायकापोरांचे रक्षण करावे म्हणून. यासाठी मी तुम्हाला अन्न व संपन्न करणाऱ्या देणग्या देऊन माझ्या लोकांवर भार टाकीत आहे; म्हणून तोंडे फिरवा व शत्रूवर हल्ला चढवा, युद्धाचा डाव जसा पडेल तसे तुम्ही टिकणार किंवा पडणार; पॅत्रोक्लस मृत असला तरी त्याला त्रोजन्सच्या ताब्यात जो कोणी आणून देईल व अॅजॅक्सला आपल्यापुढे हटायला लावील, त्याला मी अर्धी लूट देऊन माझ्यासाठी बाकीची ठेवीन. याप्रमाणे तो माझ्याशी समान सन्मानाचा वाटेकरी होईल."

तो असे बोलल्यावर ते आपले भाले पुढे धरून पुरत्या संख्या संभाराने दॅनाअनांवर धावून गेले आणि प्रत्येक माणसाला फार आशा होती की, आपण तेलेमॉनपुत्र अॅजॅक्सला पॅत्रोक्लसचा देह सोडून देण्यास बळाने भाग पाडू; मूर्ख होते ते, कारण अॅजॅक्स त्यापैकी पुष्कळांचे प्राण आता घेणार होता. मग अॅजॅक्स मेनेलॉसला म्हणाला, "माझ्या सन्मित्रा मेनेलॉस, तू आणि मी या लढाईतून जिवंत पार पडणे कठिण; पॅत्रोक्लसच्या देहापेक्षा—जो लौकरच कुत्र्यागिधाडांचे भक्ष्य होणार आहे—त्याच्यापेक्षा माझ्या व तुझ्या मस्तकाच्या सुरक्षिततेची काळजी मला जास्त आहे. सर्व दिशांकडून युद्धाच्या वादळाने आपल्याला हेक्तरने वेढले आहे, आणि आपला नाश होणार हे आता नक्की दिसत आहे. तेव्हा दॅनाअनांच्या राजपुरुषांपैकी कोणाला ऐकू जात असेल तर त्यांना हाक दे."

त्याने म्हटल्याप्रमाणे मेनेलॉसने केले आणि शक्यतेवढे मोठ्याने ओरडून त्याने दॅनाअनांना मदतीसाठी बोलावले, "माझ्या मित्रांनो," तो म्हणाला "आरगॉसच्या राजवंशीयांनो व मंत्र्यांनो, जे तुम्ही ॲगॅमेम्नॉन व मेनेलॉससह सार्वजनिक खर्चाने मद्यपान करता; आणि जव्ह तुम्हाला सत्ता व कीर्ती प्रदान करतो त्यानुसार आपापल्या लोकांना आज्ञा करता, ते सारे जण ऐका, माझ्या-भोवती लढाईची गर्दी इतकी उसळली आहे की, तुम्ही वेगवेगळे मला दिसत नाही; म्हणून सगळेजण या, प्रत्येक मनुष्य व्यक्तिशः न बोलावताही येऊ द्या, आणि लाज वाटू द्या तुम्हाला की, पॅत्रोक्लसचे मांस व अवयव त्रोजन कुत्र्यांचे भक्ष्य होण्याची वेळ आली आहे."

ऑइलिअस पुत्र वेगवान ॲजॅक्सने त्याची हाक ऐकली, व लढाईमधून नेटाने वाट काढून त्याच्या मदतीस तो सर्वांआधी धावला. त्याच्यामागून आला आयदोमेनस व त्याचा वीर शिलेदार मेरिऑनिझ; हा संहारक मार्सच्या बरोबरीने शूर होता. युद्धात त्यांच्यामागून आलेल्या इतरांबद्दल सांगायचे तर कोणी एकटा मनुष्य त्यांची किती म्हणून नावे सांगणार ?

अग्रभागी हेक्तर असलेल्या त्रोजनांनी त्यांच्यावर एकजुटीने हल्ला केला. जशी एखादी प्रचंड लाट कोणा स्वर्गजात नदीच्या मुखात गर्जत येते आणि समुद्रात शिरलेले खडक त्यांच्यावर मारा करीत आपटणाऱ्या लाटांच्या गर्जनेने निनादतात—अगदी तशीच गर्जना करीत त्रोजन धावून आले; पण ॲकिअन अटळ निश्चयाने व एक जुटीने मेनिशिअसपुत्राच्या देहाभोवती ठाम उभे राहिले व त्यांनी आपल्या ब्राँझ ढालींनी त्याच्याभोवती जणु कुंपण केले. शिवाय जव्हने त्यांच्या शिरस्त्राणांची चमक एका दाट ढगाने लपवली, कारण मेनि-शिअसपुत्र जिवंत व ईकसच्या वंशजाचा शिलेदार असताना जव्हच्या मनात त्याच्याविरुद्ध कसलीच अढी नव्हती, तेव्हा त्याला त्याच्या शत्रुपक्षीय त्रोजनांच्या कुत्र्यांपुढे बळी जाऊ देण्यास जव्ह राजी नव्हता आणि त्याच्या संरक्षणार्थ त्याच्या सोबत्यांना जव्हने प्रोत्साहन दिले.

पहिल्याने त्रोजनांनी ॲकिअनांना मागे घालवले व तेही डगमगून मृत देहा-पासून मागे हटले. कोणालाही ठार मारण्यात त्रोजनांना यश मिळाले नाही, पण मृतदेह मात्र त्यांनी ओढून दूर नेला. पण ॲकिअनांनी फार वेळ तो हातातून जाऊ दिला नाही; कारण पेलिअसपुत्राच्या खालोखाल शरीरयष्टीने बळकट तसाच प्रतापाने दॅनाअनांमधल्या सर्वात अग्रगण्य वीर असलेल्या ॲजॅक्सने त्वरित त्यांना धीर देऊन पुन्हा एकत्र आणले व पर्वतावरील वनस्थळीत कोंडीत पडला असता उलटून शिकारी कुत्रे व दांडगट तरुण यांची वाताहत उडवणाऱ्या

वनवराहाप्रमाणे तेलेमॉनपुत्र ॲजॅक्सने आघाडीकडे मोर्चा वळवून तो त्रोजन श्रेणींमध्ये सहज शिरला व पॅत्रोक्लसच्या देहाभोवती उभे असलेल्या त्यांना आणि त्याला ओढून नेऊन आपल्या नगरीत आणून कीर्ती मिळवण्याचा निश्चय केलेल्याना त्याने उधळून लावले. या क्षणाला त्या देहाच्या घोटयाजवळील स्नायूबधनां-भोवती एक पट्टा बांधून पायांकडून ओढत लढाईच्या दाटीतून तो देह पेलॅसजिअन लेथसचा शूर पुत्र हिप्पोथौस, हेक्तर व त्रोजन यांना मदत करण्याच्या उत्साहात नेऊ लागला होता ; पण लौकरच त्याच्यावर एक आरिष्ट कोसळले. ज्यांनी आनंदाने त्याचा बचाव करायला मदत केली असती त्यांच्यापैकी कोणीही त्याला त्यातून वाचवू शकला नाही, कारण तेलेमॉनपुत्राने पुढे उडी मारून त्याच्या गालांचे रक्षण करणाऱ्या ब्रॉंझ पट्टयाच्या शिरस्त्राणावर प्रहार केला. शस्त्रा-च्या अग्राजवळ तुरे लावलेला शिरस्त्राणाचा शिरोभाग तुटला, कारण भाला व ॲजॅक्सचा बळकट हात दोन्हींचा घाव एकाचवेळी बसला. त्यामुळे हिप्पो-थौसचा रक्तबंबाळ मेंदू तुऱ्याच्या खोबणीतून झिरपत बाहेर पडला. मग त्याच्या अंगातली शक्ती गेली व त्याने पॅत्रोक्लसचा पाय हातातून खाली पडू दिला व त्याच देहावर पुरा आडवा होऊन तो मरून पडला. याप्रमाणे लॅरिसाच्या सुपीक भूमीपासून दूर तो गतप्राण झाला, आणि त्याला वाढवून मोठा केल्याचे मोल तो आईबापांना कधीच देऊ शकला नाही. कारण प्रतापी ॲजॅक्सच्या भाल्याने त्याच्या आयुष्याची दोरी अकाली तुटली. नंतर हेक्तरने ॲजॅक्सवर भाल्याने नेम धरला, पण ॲजॅक्सने भाला येताना पाहिला व नेम थोडक्यात चुकवला. भाला पुढे गेला व उदात्त इफितसचा पुत्र स्केदिअस याला लागला, तो फोसिअन्सचा नायक विख्यात पॅनोपिअसमध्ये राहणारा होता आणि पुष्कळ लोकांवर राज्य करीत होता ; भाला त्याला गळयाजवळच्या हाडाखाली बसला ; ब्रॉंझचे टोक त्याच्या अंगातून आरपार गेले व खांद्याच्या चपटया हाडाखालून बाहेर आले आणि तो भूमीवर जडपणे पडताना त्याचे चिलखत त्याच्याभोवती खडखडले. ॲजॅक्सने आपल्यापरीने फीनॉप्सपुत्र कुलीन फोर्सिझ याला पोटाच्या मध्यावर मारले, त्यावेळी तो हिप्पोथौसच्या देहावर उभा होता ; भाल्याने त्याच्या कवचाचा वरचा पत्रा त्याने तोडला, त्यामुळे त्याची आतडी फुटून बाहेर निघाली आणि तो भूमीवर पडताना त्याने तळहाताने धरणी घट्ट धरली. मग हेक्तर व आघाडीवरचे लोक मागे हटले आणि आर्गाइव्हज्नी मोठयाने जयघोष करून फोर्सिझ व हिप्पोथौस यांचे देह ओढून नेले आणि लौकरच त्यांची कवचे काढून घेतली.

आता अँपॉलोने एपिटासपुत्र पेरिफाज याचे रूप धारण करून इनिआसला जर चेतविले नसते तर शूर अँकिअनांकडून त्रोजन पराभूत होऊन स्वतःच्या भ्याडपणामुळे इलिअमपर्यंत मागे हाकलले गेले असते आणि आर्गाइव्हज्चे धैर्य व सहनशक्ती प्रचंड असल्यामुळे जव्हच्या इच्छेविरुद्धदेखील त्यांनी विजयश्री प्राप्त करून घेतली असती ; पण ईनिआसच्या वयस्क बापाच्या सेवेत म्हातारा झालेल्या व सर्वकाळ त्याच्याशी निष्ठावंत राहिलेल्या एपिटासपुत्र पेरिफाज याच्या रुपात अँपॉलो ईनिआसला म्हणाला, "जरी स्वर्गस्थ शक्ती आपल्या-विरुद्ध असल्या तरीही उत्तुंग इलिअम बाचवणे तुला साधणार नाही का ? जव्ह विरुद्ध असूनही, ज्यांनी संख्येने, धैर्याने व स्वावलंबनाने स्वतःच्या लोकांना वचावले आहे असे लोक मला माहीत आहेत ; आणि यावेळेला तर, तू इतका विलक्षण भिण्यापेक्षा नुसता लढलास तर दॅनाअनांपेक्षा विजय आपल्यालाच प्रदान करणे जव्हला अधिक आवडेल."

अँपॉलोकडे सरळ पाहताच ईनिआसने त्याला ओळखले, आणि तो हेक्तरला ओरडून म्हणाला, "हेक्तर आणि इतर सर्व त्रोजन्स व मित्रपक्षीयहो, आपल्याच भ्याडपणाने आपण अँकिअन्सकडून पराभूत होऊन इलिअमपर्यंत मागे ढकलले गेलो तर आपल्याला कायमचे लांछन लागेल. एका देवाने माझ्यापाशी येऊन आताच मला सांगितले की, सर्वश्रेष्ठ कर्ताकरविता जव्ह आपल्याला अनुकूल राहील. म्हणून आपण दॅनाअनांवर धावून जाऊ या म्हणजे ते मृत पॅत्रोक्लसला नौकांकडे वाहून नेण्याआधी त्यांना कठीण प्रसंगाला तोंड द्यावे लागेल."

असे बोलत असता त्याने सर्वांच्या खूपपुढे उडी घेतली आणि त्यांनी एकत्र होऊन पुन्हा अँकिअन्सना तोंड दिले. ईनिआसने अँरिस्बासपुत्र लॅओक्रितस या लायकोमिदिझच्या शूर अनुयायास भाल्याने भोसकले, आणि तो पडताना पाहून लायकोमिदिझ करूणेने भारावला ; म्हणून तो त्याच्याजवळ गेला व स्वप्रजापाल हिप्पॅससपुत्र अँपिसॅऑन याला भाला मारून त्याने कमरेखाली यकृतात भोसकले, त्यामुळे हा मरण पावला ; तो सुपीक पिओनिआमधून आला होता व तेथील सर्व लोकात तो अँस्तेरोपिअसच्या खालोखाल निपुण योद्धा होता. त्याच्या मृत्यूचा सूड उगवायला व दॅनाअनांवर हल्ला करायला अँस्ते-रोपिअस पुढे धावला, पण त्याला काही तसे करणे शक्य होणार नव्हते, कारण पॅत्रोक्लसभोवताली जे होते ते आपापल्या ढालींनी नीट झाकलेले होते, व त्यांनी आपले भाले पुढे धरले होते ; कारण त्यांना अँजॅक्सने कडक आज्ञा दिल्या होत्या, की कोणीही मागे हटायचे नाही किंवा एकमेकांच्यापुढेही जायचे नाही, तर पॅत्रोक्लसच्या देहाभोवती सर्वांनी एक फळी करून उभे राहून हातघाईची लढाई

द्यायची. याप्रमाणे महाकाय अॅजॅक्सने त्यांना वजावले होते, आणि त्रोजन व मित्रपक्षीय यांच्या बाजूस, तसेच दॅनाअनांच्याही बाजूला प्रेते एकमेकांवर दाटीने पडत असता भूमी रक्तस्त्रावाने न्हाऊन निघाली; कारण दॅनाअनांच्या सैनिकांच्या देहावूनही रक्ताचे पाट वाहलेच. मात्र त्रोजनांपेक्षा त्यांच्या बाजूचे सैनिक कमी प्रमाणात पडले कारण त्यांनी काळजीपूर्वक एकमेकाना सहाय्य करून परस्परांचा बचाव केला.

याप्रमाणे भडकत्या आगीसारखे ते लढले; सूर्यचंद्रावर देखील कठिण प्रसंग ओढवल्यासारखे दिसले; कारण मेनिशिअसच्या मृत पुत्राभोवती सर्वात शूर वीर जेथे लढत होते त्या भागात चंद्रसूर्य पूर्णपणे झाकाळून गेले ; पण इतर दॅनाअन व अॅकिअन ज्या भागात झुंझत होते तिकडे पूर्ण दिनप्रकाश होता, दैदिप्यमान सूर्य तळपत होता आणि मैदानावर किंवा पर्वतावर एकही ढग दिसत नव्हता. त्यामुळे त्या लोकांना काही अडचण पडत नव्हती. शिवाय हे लोक काही वेळ विश्रांतीसाठी लढणे थांबवीत ; कारण ते एकमेकांपासून काही अंतरावर परस्परांच्या शस्त्रांच्या टप्प्याबाहेर होते ; उलटपक्षी जे लढाईच्या ऐन धुमश्चक्रीत होते त्यांना सतत हाणामारी व अंधार दोन्हींचा त्रास होत होता. त्यांच्यातल्या सर्व उत्तम वीराना त्यांच्या चिलखतांच्या भारी वजनाने थकवा येत होता, पण थॅसिमिदिझ व अॅन्तिलॉकस या त्यांच्यापैकी दोन शौर्यशाली योद्धयांनी अजून पॅत्रोक्लस मरण पावल्याचे ऐकले नव्हते ; त्यांना वाटत होते की, तो अद्यापि जिवंत असून त्रोजनांविरुद्ध बिनीवर नेतृत्व करीतच आहे ; स्वतःचे सोबती पडले किंवा पराभूत झाले तर शिलकी, ताज्या दमाचे लढवय्ये म्हणून उपयोगी पडण्यासाठी त्यांनी स्वतःची शक्ती राखून ठेवली होती ; कारण नौकांवरून त्यांना युद्धात पाठवणाऱ्या नेस्तॉरने त्यांना तशी आज्ञा दिली होती.

असे साऱ्या दिवसभर त्यांनी भीषण युद्ध केले, आणि वेगवान पेलिअसपुत्राच्या वीर शिलेदाराच्या देहाभोवती लढत असता अतिश्रमाने आलेला घाम सारखा त्यांच्या पायांवर, हातांवर व डोळ्यांवर ओसंडत होता. एकादा माणूस चरबीने थबथबलेले एकादे भले मोठे बैलाचे कातडे आपल्या सेवकांकडे देतो व ते ताणायला त्यांना सांगतो, तेव्हा जसे होते तसे आता झाले ; ते त्या चामड्याभोवती वर्तुळाकार उभे राहून ओलावा पार जाईपर्यंत ते ताणतात आणि चरबी त्या कातड्यात जिरते व पुष्कळजणांनी खेचल्यामुळे ते चामडे पुरते ताणले जाते— अगदी तसेच उभयपक्षांनी ते प्रेत अगदी थोड्या जागेत पुनःपुन्हा इकडून तिकडे ओढले—ते इलिअम नगरीत नेण्यासाठी नेटाने व निर्धाराने त्रोजनांनी, आणि

तितक्याच चिकाटीने आपल्या नौकांकडे नेण्यासाठी ॲकिअनांनी ; आणि त्यांच्यातली चढाओढ अत्यंत उग्र स्वरूपाची होती ; अशा लढाईला, सेनांचा स्वामी मार्स किंवा मिनर्व्हा यांना युद्धविषयक आत्यंतिक त्वेषात असतानादेखील, तुच्छ लेखता आले नसते.

माणसांचा आणि घोड्यांचा असा भयानक तुमुल संग्राम त्यादिवशी जव्हन पॅत्रोक्लसच्या देहाभोवती संयोजित केला. दरम्यान, तो पडला हे ॲकिलिझला माहीत नव्हते ; कारण लढाई होत होती ती त्रॉयच्या तटाखाली, नौकांपासून पुष्कळ दूर. त्यामुळे पॅत्रोक्लसच्या मृत्यूची कल्पनासुद्धा ॲकिलिझला नव्हती ; त्याला वाटत होते की नगरीच्या वेशीपर्यंत जाऊन पॅत्रोक्लस सुरक्षित परत येईल. त्याच्याकडून आपल्यासह किंवा आपल्याशिवाय देखील नगरी लुटली जायची नाही हे ॲकिलिझला ठाऊक होते ; कारण त्याच्या आईने तिच्यापाशी तो एकटा बसला असता पुष्कळदा त्याला तसे सांगितले होते, आणि थोर जव्हची योजना काय आहे त्याची माहिती दिली होती. तथापि आता मात्र त्याच्या सर्व सोबत्यात अतिशय प्रिय अशा पॅत्रोक्लसच्या मृत्यूने त्याच्यावर केवढी घोर आपत्ती कोसळली आहे हे तिने सांगितले नव्हते.

इतर योद्धे अजून त्या देहाभोवती एकमेकांवर तीक्ष्ण भाल्यांनी चढाई करीत एकमेकांचे प्राण घेत होते. मग एकजण म्हणायचा, "मित्रहो, आपल्याला याउपर कधीही नौकांपाशी आपली तोंडे दाखवता येणार नाहीत––पॅत्रोक्लसचे शव आपल्यानगरीत घेऊन जाण्याचा विक्रम त्रोजनांना आपण करू देण्यापेक्षा भूमीने तोंड उघडून आपणास येथेच गिळून टाकले तर बरे, फार बरे होईल !"

त्रोजनही आपल्यापरीने एकमेकांना म्हणत होते, "मित्रहो, जरी आपल्यातला एकूणएकजण या मृतदेहापाशी पडला तरी लढण्यास कोणीही कचरू नये." अशा शब्दांनी ते परस्परांना आग्रहाने सांगत होते. लढवय्ये एकसारखे लढतच राहिले आणि हवेच्या पोकळीतून एक लोखंडी खणखणाट आकाशाच्या ब्राँझ रंगाच्या घुमटाला भिडला. ईकसच्या वंशजाचे घोडे लढाईतून बाहेर निघून उभे राहिले आणि आपला सारथी, घातकी हेक्तरच्या हाताने मारला गेला हे ऐकून त्यांनी अश्रू ढाळले. दायोरिझचा शूर पुत्र ऑनोमेदॉन याने त्यांना पुनःपुन्हा चाबकाचे फटके मारले ; पुष्कळ वेळा तो त्यांच्याशी ममतेनेही बोलला, अनेकदा त्याने त्यांची खरडपट्टी काढली, पण तरीही ते रुंद हेलेस्पॉत-च्या जलाशयाजवळील नौकांकडे परतही जाईनात किंवा ॲकिअन्ससह युद्धातही सहभागी होईनात ; आपल्या रथासह ते जागच्याजागीच खांबासारखे निश्चल उभे राहिले––जसे कोणा मृतपुरुषाच्या वा स्त्रीच्या समाधीवर उभारलेले

स्तंभच,——आणि त्यांनी जमिनीपर्यंत आपली डोकी खाली वाकवली. आपल्या सारथ्याच्या वियोगार्थ शोक करीत असता त्यांच्या डोळ्यातून उष्ण आसवे ओघळली आणि त्यांच्या धुरेच्या दोन्ही बाजूच्या पट्ट्यांखालून त्यांच्या उमद्या आयाळी पार चिंब होऊन ओथंबू लागल्या.

सॅटर्नपुत्राने त्यांना पाहिले व त्यांच्या दुःखाची त्याला करुणा आली. मान हलवून तो स्वतःशी पुटपुटला, "बिचाऱ्या प्राण्यांनो, जो मर्त्यमानव आहे अशा पेलिअसला तुम्हा चिरतरुण व अमर अशा अश्वांना आम्ही का दिले बरे? मानवजातीवर जी दुःखे कोसळतात त्यांच्यात तुम्ही सहभागी व्हावे म्हणून आम्ही तसे केले का? कारण पृथ्वीवर हालचाल करणाऱ्या सर्व सजीव प्राण्यात मानवाइतका दयास्पद कोणी नाही——तरीही प्रामसपुत्र हेक्तर तुम्हाला किंवा तुमच्या रथालाही कधी हाकणार नाही; कारण मला ते चालणार नाही. ज्या चिलखताबद्दल तो एवढी फुकाची बढाई मारीत आहे ते त्याला मिळाले तेवढे पुरे आहे. त्याखेरीज मी एक करीन की युद्धातून नौकांकडे ऑतोमेदॉनला सुरक्षितपणे वाहून नेण्यासाठी मी तुम्हाला मनाचे धैर्य व शरीराची शक्ती देईन, कारण मी त्रोजनांना आणखी जास्त विजय मिळवून देणार आहे, नौकाप्रत पोहोचेपर्यंत ते शत्रूना अधिकाधिक संख्येने मारीत राहतील, मग रात्र होईल व भूमीवर अंधाराची छाया पसरेल."

असे बोलता बोलता फुंकर घालून त्याने त्या घोड्यांचे ठायी हिम्मत व ताकद आणली; त्यामुळे त्यांनी आपल्या आयाळीतली धूळ झटकून टाकली व आपला रथ त्रोजन्स-अँकिअन्समध्ये झडत असलेल्या लढाईत वेगाने ओढून नेला. सोबत्यासाठी शोकग्रस्त झालेल्या ऑतोमेदॉनने कलहंसांच्या कळपावर झडप घालणाऱ्या गिधाडासारखी घोड्यांच्या पाठीमागून लढाई केली. त्रोजनांच्या गर्दीत आतबाहेर, इकडून तिकडे पुऱ्या वेगात त्याने रथ दौडवला, पण कितीही त्वेषाने त्याने पाठलाग केला तरी त्याच्याहातून मारला मात्र नाही गेला एकही माणूस; कारण रथात एकटाच असल्याने त्याला भाला चालवणे व घोडे आवरणे हे दोन्ही शक्य नव्हते; तथापि अखेर त्याचा एक सोबती, हीमॉनपुत्र लैर्सिअसचा मुलगा ॲलिसमेदॉन याने त्याला पाहिले, आणि तो त्याच्या रथामागे आला. तो म्हणाला, "ऑतोमेदॉन, कोणत्या देवाने हे वेड तुझ्या मनात भरवले व तुझी सारासार बुद्धि हिरावून घेतली, की ज्यामुळे तू अगदी पुढच्या फळीत त्रोजनांशी एकटाच लढतो आहेस? जो तुझा सोबती होता तो मारला गेला आहे, आणि ईकसच्या वंशजाचे चिलखत आपण धारण केले म्हणून हेक्तर शेखी मिरवीत आहे."

दायोरिझपुत्र ऑतोमेदॉनने उत्तर दिले, "ॲल्सिमेदॉन, मंत्रणेत देवतुल्य असा पॅत्रोक्लस जिवंत होता तेव्हा त्याच्याखेरीज व आता तुझ्याखेरीज हे अमर अश्व दुसऱ्या कोणालाही आवरता व चालवता येत नाहीत. तेव्हा हे लगाम व चाबूक तू घे म्हणजे मी रथावरून उतरून लढतो."

ॲल्सिमेदॉनने रथावरून उडी मारली आणि लगाम व चाबूक हाती घेतले, तेव्हाच ऑतोमेदॉनने रथावरून खाली उडी घेतली. त्याला हेक्तरने जेव्हा पाहिले तेव्हा जवळच्या ईनिआसला तो म्हणाला, "लोखंडी जाळीची चिलखते घालणाऱ्या त्रोजनांच्या सल्लागारा ईनिआस, ईकसच्या वेगवान पुत्राचे अश्व दुबळ्या हातांनी हाकले जात असलेले असे लढाईत येताना मला दिसत आहेत तुला पटत असेल, तर ते आपल्याला जिंकून घेता येतील अशी मला खात्री वाटते ; आपण दोघांनीही हल्ला केला तर आपल्याला तोंड देण्यास ते लोक धजणार नाहीत."

ॲंकायसिजचा पराक्रमी पुत्र त्याच मताचा होता, आणि ते दोघे थेट तसेच चालून गेले ; त्यांचे खांदे ब्रॉंझ धातूने बऱ्याच मढवलेल्या चिवट सुक्या वृषभ-चामड्याच्या ढालींनी झाकलेले होते. त्यांच्याबरोबर क्रोमिअस व ॲरेतसही होते, आणि शत्रूच्या लोकांना मारून घोडे जिंकून घेण्याच्या आशेने त्यांची हृदये उचंबळून येत होती––मूर्खच होते ते. कारण ऑतोमेदॉनशी गाठ पडल्यानंतर ते मार खाल्ल्याशिवाय परत यायचे नव्हते ; ऑतोमेदॉनने तात जव्हची प्रार्थना केली आणि तात्काल त्याचे ठायी धैर्य व विपुल शक्ती उत्पन्न झाली. आपला विश्वासू सोबती ॲल्सिमेदॉन याजकडे वळून तो म्हणाला, "ॲल्सिमेदॉन तुझे घोडे माझ्या इतके जवळ ठेव की माझ्या पाठीवर त्यांचा श्वास मला जाणवावा ; प्राअॅमपुत्र हेक्तर आपल्याला ठार मारून घोड्यांच्या मागे स्थानापन्न होईपर्यंत आपण त्याला अडवू शकूच अशी मला खात्री नाही ; तसे झाले तर तो एकतर ॲकिअन सैन्यात घावरगुंडी उडवील नाहीतर अग्रभागी लढणारात स्वतःच मारला जाईल."

यानंतर ओरडून तो उभय ॲजॅक्सांना व मेनेलॉसला म्हणाला, "आर्गा-इव्हज्चे नायक ॲजॅक्सहो, आणि मेनेलॉस, तो मृतदेह रक्षण्यास सर्वांत जे समर्थ असतील त्यांच्याकडे तो सोपवा व आम्हा अजून प्राण धरून असलेल्यांच्या सुटकेसाठी धावून या ; कारण त्रोजनांपैकी सर्वोत्तम असे दोघे वीर हेक्तर व ईनिआस युद्धाच्या परिपूर्ण भरात आमच्यावर मोठेच दडपण आणीत आहेत. तरीही परिणाम स्वर्गस्थ शक्तीच्या इच्छेवर अवलंबून आहे, तेव्हा मी माझा भाला फेकतो आणि बाकी जे काय होईल त्याबाबत जव्हवर भिस्त ठेवतो."

हे बोलताना त्याने नेम धरून भाला फेकला तेव्हा तो अॅरेतसच्या गोल ढाली-वर वसून आरपार गेला ; ढालीने तो अडला नाही, तर त्याच्या कमरपट्टयातून पार होऊन ओटीपोटात शिरला. ज्याप्रमाणे एकादा भक्कम तरुण हाती कुऱ्हाड घेऊन बैलांच्या शिंगांमागे घाव घालतो व त्याच्या मानेच्या मागील भागातील स्नायू तोडतो तेव्हा बैल ताडकन पुढे उडून मरून खाली पडतो, त्या-प्रमाणेच अॅरेतस पुढे उडून उताणा पडला––त्याचा अंत होईपर्यंत भाला त्याच्या देहात थयथरत राहिला. मग हेक्तरने आपला भाला ऑतोमेदॉनवर नेम धरून मारला ; पण तो येत असलेला पाहून त्याला चुकवण्यासाठी तो पुढे वाकला, त्यामुळे भाला त्याच्याजवळून पुढे जाऊन त्याचे टोक जमिनीत रुतले, व मार्सने त्याचा जोर काढून घेईपर्यंत भाल्याचा दांडा कंप पावत राहिला मग त्या दोघा वीरांनी एकमेकांना भिडून हातघाईची तलवारीनी लढाई केली असती, पण उभय अॅजॅक्सांनी सोबत्याची हाक ऐकून गर्दीतून नेटाने वाट काढीत येऊन त्या खवळलेल्या वीरांना एकमेकांपासून दूर केले––कारण हेक्तर, ईनिआस व क्रोमिअस भिऊन मागे झाले आणि वर्मी घाव बसलेल्या अॅरेतसला त्यांनी तेथेच पडू दिले. मग मार्सतुल्य चपळ ऑतोमेदॉनने त्याचे चिलखत काढून घेऊन त्याच्या देहावर दर्पोक्ति केली, तो म्हणाला, "मेनिशिअसपुत्रासाठी मला झालेल्या शोकाच्या शमनार्थ मी केले ते स्वल्प आहे, कारण मी मारलेला मनुष्य त्याच्याइतक्या योग्यतेचा नाही."

असे बोलताना त्याने ती रक्तबंबाळ लूट घेऊन आपल्या रथावर ठेवली ; मग बैलावर ताव मारलेल्या सिंहासारखा, रक्ताने भिजून चिंब झालेल्या हाता-पायांनी तो रथावर चढला.

आणि आता ते अत्युग्र, आर्तस्वरयुक्त युद्ध पॅत्रोक्लसच्या देहाभोवती पुन्हा भडकले, कारण दूरदृष्टि जव्हने आपला पहिला विचार बदलला होता व दॅनाअनांना प्रोत्साहन देण्यासाठी स्वर्गातून उतरून लढाईचा भडका वाढवण्याची आज्ञा मिनर्व्हाला केली होती. मानवजातीला युद्धाचे, किंवा लोकांना काम थांबवण्यास लावणाऱ्या व कळपांना संत्रस्त करणाऱ्या, थंडीने हुडहुडी भरवणाऱ्या वादळाचे चिन्ह दर्शवण्यासाठी, नभांगणात जव्ह आपले दैदिप्यमान धनुष्य जसे वाकवतो––अगदी तशाच चमकत्या वस्त्रांनी वेष्टित मिनर्व्हा सैन्यात जाऊन इतस्ततः फिरत एकेकट्या माणसाशी बोलली. प्रथम तिने फीनिक्सचे रूप व आवाज घेऊन जवळ उभा असलेल्या अॅत्रिअसपुत्र मेनेलॉसला म्हटले, "मेनेलॉस, ट्रॉयच्या तटांपाशी अॅकिलिझच्या उदात्त सोबत्याला कुत्र्यांनी फाडले तर तुला लाज येईल व तुझी अब्रू

जाईल ; म्हणून खंबीर रहा आणि तुझ्या लोकांनाही तसेच राहण्याची निकड लाव".

मेनेलॉसने उत्तर दिले, "फीनिक्स, माझ्या भल्या जुन्या मित्रा, मिनर्व्हा मला शक्ती देवो व शूलाग्रे माझ्यापासून दूर ठेवो ; कारण त्यायोगेच पॅत्रोक्लसपाशी उभा राहून मी त्याच्या देहाचे रक्षण करू शकेन ; त्याच्या मृत्यूने माझ्या काळजाचा ठाव घेतला आहे, पण हेक्तर म्हणजे भडकती आगच आहे व अविरतपणे तो घावावर घाव घालीत आहे, कारण जव्ह त्याला आता विजयासाठी संधी प्रदान करीत आहे."

त्याने इतर देवांपैकी कोणाचे नाव घेण्याच्या अगोदर आपला नामनिर्देश केला यामुळे मिनर्व्हा संतुष्ट झाली. म्हणून तिने त्याच्या गुडघ्याना व खांद्याना बळ दिले, आणि माणसाचे रक्त जिला इतके आवडते की उडवली तरी जी पुन्हा परत येते व चावायला बघते, त्या माशीइतके त्याला धीट बनवले. देवीने असा धैर्यशाली केलेला तो वीर पॅत्रोक्लसच्या देहाला राखीत उभा राहिला आणि त्याने भाला फेकणे चालू ठेवले. आता त्रोजनांमध्ये एक एइशनपुत्र पोदिझनामक मनुष्य होता, तो श्रीमन्तही होता व शूरही. हेक्तरने त्याला फार मानीत असे, कारण तो त्याचा सोबती व जिवाभावाचा मित्र होता. तो पळून जाण्यासाठी वळला असताच त्याच्या कमरपट्टयात मेनेलॉसचा भाला बसून थेट आरपार गेला. तेव्हा तो जडपणे पुढे पडला आणि ॲत्रिअसपुत्र मेनेलॉसने त्याचा देह त्रोजनांकडून ओढून स्वकीयांच्या श्रेणींमध्ये घेतला.

मग ॲबिदॉसमध्ये राहणारा व हेक्तरच्या सर्व पाहुण्यांपैकी जास्त मर्जीतला ॲसिअसपुत्र फीनॉप्स याचे रूप घेऊन ॲपॉलो हेक्तरजवळ गेला आणि त्याला लढण्यास चिथावू लागला. त्याच्या रुपातला ॲपॉलो म्हणाला, "हेक्तर, जो मेनेलॉस योद्धा म्हणून नेहमीच कमी प्रतीचा गणला गेला आहे त्याच्यापुढे तू आता उरल्यानंतर, ॲकिअनांपैकी कोणाला यापुढं तुझी भीती वाटणार आहे ? तरी त्याने एकटयाने त्रोजन्सकडून एक प्रेत दूर ओढून नेले आणि तुझा स्वतःचा सच्चा सोबती एइशनपुत्र पोदिझ, जो अग्रगण्य शूरांपैकी एक होता, त्याला ठार मारला."

हे ऐकताना दुःखाचा कृष्णमेघ हेक्तरवर उतरला व संपूर्ण कवचधारी असा तो युद्धाच्या आघाडीवर गेला. तेव्हा सॅटर्नपुत्राने आपली गोंडे लावलेली लखलखती ढाल पकडली व तिने इदा पर्वतावर ढगाचे अवगुंठन आणले ; त्याने आपल्या चमकत्या विजा व मेघगर्जना प्रक्षेपित केल्या आणि आपली ढाल हलवीत असताच त्याने त्रोजनांना जय देऊन ॲकिअनांची दाणादाण उडवली.

घाबरगुंडीची सुरवात बीओशिअन पेनेलॉसकडून झाली, कारण, सर्वकाळ शत्रूकडे तोंड वळवून तो लढत असता खांद्याच्या वरच्या भागावर त्याला भाला लागला; पॉलिडॅमाझने फेकलेल्या त्या भाल्याने याच्या खांद्याच्या हाडाचा वरचा भाग खरचटला गेला, कारण पॉलिडॅमाझने याच्या अगदी जवळ येऊन घाव घातला होता. मग हेक्तरने जवळ भिडून केलेल्या हाणामारीत थोर अॅलेक्त्रिऑन पुत्र लैतस याच्या हातावर मनगटापाशी वार करून त्याला पुढे लढण्यास निकामी करून टाकला. त्याने हताशपणे सभोवार पाहिले कारण त्याला कळून चुकले की पुन्हा कधीही त्रोजनांविरुद्ध लढाईत भाला चालवणे त्याला शक्य राहिले नव्हते. हेक्तर लैतसचा पाठलाग करीत असता त्याच्या वक्षकवचावर स्तनाग्राजवळ आयदोमिनिअसने भाला मारला पण तो दांड्यात मोडला आणि त्रोजनांनी मोठ्याने जयनाद केला. मग द्युकॅलिअनपुत्र आयदोमिनिअस आपल्या रथावर उभा असता त्याच्यावर नेम धरून हेक्तरने फेकलेला भाला अगदी थोडक्यात चुकला; पण लिक्तसहून मेरिऑनिझबरोबर आलेला त्याचा अनुयायी व सारथी कॉइरॅनस याला तो भाला लागला. आयदोमिनिअस नौकांकडून पायीच आला होता व जर कॉइरॅनसने त्वरित आपला रथ त्याच्यापाशी आणला नसता तर त्रोजन्सना एक मोठा विजय मिळवण्याची संधि लाभणार होती; तेव्हा कॉइरॅनसने आयदोमिनिअसचा जीव वाचवून त्याची सुटका केली पण स्वतः मात्र तो हिंसक हेक्तरच्या हाती पतन पावला, कारण हेक्तरचा भाला त्याच्या जबड्यावर कानाखाली बसला; भाल्याच्या टोकाने त्याचे दात बाहेर पोकरले व जिभेचे दोन तुकडे केले त्यामुळे तो रथावरून खाली कोसळला व लगाम त्याने भूमीवर पडू दिले. ते मेरिओनिझने उचलून आपल्या हाती घेतले आणि मग तो आयदोमिनिअसला म्हणाला, "नौकांपाशी परत पोचेपर्यन्त चावकाचे फटकारे ओढीत रहा कारण तुला आता दिसून आलेच असेल की आजच्या दिवसाचा कौल आपल्या बाजूचा राहिलेला नाही."

हे ऐकून घोड्यांच्या पाठीवर चाबूक फटकारीत आयदोमिनिअसने रथ नौकांकडे नेला, कारण भीतीने त्याला ग्रासले होते.

अॅजॅक्स व मेनेलॉस यांच्या लक्षात आले की ज्व्हने पारडे त्रोजन्सच्या बाजूला झुकवले आहे, आणि पहिल्याने बोलला अॅजॅक्स; तो म्हणाला, "अरेरे, तात ज्व्ह त्रोजन्सना साह्य करीत आहे हे एकाद्या मूर्खाला देखील दिसून येईल. शूराने फेकलेली असोत की भेकडाने, त्यांची सारी शस्त्रे अचूक लक्ष्यबेध करीत आहेत. ज्व्ह सर्वांना सारखाच यशस्वी वेग देतो आहे, उलट आपल्या

शस्त्रांचा प्रत्येक घाव निष्फळ होत आहे. मग तो मृतदेह सोडवून नेणे आणि इकडे डोळे लावून बसलेल्या व परिणामी कष्टी झालेल्या आपल्या मित्रांकडे परतून त्यांना प्रमुदित करणे–या दोन्ही कामी सर्वोत्तम मार्ग कोणता? कारण त्यांना खात्रीने वाटेल की हेक्तरच्या भयानक हातांना आता कोणी रोखू शकणार नाही आणि तो आपल्या नौकांवर नक्कीच तुटून पडणार. मला फार वाटते की कोणीतरी जाऊन पेलिअसपुत्राला तात्काळ सारे सांगावे; कारण आपला प्रियतम मित्र पडला हे त्याला अजून कळले असेलसे वाटत नाही. पण त्याच्याकडे पाठवायला ॲकिअनांमधला एकही माणूस मला दिसत नाही, कारण ते आणि त्यांचे रथ दोन्ही अंधाराने झाकून टाकले आहेत. हे तात जव्ह, ॲकिअन्सवरचा हा मेघसंभार उचल; आकाश प्रसन्न कर आणि आम्हाला नीट दिसू दे; आमचा नाश व्हावा अशीच तुझी इच्छा असेल तर निदान उजेडात तरी आम्हाला रणी पडू दे."

त्याची हाक तात जव्हने ऐकली आणि त्याच्या अश्रूंनी देवराजाला अनुकम्पा आली. तात्काल त्याने तमोमेघ हाकून काढले. त्यामुळे चक्क सूर्यप्रकाश पडला आणि सर्व लढाई स्पष्ट दिसू लागली. मग ॲजॅक्स मेनेलॉसला म्हणाला, "जरा पहा मेनेलॉस, आणि नेस्तॉरपुत्र ॲन्तिलॉकस जर अजून जिवंत असेल तर त्याला लगेच ॲकिलिझकडे सांगायला धाड, की त्याचा सर्वाहून फार प्रिय असा सोबती पतन पावला आहे."

त्याचे सांगणे मानून मेनेलॉस चालू लागला–जसा एकादा सिंह गुरांच्या कोंडवाड्यातून निघून जातो तसा; माणसांवर व शिकारी कुत्र्यांवर हल्ले करून तो थकलेला असतो, कारण कळपातली निवडक लठ्ठ गुरे खाऊन त्याने मजा मारू नये म्हणून रात्रभर त्यांचा पाहरा चालू असतो. मांसाच्या तीव्र लालसेने, तो थेट गुरांकडे धाव घेतो; पण व्यर्थ! कारण बळकट हातांनी फेकलेले भाले आणि जळती लाकडे यांचा मारा त्याच्यावर होतो, त्यामुळे कितीही भुकेला असला तरी तो डगमगतो आणि तिरसटल्यासारखा दबकत छपत सकाळी निघून जातो–अगदी तशाच प्रकारे अगदी अनिच्छेने मेनेलॉस पॅत्रोक्लसचे शव सोडून गेला; त्याला फार धास्ती होती की ॲकिअन्सची दाणादाण उडून ते मागे हटवले जातील आणि ते शव शत्रूच्या हाती पडेल. त्याने मेरिऑनिझ व उभय ॲजॅक्स यांना कडकपणे बजावले, "ॲजॅक्सहो व मेरिऑनिझ, आर्गाइव्हजचे नेतेहो, खरोखर आताच लक्षात घ्या की पॅत्रोक्लस किती सज्जन होता; जितेपणी तो सदा दाक्षिण्यपूर्ण असे ही गोष्ट आता तो मृत झाला असताही ध्यानात राहू द्या."

हे सांगून मेनेलॉस त्यांच्याकडून निघाला. एखाद्या गरुडाच्या तीक्ष्ण नजरेने भोवती पाहात तो चालला. गरुडाची नजर दुसऱ्या कोणत्याही पक्षा-पेक्षा तीक्ष्ण असते असे म्हणतात; तो आकाशात कितीही उंचावर असो, पळत असलेला कुठलाही ससा झुडुपाखाली किंवा झाडांच्या जांळीखाली लपला तरी त्याच्या नजरेतून सुटू शकत नाही; कारण गरुड झेप घालून अखेर त्याचा शेवट करणारच–अगदी तशीच, हे मेनेलॉस, तुझी तीक्ष्ण दृष्टी तुझ्या अनुयायांच्या बलवान पथकावरून फिरली–नेस्तॉरचा पुत्र अजून जिवंत आहे का हे तू शोधीत होतास. लौकरच लढाईच्या अगदी डावीकडे त्याला तो दिसला; तो आपल्या लोकांना प्रोत्साहन देत धैर्याने लढण्याची निकड लावीत होता. त्याच्याजवळ जाऊन मेनेलॉस म्हणाला, "ॲन्तिलॉकस, इकडे ये व एक वाईट वार्ता ऐक–ती खोटी असती तर किती बरे झाले असते! तुला तुझ्या डोळ्यांनी चक्क दिसत असेल की देव दॅनाअनांवर आपत्तींचा डोंगर रचीत आहेत व ट्रोजनांना विजय मिळवून देत आहेत. पॅट्रोक्लस रणात पडला आहे, तो ॲकिअन्समध्ये सर्वात शूर होता आणि दॅनाअन्सना त्याची उणीव तीव्रतेने जाणवणार आहे. तात्काळ नौकांकडे पळत जा व ॲकिलिझला सारे सांग, म्हणजे त्याला येऊन ते शव सोडवून परत नौकांकडे नेता येईल. चिलखताबद्दल म्हणायचे तर ते अगोदरच हेक्तरने घेतले आहे."

ॲन्तिलॉकस या वार्तेने धक्का बसून भयचकित झाला. पुष्कळ वेळपयत त्याच्या तोंडून शब्द फुटेना, त्याचे डोळे अश्रूंनी भरून आले व काय बोलावे ते त्याला सुचेना; पण मेनेलॉसन सांगितल्याप्रमाणे त्याने केले, आणि आपले चिलखत एका सोबत्याच्या स्वाधीन करून तो पळतच निघाला. हा सोबती लॅओदॉकस त्याच्याजवळच त्याचे घोडे वाटोळे फिरवीत होता.

तेव्हा याप्रमाणे रणांगणावरून तो रडत पळत पेलिअसपुत्र ॲकिलिझला ती कुवार्ता पोहचवायला निघाला आणि हे मेनेलॉस, तुझाही त्याच्या संत्रस्त सोबत्यांना मदत करण्याकडे कल दिसला नाही. त्या पिलिअन्सना सोडून ॲन्तिलॉकस निघून गेला होता. आणि तो नसल्याचे त्यांना फार तीव्रपणे जाणवत होते–पण मेनेलॉसने उदात्त थ्रॅसिमिदिझला त्यांच्याकडे धाडले आणि तो स्वतः परत पॅट्रोक्लसच्या देहाकडे गेला. उभय ॲजॅक्सांपाशी तो पळत आला व म्हणाला, "मी ॲन्तिलॉकसला नौकांकडे ॲकिलिझला निरोप सांगण्यासाठी पाठवले आहे; पण तो हेक्तरवर कितीही खवळला तरी त्याला लढायला येता येणार नाही, कारण चिलखताशिवाय त्याला लढता यणार नाही. तेव्हा मग मृतदेह सोडविणे आणि ट्रोजन्सच्या कोलाहलातून

आपण जिवानिशी सुटून जाणे या दोन्ही कामी सर्वात उत्तम योजना कोणती? "

ॲजॅक्सने उत्तर दिले, "मेनेलॉस, तू योग्य बोललास. तेव्हा आता तू व मेरिऑनिझ खाली वाकून मृतदेह उचला व झगड्यातून तो दूर न्या; दरम्यान आम्ही दोघे मागे राहून हेक्तर व त्रोजन यांना थोपवून धरतो. आम्ही दोघे नावाने तसेच मनाने एक आहोत आणि एकमेकांच्या शेजारी राहून लढण्याची पुष्कळ दिवसांची सवय आम्हाला आहे."

हे ऐकून मेनेलॉस व मेरिऑनिझ यांनी तो मृत मनुष्य आपल्या बाहुपाशात धरून मोठ्या प्रयत्नाने उंच उचलला. तो देह ॲकिअन्स घेऊन चाललेले पाहून त्यांच्यामागे त्रोजन्सच्या सैनिकांनी एकच हलकल्लोळ उठवला आणि तरुण शिकाऱ्यांच्या टोळीने दिलेल्या इशाऱ्यावर शिकारी कुत्रे जसे जखमी रानडुकरावर हल्ला करतात तसे त्रोजन्स त्यांच्यामागे धावले; काहीवेळ ते कुत्रे त्या रानडुकराचे जणू फाडून तुकडे करणार अशा त्वेषाने त्याच्यावर उड्या घेतात, पण तो मधूनमधून भडकून त्यांच्यावर उलटतो व त्यांना घाबरवून चौफेर उधळून लावतो–अगदी त्याप्रमाणेच काहीवेळ त्रोजन्सनी तलवारींनी व दोन्ही बाजूंना टोके असलेल्या भाल्यांनी एक जुटीने हल्ला केला, पण जेव्हा दोघे ॲजॅक्स त्यांना सन्मुख होऊन उलटून उभे ठाकले, तेव्हा त्रोजन्स गोरेमोरे झाले व पुढे होऊन मृत देहासाठी आणखी नेटाने लढण्याची कोणाची प्राज्ञा झाली नाही.

याप्रमाणे त्या दोन वीरांनी ते शव लढाईतून बाहेर नौकांकडे नेण्यासाठी प्रयत्नाची पराकाष्ठा केली. एकदा भडकलेल्या आगीच्या ज्वाळा जशा नगरावर वणव्यासारख्या पसरतात आणि जाळाच्या प्रखर प्रकाशात घरे कोसळतात तसे युद्ध त्या वीरांभोवती पेटले होते. पॅत्रोक्लसला रणातून ते वाहून नेत असताना त्यांचा पाठलाग करणाऱ्या लोकांचे व घोड्यांचे पदाघात आणि गर्जना तशाच भडकून पसरत होत्या. किंवा एखाद्या खडबडीत गिरि-मार्गावरून एखादी तुळई किंवा नौका घडवायला उपयुक्त असा प्रचंड काष्ठ-खंड ओढून नेणारी खेचरे आपली सारी शक्ती पणास लावून जशी धापाटाकीत घामाघूम होतात–तसेच पॅत्रोक्लसचा देह वाहून नेताना मेनेलॉस व मेरिऑनिझ धापा टाकीत घामाघूम झाले. त्यांच्यामागे दोघे ॲजॅक्स खंबीरपणे शत्रूला तोंड देत राहिले. ज्याप्रमाणे मैदानाच्या मध्यभागी आडवा पसरलेला पर्वताचा एखादा वृक्षाच्छादित कडा पाण्याचा ओघ अडवून वळवील आणि मोठ्या नदीचा प्रवाह देखील रोखील व त्याचा अडथळा फोडून पार होण्याइतका जोर एकाही जलौघात नसेल,–त्याप्रमाणेच उभय ॲजॅक्सांनी त्रोजन्सना तोंड देऊन

त्यांच्या चढाईची, एकसारखी लोटीत पुढे येणारी लाट थोपवून धरली आणि हल्ला करणारात अग्रभागी होते अँकायसिसपुत्र ईनिआस व त्याच्याबरोबर पराक्रमी हेक्तर. साऱ्या बारक्या पक्ष्यांचा शत्रू ससाणा उंचावरून उड्डाण करीत जवळ येत असलेला पाहून डॉ किंवा स्टार्लिंग पक्ष्यांचा तांडा जसा कर्कशपणे ओरडा व चिवचिव करू लागतो, तसाच अर्थहीन संमिश्र आरडाओरडा, आपला पूर्वीचा पराक्रम विसरून, ईनिआस व हेक्तर यांच्यासमोरून पळून जाणाऱ्या अँकिअन तरूणांनी केला. दॅनाअनांची जी दाणादाण उडाली तिच्यामुळे पुष्कळ उत्तम शस्त्रसंभार खंदकाभोवती गळून पडला आणि मारामारीचा तर अंतच दृष्टीक्षेपात येत नव्हता.

● ● ●

## सर्ग १८

असे एखाद्या ज्वलंत अग्नीसारखे ते लढले. दरम्यान जलद धावणारा अँन्तिलॉकस दूत म्हणून पाठविला होता तो अॅकिलिझपाशी पोहोचला. तो त्याला त्याच्या उच्च नौकांपाशी बसलेला दिसला आणि खरोखर जे अगदी खात्रीनेच घडून आले होते त्याचे भाकित तो मनाशी करीत होता. ऊर अगदी भरून येऊन तो स्वतःशी म्हणाला, "अरेरे, अॅकिअन पुन्हा मैदानावरून धावत सुटून नौकांकडे का गोळा होत आहेत? स्वर्गस्थ शक्तींची कृपा होवो व माझी माता थेतिस ज्याच्याबद्दल बोलली होती ते दुःख देव माझ्यावर ओढवून न आणोत! ती म्हणाली होती की मी जिवंत असतानाच मिर्मिदॉनांमधला सर्वात शूर वीर त्रोजनांपुढे पडेल आणि त्याला पुन्हा सूर्यप्रकाश दिसणार नाही. मला धास्ती वाटते की मेनिशिअसचा शौर्यशाली पुत्र स्वतःच्याच साहसी स्वभावामुळे मारला गेला आहे—आणि तरीही मी त्याला बजावले होते, की नौकांकडे अग्नि आणणाराना मागे रेटल्याबरोबर त्याने परत फिरावे व हेक्तरशी युद्धात गुंतू नये."

असे तो चिंतन करीत असताच नेस्तारपुत्र त्याच्याजवळ आला व कळवळून रडत त्याने आपली दुःखद कहाणी त्याला सांगितली, "हाय, उदात्त पेलिअसच्या पुत्रा, मी तुझ्याकडे दुष्ट वार्ता घेऊन आलो आहे, ती खोटी असती तर किती बरे झाले असते! पॅत्रोक्लस धारातीर्थी पडला आहे व त्याच्या अनावृत देहाभोवती तुमुल संग्राम चालला आहे—कारण हेक्तरने त्याचे चिलखत हिरावून घेतले आहे."

हे ऐकत असता अॅकिलिझवर दुःखाच्या कृष्णमेघाची छाया पडली. भूमीवरून दोन्ही मुठी भरून धूळ उचलून त्याने ती डोक्यावर ओतली व त्यायोगे आपला उमदा चेहरा विद्रूप करून चांगल्या नव्या अंगरख्यावर ती घाण पडून राहू दिली. त्याने आपला प्रचंड देह धाडकन भूमीवर ऐसपैस लोटून दिला व हातानी आपले केस उपटले. अॅकिलिझ व पॅत्रोक्लस यांनी जिंकून आणलेल्या दासींनी दुःखाने किंकाळ्या फोडल्या, त्यांनी ऊर बडवून घेतले आणि शोकाने त्या विकलांग झाल्या. त्यावेळी विव्हळत पडलेल्या अॅकिलिझचे दोन्ही हात धरून स्वतः रडणारा अँन्तिलोकस त्याच्यावर वाकून कितीवेळ उभा राहिला, कारण अॅकिलिझ स्वतःच्या गळ्यात सुरी खुपसून घेईल अशी भीति त्याला

वाटत होती. मग अँकिलिझने मोठ्याने हंबरडा फोडला आणि खोल सागरात आपल्या वृद्ध पित्यापाशी बसलेल्या त्याच्या मातेने तो आवाज एकून किंकाळी फोडली; तेव्हा समुद्रतळी राहणाऱ्या साऱ्या नेरिअस कन्या असलेल्या देवता तिच्याभोवती गोळा झाल्या. त्यांच्यात होत्या ग्लॉसी, थालिआनी सिमोदोसी, नेसाइआ, स्पिओ, थोई व काळ्या डोळ्यांची हाली, सिमोथोई, अॅक्तिआ व लिम्नोरिआ, मेलिती, आईरा, अम्फिथोई व अॅगव्ही, दोतो व प्रोतो, फेरूसा व दाएनॅमेनी, देक्सॅमिनी, अॅम्फिनोमी व कॅलिअॅनीरा, दोरिस, मॅनोपी व प्रसिद्ध सागराप्सरा गॅलॅटिआ, नेमेंतिस, अॅप्स्यूदिस व कॅलिअॅनॅसा. शिवाय होत्या क्लिमिनी, आअॅनीरा व आअॅनॅसा, मीरा, ओरी थ्युइआ व सुकेशा अॅमॅथीआ; त्यांच्याबरोबर खोल सागरात राहणाऱ्या इतर नेरेइदीजही होत्या. ती स्फटिकाची गुहा त्या देवींच्या समूहाने भरून गेली आणि थेतिसच्या आक्रोशाला जोड देत त्या सर्वांनी ऊर बडवून घेतले.

थेतिस म्हणाली, "ऐका भगिनींनो, नेरिअस कन्यांनो, म्हणजे माझ्या दुःखाचे मुख्य सूत्र तुम्हाला कळेल. होय, दुर्दैव माझे; माझ्या पोटी अतितेजस्वी संतान जन्माला आले ते शेवटी अशा दुःखालाच कारण व्हायला का? मी त्याला जन्म दिला तेव्हापासूनच तो देखणा व धष्टपुष्ट होता; वीरातला वीर; आणि एकाद्या बालतरुसारखा तो एकदम फोफावला. एकाद्या सुंदर उद्यानातल्या रोपट्यासारखे त्याचे मी संगोपन केले आणि त्रोजनांशी लढण्यासाठी त्याच्या नौकांसह त्याला इलिअमला पाठवले; पण परत पेलिअसच्या घरी त्याचे स्वागत करण्याची संधी मला कधीच मिळणार नाही. सूर्यप्रकाश पाहण्यास तो जिवित आहे तोपर्यन्त तो दुःखाने भारावलेलाच आहे, आणि जरी मी त्याच्याकडे गेले तरी त्याला कसलेही साह्य मी करू शकणार नाही. तरीही मी जाणारच, म्हणजे मला माझा प्रिय पुत्रही भेटेल आणि तो युद्धापासून अजून अलिप्त राहिला असूनही त्याच्यावर काय दुःख ओढवले आहे हे तेही समजेल."

असे बोलतानाच ती गुहेबाहेर पडली आणि बाकीच्या साऱ्या रडत तिच्या पाठोपाठ निघाल्या. लाटांनी दुभंगून त्यांना वाट दिली. त्या जेव्हा त्रॉयच्या संपन्न मैदानात पोहोचल्या तेव्हा समुद्रातून बाहेर निघून वाळूच्या किनाऱ्यावरून लांबच लांब रांगेनें त्या अॅकिलिझच्या तंबूभोवती, जेथे मर्मिदॉनांच्या नौका ओढून लावल्या होत्या तेथे आल्या. तो विव्हळत पडला असताना त्याची माता त्याच्यापाशी गेली; तिने त्याच्या मस्तकावर हात ठेवून करूणार्द्र स्वरानें त्याला विचारले, "माझ्या मुला, तू असा रडतो का आहेस? तुझ्यावर आता काय दुःख कोसळले आहे? मला सांग, माझ्यापासून लपवून ठेवू नकोस.

खरं म्हणजे जव्हने तुझे मागणे मान्य केले आहे; जेव्हा तू हात वर उचलून त्याला विनविलेस की सारे ॲकिअन त्यांच्या नौकांपाशी कोंडले जावेत आणि तू त्यांच्यात नाहीस याचा कटु पश्चात्ताप त्यांनी करावा तेव्हा तुझी ती प्रार्थना जव्हने सफल केली आहे."

ॲकिलिझने दुःखस्वर काढला व म्हटले, "माते, ऑलिम्पिआवासी जव्हने माझ्या प्रार्थनेचे फळ दिले खरे, पण त्याचा मला काय उपयोग? कारण माझा प्रियसखा पॅत्रोक्लस रणांगणात पडला आहे, त्याचे मोल इतर सर्वांपेक्षा माझ्यालेखी जास्त होते आणि स्वतःच्या प्राणासारखे माझे त्याच्यावर प्रेम होते. मी त्याला गमावून बसलो आहे, होय! आणि तुला मर्त्य मानवाशी जेव्हा एक-शय्या करायला देवांनी लावले तेव्हा त्यांनी पेलिअसला जे दिव्य अद्‌भूत कवच दिले होते ते हेक्तरने पॅत्रोक्लसला मारल्यावर त्याच्या देहावरून काढून घेतले आहे. किती छान झाले असते जर तू अद्यापिही अमर सागराप्सरातच राहिली असतीस व पेलिअसने एकादी मर्त्य स्त्री आपली नवरी करून घेतली असती तर! कारण आता यापुढे ज्या मुलाचे कधीही आपल्या घरी तुला स्वागत करता येणार नाही त्याच्या मरणाचे असीम दुःख तुला होणार आहे—नाही, नाही! माझ्या भाल्याने हेक्तर रणात पडेपर्यन्त व मेनिशिअसपुत्र पॅत्रोक्लस याला मारण्याबद्दल तो मला असा भरपाई दंड देईपर्यन्त मी जीव धरून रहाणार नाही की मानवजातीत वावरणार नाही."

थेतिस आक्रंदून म्हणाली, "मग माझ्या पुत्रा, तुझा अंत जवळ आला आहे—कारण हेक्तरच्या मृत्युपाठोपाठ अगदी लौकर तुझा स्वतःचाही मृत्यु घडून येणार आहे."

मग ॲकिलिझ परम दुःखावेगात म्हणाला, "मी आपल्या सोबत्याला वाचवू शकलो नाही म्हणून आत्ताच व येथेच मला मरण आले तर बरे होईल. तो घरापासून दूर असताना रणात पडला आणि त्याच्या संकटाच्याक्षणी त्याच्यामदतीला तेथे माझा हात उपस्थित नव्हता. आता काय उरले आहे माझ्या साठी या जगात? स्वतःच्या देशाला मी परत जाणार नाही, आणि पॅत्रोक्लसला किंवा बलाढ्य हेक्तरने माझ्या इतर सोबत्यांपैकी जे इतके पुष्कळ ठार केले त्यांनाही वाचवायला माझा उपयोग झाला नाही; येथे माझ्या नौकांपाशी मी राहतो आहे केवळ भूमीला एक निरर्थक भार म्हणून--मी—ज्या माझ्याशी युद्धात तुल्यबल असा ॲकिअन्सपैकी कोणी नाही, जरी मंत्रणेत माझ्याहून शहाणे त्यांच्यात आहेत; म्हणून मरो तो संघर्ष देवांमधला व माणसांतलाही, आणि जळो तो संताप; ज्याच्या भरात सहृदय माणूस देखील हृदय कठोर

करतो---जो संताप माणसाच्या अंतर्यामी धुरासारखा उठतो व ज्याचा स्वाद मधुबिंदूपेक्षाही मधुरतर असतो---अगदी तसाच संताप ॲगॅमेम्नॉनने मला आणला. आणि तरीही---जाऊ दे, कारण ते सर्व आता संपले आहे. मी माझ्या मनाला बळजबरीने नमवीन, तसे मला केलेच पाहिजे. मी जाईन, ज्याच्यावर इतक्या जिवाभावाने मी माया केली त्याला मारणाऱ्या हेक्तरचा मी पाठलाग करीन, आणि मग जव्हला व इतर देवांना माझ्यावर घाला घालण्याची इच्छा होईल---त्या माझ्या नियतीच्या क्षणाची वाट पाहीन. जव्हचा सर्वात प्रिय हर्क्युलिझ-त्याला सुद्धा मृत्यूच्या हातून निसटता आले नाही; देवाने व ज्यूनोच्या उग्र कोपाने त्याला भुईसपाट केले, तसाच माझा अंत होणार असला तर तसाच, मीही भुईसपाट होईन. तोपर्यंत मी कीर्ती मिळवीन आणि त्रोजन व दार्दानिअन स्त्रियांना परमदु:खाच्या भरात त्यांच्या नाजूक गालांवरून दोन्ही हातांनी आसवे निपटून काढण्यास सांगेन; याप्रमाणे त्यांना कळून येईल की जो इतका वेळ बाजूला राहिला होता तो आता बाजूला राहणार नाही. म्हणून माझ्या-वरच्या तुझ्या प्रेमाखातर, आता मला आवरून धरू नको, कारण मी निश्चया-पासून ढळणार नाही."

मग रौप्यचरण थेतिसने उत्तर दिले, "माझ्या मुला, तू जे म्हणालास ते खरे आहे. आपल्या सोबत्यांना विनाशापासन वाचवणे योग्यच आहे; पण तुझे चिलखत त्रोजनांच्या ताब्यात आहे; हेक्तर ते विजयाच्या दिमाखात स्वत:च्या खांद्यावर घालीत आहे. त्याची ही प्रौढी टिकणार नाही हे मला पुरते ठाऊक आहे, कारण त्याचा शेवट अगदी जवळ आला आहे; पण मला पुन्हा परत येथे आलेली पाहीपर्यन्त तू युद्धाच्या गर्दीत जाऊ नको; उद्या सूर्यो-दयाला मी येथे येते आणि व्हल्कन राजाकडून तुला एक उत्तम चिलखत आणते."

असे म्हणून ती आपल्या शूर पुत्राजवळून निघाली, आणि जाण्यासाठी वळत असता आपल्या भगिनी समुद्राप्सरा यांना म्हणाली, "सागराच्या अंतर्भागात बुडी मारा व माझ्या वृद्ध सागरदेव-पित्याच्या घरी जा. त्याला सर्व काही सांगा; मी स्वत: उत्तुंग ऑलिम्पसवर चतुर कारागीर व्हल्कन याच्याकडे जाते आणि त्याला माझ्या पुत्रासाठी उत्कृष्ट चिलखताचा एक संच करून दे म्हणून सांगते." तिने असे म्हटल्यावर त्या सागराप्सरांनी तात्काल सागरात बुड्या मारल्या. दरम्यान रौप्य चरणा थेतिस आपल्या मुलाला चिलखत आणण्यासाठी आपल्या वाटेने गेली.

तेव्हा याप्रमाणे त्यादेवीच्या पायांनी तिला ऑलिम्पसला नेले, आणि दरम्यान प्राणघातक हेक्तरपुढे ॲकिअन मोठमोठ्याने ओरडत पळत होते ते थेट त्यांच्या

नौकांपाशी व हेलेस्पॉंतला पोहोचेपर्यंत; आणि त्याच्यावर बरसणाऱ्या शस्त्रां-पासून, मार्स सेवक पॅत्रोक्लसचा देह ते दूर ओढून नेऊ शकत नव्हते, कारण प्राअॅमपुत्र हेक्तर आपले सैनिक व घोडेस्वार यांच्यासह एकाद्या धगधगत्या भट्टीच्या ज्वाळेप्रमाणे त्या मृत देहाला वेढून राहिला होता; शूर हेक्तरने त्या देहाचे पाय पकडून व मोठ्या आवाजात त्रोजनांना हाका घालून संपूर्ण बळानिशी तो देह ओढून नेण्याचा तीनदा प्रयत्न केला, आणि वस्त्राप्रमाणे शौर्याने वेष्टित अशा दोघा अॅजॅक्सांनी तीनदा त्याला त्या देहापासून हटवले; पण तो न डगमगता कधी पुन्हा लढाईच्या ऐन गर्दीत धडक मारी तर कधी स्थिर उभा राहून मोठ्याने ओरडे पण मागे मात्र अजिबात हटेना. ज्याप्रमाणे उंच पठारावरचे मेंढपाळ मेलेल्या मेंढीवरून एकाद्या भुकेल्या सिंहाला हुसकून लावू शकत नाहीत, त्याप्रमाणे पॅत्रोक्लसच्या शवापासून प्राअॅमपुत्र हेक्तरला दोघे अॅजॅक्स घालवू शकले नाहीत.

आणि आता तर त्याने तो देह ओढून नेलाही असता व अविनाशी कीर्ती कमावली असती ; पण वायुवेगवती आयरिस उड्डान करून ऑलिम्पसहून दूती म्हणून पेलिअसपुत्राकडे आली नि तिने त्याला शस्त्रसज्ज होण्यास सांगितले ज्यूनोने पाठवले म्हणून जव्हच्या व इतर देवांच्या नकळत ती गुप्तपणे आली आणि त्याच्या अगदी जवळ आल्यावर म्हणाली, "पेलिअसपुत्रा, ऊठ, साऱ्या मानवजातीत तू अति प्रबळ आहेस. नौकांपाशी हे भयंकर युद्ध ज्या पॅत्रोक्लस-भोंवती भडकले आहे त्याचा देह सोडव. माणसे एकमेकांचे प्राण घेत आहेत, मृतदेहाला वाचवण्यासाठी दॅनाअन्स व तो ओढून पवनव्याप्त इलिअमला नेण्यासाठी त्रोजन्स झटत व मारामारी करीत आहेत ; त्या सर्वांत अधिक बेफाम हेक्तर आहे ; मृतदेहाचे मस्तक तोडून ते भिंतीच्या अणकुचीदार खांबावर बसवण्याचा त्याचा बेत आहे. तेव्हा उठ, व आता इथे थांबू नको. त्रॉयच्या कुत्र्यांचे भक्ष्य पॅत्रोक्लस कदाचित होईल या विचाराने अंगावर शहारे येऊ देत. त्याच्या देहाची कुठल्याही प्रकारे विटम्बना झाली तर तुला ते मोठे लाजिरवाणे होईल."

आणि अॅकिलिझने विचारले, "आयरिस, देवांपैकी कोणी तुला माझ्याकडे पाठविले ?"

आयरिसने उत्तर दिले, "जव्हची पत्नी राणी ज्यूनो हिने ; पण मी इथे आलेली सॅटर्नपुत्राला माहीत नाही ; तसेच हिमावृत्त शिखरांच्या ऑलिम्पसवरील दुसऱ्या अमरांपैकीही कोणाला हे माहीत नाही."

तेव्हा द्रुतगती अॅकिलिझने तिला उत्तर दिले, "मला युद्धात आघाडीवर कसे जाता येईल ? माझे चिलखत तर त्याच्या ताब्यात आहे. माझ्या मातेने ती परत आलेली दिसेपर्यंत शस्त्रसज्ज होण्यास मला प्रतिबंध केला आहे, कारण व्हल्कनकडून उत्तम चिलखत घेऊन येण्याचे वचन तिने मला दिले आहे. ज्याची शस्त्रे मला धारण करता येतील असा कोणीही पुरुष मला माहीत नाही ; अपवाद आहे फक्त तेलेमॉनपुत्र अॅजॅक्सच्या ढालीचा ; आणि तो तर नक्कीच अग्रश्रेणीत लढत मृत पॅत्रोक्लसभोवती आपला भाला चालवीत असणार."

आयरिस म्हणाली, "तुझे चिलखत काढून घेतले आहे हे आम्हाला ठाऊक आहे, पण आहेस तसाच जा ; खोल खंदकापाशी जाऊन त्रोजनांच्यासमोर उभा रहा म्हणजे तुझी भीति वाटून ते लढायचे थांबतील. या मार्गाने क्षीणबल होत असलेले अॅकिअन्सपुत्र थोडी उसंत मिळवू शकतील. एरवी ती लढाईत मिळणे अशक्यच असते."

असे बोलल्यानंतर आयरिस त्याच्यापासून निघून गेली, पण जव्हचा प्रिय अॅकिलिझ उठला व त्याच्या बळकट खांद्याभोवती मिनर्व्हाने आपली गोंडेदार ढाल संरक्षणार्थ टाकली, त्याच्या मस्तकावर सोनेरी ढगाच्या तेजाचा किरीट ठेवला व त्यामधून चमकत्या अग्नीची दीप्ती पेटत ठेवली. समुद्रात दूरवर असलेल्या बेटावरच्या वेढा पडलेल्या एकाद्या नगरीतून वर जाणाऱ्या धुराप्रमाणे ––दिवसभर शहराबाहेर चाल करून येऊन लोक निकराने लढतात व सूर्यास्त झाल्यावर पेटवलेल्या खुणेच्या शेकोटयांचे जाळ वरपर्यंत पेटून उठतात, जवळपास राहणारांना दिसावे व शक्य तर त्यांनी आपल्या नौकातून येऊन साह्य करावे यासाठी––जेव्हा तो भिंतीपलीकडे जाऊन खंदकापाशी उभा राहिला तेव्हा अगदी तसाच प्रकाश अॅकिलिझच्या मस्तकापासून उफाळून निघाला. पण तो स्वतः अॅकिअनांना जाऊन मिळाला नाही, कारण त्याच्या मातेने त्याला जे बजावले होते ते त्याने लक्षात ठेवले होते.

तेथे तो उभा राहिला व मोठ्याने ओरडला. मिनर्व्हानेही दुरून आपला आवाज चढवला आणि त्रोजन्समध्ये अवर्णनीय भीति फैलावली. नगरीच्या वेशीपाशी शत्रू येऊन ठेपला असता भयसूचक ध्वनी करणाऱ्या तुतारीप्रमाणे ईकसपुत्राचा आवाज खणखणीत होता व त्याचे तारस्वर त्रोजन्सनी जेव्हा ऐकले तेव्हा ते हताश झाले ; भावी अरिष्टाची चाहूल लागून घोडे आपल्या रथांसह मागे फिरले आणि धूसर-नयना देवीने महान पेलिअसपुत्राच्या शिरावर चेतवलेली स्थिर ज्योत पाहून त्यांचे सारथी भयग्रस्त झाले.

त्या खंदकापाशी उभा राहून अॅकिलिझने तीनदा तारस्वरात आरोळी दिली आणि तीनदा त्रोजन्स व त्यांचे शूर मित्रपक्षीय गडबडून गेले. परिणामी त्यांच्या उत्तम लढवय्यांपैकी बाराजण स्वतःच्याच रथाच्या चाकाखाली पडले व आपल्याच भाल्यांनी मारले गेले. मग अॅकिअन्सनी मोठ्या आनंदाने पॅत्रोक्लसचा देह शस्त्रांच्या टप्प्यातून दूर ओढून काढला आणि एका रुग्णवाहक डोलीवर ठेवला ; त्याचे सोबती शोक करीत त्याच्याभोवती उभे राहिले, आणि आपला सच्चा साथी त्या डोलीवर मरून पडलेला पाहून त्या लोकातच उभा असलेला द्रुतगती अॅकिलिझ ढसढसा रडला. घोडे व रथ बरोबर देऊन याने त्याला युद्धात पाठविला होता, पण त्याच्या पुनरागमनाचे स्वागत याच्याकडून व्हायचे नव्हते.

नंतर कार्यव्यग्र सूर्याला जरी तो अनुत्सुक होता तरीही ज्यूनोने ओशिअॅनसच्या जलाखाली पाठवले ; याप्रमाणे तो अस्तास गेला आणि युद्धाच्या ताणातून व कल्लोळामधून अॅकिअन्सना विश्रांती मिळाली.

आता लढाईतून बाहेर पडल्यानंतर त्रोजनांनी आपल्या रथांचे घोडे सोडवले आणि रात्रीचे भोजन सिद्ध करण्यापूर्वी सभेसाठी ते एकत्र गोळा झाले. ते उभेच राहिले आणि कोणाला खाली बसण्याचे धैर्य झाले नाही, कारण युद्धापासून इतक्या काळपर्यंत अलिप्त राहिलेल्या अॅकिलिझने त्यांना दर्शन दिल्यामुळे त्या सर्वांवर भीतीचा पगडा बसला होता. पॅन्थॉसपुत्र पॉलिडॅमाज पहिल्याने बोलला; तो विवेकी होता, त्यांच्यापैकी त्याला एकट्यालाच मागचा पुढचा नीट विचार करून निर्णय घेता येत असे. तो हेक्तरचा सोबती होता, आणि दोघांचाही जन्म एकाच रात्री झाला होता. पूर्ण कळकळीने व सदिच्छेने तो त्यांना उद्देशून मग असे बोलला, "नीट विचार करा, माझ्या मित्रांनो ; आता तुम्ही परत आपल्या नगरीकडे जावे व येथे नौकांपाशी थांबू नये असे मी आग्रहाने सांगतो, कारण आपण आपल्या तटांपासून दूर आहोत. जोपर्यंत हा मनुष्य अॅगॅमेम्नॉनशी वैर धरून होता तोपर्यंत अॅकिअनांचा प्रतिकार करणे सोपे होते, आणि नौका जिंकण्याच्या आशेने येथे त्यांच्याचपाशी तळ द्यायला मला आनंद वाटला असता; पण आता मला पेलिअसच्या शीघ्रगती पुत्राचे फार भय वाटते; तो इतका धाडसी आहे की त्रोजन्स व अॅकिअन्स सारख्याच शौर्याने लढत असलेल्या या मैदानावर तो थांबणार नाही ; तर आपल्या नगरीवर हल्ला चढवून आपल्या स्त्रिया पळवून नेण्याचा तो प्रयत्न करील. तेव्हा मी म्हणतो तसे करा. आपण माघार घेऊ या. कारण यापुढे जे होण्याची शक्यता आहे ते असे. रात्रीचा अंधार काही वेळपर्यंत पेलिअसपुत्राला थांबवून ठेवील,

पण सकाळी पूर्ण शस्त्रसज्ज होऊन तो जेव्हा जोरात बाहेर पडेल, तेव्हा जर येथे आपण त्याला सापडलो तर आपल्याला त्याची चांगलीच ओळख पटेल ! जो कोणी निसटून परत इलिअमला जाईल तो खरोखरच आनंद मानील, आणि पुष्कळसे ट्रोजन कुत्र्यागिधाडांचे भक्ष्य होतील——ते सारे ऐकायला जिवंत राहण्याची वेळ माझ्यावर कधीही न येवो ! मी जे आता म्हणतोय ते आपल्याला काहीसे रुचत नसले तरी जर तसे केले, तर रात्रीत मंत्रणेचे बळ आपल्याला मिळेल, आणि नगरीच्या महान वेशी व त्यांना बंद करून ठेवणारे दरवाजे आपल्या नगरीचे रक्षण करतील. दिवस उजाडताच आपल्याला शस्त्रे घेऊन तटावर आपल्या जागा धरून उभे राहता येईल ; मग नौका सोडून चाल करून तो आपल्याशी लढायला आला तर तो पस्तावेल. आपल्या तटांखाली चौफेर हवे तेवढे त्याचे घोडे त्याने दौडवले म्हणजे नंतर तो परत जाईल, आणि बळजबरीने प्रयत्न करून नगरीत घुसण्याची इच्छा त्याला उरणार नाही. आणि नगरीही तो कधीच लुटणार नाही; ते करण्याआधीच कुत्री त्याला फाडून खातील."

हेक्तरने अत्युग्र नजरेने त्याच्याकडे पाहून उत्तर दिले, "पॉलिडॅमास, तू आम्हाला परत जाऊन नगरीत कोंडून घ्यायला सांगतोस ! हे तुझे बोल मला पसंत नाहीत. इतकेदिवस तटाच्या आड कोंडून घेतले ते तुला पुरे झाले नाही का ? पूर्वीच्या दिवसात प्राअॅमची नगरी तिच्या सोन्याच्या व ब्राँझच्या संपत्ती-बद्दल जगभर प्रसिद्ध होती ; पण आमच्या घरातून आमची धनदौलत व्यर्थ बाहेर चालली आहे, आणि फ्रिजिआ व देखण्या मेओनिआला बरीचशी मालमत्ता विकली गेली आहे ; कारण जव्हच्या हातांनी आमच्यावर कठोर आघात केला आहे——म्हणून आता, कारस्थानी सॅटर्नपुत्राने मला कीर्ती मिळवण्याची संधी कृपाळूपणे देऊन अॅकिअन्सना त्यांच्या नौकांपाशी कोंडीत पकडणे शक्य केल्यावर, आपल्या लोकांमध्ये मूर्खासारखा असा जास्त बडबडू नको. तुझ्याशी कोणीही सहमत होणार नाही ; तू म्हणतोस ते होणे नाही. तुम्ही सगळेजण मी आता म्हणतो तसे करा : आपले रात्रीचे जेवण आपापल्या पथकात सर्व सैन्याने घ्यावे, पहारे जारी ठेवावे व प्रत्येक मनुष्याने जागृत रहावे. जर कोणा ट्रोजनला आपल्या मालकीच्या चीजवस्तूच्या सुरक्षिततेबद्दल चिंता वाटत असेल तर त्याने त्या गोळा करून लोकात वाटून टाकाव्या ; त्या अॅकिअन्सला मिळण्यापेक्षा आपल्याच लोकांना मिळालेल्या बऱ्या. दिवस उजाडताच आपण शस्त्रसज्ज होऊन नौकांभोवती लढाई देऊ. अॅकिलिझ त्यांचा बचाव करायला पुन्हा पुढे आला आहे हे कबूल ; त्याला हवे तसे करू द्या, पण ते सारे त्याला जड जाईल.

मी त्याला टाळणार नाही तर उलट त्याच्याशी लढेन, मग मला विजय मिळो किंवा मृत्यु येवो. युद्धाचा देव सर्वांना सारखेच माप देतो व मारणारा प्रसंगवशात मारला जातो.

असे हेक्तर बोलला व त्रोजन्सनी मूर्खासारखी ओरडून आपली प्रशंसा व्यक्त केली, कारण पॅलास मिनर्व्हाने त्यांचे सामंजस्य हरण केले होते. हेक्तरच्या दुर्वृत्त मंत्रणेला त्यांनी अवधान दिले पण पॉलिडॅमाजच्या शहाणपणाच्या बोलण्याकडे कोणी लक्ष दिले नाही. सैन्यभर ज्याने त्याने आपले रात्रीचे जेवण केले, आणि दरम्यान ॲकिअन्सनी पॅत्रोक्लससाठी रात्रभर शोक केला व त्यांच्या विलापात पुढाकार पेलिअसपुत्राचा होता. आपले संहारक्षम हात त्याने मृतमित्राच्या छातीवर ठेवले आणि दाट अरण्यात हरणाचा पाठलाग करताना एकाद्या माणसाने सिंहाचा छावा पळवला तर आयाळधारी सिंह जसा विवळतो तसा तो पुनःपुन्हा विवळला ; सिंह जेव्हा स्वस्थानी परत येतो तेव्हा तो संतप्त होतो व अपराधी शिकारी कुठे सापडतो का ते पहायला तो दऱ्याखोऱ्यातून शोध घेतो, कारण रागाने तो वेडा झालेला असतो—अगदी तसाच अनेक सुस्कारे टाकीत मिर्मिदानांमध्ये ॲकिलिझ बोलत होता,—"अरेरे ! वीर मेनिशिअसला त्याच्याच घरात ज्या शब्दांनी मी प्रोत्साहन दिले ते शब्द व्यर्थच होते म्हणायचे! मी म्हणालो होतो की इलिअम लुटून लुटीचा त्याचा हिस्सा त्याने घेतल्यावर मी त्याच्या शूर पुत्राला पुन्हा परत ओपोइसला आणीन—पण जव्ह सर्व माणसांच्या मनीच्या इच्छा काही पुरवीत नाही. आमच्या दोघांच्याही रक्ताने ही एकत्र त्रॉयची भूमी लाल होईल, कारण वृद्ध उच्चकुलीन वीर पेलिअस किंवा माझी माता थेतिस यांच्याकडून माझेही स्वगृही स्वागत कधीच होणार नाही ; तर याच ठिकाणी भूमी माझ्यावर पांघरून घालील. तरीही, हे पॅत्रोक्लस, आता मी तुझ्यामागे राहिलोच आहे, तेव्हा तुला ठार मारणाऱ्या बलाढ्य हेक्तरचे शिर व चिलखत इथे आणल्याखेरीज मी तुझे दफन करणार नाही. तुझ्या मरणाच्या सूडाखातर तुझ्या प्रेतवाहिनीपुढे त्रोजन्सच्या बारा उच्चकुलीन पुत्रांचा मी शिरच्छेद करीन ; मी तसे करीपर्यंत तू आहेस तसाच नौकांपाशी पडून राहशील आणि भाल्यांनी व बाहुबलाने लोकांच्या सुंदर नगरी लुटून आम्ही जिंकून घेतलेल्या त्रॉय व दार्दानिस येथील सुंदर स्त्रिया तुझ्यासाठी रात्री व दिवसाही रडत बसतील."

मग पॅत्रोक्लसच्या देहावरचे गुठळ्या झालेले रक्त धुवून काढण्यासाठी विस्तवावर एक मोठे तीन खुरांचे भांडे ठेवायला ॲकिलिझने आपल्या लोकांना सांगितले. तेव्हा पूर्ण पेटलेल्या अग्नीवर स्नानजलाने भरलेले तीन खुरांचे

भांडे त्यांनी ठेवले. मोठा जाळ करण्यासाठी त्यांनी अग्नीवर काष्टे टाकली आणि फुगीर त्रिपाद भांड्याभोवती ज्वाळा खेळू लागल्या तसे पाणी ऊन झाले. भांड्यातले पाणी उकळू लागले तेव्हा त्यांनी ते शव धुवून त्याला तेल लावले व नऊ वर्षे मुरत ठेवलेल्या मलमाने त्याच्या जखमा बंद केल्या. मग ते शव प्रेत-वाहिनीवर ठेवून त्याच्यावर त्यांनी आपादमस्तक एक तागाचे वस्त्र पसरले व त्यावर एक उत्तम शुभ्र झगा घातला. याप्रमाणे रात्रभर ॲकिलिझभोवती पॅत्रोक्लससाठी शोक करण्यासाठी मिर्मिदॉन गोळा झाले होते.

मग जव्ह आपली भगिनी व पत्नीही असलेल्या ज्यूनोला म्हणाला, "तर मग राणी ज्यूनो, तू आपला हेतु साध्य केलास तर! वेगवान ॲकिलिझला शेवटी तू चिथावलेसच. कोणाला वाटेल की ॲकिअन्स तुझ्या रक्तामांसाचे नातेवाईकच आहेत."

आणि ज्यूनोने उत्तर दिले, "भयावह सॅटर्नपुत्रा, तू हे असे का म्हणावेस? मानव हा जरी केवळ मर्त्य व आपल्यापेक्षा कमी ज्ञानी असला तरी त्याने दुसऱ्या-साठी शक्य ते करू नये का? आणि उत्तम कुळाने, तशीच स्वर्गात राज्य करणाऱ्या तुझी पत्नी म्हणून, देवतांमध्ये अग्रगण्य अशा मी त्रोजन्सवर रागावले तर त्यांच्या अनिष्टासाठी योजना करू नये?"

याप्रमाणे त्यांचा संवाद चालला होता. दरम्यान थेतिस अविनाशी, तारका-भूषित व स्वर्गातल्या सुंदर अशा व्हल्कन-निवासाप्रत आली; ब्राँझचा तो प्रासाद त्या लंगड्या देवाने स्वतःच्या हातांनी तयार केला होता. तो तिला भाता हलवीत असलेला, घामाघूम झालेला व कामात गुंतलेला आढळला; कारण त्याच्या घराच्या भिंतीजवळ उभ्या करण्यासाठी वीस तिवया तो घडवीत होता, आणि त्या सर्वांच्याखाली तो सोन्याची चाके बसवीत होता; अशासाठी की त्यायोगे त्या तिवया देवांच्या सभात आपोआप जाव्यात व परत याव्यात. पाहिल्याबरोबर चमत्कार वाटावा अशाच त्या होत्या. त्यांना कसबी कारा-गिरीचे कान बसविणे तेवढे अजून बाकी होते, अन्यथा त्या घडवून तयार झाल्या होत्या; तेच काम तो आता बसवीत होता व हातोड्याने सांधणाऱ्या खिळी ठोकीत होता. असा तो कामात असताना रौप्यचरणा थेतिस त्या घरी आली. शोभिवंत शिरोवस्त्र धारण केलेली कॅरिस,—त्या दूरवर कीर्ती पोहोचलेल्या लंगड्या देवाची पत्नी, थेतिसला पाहताच तिच्याकडे आली व तिचा हात हातात घेऊन म्हणाली, "माननीय व सदा स्वागतार्ह थेतिस, आमच्या घरी तू आज का आली आहेस बरे? कारण तू आम्हाला वरचेवर भेट देत नाहीस. आत ये व तुझ्यापुढे मला उपहार ठेवू दे."

बोलता बोलता ती देवी पुढे झाली व तिने थेतिसला चांदीची बहुमोल नक्षी केलेल्या आसनावर बसण्यास सांगितले, तिच्यापुढे पाय टेकायला एक चौरंगही होता. मग तिने व्हल्कनला बोलावले व म्हटले, "व्हल्कन, इकडे ये, थेतिसचे तुझ्याशी काम आहे." आणि दिगंत कीर्तीचा तो लंगडादेव उत्तरार्थी बोलला, "मग खरोखरच एक पूज्य व माननीय देवी येथे आली आहे म्हणायची! माझ्या निष्ठुर मातेच्या कोपामुळे जोराने खाली फेकला जाऊन मी जेव्हा वेदना भोगीत होतो तेव्हा हिनेच माझा सांभाळ केला---कारण मी लंगडा म्हणून माझी आई मला नष्ट करायला निघाली होती. पृथ्वीला सदैव वेढून असलेल्या जलनिधी ओशिॲनसच्या युरिनोमी नामक कन्येने व थेतिसने जर मला आपल्या हृदयात प्रेमाचे स्थान दिले नसते तर माझी कठिण अवस्था होती. नऊ वर्षे मी त्यांच्यापाशी राहिलो व त्यांच्या गुहात, जवळून ओशिॲनसचे गर्जना करणारे जलौघ वेगाने फेसाळत जात असता, वस्त्रांचे चाप, चक्राकार बाहुभूषणे, चषक व साखळचा अशा अनेक ब्राँझच्या सुंदर कृती मी त्यांच्यासाठी घडवल्या, आणि माझी काळजी घेणाऱ्या थेतिस व युरिनोमीखेरीज देवांपैकी किंवा मानवांपैकी कोणालाही या गोष्टीचा पत्ता नव्हता. तेव्हा जर थेतिस माझ्या घरी आली असेल तर मला वाचवण्याबद्दल उचित ती परतफेड मी केलीच पाहिजे. म्हणून मी माझा भाता व सारी हत्यारे आवरून ठेवीपर्यंत पूर्ण आतिथ्यशीलतेने तू तिची सरबराई कर."

असे म्हणून तो प्रबळ राक्षसी देव आपल्या ऐरणीपासून लंगडत दूर गेला. त्याचे लुकडे पाय त्याच्या शरीराला जोरात पुढे नेत होते. त्याने भाता विस्तवापासून दूर ठेवला व आपली हत्यारे एका चांदीच्या पेटीत गोळा करून ठेवली. मग त्याने एक स्पंज घेऊन आपले तोंड व हात, केसाळ छाती व पुष्ट मान स्वच्छ केली; मग त्याने आपला अंगरखा चढवला, भक्कम दांडका हाती घेतला आणि तो लंगडत दाराकडे गेला. त्याच्यासाठी काम करणाऱ्या सुवर्णमयी दासीही होत्या; त्या खरोखरच्या तरुणींसारख्या, जाणीव व विवेकशक्ती, तसेच आवाज व बळही असलेल्या आणि अमरांची सारी विद्या जाणणाऱ्या अशा होत्या. राजाच्या आज्ञेनुसार त्या कामाला लागल्या, आणि त्याने थेतिसच्या जवळ येऊन तिला उत्तम आसनावर बसवून तिचा हात आपल्या हातात घेऊन म्हटले, "माननीय व सदा स्वागतार्ह थेतिस, तू आमच्या घरी आज कशी आलीस? कारण तू वरचेवर काही आम्हाला भेट देत नाहीस, तुला काय हवे ते बोल, आणि मला शक्य असेल, ते करण्यासारखे असेल तर ते मी तुझ्यासाठी तात्काल करीन."

थेतिस अश्रू ढाळीत उत्तरली, "व्हल्कन, इतकी पीडा देऊन जिची परीक्षा पाहण्याचे सॅटर्नपुत्राने मनावर घेतले आहे अशी ऑलिम्पसमध्ये दुसरी कोणी देवी असेल का ? सागरी देवांपैकी एकट्या मला जव्हने एका मर्त्य मानवाचे राणीपद पत्करायला लावले ; तो होता पेलिअस, ईकसचा पुत्र, आणि अतिशय अनिच्छेने, केवळ मर्त्यमानव असलेल्या त्याची आलिंगने मी सहन केली, आणि तो आता वार्धक्याने थकून घरी स्वस्थ राहतो आहे. आणि एवढ्यानेच झाले नाही. स्वर्गाने मला पुत्र प्रदान केला, वीरातला सर्वश्रेष्ठ वीर, आणि तो एकाद्या बालतरूसारखा भराभर उंच वाढला; उत्तम उद्यानातल्या एकाद्या रोपट्यासारखे मी त्याचे संगोपन केले व त्याच्या नौकासह त्याला ट्रोजन्सशी लढायला इलिअमला धाडले, पण परत पेलिअसच्या घरी त्याचे स्वागत करण्याची संधी मला कधीच मिळणार नाही. सूर्यप्रकाश पाहण्यास तो जोवर जीवीत आहे तोवर तो दुःखभाराखालीच असणार आहे ; आणि जरी मी त्याच्याकडे जाते तरी त्याला मी मदत करू शकत नाही ; अॅकिअन्सच्या पुत्रांनी त्याला पारितोषिकार्थ दिलेली तरुणी अॅगॅमेम्नॉन राजाने त्याला परत द्यायला लावली, आणि तिच्यासाठी तो दुःखाने झुरत आहे. नंतर ट्रोजन्सनी अॅकिअनांची त्यांच्या नौकांच्या पिछाडीस कोंडी केली व त्यांना बाहेर पडू दिले नाही ; तेव्हाच्या आर्गासच्या ज्येष्ठ मंडळींनी अॅकिलिझची विनवणी करून त्याला खूप संपत्ती देऊ केली, त्यावर त्यांचे विमोचन स्वतः करण्याचे त्याने नाकारले, पण स्वतःचे चिलखत पॅट्रोक्लसच्या अंगावर चढवून पुष्कळ अनुयायांसह त्याला युद्धास धाडले. ते सबंध दिवसभर स्कीअॅनवेशीपाशी लढले आणि तेथे व तेव्हाच त्यांनी ती नगरी जिंकली असती; पण अॅपोलोने विजयाचे यश हेक्तरला प्रदान केले व शूर मॅनिशिअसपुत्राने ट्रोजन्सचा बराच नाश केल्यानंतर अॅपोलोने त्यालाच मारले. म्हणून मी तुझ्या पायांपाशी याचना करते आहे की शक्यतर, ज्याचा अंत समीप आहे त्या माझ्या पुत्रासाठी शिरस्त्राण, ढाल, घोट्यांशी फासे बसवलेली पोटऱ्यांसाठी उत्तम कवचे व वक्षकवच पुरविण्याची जमल्यास तू कृपा करावी ; कारण ट्रोजन्सच्या हातांनी त्याचा इमानी मित्र रणात पडला तेव्हा माझ्या पुत्राचे कवच हिरावले गेले, आणि आता तो अंतरीच्या कटु दुःखाने व्यथित होऊन भूमीवर हातपाय पसरून पडला आहे."

आणि व्हल्कनने उत्तर दिले, "धीर धर व या प्रकरणी आता आणखी अस्वस्थ होऊ नको ; त्याच्या मृत्यूचा क्षण येईल तेव्हा काळपुरुषाच्या नजरेपासून त्याला मला लपवता आले असते तर किती बरे होते ! मी त्याच्यासाठी असे चिलखत बनवून देतो की जे पाहून सगळ्यांचे डोळे दिपून जातील. पण

चिलखत बनवण्याइतके, त्याला मृत्युपासून वचावणे मात्र सोपे व शक्य नाही." असे म्हटल्यावर तो तिच्याजवळून उठला व आपल्या भात्यांकडे गेला. भात्यांचे तोंड त्याने विस्तवाकडे वळवले व त्यांना आपले काम करण्यास तो लावू लागला. मुशींवर वीस भात्यातून हवेचा झोत वसत होता आणि सर्वप्रकारचे झोत त्या भात्यातून निघत होते ; त्याला जरूर असेल त्याप्रमाणे जास्त जोराचे व कमी जोराचे झोत तो काम करीत असताना बाहेर पडत होते. भट्टीत त्याने टणक तांबे टाकले, तसेच कथील व त्यावरोवर चांदी-सोनें. त्यानें आपली प्रचंड ऐरण तिच्या ठोकळ्यावर वसवली आणि एका हाताने आपला मोठा थोरला घण धरून दुसऱ्या हातात चिमटा पकडला.

प्रथम त्याने मोठ्या व मजबूत ढालीला आकार दिला, तिच्या पृष्ठभागावर सर्वत्र नक्षीकाम केले, व चकचकीत थरांच्या तीन वेढ्यांनी तिची गोल कड बांधली ; खांदेपट्टा चांदीचा घडवला. ढालीची जाडी त्याने पाचपट केली व त्याच्या कसबी हातानी अनेक चमत्कृतींनी ती ढाल त्याने नटवली.

तिच्या नक्षीत त्याने पृथ्वी, नभोमंडळ व सागर, त्याचप्रमाणे पूर्णचंद्र व निरलस सुर्य, शिवाय आकाशाला शोभा आणणाऱ्या प्लॅआद, ह्याद, प्रचण्ड ओरायन आणि माणसे ज्याला बेनही म्हणतात, ते सर्वदा ओरायनच्या सन्मुख राहून एकाच जागी गोल फिरते व ओशिअॅनसच्या प्रवाहात इतर ताऱ्यांसारखे कधीच बुडत नाही असे बेअर,—ही नक्षत्रे समाविष्ट केली होती.

आणखी त्याने कोरली होती दोन नगरे, देखणी व माणसांच्या गोंगाटाने गजबजलेली. एकात लग्ने व लग्नांच्या मेजवान्या आणि वधूंना त्यांच्या महालातून मशालींच्या उजेडात नगरामधून संभाळीत नेणारे लोक दाखवले होते. हायमेनचा—विवाहमंगलाचा अधिष्ठाता देव—ध्वनि मोठ्याने उठत होता आणि बासरी व वीणावाद्यांच्या संगीतसाथीवर तरुण नाचत असून त्यांना पाहण्यास स्त्रिया आपापल्या घरांच्या दारात उभ्या होत्या.

दरम्यान लोक सभेसाठी जमले होते, कारण एक भांडण चालले होते, आणि दोन माणसे एका मारल्या गेलेल्या माणसावद्दलच्या भरपाईवद्दल वाद घालीत होती ; एक लोकांसमोर आपण नुकसान भरपाई पुरी दिल्याचे सांगत होता, तर दुसरा ती मिळाली नाही असे म्हणत होता. दोघेही आपली बाजू पटवून देण्यासाठी झटत होते. आणि लोक भांडणारांची ही किंवा ती बाजू घेऊन आपापल्या गड्याला पाठिंबा देत होते ; तथापि घोषणादूत त्यांना मागे हटवून धरीत होते ; पंचांची कामे करणारे जेष्ठ आपापल्या दगडी आसनावर गंभीरपण वर्तुळाकार वसले होते व घोषणादूतांनी दिलेले दण्ड त्यांच्या हातात होते.

मग सर्वांनी उठून पाळीपाळीने आपापले निर्णय दिले आणि दोन टॅलेन्तची रक्कम तेथे ठेवण्यात आली; ज्याचा निर्णय सर्वात न्याय्य मानला जाई त्याला ती देण्यात येणार होती.

दुसऱ्या नगराभोवती चकाकत्या शस्त्रसंभारासह दोन सैन्यांनी छावण्या ठोकल्या होत्या. ते नगर लुटावे की न लुटता त्यातील अर्धी मालमत्ता तडजोड म्हणून स्वीकारावी याबाबत त्यांच्यात दुमत होते. पण नगरातले लोक अजून तडजोडीला कबूल होत नव्हते व अचानक हल्याच्या भीतीने ते शस्त्रसज्ज झाले होते; त्यांच्या बायकांनी व लहान मुलांनी तटावर पाहरे ठेवले होते आणि त्यांच्या जोडीला वार्धक्यामुळे लढाईचे दिवस संपलेले लोक होते; पण बाकीचे लोक मार्स व पॅलास मिनर्व्हा यांच्या नेतृत्वाखाली बाहेर चालून येत होते– दोन्ही देवता सोन्याने बनवलेल्या असून सुवर्णवसनांनी व सुरेख कवचांनी नटवल्या होत्या. देवांना शोभतील अशा त्यांच्या प्रतिमा भव्य व सुंदर होत्या. त्यांच्यामागचे लोक त्यांच्याहून लहान दाखवले होते. जेथे ते दबा धरून बसणार होते त्याठिकाणी ते पोचले. ते स्थळ नदीच्या पात्रावर, जेथे पाणी पिण्यास जनावरे जवळून व दुरून तेथे येत होते; तेथे शस्त्रकवचांनी पूर्ण सज्ज असे ते दल लपून बसले. त्यांच्यापासून थोड्या अंतरावर दोन टेहळचे मेंढरांच्या व गुरांच्या येण्यावर नजर ठेवीत होते, ती जनावरे लौकरच आली व त्यांच्यामागे पावा वाजवीत येणाऱ्या दोन मेंढपाळांना संकटाची थोडीसुद्धा कल्पनाही नव्हती. दबा धरून बसणारांनी हे जेव्हा पाहिले तेव्हा त्यांनी जनावरे बाजूला वळवून अडवून ठेवली व मेंढपाळांना ठार मारले. दरम्यान वेढा घालणारे मंत्रणासभेत बसले असता त्यांनी गुरामेंढरामध्ये बराच गोंगाट झालेला ऐकला, तेव्हा त्यांनी घोड्यावर उड्या मारून अत्यंत वेगाने त्याबाजूस दौड केली; गुरांजवळ येताच त्यांनी नदीकाठी युद्धव्यूह रचला आणि उभय सैन्यांनी आपले ब्रॉंझच्या शेंड्या असलेले भाले एकमेकांकडे फेकले. त्यांच्या-बरोबर 'संघर्ष' नि 'सक्षोभ' आणि 'दैव दुर्विपाक' ही दुष्ट दैवते होती; दुर्विपाका आपल्यामागून तिघांना ओढीत आणीत होती; त्यातल्या एकाला नुकतीच जखम झालेली, दुसरा जखम न झालेला व तिसरा मेलेला असून ती त्याची टाच धरून त्याला फरफटत नेत होती; तिचे वस्त्र माणसांच्या रक्ताने भिजलेले होते. दोन्ही पक्षांतले सैनिक एकमेकांच्यामधून जात-येत होते, जिवंत माणसासारखे लढत होते व एकमेकांची प्रेते ओढून नेत होते.

आणखी दुसऱ्या नक्षीकामात व्हल्कनने एक देखणे, लागवड न झालेले, मोठे व आधीच तीनदा नांगरून झालेले असे शेत दाखवले असून त्यात माणसे

बैल जोडलेले आपापले नांगर इकडून तिकडे फिरवून भूमीत सरीवर सरी काढीत होती. ती प्रत्येक वेळी मुख्य भूमीपाशी टोकाशी येऊन वळताना एक माणूस त्यांच्याजवळ येऊन त्यांना मद्याचा एक पेला देई, आणि पुन्हा परत मुख्य भूमीकडे येण्याची उत्सुकतेने वाट पाहात ते परत आपल्या सरीकडे जात. त्यांनी नांगरलेल्या शेताचा भाग त्यांच्यामागे काळा दिसत होता, त्यामुळें ते शेत सोन्याचे बनवलेले असूनही त्याची नांगरट होत असल्यासारखे वाटून दृष्टीला मोठा अद्‌भुत चमत्कार दिसत होता.

तसेच त्याने कापणीला आलेले एक शेत कोरले व त्यात कापणी करणारे हातातल्या धारदार कोयत्यांनी पिकांची ताटे कापीत असलेले दाखवले. त्यांच्यामागे सरळ ओळीत जुड्यामागून जुड्या भूमीवर पडत होत्या, व त्यांचे भारे बांधणारे, पीळ घातलेल्या पेंड्याने त्यांचे भारे बांधीत होते. बांधणारे तिघे होते व त्यांच्यामागे कापलेल्या जुड्या कवेत गोळा करून बांधण्यासाठी आणून देत राहणारी मुले होती. त्यांच्यामध्यें शेताचा धनी एका बाजूला मुकाट्याने उभा होता व तो आनंदित दिसत होता. एका ओक वृक्षाखाली सेवक जेवण तयार करीत होते; कारण त्यांनी एक भला मोठा बैल बळी दिला होता व त्याचे कापून तुकडे करण्यात ते गुंतले होते, आणि बायका बऱ्याचशा पांढऱ्या जवांची खीर मजुरांच्या भोजनासाठी करीत होत्या.

आणखीही त्याने एक द्राक्षोद्यान घडविले. ते सोनेरी व देखणे होते आणि द्राक्षवेली द्राक्षांच्या घडांनी भारावल्या होत्या. माथ्यावरचे घड काळे होते पण वेली चांदीच्या दांड्यांवर चढवलेल्या होत्या. त्या मळ्याभोवती त्याने एक कृष्णधातूने बनवलेला खंदक दाखवला होता व त्याला कथलाचे कुंपण केले होते. त्यामध्ये जायला एकच पायवाट होती व द्राक्षांचा बहार गोळा करण्यासाठी मद्य गाळणारे त्या मार्गाने जात. तरुण व तरुणी मोठ्या खुषीत व आनंदोत्साहात रसरशीत फळांचे घड विणलेल्या टोपल्यातून वाहून नेत होती; आणि त्यांच्याबरोबर एक मुलगा वीणा वाद्यावर मधुर स्वर काढीत, प्रसन्न बालसहज आवाजात एक वीणा गीत म्हणत चालला होता.

त्याने शिवाय एक शृंगधारी गुरांचा कळपही शिल्पित केला. त्याने कथील व सोने वापरून घडवलेल्या गाई कोंडवाड्यातून बाहेर पुऱ्या वेगात येऊन हंबरत नदीकाठी वाहून डोलणाऱ्या लव्हाळ्यावर चरण्यास जाताना दाखविल्या होत्या. त्यांच्याबरोबरचे चार गुराखी सोन्याचे होते व त्यांच्यामागे नऊ वेगवान कुत्रे होते. अगदी पुढील गाईबरोबरच्या डरकाळ्या फोडणाऱ्या बैलाला दोन भयंकर सिंहानी पकडीत धरले आणि बैलाच्या ओरडण्याला न

जुमानता ते सिंह त्याला ओढून नेत होते व कुत्रे व माणसे त्याचा पाठलाग करीत होती. बैलाचे जाड कातडे फाडून सिंह त्याच्या रक्तावर व कोथळ्यावर ताव मारीत होते, पण गुराखी भीतीमुळे काहीच करू शकत नव्हते, व फक्त कुत्र्यांना सिंहावर सोडीत होते. कुत्र्यांना सिंहाना भिडण्याची छाती होत नव्हती, पण ते बाजूला संकटापासून दूर उभे राहून भुंकत होते.

त्या देवाने आणखीही एक शिल्प असे केले की ज्यात एका पर्वताच्या सुंदर दरीत कुरण दाखवले होते व त्यात मेंढयांचा एक मोठा कळप, एक वाडा, झोपडया व सुरक्षित जागी असलेले मेंढवाडे दाखविले होते.

शिवाय त्याने एक हरितभूमी घडवली; ती एकदा दीदॅलसने नॉससमध्ये सुंदर ॲरिॲद्नीसाठी बनविलेल्या भूमीसारखी होती; तेथे सर्वांनी ज्यांची प्रणयाराधना करावी अशा तरुणी आणि तरुण एकमेकांच्या मनगटावर हात ठेवून नाचत होते. तरुणींची वस्त्रे तलम तागपाटाची होती आणि तरुणांचे अंगरखे उत्तम विणलेले व किंचित तेलाचा हात लावलेले होते. तरुणींच्या मस्तकांभोवती पुष्पमाला होत्या तर तरुणांकडे चांदीच्या पट्ट्यांवर अडकवलेले सोन्याचे खंजिर होते. कधी कधी नाचऱ्या, चमकून उठणाऱ्या पावलांनी ते कौशल्याने चक्राकार नाच करीत ; तेव्हा जणु कुंभार चाकापाशी कामाला बसून ते नीट चालते आहे का ते फिरवून पाहात आहे असा भास होई. तर कधी ते सगळे सारे एका ओळीत एकमेकांसह नाचत जात; आणि त्या हरित-भूमीभोवती पुष्कळ माणसे सहर्ष गोळा झाली होती, त्यांच्यासाठी गाण्यास व वीणा वाद्य वाजवण्यास एक वैतालिकही तेथे होता आणि त्याने सूर छेडला की डोंबाऱ्याचा खेळ करून दाखवणारे दोघेजण उडयामारीत मध्यभागी फिरत होते.

ढालीच्या सर्वात बाहेरच्या कडेभोवती त्याने ओशिॲनस नदीचा भरदार प्रवाह गोलाकार बसवला.

मग ती इतकी प्रचंड व मजबूत ढाल घडवून झाल्यावर त्याने अग्निपेक्षाही अधिक तेजाने चकाकणारे वक्षकवचही तयार केले. कपाळावर घट्ट बसणारे व भरगच्च बहुमोल कलाकुसर केलेले एक शिरस्त्राण त्याने बनविले व त्याच्यावर लटकणारा सोन्याचा तुरा बसवला, आणि मग त्याने ठोकून घडविलेल्या कथलाची पोटऱ्याची संरक्षक कवचेही सिद्ध केली.

शेवटी त्या विख्यात लंगडया देवाने नानाविध कवचांनी संपन्न असे चिलखत तयार केल्यावर ते सर्व नेऊन ॲकिलिझच्या मातेपुढे ठेवले. तेव्हा एकाद्या ससाण्यासारखी ती हिमाच्छादित शिखरांच्या ऑलिम्पसवरून निघाली व व्हल्कनच्या घरातून ते चकाकते चिलखत घेऊन त्वरेने निघून गेली.

## सर्ग १९

आता जेव्हा केशरी वस्त्र परिधान केलेली उषा ओशिॲनसच्या प्रवाहातून मर्त्यांना व अमरांना प्रकाश देण्यासाठी घाईने निघत होती, तेव्हा त्या देवाने दिलेले चिलखत घेऊन थेतिस नौकांपाशी पोहोचली. तिला आपला पुत्र पॅत्रोक्लसच्या देहाजवळ दु:खावेगाने विलाप करीत पडलेला दिसला. त्याच्या अनुयायांपैकी इतर अनेकही त्याच्याभोवती अश्रू ढाळीत होते, पण ती देवी जेव्हा त्यांच्याजवळ आली तेव्हा पुत्राचा हात आपल्या हातात धरून म्हणाली, "माझ्या मुला, शोक करणे आपल्याला प्राप्तच असले तरी या माणसाला आपण इथेच पडू दिले पाहिजे, कारण स्वर्गस्थ देवांच्या इच्छेनेच तो पडला आहे; म्हणून आता तू व्हल्कनकडचे हे मूल्यवान व गुणाढ्य चिलखत स्वीकार, ते अजून कोणाही माणसाने आपल्या खांद्यावर चढविलेले नाही."

असे बोलत असता तिने ते चिलखत ॲकिलिझपुढे ठेवले व ती ते असे ठेवीत असता त्याचा प्रचंड खणखणाट झाला. मिर्मिदॉन्स भीतीयुक्त आदराने भारावून गेले आणि त्या कवचाकडे निरखून पाहण्याचे कोणालाही धैर्य झाले नाही, कारण त्यांना त्याचे भयच वाटत होते; पण ॲकिलिझचा प्रकोप मात्र जास्तच तीव्र झाला, आणि भयानक तेजाने त्याचे डोळे चमकले, कारण त्या देवाने त्याच्यासाठी केलेल्या या उत्कृष्ट उपायनाची हाताळून परीक्षा केल्यावर त्याला संतोष झाला होता. मग त्या कवचाकडे बराच वेळ पाहून स्वत:चे समाधान करून घेतल्याबरोबर तो आपल्या मातेला म्हणाला, "अमराला अत्यंत योग्य व कोणीही दुसरा माणूस आपल्या हयातीत घडवू शकला नसता असे हे चिलखत त्या देवाने मला दिले आहे; आता मी शस्त्रसज्ज होतो, पण मला मोठी भीती वाटते की मेनिशिअसपुत्रावर माशा बसून त्याच्या जखमात कृमी होतील व त्यामुळे आता त्याचे मृत शरीर विद्रूप होईल व त्यातील मांस कुजू लागेल."

रौप्यचरणा थेतिसने उत्तर दिले, "माझ्या मुला, या गोष्टीबद्दल अस्वस्थ होऊ नको. युद्धात मारल्या गेलेल्या माणसांच्या देहावर तुटून पडणाऱ्या घाणेरड्या माशांच्या झुंडीपासून त्याचे रक्षण करण्याचे उपाय मी शोधून काढीन. त्याचा मृतदेह जरी वर्षभर सडून राहिला तरी त्यातील मांस सदैव पूर्ववत निर्दोष किंवा पूर्वीपेक्षाही अधिकच निर्दोष असे राहील. तेव्हा ॲकिअन

वीरांना आता सभेला बोलाव; ॲगॅमेम्नॉनच्या विरुद्ध उच्चारलेले तुझे रागाचे शब्द परत घे; तात्काल शस्त्रसज्ज हो व साऱ्या शक्तीनिशी युद्ध कर."

असे बोलत असता तिने त्याच्या हृदयात बळ व धैर्य उत्पन्न केले. आणि मग तिने देवपेय व लाल अमृत पॅत्रोक्लसच्या जखमांवर टाकून त्याचा देह आहे तसाच राहावा व त्यात विकृती उद्‌भवू नये अशी योजना केली.

नंतर ॲकिलिझ बाहेर सागरतीरावर गेला व मोठ्याने ओरडून त्याने ॲकिअन वीरांना हाक दिली. त्यावर अद्यापि जे सारखे नौकांवरच राहिले होते ते नौका-संचालक, कर्णधार आणि नौकांवर शिधावाटप करणारे कर्मचारी सारे सभास्थानी आले, कारण युद्धातून इतक्या काळपर्यन्त बाजूला राहिल्यानंतर ॲकिलिझने आजच सर्वांना दर्शन दिले होते. मार्सचे दोन पुत्र युलिसिस व तायदिअसपुत्र लंगडत आले, कारण त्यांच्या जखमा अजून दुखत होत्या; तरीही ते आले व सभेच्या पुढच्या ओळीत स्थानापन्न झाले. सर्वांचे शेवटी नृपती ॲगॅमेम्नॉन आला, तोही जखमी झालेला होता, कारण लढाईत ॲन्तेनॉरपुत्र कॉओन याने त्याला भाला मारला होता.

सर्व ॲकिअन्स एकत्र आल्यानतर ॲकिलिझ उठून म्हणाला, "ॲत्रिअसपुत्रा, आपण दोघे ब्रिसेइसवरून किती संतापलो ! लिर्नेसस लुटल्यावर मी जिंकून घेतलेल्या त्या स्त्रीला नौकांपाशीच दायानाच्या बाणाने ठार मारले असते, तर खरोखर तुझ्या व माझ्या दृष्टीने फार बरे झाले असते. कारण त्यामुळे माझ्या रागाच्या अवधीतच कितीतरी थोड्या प्रमाणात ॲकिअन्सना शत्रूने धूळ चारली असती. हेक्तरच्या व त्रोजनांच्या ते पथ्यावरच पडले, पण ॲकिअन्स मात्र खरोखर दीर्घकालपर्यन्त आपले भांडण लक्षात ठेवतील. तथापि आता ते सारे राहू दे, कारण ते सारे संपले आहे आता. आपण पूर्वी जरी संतापलो असलो तरी आता गरजेने आपल्या रागाला धडा शिकवला आहे. मी माझा राग सोडून देतो; तो कायम जोपाशीत राहण्यास आता मी धजत नाही. म्हणून ॲकिअन्सला तात्काल शस्त्र सज्ज होण्याची आज्ञा दे, म्हणजे मला त्रोजन्सवर चालून जाता येईल. मी एकदा भाला चालवू लागलो म्हणजे जो पळत सुटेल तो गुडघ्यांना थोडी जरी विश्रांती वाटेत मिळाली तरी स्वतःला धन्य मानील असे मला वाटते."

असे तो बोलला व त्याने आपला राग सोडला, याबद्दल ॲकिअन्सना हर्ष झाला. मग सभेच्या मध्यभागी न जाता आपल्या जागेवरच उठून उभा राहून ॲगॅमेम्नॉन बोलला, "दॅनाअन वीरहो, मार्सच्या सेवकांनो, मनुष्य बोलायला उभा राहिला म्हणजे त्याचे बोलणे ऐकून घेणे चांगले, आणि त्याच्या बोलण्यात व्यत्यय आणणे

शोभणार नाही, अन्यथा सराईत वक्त्याला देखील बोलणे कठीण होईल. गोंगाट चालू असता ऐकायला किंवा बोलायला तरी कोणाला येईल? सर्वोत्तम व्याख्याता त्यामुळे देखील गडबडून जाईल. मी पेलिअसपुत्राला खुलासेवार सारे सांगतो, आणि तुम्ही इतर ॲकिअन्सही माझे स्पष्टीकरण लक्ष देऊन ऐका; व त्याची नोंद घ्या. याप्रकरणी पुष्कळदा ॲकिअन्स माझ्याशी बोलले आहेत व रागेही भरले आहेत, पण जे केले ते मी नव्हे. जव्ह, नियतीदेवी व अंधारात संचार करणारी डाकिनी एरिनिस यांनी, ज्यादिवशी आपण सभेत एकत्र जमलो व ॲकिलिझला देण्यात आलेले पारितोषिक मी त्याच्याकडून घेतले त्यादिवशी माझ्या डोक्यात वेड भरवले. मग मी काय करू शकणार? सर्व गोष्टी स्वर्गस्थ शक्तींच्या हाती असतात, आणि जव्हची सर्वात थोरली कन्या 'मूर्खता' माणसाच्या नाशाच्या क्षणी त्याला आंधळा करून टाकते. ती नाजुकपणे चालते, घट्टभूमीवर नव्हे तर अधांतरी, व माणसांच्या डोक्यावर घोटाळत ती त्यांना ठेचकळायला लावते किंवा जाळ्यात अडकविते."

एक वेळ अशी होती की तिने स्वतः जव्हला देखील मूर्ख बनवले, व तो तर म्हणे देवात किंवा माणसात सर्वश्रेष्ठ. कारण ज्यूनोने ती जरी केवळ एक स्त्री होती तरीही तिने थीब्स या सुंदर नगरीत अल्कमेना बलाढ्य हर्क्युलिझला जन्म देणार होती तेव्हा जव्हला फसवले. त्यावेळी प्रथम देवांमध्ये त्याने सर्वत्र पुढील गोष्ट सांगितली; तो म्हणाला, "सर्व देव हो व देवींनो, मला जे सांगावेसे वाटते ते मी बोलतो, म्हणून माझे ऐका; आजच्या दिवशी प्रसूतीवेदनाग्रस्त स्त्रियांची साह्यकर्ती एक देवी इलिथ्युइआ जगात असे एक पुरुष-बालक आणणार आहे की जे त्याच्याभोवती राहणाऱ्या माझ्या रक्ताच्या व वंशाच्या साऱ्यांचा स्वामी होईल." तेव्हा कपटी व नाना छद्मे वापरण्यात कुशल ज्यूनो म्हणाली, "बघ हो-तू विश्वासघात करशील व दिलेला शब्द पाळणार नाहीस. हे ऑलिम्पिअसवासी देवा, माझ्यापुढे शपथ घे, अशी एक महाशपथ घे की जो कोणी आज स्त्रीच्या पायांमध्ये पडेल, तो त्याच्याभोवती राहणाऱ्या तुझ्या रक्ताच्या व वंशाच्या सर्वांवर स्वामीत्व गाजवील."

असे ती बोलली व जव्हला तिच्याबद्दल काही संशय आला नाही, त्याने ती महाशपथ घेतली, आणि नंतर त्याला त्याबद्दल फार पस्तावा झाला. कारण ऑलिम्पसच्या उत्तुंग माथ्यावरून तीरासारखी ज्यूनो निघाली व जेथे पर्सिअसपुत्र स्थेनेलसची थोर पत्नी असल्याचे तिला माहीत होते, त्या ॲकिअन आरगॉसला घाईघाईने गेली. ती बाई सात महिन्याची गरोदर होती, आणि प्रसूतीला अजून महिनाभर जरी अवकाश होता तरी ज्यूनोने ते बालक तात्काल जन्माला

घातले; पण अल्कमेनाचा अपत्यजन्म मात्र रोखून धरून इलिथ्युइआना तिने दूर ठेवले. मग ती सॅटर्नपुत्र जव्हला ती वार्ता सांगायला गेली, ती म्हणाली, "तात जव्ह, विद्युल्लतेच्यास्वामी—तुझ्या कानात एक गोष्ट सांगायची आहे मला. आज एक उत्तम बालक जन्मले आहे; ते म्हणजे युरिस्थिअस, पर्सिअस-पुत्र स्थेनेलस याचा मुलगा; तो तुझ्या वंशाचा आहे, तेव्हा त्याने आर्गाइव्हज्वर राज्य करणे उचितच होईल."

"हे वक्तव्य जव्हच्या अगदी वर्मी झोंबले, व संतापाच्या भरात त्याने मूर्खतेचे केस पकडून तिला एक महाशपथ घातली, की तिने पुन्हा कधीही तारांकित स्वर्गात आणि ऑलिम्पसवर चाल करू नये, कारण ती सर्वांना अनर्थकारिणी ठरली आहे. मग त्याने हात बाटोळा वळवून तिला गरगरा फिरविले व स्वर्गातून खाली भिरकावले, तेव्हा ती मर्त्य मानवांच्या शेतात पडली; आणि नंतर त्याचा पुत्र, युरिस्थिअसने त्याच्यावर लादलेली कठीण कष्टांची कामे करीत असता विव्हळताना पाहून तर जव्ह मूर्खतेवर सर्वकाळ चडफडतच राहिला. अगदी तसेच दुःख मला बलाढ्य हेक्तर ऑर्गाइव्हज्ना त्यांच्या नौकांपाशी ठार मारीत असता झाले; आणि सगळा वेळ माझा असा घात करणाऱ्या 'मूर्खतेचा' मी विचार करीत होतो. मी अंध बनलो होतो व जव्हने माझी विवेकबुद्धी हिरावून घेतली होती. आता मी त्या सगळ्याची भरपाई करीन व परिमार्जन म्हणून आणखी पुष्कळ संपत्ती देईन. तेव्हा हे वीरा, तू व तुझ्याबरोबर तुझे लोक युद्धावर जा; काल तुझ्या तंबूत युलिसिसने देऊ केलेले सर्वकाही मी तुला देईन; किंवा जरी तात्काळ लढण्याची तुझी इच्छा असली तरी थांबण्याची जर तू कृपा करशील, तर माझे शिलेदार माझ्या नौकेतून त्या साऱ्या देणग्या आणतील, म्हणजे मी देतो ते पुरेसे आहे की नाही ते तुला दिसेल."

आणि ॲकिलिझने उत्तर दिले, "ॲत्रिअसपुत्रा, नृपते, ॲगॅमेम्नॉन, तुला योग्य वाटतील त्या देणग्या तुला देता येतील किंवा मागेही घेता येतील; ते सारे तुझ्या स्वतःच्या हाती आहे. आता आपण प्रथम युद्धाचा व्यूह रचू या; क्षुल्लक गोष्टींबद्दल बोलत रेंगाळत राहणे बरं नव्हे, कारण अजून एक मोठे कार्य करायचे आहे. ॲकिलिझ पुन्हा अग्रश्रेणीत लढताना दिसेल, व ट्रोजनांच्या रांगा भुईसपाट करताना त्याला तुम्ही पहाल; तुम्ही प्रत्येकजण लढताना या गोष्टीची जाणीव ठेवा."

मग युलिसिस म्हणाला, "देवासमान तेजस्वी व शूर ॲकिलिझ, ॲकिअन्सना असे उपाशी पोटी इलिअमच्याविरुद्ध ट्रोजन्सशी लढायला पाठवू नकोस, कारण

लढाई एकदा सुरू झाली व स्वर्गस्थ देवांनी उभय पक्षांना त्वेष चढविला म्हणजे युद्ध लौकर आटपणार नाही; त्यांना अगोदर नौकांपाशी अन्नग्रहण करण्यास सांग. रोटी व मद्य दोन्हींचे सेवन त्यांना करू दे, कारण त्यामुळेच त्यांच्यात शक्ती व चिकाटी येईल. अन्नाविना कोणीही मनुष्य साऱ्या दिवसभर सूर्यास्तापर्यन्त लढू शकणार नाही; त्याची लढण्याची कितीही इच्छा असली तरी त्याच्या लक्षात येण्याआधीच त्याची शक्ती क्षीण होईल. भूक व तहान यांच्या कचाटयात सापडून त्याची गात्रे थकतील. पण अन्न व मद्य यांनी पोट पुरते भरले असले तर माणूस संबंध दिवस लढू शकतो; मग त्याच्या हृदयाचे स्पंदन जोरात होते आणि सर्व शत्रुचा निःपात करीपर्यंत त्याची शक्ती टिकून राहते. म्हणून लोकांना पाठवून दे व आपले जेवण तयार करायला त्यांना सांग. सभेसमोर ठेवण्याकरिता राजा ॲगॅमेम्नॉन ती पारितोषिके आपल्या नौकेबाहेर आणील, म्हणजे ती सर्वांना पाहता येतील व तुझेही समाधान होईल. शिवाय त्याने कधीच ब्रिसेईसच्या शय्येवर आरोहण केले नाही किंवा स्त्री-पुरुषात होतो तसा समागमही तिच्याशी केला नाही अशी शपथ आर्गाइव्हज्च्यासमोर त्याला घेऊ दे; आणि तूही स्वतः मनाचा थोरपणा दाखव; ॲगॅमेम्नॉनला त्याच्या तंबूत तुझ्यासाठी एक प्रीतीभोज देऊ दे, म्हणजे तुझी उचित अशी पुरी भरपाई केल्यासारखे होईल. आणि ॲत्रिअसपुत्रा, तुला असे सांगायचे की, तू अतःपर लोकांना अधिक न्यायबुद्धीने वागव; अगोदर चूक झाली असली तरी तिचे परिमार्जन करण्यात राजाला देखील कमीपणा येत नाही."

आणि ॲगॅमेम्नॉन राजानें उत्तर दिले., "लेर्आतिजपुत्रा, तुझ्या शब्दांनी मला परम संतोष झाला, कारण तुझे संपूर्ण बोलणेच शहाणपणाचे होते. तुझ्या इच्छेनुसार मी तुला हवी तशी शपथ घेईन. हे मी स्वतःच्या राजीखुषीने करीत आहे व स्वर्गस्थ देवांच्या नावानें घेतलेली शपथ मी व्यर्थ होऊ देणार नाही. तेव्हा ॲकिलिझला जरी तात्काळ लढणे अधिक पसंत असले तरी त्याला थांबू दे व तुम्ही इतरही पारितोषिके माझ्या तंबूत येईपर्यंत आणि यज्ञ विधीने माझ्या शपथेचे सर्वांसमोर प्रमाणीकरण होईपर्यन्त थांबा. युलिसीस, तुझ्यावर मी आता ही कामगिरी सोपवतो. बरोबर काही उच्चकुलीन ॲकिअन्सना घेऊन माझ्या तंबूमधून काल मी ॲकिलिझला कबूल केलेल्या देणग्या घेऊन ये, व तेथील स्त्रियांना पण आण. शिवाय सैन्याबरोबर असलेल्या पशूंमधून एक वराह तॅल्थिबिअसनें शोधून आणावा आणि जव्ह व सूर्य यांच्याप्रीत्यर्थ यज्ञबळी देण्यासाठी तो पशू सिद्ध करावा."

मग ॲकिलिझ म्हणाला, "ॲत्रिअसपुत्रा, नराधिपा, ॲगॅमेम्नॉन, जेव्हा उसंत असेल व मी अधिक शांतचित्त असेन अशा दुसऱ्या एकाद्या वेळी या गोष्टींची व्यवस्था कर. प्राॲमपुत्र हेक्तर याने मारलेल्या लोकांचे देह छिन्न-विछिन्न होऊन अजून रणभूमीवर पडलेलेच असताना लोकांनी भोजन करावे असे तुझे मत आहे का? मी तर म्हणतो, की पडलेल्या लोकांबद्दलचा आमचा सूड उगवून होईपर्यन्त ॲकिअन्सपुत्रांना उपाशीपोटी अन्नाविना लढू दे. नंतर सूर्यास्ताला त्यांना पोटभर जेवू दे. माझ्याबद्दल म्हणशील तर अनेक घाव खाऊन मोडतोड झालेला पॅत्रोक्लसचा देह पाय दाराकडे करून माझ्या तंबूत पडला आहे व त्याच्याभोवती त्याचे सोबती शोक करीत आहेत. म्हणून केवळ हत्या, रक्तपात, मरणोन्मुखांच्या घशातली घरघर याखेरीज दुसरा कसलाही विचार मला करताच येत नाही."

युलिसिसने उत्तर दिले, "पेलिअसपुत्रा ॲकिलिझ, ॲकिअन्स मधील सर्वात बलाढ्यवीरा, युद्धात तू माझ्यापेक्षा थोडा अधिक निपुण आहेस, थोडा का पुष्कळच निपुण आहेस, पण मंत्रणेत मी तुझ्या बराच पुढे आहे; कारण मी वयाने मोठा व ज्ञान जास्त आहे. म्हणून माझे शब्द धीमेपणाने ऐक. लढणे ही गोष्ट अशी आहे की माणसाना तिचे लौकरच अजीर्ण होते, आणि जेव्हा युद्धाचा कार्याधीश जो जव्ह तो परिणामाची मोजदाद करील, तेव्हा आपल्या कोयत्यांनी कापलेला कडबा दाण्यापेक्षा कितीतरी भारी वजनाचा आहे असे सिद्ध होईल. ॲकिअन्सनी मृतांसाठी शोक, पोटावर मारून करावा असे होऊ नये; दिवसानुदिवस लोक सतत मोठ्या संख्येने व तिपटीने रणात पडत आहेत; मग आपल्या दुःखातून उसन्त आपल्याला मिळणार तरी केव्हा? मृतांसाठी एक दिवस शोक करून त्यांचे दफन करून त्यांना दृष्टिआड करू या व मनातूनही काढून टाकू या, पण आपल्यापैकी जे मागे उरले आहेत त्यांना खाणेपिणे करू द्या म्हणजे आपल्याला शस्त्र सज्ज होऊन अधिक त्वेषाने आपल्या शत्रूंशी लढता येईल. मग त्यावेळी मात्र कोणीही माणसाने दुसऱ्या बोलावण्याची वाट पाहात मागे मागे राहू नये; आपल्या नौकांपाशी मागे रेंगाळत राहणाराला तसे दुसरे बोलावणे करण्याची पाळी आली तर ते त्याला फार जड जाईल; त्यापेक्षा एकजुटीने जोरात चाल करून जाऊ व युद्धाचा प्रक्षोभ त्रोजन्सवर प्रक्षेपित करू या."

असे बोल्यानंतर त्याने नेस्तॉरपुत्राना व फिलिअसपुत्र मेगिझ, थोआस, मेरिऑनिझ, क्रेऑन्तिझपुत्र लिकोमिदिझ आणि मेलॅनिपस यांनाबरोबर घतले व तो ॲत्रिअसपुत्र ॲगॅमेम्नॉनच्या तंबूत गेला. तोंडातून शब्द बाहेर

पडल्याबरोबर त्याप्रमाणे तात्काळ कृतीही झाली. ॲगॅमेम्नॉनने देणगी म्हणून कबूल केलेल्या सात तिवया, वीस धातूच्या कढया व बारा घोडे त्यांनी बाहेर आणले; तसेच उपयुक्त कलाकौशल्यात प्रवीण अशा सात स्त्रिया व आठवी स्त्री ब्रिसेइस यांनाही ते बाहेर घेऊन आले. युलिसिसने दहा तॅलेन्त सोने तोलून घेतले, व तो परत जाण्यासाठी पुढे निघाला, तेव्हा त्याच्यामागून त्या तरुण ॲकिअनांनी बाकीच्या देणग्या आणून त्या सभेच्या मध्यभागी ठेवल्या.

मग ॲगॅमेम्नॉन उठला व देवासारखा आवाज असलेल्या तॅल्थिबिअसने त्याच्यापाशी तो वराह आणला. आपल्या समर्थ खड्गाच्या म्यानाजवळ धारण केलेली सुरी काढून ॲत्रिअसपुत्राने वराहाच्या अंगावरील थोडे राठ केस कापताना प्रार्थनेसाठी हात उंचावून कामाला सुरवात केली. बाकीचे ॲकिअन्स सारे गुपचूप व्यवस्थितपणे बसून राजाचे बोलणे ऐकू लागले, आणि ॲगॅमेम्नॉनने स्वर्गाच्या घुमटात पाहून प्रार्थना केली, तो म्हणाला, "देवांतल्या आद्य व सर्वांत बलशाली जव्हला मी साक्षीस आवाहन करीत आहे; आणखी पृथ्वी, सूर्य आणि अधोलोकी राहाणऱ्या व खोटी शपथ घेणाऱ्यांवर सूड उगवणाऱ्या एरिनिज यांनाही साक्षी ठेवून जाहीर करतो, की ब्रिसेइस या मुलीला मी हात लावलेला नाही. तिला माझ्या शय्येवर नेण्यासाठी किंवा दुसऱ्या कशासाठीही मी तिला स्पर्श केलेला नाही, तर ती माझ्या तंबूत निष्कलंक अशी राहिली आहे. जर मी खोटी शपथ घेत असेन तर मिथ्या शपथ घेणाराला करण्यात येणारे सर्व दंड स्वर्गस्थ देव मला करोत."

बोलत असताच त्याने वराहाचा गळा चिरला, त्यावर तॅल्थिबिअसने तो पशू डोक्याभोवती गरगरा फिरवून विस्तीर्ण समुद्रात माशांचे भक्ष्य होण्यासाठी भिरकावून दिला. मग ॲकिलिझही उठला व आर्गाइव्हज्‌समोर म्हणाला, "तात जव्ह, खरोखर तू माणसांच्या दृष्टीवर झापड आणून त्यांचा नाश करतोस. अन्यथा ॲत्रिअसपुत्राने मला चिथावून इतका भयंकर संताप मला आणला नसता, किंवा माझ्या इच्छेविरुद्ध इतक्या आडमुठेपणाने ब्रिसेइसला माझ्याकडून काढून घेतली नसती. निश्चितच जव्हने अनेक आर्गाइव्हज्‌चा नाश योजिला असला पाहिजे. तुम्ही लोक जा आता, व तुमचे जेवण करा म्हणजे आपल्याला लढाईला सुरवात करता येईल."

यावर त्याने सभा विर्सजित केली, आणि प्रत्येकजण नौकेकडे गेला. मिर्मिदॉन्सनी देणग्यांची व्यवस्था करून त्या ॲकिलिझच्या नौकेकडे नेल्या. बाकीच्या गोष्टी त्याच्या तंबूत ठेवून झाल्यावर मोतद्दारांनी घोडे तेवढे हाकून नेऊन इतर घोड्यांमध्ये दाखल केले.

व्हीनससारख्या रुपवती ब्रिसेइसने जेव्हा पॅत्रोक्लसचा छिन्नविछिन्न देह पाहिला तेव्हा त्याच्यावर अंग टाकून, आपले ऊर, कंठ व सुंदर मुख दोन्ही हातांनी ओरबाडून घेऊन ती मोठमोठ्याने रडली. देवीसारखी सुरेख अशी ती स्त्री रडत रडत म्हणाली, "पॅत्रोक्लस, प्रियतम मित्रा, मी येथून गेले तेव्हा तू जिवंत होतास ; हे राजपुत्रा, मी परत येऊन पाहते तो तू मेलेला दिसत आहेस ; अशी एकामागून एक नवी नवी दुःखे वाढत वाढत मजवर कोसळत आहेत. माझ्या आईबापांनी ज्याच्याशी माझे लग्न लावून दिले, तो आमच्या नगरीपुढे मारला गेलेला मी पाहिला, आणि माझे तीन प्रिय सख्खे भाऊ त्याचदिवशी त्याच्याबरोबर नाश पावले. पण तू पॅत्रोक्लस, ॲकिलिझने जेव्हा माझ्या पतीला मारले व थोर मिनिझ नगरी लुटली तेव्हाच, तू मला रडायचे नाही म्हणून सांगितलेस, कारण तू म्हणालास की तू ॲकिलिझला माझ्याशी लग्न करायला व त्याच्याबरोबर परत थिआला घेऊन जाण्यास लावशील आणि तेथे मिर्मिदॉन्स-मध्ये आमच्या विवाहानिमित्त महाभोज होईल. तू नेहमीच माझ्याशी दयाळू-पणे वागलास व तुझ्यासाठी शोक करायची मी कधी थांबणार नाही."

बोलताना ती रडत होती व बाकीच्या स्त्रिया तिच्यासह शोक करीत होत्या--आपले अश्रू पॅत्रोक्लससाठी आहेत असा त्यांचा आविर्भाव असला तरी खरोखर प्रत्येकजण आपल्या स्वतःच्या दुःखाखातरच रडत होती. ॲकिअन्समधल्या ज्येष्ठांनी ॲकिलिझभोवती जमून त्याला अन्नग्रहण करण्याची प्रार्थना केली, पण तो विवळत राहिला व त्याने खाण्यास नकार दिला. तो म्हणाला, "मी तुम्हाला विनवतो—जर कोणी सोबती माझे ऐकणार असेल तर—मला अन्न किंवा पाणी घेण्याचा आग्रह करू नका. कारण माझे अंतःकरण दुःखाने जड झाले आहे व सूर्यास्तापर्यंत मी उपासच करणार आहे."

असे म्हणून त्याने दोघे ॲत्रिअसपुत्र, नेस्तॉर, युलिसिस, आयदोमेनस आणि वृद्ध उच्चकुलीन वीर फिनिक्स यांच्याखेरीज बाकीच्या राजपुरुषांना पाठवून दिले. या लोकांनी मागे राहून त्याच्या तीव्र दुःखाचे शमन करण्याचा प्रयत्न केला ; पण स्वतःला लढाईच्या जबड्यात झोकून देईपर्यंत तो स्वतःच्या शोकाचा उपशम होऊ देण्यास तयार नव्हता. सारखा पॅत्रोक्लसचाच विचार करीत तो एकामागून एक निश्वास टाकीत राहिला. मग तो बोलला,

"दुर्दैवी व प्रियतम सोबत्या, ॲकिअन्स त्रोजन्सशी लढण्याची घाई करीत होते तेव्हा लगेच व विनाविलंब माझ्यासाठी चांगले जेवण तूच तयार करीत होतास ; म्हणून आता, माझ्या तंबूत जरी खाद्यपेय आहे तरीसुद्धा मी दुःखा-मुळे उपास करणार. त्या नतद्रष्ट हेलनखातर परक्या देशात त्रोजन्सशी

लढणाऱ्या माझ्या वियोगामुळे जो आता थिआमध्ये रडत आहे, त्या माझ्या पित्याच्या निधनाची वार्ता मी ऐकली असती तरीसुद्धा,—किंवा स्किरॉस-मध्ये ज्याचे संगोपन होत आहे—तो माझा पुत्र निऑप्तोलेमस—खरोखरच अजून जिवंत असेल तर—त्याच्या मरणाचे वृत्त ऐकून देखील आतापेक्षा अधिक शोक मला झाला नसता. आतापर्यंत मी निश्चित केले होते की मी एकटाच येथे ट्रॉयला आरगॉसपासून दूर धारातीर्थी पडायचे व तू परत थिआला जाऊन, माझ्या पुत्राला तुझ्या स्वतःच्या नौकेतून बरोबर घेऊन येऊन त्याला माझी सर्व मालमत्ता, माझे दास व माझ्या घराचे वैभव दाखवायचेस,—कारण पेलिअस नक्कीच एकतर मृत झाला असला पाहिजे किंवा त्याचे जे काही थोडे आयुष्य उरले आहे ते वार्धक्याच्या दौर्बल्याने, तसेच माझ्या मृत्यूची वार्ता ऐकू येते की काय या सदाच्या धास्तीने पीडित झालेले असणार."

असे बोलताना तो रडला व ज्येष्ठानी आपले सुस्कारे त्याच्या व एकमेकांच्या सुस्काऱ्यात मिळवले, कारण प्रत्येकाच्या मनात आपण आपल्यामागे स्वगृही काय काय सोडून आलो आहो याचे विचार येत होते. वरून सॅटर्नपुत्राने त्यांच्याकडे सानुकम्प दृष्टिक्षेप केला व लगेच मिनर्व्हाला म्हटले, "माझ्या बाळे, तू तुझ्या आवडत्या वीराला अगदीच वाऱ्यावर सोडून दिले आहेस ; तर मग तो काय इतका तुझ्या आठवणीतून सपशेल नाहीसा झाला आहे ? तो पहा नौकांपाशी आपल्या प्रिय सख्याच्या वियोगामुळे अगदी पोरका झाल्यासारखा बापडा बसला आहे ; इतर लोक जरी जेवायला गेले तरी तो मात्र खाद्यपेयाला स्पर्श करणार नाही. तेव्हा जा, व अमृत तसेच देवान्न त्याच्या हृदयात टाक म्हणजे त्याला भूक जाणवणार नाही."

याशब्दांनी त्याने मिनर्व्हाला कार्यप्रवृत्त केले व तिच्या मनातही ते आधीच आले होते. रुंद पंखांवर तरंगत, कर्कश स्वर काढीत वेगाने जाणाऱ्या ससाण्या-सारखी ती स्वर्गातून खाली अवकाशात आली. दरम्यान साऱ्या सैन्यभर ॲकिअन्स शस्त्रसज्ज होत होते ; आणि ॲकिलिझच्या हातापायांनी त्याला असह्य क्षुधेमुळे दगा देऊ नये यासाठी मिनर्व्हाने त्याच्या हृदयात अमृत व देवान्न टाकून परत आपल्या बलाढ्य पित्याच्या गृहाप्रत प्रयाण केले. जव्हच्या हाताने फेकलेल्या व उत्तरवायूच्या तीव्र झोतांनी वाहून आणलेल्या थंडगार हिमशलाकां-सारख्याच दाटीदाटीने चकाकती शिरस्त्राणे, मध्ये उंचवटे असलेल्या ढाली, भक्कम जाड पत्रे लावलेली वक्षकवचे व ॲश काष्ठाच्या दांड्याचे भाले यांचा ओघ नौकांमधून बाहेर पडला. त्यांची चमक थेट आकाशात घुसली, झळकत्या शस्त्र-संभाराने सारी भूमी उजळून निघाली व त्यांच्या पदाघातांचा ध्वनि त्यांच्या

पायाखालून वरपर्यंत उठला. त्या सर्वांच्यामध्ये ॲकिलिझने आपले चिलखत चढवले; त्याने दातओठ खाल्ले, त्याचे नेत्र अग्नीसारखे झळकले, कारण त्याचे दुःख सहन करण्यापलीकडचे होते. तेव्हा याप्रमाणे त्रोजन्सविरुद्ध त्वेषपूर्ण होऊन त्याने त्या देवाची देणगी—व्हल्कनने त्याच्यासाठी बनविलेले ते कवच धारण केले.

प्रथम त्याने घोटयांना फासे असलेली पोटऱ्यांची उत्तम कवचे बसवली, मग छातीभोवती वक्षकवच चढवले. चांदीचे खडे बसविलेले ब्रॉंझचे खड्ग त्याने खांद्यावरून लटकत ठेवले आणि नंतर चंद्रासारख्या उज्ज्वलतेने दूरपर्यंत चकाकणारी ती एवढी भव्य व भक्कम ढाल उचलली. ईप्सित आश्रयस्थानापासून वाऱ्याने व वादळाने सागरात दूरवर नेलेल्या नाविकांना पर्वतावरील आपल्या उंचावरच्या वस्तीत लोकांनी पेटवलेल्या शेकोटीचा उजेड जसा समुद्रावरून दिसतो, अगदी तशीच ॲकिलझिच्या विस्मयकारी ढालीची चमक आकाशात उंचावर उठून दिसली. त्याने ते दुर्दम्य शिरस्त्राण उचलून आपल्या मस्तकावर ठेवले. तेथून ते एकाद्या ताऱ्यासारखे चमकू लागले आणि त्याच्या कडेवर व्हल्कनने दाट बसविलेले सोनेरी तुरे त्याच्याभोवती डोलू लागले. मग ॲकिलिझने चिलखत अंगावर नीट बसते की नाही याची चांचणी घेतली; त्याखाली हातपाय सहज चालवता येतातसे पाहिले आणि जणु ते पंखच असल्यासारखी त्या कवचामुळे त्याला उभारी वाटली.

त्याने भाले ठेवण्याच्या चौकटीतून आपल्या पित्याचा भालाही काढला; तो इतका मोठा, जड व मजबूत होता की ॲकिलिझखेरीज कोणाही ॲकिअनला तो चालवण्याचे बळ नव्हते; हा भाला, पेलिऑन पर्वताच्या सर्वोच्च रांगांवरील पेलिअन ॲश या वृक्षांच्या काष्ठाचा असून कायरॉनने एकेकाळी तो पेलिअसला दिला होता. तो अनेक वीरांचा अंतक ठरणार होता. त्याच्या घोडयांना धुरेला जुपण्याच्या कामाला ऑतोमेदॉन व ॲल्सिमस लागले; त्यांनी घोडयांचे पट्ट आवळून त्यांच्या तोंडात लगाम दिले व लगामाचे पट्टे ओढून मागे रथाकडे आणले; चाबुक हाती धरून ऑतोमेदॉन उडी घेऊन रथावर घोडयांमागे आरुढ झाला आणि त्याच्यामागून संपूर्ण शस्त्रकवचसज्ज ॲकिलिझ रथावर चढला. तो सूर्यदेव हायपेरिऑनसारखा तेजस्वी दिसत होता. मग त्याने खडया आवाजात आपल्या पित्याच्या घोडयांना दटावले, "झॅन्थस व बॅलिअस, पोदार्जीच्या विख्यात संतानानो, या खेपेस आमची लढाई संपल्यावर तुमच्या सारथ्याला ॲकिअन्सच्या सैन्याकडे निश्चितपणे सुखरुप परत आणा, आणि पॅत्रोक्लसला मैदानात मेलेला सोडलात तसा त्याला सोडू नका."

तेव्हा वेगवान झॅन्थसने धुरेखालून उत्तर दिले--कारण शुभ्रबाहू ज्यूनोने त्याला मनुष्यवाणी प्रदान केली होती--धुरेच्या पट्ट्याखाली लोंबणारी त्याची आयाळ भूमीला स्पर्श करीपर्यंत वाकून त्याने म्हटले, "भयावह ॲकिलिझ, आम्ही खरोखर तुला आता वाचवूच, पण तुझ्या मृत्यूचा दिवस समीप आहे, आणि तो दोष आमचा असणार नाही ; तर तुझा नाश करणारे असतील स्वर्गस्थ देव व कठोर दैव. आणि त्रोजन्सनी पॅत्रोक्लसचे कवच काढून घेतले तेही काही आमच्या आळसामुळे किंवा ढिलाईमुळे नव्हे ; तर रूपवती लीतोने जन्म दिलेल्या बलाढ्य देवाने, पॅत्रोक्लस अग्रतमश्रेणीत लढत असता त्याला मारून हेक्तरला यशश्री प्रदान केली. सर्व वायूत परम वेगवान असे ज्याचे वर्णन करतात त्या झेफिरसइतके आम्ही दोघे वेगाने पळू शकतो ; तरीही एका मानवाच्या व देवाच्या हातून मारला जाणे तुझ्या नशिबी आहे."

तो असे बोलल्यावर एरिनिजनी त्याची वाक्शक्ती हिरावून घेतली आणि ॲकिलिझने अत्यंत खिन्नपणे त्याला उत्तर दिले, "हे झॅन्थस, तू का बरे असे माझ्या मरणाचे भाकित करतोस ? तुला तसे करण्याची गरज नाही. कारण मला पुरते ठाऊक आहे की मी माझ्या प्रिय मातापित्यापासून दूर येथे रणी पडणार आहे ; तथापि म्हणून काही त्रोजनांशी त्यांची तृप्ती होईपर्यंत झुंज देण्यापासून मी माझा हात आवरता घेणार नाही."

असे म्हणून एक मोठी आरोळी देऊन त्याने आपले घोडे युद्धाच्या आघाडीकडे हाकले.

• • •



## सर्ग २०

याप्रमाणे, हे पेलिअसपुत्रा, युद्धासाठी भुकेले अँकिअन्स तुझ्याभोवती आपल्या नौकांपाशी शस्त्रसज्ज झाले; त्याचवेळी त्यांच्या समोरच्या बाजूस मैदानाच्या चढावर त्रोजन्सनींही शस्त्रे धारण केली.

दरम्यान अनेक दऱ्या असलेल्या ऑलिम्पसच्या माथ्यावरून जव्हने थेमिसला देवांना सभेसाठी एकत्र गोळा करण्याची आज्ञा दिली; तेव्हा तिने सगळीकडे जाऊन त्यांना जव्हच्या निवासात बोलावले. तेथे ओशिॲनसशिवाय एकही नदी अनुपस्थित नव्हती, सुंदर लताकुंजात संचार करणाऱ्या, नद्यांच्या प्रवाहात वास्तव्य करणाऱ्या, नद्यांवरच्या किंवा हरित तृणाच्या कुरणातल्या कोणीही अप्सरा आल्यावाचून राहिल्या नाहीत. मेघांचे बलाने नियंत्रण करणाऱ्या जव्हच्या सदनी त्या जेव्हा पोहोचल्या तेव्हा व्हल्कनने अनन्य कौशल्याने तात जव्हसाठी तयार केलेल्या घोटीव स्फटिकांच्या कमानींच्या सभागृहात आपापल्या स्थानांवर त्या आरुढ झाल्या.

तेव्हा अशाप्रकारे जव्हच्या घरी सर्व देवदेवता जमल्या. देवीच्या आवाहनास भूकंपस्वामी नेपच्यूननेही मान दिला व तो समुद्रातून निघून त्यांच्यामध्ये आला. तेथे त्यांच्यात बसून जव्हचा हेतु काय असावा अशी पृच्छा त्याने केली. त्याने विचारले, "विद्युत्प्रयोजका, देवांना मंत्रणसाठी तू बोलावले आहेस का? त्रोजन्स व अँकिअन्स यांचा संबंध असलेल्या काही प्रकरणाचा तू विचार करीत आहेस काय? कारण त्यांच्यात लढाईचा भडका पेटवला जाण्याच्या बेतात आहे."

"माझा हेतू तुला ठाऊक आहे, भूकम्पकारका," जव्हने उत्तर दिले, "व कशासाठी तुम्हा सर्वांना मी येथ बोलावले आहे तेही तू जाणतोस. त्यांचा नाश होत असतादेखील मी त्यांची चिन्ता वाहात आहे. माझ्यापुरते म्हणशील तर मी येथे ऑलिम्पस पर्वतावरच बसून राहून सारे काही शांतपणे पाहात राहीन, पण तुम्ही बाकीचे त्रोजन्स व अँकिअन्समध्ये जाऊन तुमच्या प्रत्येकाच्या इच्छेप्रमाणे मन मानेल त्या पक्षाला मदत करा. जर अँकिलिझने त्रोजन्सशी अप्रतिबंध युद्ध केले तर ते त्याच्यापुढे टिकून राहणार नाहीत. त्याला पाहताच ते नेहमीच थरथरा कापत आले आहेत, आणि आता सोबत्याच्या मरणाने तो चिथावला जाऊन त्याला असा भयंकर त्वेष चढल्यावर तर तो प्रत्यक्ष दैवावर देखील मात करून त्या नगरीवर तुफान हल्ला चढवील."

जव्हने असे बोलून युद्धाची सूचना दिली; त्यावर देवांनी आपापले पक्ष निवडून युद्धात प्रवेश केला. ज्यूनो, पॅलास मिनर्व्हा, पृथ्वीपरिवेष्टा नेपच्यून, चांगल्या पायगुणाचा व सर्व कपट विद्यात उत्कृष्ट असा मर्क्युरी यांनी नौकांवरच्या सैन्याची बाजू घेतली; त्यांच्याबरोबर आपल्या परिपूर्ण तेजाने मंडित असा व्हल्कन आला; तो लंगडत होता पण त्याचे काटकुळे पाय त्याच्या शरीराला जोशात वाहून नत होते. चकाकते शिरस्त्राण असलेला मार्स त्रोजनांच्या पक्षाला जाऊन मिळाला आणि त्याच्यासह गेले लांबलचक झुलुपांचा अॅपॉलो धनुर्धारिणी देवी दायाना, लीतो, झॅन्थस व हास्यविनोद प्रेमी व्हीनस.

जोपर्यन्त मर्त्य योद्धयांपासून देव अलिप्त राहिले, तोपर्यन्त अॅकिअन्स विजयी होत होते, कारण दीर्घकाळपर्यन्त लढण्याचे नाकारीत असलेला अॅकिलिझ आता त्यांच्याबरोबर लढत होता. आपले कवच धारण करून तेजाने तळपत प्रत्यक्ष मार्ससारखा दिसणारा वेगवान पेलिअसपुत्र पाहिल्यानंतर भीतीने ज्याचे हातपाय गळाले नाहीत असा एकही त्रोजन नव्हता. तथापि जेव्हा आलिम्पसनिवासी देव आपला हातभार लावण्यास मानवात आले तेव्हा सैन्यांना चिथावणारा प्रबळ 'संघर्ष' तात्काळ खवळून उठला आणि मिनर्व्हाने कधी भिंतीभोवतालच्या खोल खदकाजवळ उभे राहून तर कधी गरजणाऱ्या सागराच्या तटावर उभे राहून, सर्व शक्ती खर्च करून आपला मोठा आवाज खूप उच चढवला. काळ्या वादळी मेघासारख्या मार्सनेही दुसऱ्या बाजूने गर्जना केली, आणि कधी नगरीतल्या दुर्गावरून, तर कधी सिमॉइस नदीच्या बाजूने कॅलिकोलोनी टेकडीपर्यन्त धावत जाऊन तारस्वराने त्रोजन्सना हाक दिली.

याप्रमाणे देवांनी उभय सैन्याना झुंज देण्यास चेतविले, व आपापसातही हिरिरीने उग्र विग्रह माजवला. देवांच्या व मानवांच्या पित्याने वरील स्वर्गातून मेघगर्जना केली व खाली नेपच्यूनने विशाल पृथ्वी हालवून उंच टेकड्यांना कंपनाचा आदेश दिला. अनेक झऱ्यांच्या इदापर्वताचे फाटे व शिखरे थरथरली, तशीच त्रोजनांची नगरी व अॅकिअन्सच्या नौकाही कंपित झाल्या. अधोलोकीच्या राज्याचा स्वामी हेदिझ भयाकुल होऊन सिंहासनावरून उडी मारून घाबरा होत उठला, आणि भूकंपाधिपति नेपच्यून डोक्यावरील भूमीला तडे पाडून आपल्या बुरसलेल्या हवेल्या उघड्या करील व अमरांच्या व मर्त्य मानवांच्या नजरेस आणील या भीतीने मोठ्याने ओरडत सुटला——त्या हवेल्या इतक्या भीषण व उजाड होत्या की त्यांच्या नुसत्या विचाराने देवांच्या देखील अंगावर काटा उभा राही. युद्धात देव एकत्र आल्यावर असा हलकल्लोळ उडाला. अॅपॉलोने आपले बाण घेऊन नेपच्यूनसमोर

ठाण मांडले तर मिनर्व्हाने युद्धदेव मार्सच्या विरुद्ध. दूर अंतरावर बाण मारू शकणाऱ्या अँपॉलोची बहीण धनुर्धारिणी दायाना आपले सुवर्णशर घेऊन ज्यूनोच्या सन्मुख उभी राहिली. चांगल्या पायगुणाचा महाकाय मर्क्युरी लीतोच्या पुढे आला तर मानव ज्याला स्कॅमॅन्दर पण देव झॅन्थस म्हणतात तो भोवऱ्यांनी युक्त असा प्रवाह असलेला प्रबळ नद व्हल्कनच्या तोंडीस उभा राहिला.

तेव्हा ते देव असे एकमेकांविरुद्ध उभे राहिले होते. पण अँकिलिझचा निश्चय प्रायॅमपुत्र हेक्तरशी भिडण्याचा होता, कारण इतर सर्व गोष्टीपेक्षा त्याच्या रक्ताने हठाग्रही युद्धस्वामीला आकंठ तृप्त करण्याची त्याची तीव्र कामना होती. दरम्यान अँपॉलोने इनिआसला पेलिअसपुत्रावर आक्रमण करण्यास लावून त्याच्या हृदयात धैर्य उत्पन्न केले. त्यासाठी प्रायॅमपुत्र लायकॅऑन याचे रुप घेऊन त्याच्या आवाजात तो म्हणाला, "त्रोजन्सच्या सल्लागारा, इनिआस, द्वंद्वयुद्धात पेलिअसपुत्र अँकिलिझशी मी लढेन अशी जी बढाई त्रोजन राजपुरुषांपुढे मद्यपान करताना तू मारलीस त्यातले प्रौढीचे शब्द आता कोठे आहेत?"

आणि इनिआसने उत्तर दिले, "माझी मुळीच इच्छा नसताना मला तू असा, अभिमानी पैलिअसपुत्राशी लढण्यास का सांगत आहेस? मी जर आता त्याच्यासमोर गेलो तर ती काही माझी त्याच्याशी लढण्याची पहिलीच वेळ असणार नाही. जेव्हा त्याने आमच्या गुरांवर हल्ला चढवून, लिर्नेसस व पेदॅसस नगरी लुटल्या तेव्हासुद्धा त्याच्या भाल्याने मला इदाहून पळवून लावलेले आहे. खरोखर माझ्या पायात पळण्याचे बळ देऊन जव्हने मला त्यावेळी वाचवले, नाहीतर अँकिलिझच्या, व त्याचे रक्षण करण्यास त्याच्यापुढे राहणाऱ्या आणि त्रोजन्सवर तुटून पडण्यास त्याला चिथावणाऱ्या मिनर्व्हाच्या हातून मी रणात पडलो असतो. कोणीही मर्त्य मनुष्याने अँकिलिझशी लढण्याचे करू नये, कारण त्याची संरक्षक दैवी शक्ती म्हणून देवांपैकी एक सदा त्याच्याबरोबर असतो, आणि जरी तसे नसले तरी त्याचे शस्त्र नेहमी थेट सरळ जाते व विरोधकाच्या मांसाच्या भेद केल्याविना राहात नाही. जर स्वर्गस्थ शक्तींनी उभयतांना तुल्यबल ठेवून मला त्याच्याशी लढू दिले तर तो मला एवढ्या सहजगत्या पराजित करू शकणार नाही, मग तो कितीही आत्मश्लाघा करो, की आपण ब्रॉंझचे घडवलेले आहोत म्हणून."

मग जव्हपुत्र राजा अँपॉलो बोलला, "तसे नाही, वीरा, सदाजीवी देवांची प्रार्थना कर; कारण लोक म्हणतात तू जव्हकन्या व्हीनसच्या पोटी जन्मलास,

तर ॲकिलिझ पुत्र आहे तो कनिष्ठ श्रेणीच्या देवीचा. व्हीनस जव्हची मुलगी आहे तर थेतिस मुलगी आहे ती केवळ सागरास्थित वृद्ध पुरुषाची. म्हणून त्याच्यावर तुझा भाला रोख आणि त्याच्या टोमण्यांनी नी धाकदपटशाने त्याच्याकडून भेडसावला जाऊ नकोस."

असे बोलताना त्याने त्या प्रजापालकाच्या हृदयात धैर्य उत्पन्न केले आणि तो पूर्णकवचधारी व शस्त्रसज्ज असा सर्वात पुरोभागी लढणाऱ्या श्रेणीत जोराने पदन्यास करीत गेला. ॲकिलिझला भिडण्यास तो गर्दीतून पुढे चालून जात असता, अँकायसिसचा तो पुत्र शुभ्रबाहू ज्यूनोच्याही नजरेतून सुटला नाही. तेव्हा ज्यूनोने देवांना आपल्याभोवती बोलावून म्हटले, "तुम्ही दोघे, नेपच्यून व मिनर्व्हा इकडे लक्ष द्या, आणि आता हे कसे काय घडवून आणावे याबद्दल विचार करा; फीबस ॲपॉलोने परिपूर्ण कवचधारी ईनिआसला ॲकिलिझशी लढायला पाठविले आहे; त्याला आपण तात्काल परत फिरवू या की आपल्यापैकी एक जण ॲकिलिझच्या बाजूला उभे राहून, त्याला बल प्रदान करू या? म्हणजे मग त्याचा धीर खचणार नाही आणि त्याला कळून येईल की देवातले मुख्य मुख्य त्याचे पाठीराखे आहेत, व सगळा वेळ ट्रोजनांचे रक्षण करीत असलेले इतर देव केवळ कुचकामाचे आहेत. आपण सगळे ऑलिम्पसवरून खाली येऊन युद्धात सहभागी होऊ या, म्हणजे आजच्या दिवशी तरी ट्रोजन्सच्या हातून त्याला अपाय होणार नाही. जेव्हा त्याचा गर्भ उदरी राहिला व मग जेव्हा त्याच्या आईने त्याला जन्म दिला तेव्हा प्रारब्धाने त्याच्यासाठी जे काही ठरवले असेल ते पुढे त्याला भोगू द्या. याप्रमाणे देवाच्या आवाजाने ॲकिलिझला असे आश्वासन मिळाले नाही, तर थोड्याच वेळात आपल्यापैकी कोणी युद्धात त्याच्यासमोर येईल तेव्हा तो धास्तावेल, कारण देवांचे समोरासमोर झालेले दर्शन भयंकर असते."

भूकम्पाधीश नेपच्यूनने तिला उत्तर दिले, "ज्यूनो, आपला संताप आवर; तो बरा नव्हे; इतर देवांना आपल्याशी लढायला लावण्यास मी अनुकूल नाही, कारण लाभाचे पारडे फार मोठ्या प्रमाणात आपल्या बाजूस राहील. रुळलेल्या मार्गापासून लांब असलेल्या एकाद्या टेकडीवर आपण जागा धरू आणि मर्त्य मानवांना आपापसात लढून याबाबतीतला निर्णय करू दे. जर मार्स किंवा फीबस ॲपॉलो यांनी लढण्यास सुरवात केली किंवा ॲकिलिझला लढता येऊ नये असे त्याच्यावर त्यांनी नियंत्रण आणले, तर मग आपणही युद्धाची घोषणा करू आणि आपण तसे केले म्हणजे मग ते देव लागलीच रणक्षेत्र सोडून पराभूत स्थितीत ऑलिम्पसला इतर देवात परत जातील."

असे बोलून तो कृष्णकुंतल देव, हर्क्युलिझच्या उन्नत भूभागाकडे पुढे निघाला. ते मातीचे बांधकाम पक्क्या दगडचुन्याच्या बांधणीभोवती त्रोजन्स व मिनर्व्हा यांनी, सागरवासी राक्षसाकडून किनाऱ्यापासून सपाटीकडे पळताना त्याचा पाठलाग होत असता हर्क्युलिझला आश्रयस्थान म्हणून उभारले होते. तेथे नेपच्यून व त्याच्याबरोबरची मंडळी दाट अंधाऱ्या ढगात स्वतःला गुंडाळून घेवून स्थानापन्न झाली पण इतर देव, हे फिब्स व शहरे उध्वस्त करणाऱ्या मार्स, तुमच्याभोवती कॅलिकोलोनीच्या कटकावर आसनस्थ झाले.

याप्रमाणे देव दूरदूर बसून आपापले बेत करू लागले, पण उभय पक्षांपैकी कोणीही एकजण दुसऱ्याशी युद्ध करण्यास तयार नव्हता, आणि आपल्या उत्तुंग स्थानावरून जव्ह सर्वांवर सत्ता गाजवीत होता. दरम्यान सबंध रणमैदान माणसांनी व घोडयांनी गजबजले होते आणि शस्त्र संभाराच्या चकाकीने तळपत होते. उभय पक्ष एकमेकांकडे धावले तेव्हा त्यांच्या जोरदार पदाघातांनी भूमी पुन्हा दुमदुमली आणि त्यांच्यातले इतर सर्वांपेक्षा पुष्कळच श्रेष्ठ असे दोन कैवारी वीर दोन्ही सैन्यांमध्ये एकमेकांशी लढण्यास भिडले–ते होते अँकायसिसपुत्र ईनिआस व उदात्त अँकिलिझ.

आपल्या दुर्धर शिरस्त्राणाने शत्रूंना आव्हान देत, लांबलांब टांगा टाकीत हल्ला करण्यासाठी पुढे झालेला पहिला वीर होता ईनिआस. त्याने आपली मजबूत ढाल छातीपुढे धरली होती व तो आपला ब्राँझचा भाला परजीत होता. दुसऱ्या बाजूने पेलिअसपुत्र उडी मारून पुढे सरसावला––ज्याला शिकार करून मारण्यास साऱ्या ग्रामीण प्रदेशाचे लोक गोळा झाले आहेत अशा सिंहासारखा; सुरवातीला त्याच्या आविर्भावावरून काही अनिष्ट होईल असे वाटत नाही, पण एकाद्या धाडसी तरुणाने त्याला भाला मारल्यावर तो जबडा उघडून, शत्रूवर उडी घेण्याचा पवित्रा घेतो, त्याच्या जबडयातून फेस येतो व तो त्वेषाने गर्जना करतो, आपल्या बरगडयांवर व पुठ्ठ्यावर दोन्ही बाजूंनी शेपटीचे फटकारे ओढतो आणि समोर थेट उडी घेताना उग्र दृष्टीने टवकारून पहातो. आपण शत्रूला ठार करणार आहो की शत्रूच्या सर्वांत पुढच्या फळीत आपणच मारले जाणार आहोत याचा तो शोध घेत असतो. अगदी तशाच क्रोधावेशात ईनिआसवर उडी घेण्यास अँकिलिझ कमालीचा अधीर झाला होता.

आता ते एकमेकांच्या जेव्हा अगदी जवळ आले तेव्हा पहिल्याने अँकिलिझ बोलला, "ईनिआस, तू असा सैन्यापुढे उभा राहून माझ्याशी लढण्यास का उद्युक्त झाला आहेस? प्रॉमच्या जागी त्रोजन्सवर राज्य करायची आशा तुला आहे की काय? छे रे! जरी तू मला मारलेस तरी प्राॅम त्याचे

राज्य तुझ्या स्वाधीन करणार नाही; तो निर्दोष निर्णयक्षमता असलेला मनुष्य आहे व त्याला स्वतःचे पुत्र आहेत. का मला तू मारलेस तर ट्रोजन्स तुला फळबागा, कुरणे व धान्य पिकवणारी शेते यांनी भरगच्च भरलेली स्वाधीनभूमी तुला वहाल करणार आहेत? पण मला तू मारणे दुष्करच; अगोदर एकदा तुला मी पराभूत केला आहेच. तू एकटा असताना तुझा पाठलाग करीत तुझ्या कळपापासून दूर इदाच्या उतारांवर मी तुला कसे सैरावैरा पळवून लावले होते ते तू विसरलास का? तू मागे पाहायला वळलास देखील नाही; तू लिर्नेससमध्ये आश्रय घेतलास, पण मी त्या नगरावर हल्ला केला, व जरी जव्ह व इतर देवांनी तुला वाचवले, तरी मिनर्व्हा व तात जव्हच्या साह्याने ते नगर लुटून त्यातल्या बायका मी बंदीवासात घेऊन गेलो. तुला वाटत असेल की ते देव आता तुझे रक्षण करतील, पण ते तसे करणार नाहीत; म्हणून म्हणतो आपल्या सैन्यात माघारा जा, व मला तोंड देण्याचा प्रयत्न करू नको, नाही तर मग पस्तावशील. गोष्ट होऊन गेल्यानंतर मग मूर्खालाही शहाणा होता येते."

तेव्हा ईनिआसने उत्तर दिले, "पलिअसपुत्रा, मी लहान मूल असल्यासारखा तुझ्या शब्दांनी घाबरून जाईन असे समजू नको. माझी इच्छा असली तर मलाही बढाई मारून बाष्कळपण बोलता येईल. जरी तू कधी माझी मातापितरे किंवा मी तुझी पाहिली नाहीत, तरी सर्वसामान्य प्रसिद्ध गोष्टी म्हणून एकमेकांचे वंश व कुळी आपल्याला ठाऊक आहेत. लोक म्हणतात की तू कुलवान पेलिअसचा पुत्र, व सागरकन्या सुकेशा थेतिस तुझी माता आहे. माझा पिता कुलीन अँकायसिस असून व्हीनस माझी माता आहे; आपल्या दोघातल्या एका कोणाची तरी मातापितरे आज पुत्रासाठी शोक करणार आहेत, कारण लढाई संपल्यावर आपण विभक्त होऊ ते बालिश बडबडीपेक्षा अधिक काहीतरी झाल्यामुळे. तेव्हा हवी तर माझी वंशपरंपरा जाणून घे––पुष्कळांना ती विदित आहेच."

"प्रारंभी दार्दानस हा जव्हचा मुलगा होता, आणि त्याने दार्दानिआ स्थापन केली; कारण इलिअमची स्थापना माणसांनी मैदानावर वस्ती करण्यासाठी अजून झाली नव्हती व ते लोक अद्यापि अनेक निर्झरमंडित इदाच्या फाट्यावर राहात होते. दार्दानसला राजा एरिक्थोनिअस नावाचा पुत्र होता, तो सर्व पृथ्वीवरील हयात माणसात श्रीमंत होता, शिंगरांसह सजल कुरणांपाशी चरणाऱ्या तीन हजार घोड्या त्याच्यापाशी होत्या. त्या चरत असताना पाहून त्यांच्यावर बोरिआस मोहित झाला आणि काळ्या आयाळीच्या, खच्ची न केलेल्या मस्त अश्वाचे रुप घेऊन तो त्यांच्याशी रममाण झाला. घोड्या

गाभण राहून बारा शिंग्या जन्माला आल्या आणि सुपीक मैदानावरून धावताना त्या कणसाला आलेल्या पिकावरून ताटे न मोडता उड्या मारून जात; किंवा सागराच्या विशाल पृष्ठावर क्रीडा करताना त्या एकाद्या लाटेच्या माथ्यावर मजेने दौडू शकत. एरिक्थोनिअस त्रोजनांचा राजा त्रॉस याचा जनक झाला आणि त्रॉसला तीन उमदे पुत्र झाले,—इलस, अॅसॅरॅकस व मर्त्यमानवात सर्वात देखणा असा गॅनिमीद; त्याच्या सुंदर रुपामुळे देवांनी त्याला पळवून जव्हचा चषकधारी होण्यास नेले, या हेतूने की त्याने अमरांमध्येच सदैव राहावे. इलसने लॅओमेदॉनला जन्म दिला आणि लॅओमेदॉनला तिथोनस, प्राअॅम, लॅम्पस, क्लितिअस व मार्सवंशीय हिकेतॅऑन हे मुलगे झाले. पण अॅसॅरॅकस हा कॅपिसचा पिता होता व कॅपिस अँकायसिसचा, जो माझा पिता होता, आणि हेक्तर प्राअॅमचा पुत्र आहे."

"माझे कुळ व वंशपरंपरा मी याप्रमाणे निवेदित करतो, पण शौर्याविषयी बोलायचे तर जव्ह त्याच्या इच्छेनुसार ते देतो किंवा हिरावून घेतो; कारण तो सर्वांचा स्वामी आहे. आणि आता आपण पोरे असल्यासारखे लढाईच्या-मध्येच असे आणखी बडबडणे नको. आपण एकमेकांना अनंत टोमणे मारू शकतो; ते शंभर वल्ह्यांच्या नौकेतही मावणार नाहीत. जीभ सगळीकडे चौफेर धावू शकते व सगळ्याप्रकारे बोलू शकते, तिला एका विषयावरून दुसऱ्यावर जाता येते; व माणूस जसे बोलतो तसे त्याचे बोलणे नाकारताही येते. बायकांचे एकमेकीशीं बिनसले म्हणजे त्या बाहेर पडून रस्त्यावर भांडतात. रागाच्या भरात जशी स्फूर्ति होईल तसे अर्धा भाग खरे व उरलेला खोटे बोलतात. त्यांच्यासारखी कठोर शब्दांची आपण देवाणघेवाण करण्याने काय फायदा होणार? मी खुषीने लढण्यास एकदा तयार झाल्यावर तुझ्या कुठल्याही शब्दांनी माघार घेणार नाही तेव्हा आपण एकमेकांच्या भाल्यांनीच एकमेकांची परीक्षा करू या."

असे बोलत असता त्याने आपला भाला अॅकिलिझच्या महान व भयानक ढालीवर फकला आणि त्याचे अग्र आपटून ढाल खणखणली. पेलिअसपुत्राने आपल्या मजबुत हाताने ढाल स्वतःपुढे धरली आणि इनिआसचा भाला ढाली-मधून अगदी सहज आरपार जाईल या विचाराने तो चरकला, कारण देवाच्या तेजस्वी देणग्या मर्त्य मानवांच्या घावांपुढे नमणे असंभव हा विचार त्याच्या मनात आला नाही. आणि खरोखरच इनिआसच्या त्या भाल्याने ढालीचा भेद केला नाही, कारण देवाच्या त्या देणगीतला जो सोन्याचा थर होता त्याने भाल्याचे टोक अडवले. भाला दोन थरातून पार गेला, पण त्या देवाने ती

ढाल पाच थरांची घडवली होती. दोन ब्रॉंझचे, अगदी आतले दोन कथलाचे व एक सोन्याचा; याच सोन्याच्या थराने भाला अडवला.

मग अॅकिलिझने आपल्यापरीने भाला फेकला, तो ईनिआसच्या ढालीच्या अगदी कडेवर, जेथे ब्रॉंझचा थर अगदी पातळ होता तेथे लागला; पेलिअन अॅशकाष्ठाचा तो भाला थेट आरपार गेला व त्या घावाने ढालीचा खणखण असा आवाज झाला. ईनिअस भिऊन ढाल अंगापासून दूर धरून दवकत मागे झाला; तथापि तो भाला त्याच्या पाठीवरून न जाऊन थरथरत जमिनीत रुतला; तो निवारक ढालीच्या दोन्ही वर्तुळातून पार झाला होता. ईनिआसने भाला जरी चुकवला होता, तरी ते शस्त्र त्याच्या इतक्या जवळून गेल्यामुळे भयाने व खेदाने त्याची दृष्टी झाकाळून तो जागच्याजागी खिळल्यासारखा उभा राहिला; मग अॅकिलिझने कृतान्तासारखी आरोळी ठोकून आपली धारदार तलवार उपसून त्वेषाने त्याच्यावर उडी घेतली, आणि ईनिआसने एक प्रचण्ड धोंडा उचलला; तो इतका प्रचंड होता की आजच्या अंगकाठीच्या दोन लोकांना देखील तो उचलला नसता, पण त्याने तो अगदी सहज हाती घेतला.

त्यावेळी आपल्यावर उडी घेणाऱ्या अॅकिलिझच्या शिरस्त्राणावर किंवा त्याचा देह झाकणाऱ्या ढालीवर त्याने तो हाणला असता व अॅकिलिझने त्याला भिडून खड्गाने त्याची वाट लावली असती; पण भूकम्पाधीप नेपच्यूनच्या परिस्थिति चटकन लक्षात येऊन तो तात्काल अमराना म्हणाला , "अरेरे, थोर ईनिआससाठी मला हळहळ वाटते, कारण तो पेलिअसपुत्राकडून पराजित होऊन खाली हेदिझच्या गृहीं जाणार. अॅपॉलोची मंत्रणा ऐकली हा त्याचा मूर्खपणा. अॅपॉलो त्याला विनाशापासून कधीच वाचवू शकणार नाही. हा मनुष्य निरपराध असताना, त्याने विनाकारण व दुसऱ्याच्या भांडणापायी दण्ड का भोगावा? त्याने स्वर्गनिवासी देवाना सर्वप्रसंगी स्वीकार्य यज्ञभाग अर्पण केले नाहीत काय? तेव्हा मृत्यूच्या दाढांतून आपण त्याला पळवून बाजूला काढू या. नाहीतर अॅकिलिझने त्याचा वध केल्यास सॅटर्नपुत्र संतापेल. शिवाय दैवयोजना अशी आहे की तो वाचावा आणि ज्याच्यावर मर्त्य स्त्रियांपासून झालेल्या सर्व पुत्रांपेक्षा जव्हचे अधिक प्रेम होते, त्या दार्दानसचा वंश, स्वतःचे बीज किंवा नावनिशाणीही मागे न उरता सर्वस्वी नष्ट होऊ नये. कारण आता खरोखर जव्हने प्रायॅमच्या वंशजांवर दात धरला आहे आणि त्रोजन्सवर अधिराज्य ईनिआसचे व त्याच्या यानंतर जन्माला येणाऱ्या मुलांच्या मुलांचे होणार आहे."

मग ज्यूनोने उत्तर दिले, " भूकम्पकारका, याप्रकरणी तूच स्वतः लक्ष घाल व ईनिआसबद्दल काय करायचे ते ठरव; तू त्याला वाचवणार की तो शूर असूनही पेलिअसपुत्र ॲकिलिझच्या हातून त्याला रणात पडू देणार? कारण खरे सांगायचे म्हणजे आम्ही दोघींनी—मी व पॅलस मिनर्व्हाने अनेकवेळा सर्व अमरांसमक्ष शपथपूर्वक प्रतिपादले आहे की कधीही, जरी सारी ट्रॉयनगरी ॲकिअन्सनी पेटवलेल्या ज्वालात जळत असली तरीही-ट्रोजन्सचे विनाशापासून आम्ही संरक्षण करणार नाही."

पृथ्वी वेढून असलेल्या नेपच्यूनने जेव्हा हे ऐकले तेव्हा तो भाल्यांच्या खणखणाटात चाललेल्या युद्धात शिरला व ॲकिलिझ व ईनिआस जेथे लढत होते त्या स्थळी आला. तात्काळ त्याने पेलिअस-पुत्राच्या दृष्टीपुढे काळोख पसरविला व ईनिआसच्या ढालीतून ब्रॉझचे फाळ असलेला तो ॲश काष्ठाचा भाला उपसून ॲकिलिझच्या पायांपाशी ठेवला. मग त्याने ईनिआसला उचलून पृथ्वीवरून उंच आकाशात नेले व त्वरेने दुसरीकडे हलवले. देवाच्या हाताने वेग दिलेला तो वीर अनेक अश्वारुढ व पदाती योद्धयांच्या समूहावरून उड्डाण करीत लढाईच्या अगदी कडेला, जेथे कॉकोनिअन्स लढण्यासाठी शस्त्रसज्ज होत होते तेथे आला. मग भूकम्पकारक नेपच्यून त्याच्यापाशी येऊन म्हणाला, " ईनिआस, पेलिअसपुत्र अधिक शक्तिमान वीर तसाच स्वर्गाला तुझ्यापेक्षा जास्त प्रिय असताना, त्याच्याशी लढण्याचा हा मूर्खपणा करण्यास तुला कोणत्या देवाने चिथावले? जेव्हा जेव्हा युद्धात त्याच्यासमोर येशील तेव्हा तेव्हा माघार घेत जा; नाहीतर दैवाची वेगळी इच्छा असूनही तू खाली हेदिझच्या घरी जाशील. जेव्हा ॲकिलिझ मृत पावेल तेव्हा मग न डगमगता तुला योद्धयांच्या अग्रश्रेणीत लढण्यास हरकत नाही, कारण ॲकिअन्समधला दुसरा कोणीही तुला मारणार नाही."

या सूचना दिल्यावर तो देव त्याला सोडून निघून गेला, आणि त्याने तात्काल ॲकिलिझच्या डोळ्यांपुढचा अंधःकार दूर केला. ॲकिलिझचे डोळे चांगलेच विस्फारले व अत्यंत रागाने तो बोलला, " अरेरे, हा काय चमत्कार आता पाहतो आहे मी? माझा भाला हा येथे भूमीवर आहे, पण तो ज्याला मारण्या-साठी मी फेकला तो मला कुठे दिसत नाही! ईनिआसची बढाई मला जरी वायफळ वाटली होती तरी खरोखर त्यालाही स्वर्गाचे संरक्षण असले पाहिजे. पण आता मरू दे तो! तो मारला जात असताना किती थोडक्यात वाचला हे यावेळी पाहिल्यानंतर आणखी पुढे लढण्याची इच्छा त्याला यापुढे राहणार

नाही. आता मी दॅनाअन्सना युद्धाबद्दल आज्ञा देतो व दुसऱ्या एकाद्या त्रोजना-वर हल्ला करतो."

तो सैनिकांच्या श्रेणींमधून त्वरेने पुढे जाऊ लागला व जाता जाता आपल्या लोकांना प्रोत्साहन देऊ लागला, "ॲकिअनांनो, त्रोजनांना तुम्हाला हातभर दूर ठेवू देऊ नका, तर त्यांच्यावर धावून जाऊन माणसाला माणूस भिडवून लढा. मी कितीही पराक्रमी असलो तरी इतक्या लोकांचा पाठलाग करून सर्वांशी लढणे मला शक्य नाही. अमर देव असलेला मार्स, किंवा मिनर्व्हाही अशा युद्धाच्या जबड्यात स्वतःला भिरकावून, चौफेर लढा देण्यास कचरतील. तरी देखील, माझ्या मगदुराप्रमाणे मी हातापायांची ढिलाई किंवा सहनशक्तीची उणीव क्षणभरसुद्धा दिसू देणार नाही. मी त्यांची फळी पार फोडून टाकीन आणि माझ्या भाल्याच्या आटोक्यात येण्याचे धाडस जो त्रोजन करील त्याची धडगत राहणार नाही."

याप्रमाणे त्याने आग्रहाने त्यांना आवाहन केले. दरम्यान हेक्तरने त्रोजनांना हाका घालून आपण ॲकिलिझशी लढाई देणार असे उद्घोषित केले. "अभिमानी त्रोजन्सहो, पेलिअसपुत्राला तोंड देण्यास भिऊ नका; लढाई नुसत्या शब्दांचीच असती तर मी खुद्द देवांशीही लढलो असतो, पण आपल्याला जर भाल्यांचा वापर करावा लागला तर ते आपल्याला भारी ठरतील. त्याचप्रमाणे ॲकिलिझच्या कृती त्याच्या शब्दांपेक्षा काहीशा तोकड्या होतील. तो त्याचे काम अंशतः करील व बाकीचा भाग आखडता घेईल. त्याचे हात अग्नीसारखे असले किंवा साक्षात् अग्नी असले व त्याचे बळ लोखंडी असले तरी त्याच्यावर मी चाल करून जाईन."

असे चेतविले गेल्यावर त्रोजनांनी ॲकिअनांविरुद्ध आपले भाले उचलले आणि त्यांच्या श्रेणींच्या मध्यभागी आपल्याला झोकून देताना मोठी रणगर्जना उठवली. पण फीबस ॲपॉलो हेक्तरपाशी येऊन म्हणाला, "हेक्तर, काही झाले तरी तू ॲकिलिझला द्वंद्वयुद्धाचे आव्हान देता कामा नये; त्याच्यावर लक्ष ठेवून तू दुसऱ्यांच्या आडोशाला व लढाईच्या गर्दीपासून दूर रहा; नाहीतर तो तुला भाल्याने तरी दुरून जखमी करील किंवा जवळून वार करून तुला मारून खाली पाडील."

असे तो बोलला आणि हेक्तर पाऊल मागे घेऊन गर्दीत मिसळला, कारण त्याला तो देव जे बोलला होता ते ऐकून भीती वाटली. मग भयानक आरोळी ठोकून, शौर्याने वस्त्राप्रमाणे वेष्टित अशा ॲकिलिझने त्रोजन्सवर झेप घेतली. मोलस पर्वताच्या हिमाच्छादित रांगाच्या खाली असलेल्या हैदे भूमीत एका

जलनिवासी अप्सरेच्यापोटी नगरे उध्वस्त करणाऱ्या ऑत्रितिअसने जन्माला घातलेला पुत्र, बहुत लोकांचा नेता, इफिशन याला प्रथम त्याने मारले. तो आपल्याकडे चालून येत असता ॲकिलिझने थेट त्याच्या डोक्यावर प्रहार करुन त्याची सरळ दोन छकले केली; तेव्हा इफिशन जडपणे भूमीवर पडला व ॲकिलिझने त्याच्यावरुन प्रौढी मिरवली. तो म्हणाला, "बलाढ्य वीर पुरुष ऑत्रितिअस याच्या पुत्रा, तू पार भुईसपाट झाला आहेस या मैदानावर, पण तुझे पूर्वज मात्र नांदले गिलिअन सरोवरावर, मत्स्यसपन्न हिलस व भोवऱ्यांनी परिपूर्ण पाण्याची हर्मस यांच्याजवळ; तेथेच तुझ्या पित्याची मालमत्ता पण आहे."

अशी बढाई त्याने मारली पण त्या पडलेल्या वीराच्या डोळ्यांपुढे काळोखी आली होती. लढाईच्या पुरोभागी जाणाऱ्या ॲकिअनांच्या रथांची चाके त्याच्या देहावरून जाताना त्याच्या देहाचे तुकडे झाले. त्याच्यानंतर ॲकिलिझने शूर योद्धा व ॲन्तेनॉरचा पुत्र देमॉलिऑन याचा प्राण घेतला. गालांच्या संरक्षणार्थ ब्राँझच्या पट्ट्या असलेल्या त्याच्या शिरस्त्राणातून कानशिलावर घाव पडून, शिरस्त्राणाने न अडता भाला आरपार गेला व हाडाचा चुराडा होऊन आतला मेंदू चौफेर विखुरला आणि त्याच्या युद्धलालसेची अखेर झाली. मग त्याच्यासमोर रथावरून खाली उडी मारून निसटण्याच्या प्रयत्नात असलेल्या हिप्पोदॅमाझच्या पोटाच्या वरच्या भागावर त्याने प्रहार केला. हेलिसीच्या राजाला यज्ञार्थ बळी देण्यासाठी तरुण लोक ओढून नेत असलेला बैल जसा डरकाळ्या फोडतो व भूकम्पकारी देवाच्या हृदयी संतोष दाटतो, तसाच मरणोन्मुख पडला असता हिप्पोदॅमाझने डरकाळ्या फोडल्या. मग प्राॲमचा सर्वात धाकटा व सर्वात प्रिय असल्यामुळे पित्याने ज्याला लढण्यास नेहमी प्रतिबंध केला होता, आणि जो सर्वात वेगाने पळणारा होता त्या प्राॲमपुत्र पॉलिदॉरसच्या मागावर ॲकिलिझ निघाला. तो मूर्खासारखा आपल्या चपळगतीने प्रदर्शन करीत पुरोभागीच्या सेनाश्रेणीत इकडून तिकडे जोरात जात होता; अखेर त्याने आपला जीव गमावला; कारण तो त्याच्याजवळून वेगाने जात असता त्याच्या पाठीच्या मध्यावर ॲकिलिझने भाला मारला; तो त्याच्या कमरपट्ट्याच्या सोन्याच्या फाशापाशी नेमका लागून दुहेरी वक्षकवचाचे पत्रे एकावर एक चढले होते त्यातून पार होऊन बेंबीपाशी त्याचे टोक बाहेर आले, तेव्हा तो विव्हळून गुडघ्यांवर पडला व ओंजळीत आपली आतडी सावरीत कोसळत असताच त्याच्यावर अंधाराची दाट छाया पडली.

आपला भाऊ पॉलिदॉरस स्वत:ची आतडी ओंजळीत सावरीत भूमीवर कोसळत असलेला पाहून हेक्तरचे डोळे ओलावले आणि त्याला दूर अंतरावर

थांबणे असह्य झाले. म्हणून त्याने आपला भाला सरसावून अग्निज्वाळेसारखी ॲकिलिझकडे वेगाने चाल केली. जेव्हा ॲकिलिझच्या दृष्टीस तो पडला तेव्हा पुढे उडी घेऊन ॲकिलिझने दर्पोक्ती केली, "ज्याने माझ्या हृदयाला अति-खोल क्षत पाडले व माझा प्रिय सोबती ठार केला तो हाच. युद्धाच्या राजमार्गावर एकमेकांसमोर आम्ही दोघे आता जास्त काळपर्यंत माघार घेत राहणार नाही."

त्याने भीषण नजरेने हेक्तरकडे पाहून म्हटले, "जवळ ये, म्हणजे तितक्याच लौकर तुझ्या अंताशी तुझी गाठ पडेल." हेक्तर त्याच्यापुढे न भिता बोलला, "पेलिअसपुत्रा, मी एकादे मूल असल्यासारखे तुझे शब्द मला भेडसावतील असे समजू नकोस. माझी इच्छा असली तर मीही वढाया मारू शकतो किंवा अप्रशस्त असे बोलू शकतो; मला ठाऊक आहे की तू मोठा वलाढ्य वीर, माझ्यापेक्षा पुष्कळच जास्त समर्थ आहेस; तरीही अखेर परिणाम काय होणार ते स्वर्गस्थ शक्तींच्या इच्छेवर आहे. मी जरी तुझ्यापेक्षा गुणवत्तेत कनिष्ठ असलो तरी तुला माझ्या भाल्याने मारणार की नाही ते देवच ठरवतील, कारण यापूर्वीही या भाल्याची धार किती तीक्ष्ण आहे याचा प्रत्यय मिळालेला आहे."

बोलता बोलता त्याने भाला भिरकावला, पण मिनर्व्हाने त्याच्यावर निश्वास टाकला; व जरी तो निश्वास अगदी मंद होता तरीही त्याने भाला ॲकिलिझच्या दिशेकडून मागे वळवला व तो हेक्तरकडे परतून त्याच्या पायाशी पुढे पडला. तेव्हा ॲकिलिझने एक मोठी आरोळी देऊन हेक्तरला ठार मारण्याच्या निश्चयाने त्याच्यावर उडी घेतली, पण केवळ देवालाच साध्य अशा सहजपणे ॲपॉलोने हेक्तरला उचलून गडद अंधारात लपविले. ॲकिलिझने भाला हाती धरून तीनदा हेक्तरवर झेप घेतली आणि तिन्ही वेळा त्याचे घाव हवेत व्यर्थ गेले. एकाद्या देवासारखा जेव्हा चौथ्या खेपेस तो पुढे धावला तेव्हा मोठ्याने ओरडत म्हणाला, "श्वाना, यावेळीही तू मरणातून बचावला आहेस—पण खरोखर मरण तुझ्या फार जवळ आले होते. युद्धाला जाण्यापूर्वी ज्या फीबस ॲपॉलोची तू प्रार्थना करतोस असे दिसते, त्याने तुला पुन्हा वाचवले आहे; पण मलाही कोणी देवात मित्र असले, तर दुसऱ्या एकाद्या वेळी जेव्हा तुझ्याशी गाठ पडेल तेव्हा मी नक्की तुझा शेवट करीन. तथापि आता मी दुसऱ्या त्रोजन्सचा पाठलाग करून त्यांना गाठतो."

यावर त्याने आपला भाला द्रायॉप्सच्या मानेवर मध्यभागाजवळ मारून त्याला आपल्या पायाजवळ उलटापालटा पाडला. त्याला तेथेच पडू देऊन ॲकिलिझने शूर तसाच महाकाय फिलेतॉरपुत्र दिमूकस याला गुडघ्यावर भाला

मारून रोखले; मग तरवारीचा वार करून त्याचा जीव घेतला. यानंतर विआजपुत्र लॅओगॉनस व दार्दानस यांच्यावर उडी घेऊन त्यांना त्यांच्या रथावरून खाली पाडले, एकाला फेकलेल्या भाल्याच्या घावाने तर दुसऱ्याला हातघाईच्या झुंजीत वार करून. शिवाय ॲलॅस्तारपुत्र त्रॉसही तेथे होता. त्याने ॲकिलिझ-पाशी येऊन दोघेही समवयस्क म्हणून ॲकिलिझ जाऊ देईल, प्राणदान मिळेल व मरण टळेल या आशेने त्याचे गुडघे कवटाळले. मूर्ख कुठला! ॲकिलिझचे मन त्याच्या प्रार्थनेने वळणार नाही हे त्याला कळायला हवे होते, कारण दया दाखवण्याच्या किंवा क्षमा करण्याच्या मनःस्थितीत ॲकिलिझ नव्हता. त्याच्या मनाचा कठोर निर्धार झालेला होता. म्हणून जेव्हा त्रॉसने त्याचे गुडघे पकडून आपली प्रार्थना ऐकण्याची याचना केली, तेव्हा ॲकिलिझने आपले खड्ग त्याच्या यकृतात खुपसले. यकृत घरंगळत बाहेर आले व त्याची छाती जखमेतून उफाळणाऱ्या कृष्ण रक्ताने झाकून गेली. असा तो निष्प्राण पडला असता मृत्यूने त्याचे डोळे मिटवले.

मग ॲकिलिझने म्युलिअसपाशी जाऊन त्याच्या कानावर भाला मारला, व भाल्याचे ब्राँझचे टोक थेट दुसऱ्या कानातून बाहेर निघाले. शिवाय ॲगेनॉरपुत्र एकेक्लस याच्या डोक्यावर त्याने खड्ग प्रहार केला व ते खड्ग त्याच्या रक्ताने तप्त होऊन एकेक्लसचे डोळे मृत्यूने व निष्ठुर दैवाने मिटवले. क्रमाने त्यानंतर त्याच्या भाल्याच्या ब्राँझ अग्राने द्युकॅलियनच्या बाहूच्या पुढच्या भागाला——कोपरापाशी स्नायू एकत्र येतात तेथे——जखम झाली; तेव्हा लोंबत्या बाहूने व मृत्यूची नजर चेहऱ्यावर रोखलेली असताना तो ॲकिलिझच्या हल्ल्याची वाट पहात राहिला. ॲकिलिझने तलवारीच्या एका वाराने त्याचे शीर धडा-वेगळे केले व ते शिरस्त्राणासकट आपल्यापासून दूर फेकले; आणि द्युकॅलिअनचे धड जमिनीवर पडलेले असता त्याच्या पाठीच्या कण्यातून अस्थिसार (marrow) हळूहळू स्त्रवू लागले. ॲकिलिझ मग सुपीक थ्रेसमधून आलेला पैरेझचा उमदा पुत्र ऱ्हिग्मस याच्या पाठीमागे लागला, आणि त्याला मारलेला भाला देहाच्या मध्यभागातून जाऊन पोटात रुतल्याने तो उलटा होऊन रथावरून खाली पडला. ॲकिलिझने आणखी ऱ्हिग्मसचा शिलेदार ॲरेइथौस यालाही, तो पळून जाण्यासाठी घोडे वळवीत असता पाठीत भाला मारला व रथावरून खाली ढकलले तेव्हा घोड्यांची भीतीने तिरपीट उडाली.

ज्याप्रमाणे दीर्घ अवर्षणानंतर एखाद्या पर्वताच्या दरीत आग भडकते व दाट अरण्य पेटून वारा ज्वाळांच्या मोठाल्या जिभल्या प्रत्येक दिशेला पसरवतो——अगदी तशाच त्वेषाने धुमाकुळ घालीत ॲकिलिझने जणू प्रत्यक्ष दैव

असल्यासारखा आपला भाला चालवला आणि ज्यांना मारायचे होते त्यांचा पाठलाग केला--शवटी त्या हत्याकांडात श्यामल पृथ्वीवरून रक्त वाहू लागले. किंवा खळ्यावर तुडवून जवांची मळणी करण्यासाठी रुंद कपाळांचे बैल जोखडाला जुंपणारा जसा त्या हंबरणाऱ्या गुरांच्या पायाखालचे धान्य बारीक तुडवून मळून काढतो त्याचप्रकार ॲकिलिझच्या अश्वांनी ढाली व मेलेल्यांची प्रेते तुडवून, घोड्यांच्या टापांनी व चाकांच्या धावांनी चुरडली. उडवलेल्या रक्ताच्या गुळच्यांनी रथाखालचा आस व रथाभोवतालचा कट्टा शिडकावला गेला होता; पण पेलिअसपुत्र आणखी यशश्री जिंकून घेण्यासाठी नेटाने पुढे जातच होता आणि त्याचे हात रक्ताने माखून निघाले होते.



## सर्ग २१

आता जेव्हा ते, अमर जव्हने जन्म दिलेल्या तुडुंब भरून वाहणाऱ्या झॅन्थस नदीच्या घाटापाशी आले, तेव्हा ॲकिलिझने त्यांच्या सेनेचे दोन भाग एकमेकांपासून तोडले. आदल्या दिवशी पूर्ण विजयोत्साहातील हेक्तरपुढे भयभीत होऊन पळणारे ॲकिअन्स ज्या मार्गाने आले होते, त्याच मैदानावरून नगरीकडे जाणाऱ्या मार्गाने अर्ध्या त्रोजनसेनेचा ॲकिलिझने पाठलाग केला ; ते त्या मार्गाने सैरावैरा पळत असता त्याना अडवण्यास त्यांच्यापुढे जूनोने एक दाट धुके पसरले. सेनेच्या दुसऱ्या अर्धाची त्या खोल रूपेरी भोवरे असलेल्या प्रवाहापाशी कोंडी झाली, व ते लोक मोठा आरडाओरडा करीत पाण्यात पडले. फिरणाऱ्या भोवऱ्यात मोठ्याने ओरडत ते इतस्तत: पोहत असता पाण्यावर प्रतिध्वनी उठले व नदीतीर पुनःपुन्हा दुमदुमले. कुरणात पेटवलेल्या आगीपुढून दूरदूर उडत टोळ जसे नदीपाशी येतात—जाळ पुढे पुढे येत अखेर त्यांना गाठतो व ते दाटीवाटीने पाण्यात घुसतात—अगदी तसाच झॅन्थसचा भोवरे असलेला प्रवाह ॲकिलिझपुढे पळणाऱ्या व गोंधळून धडपडणाऱ्या माणसांच्या व घोड्यांच्या कल्लोळाने भरून गेला.

तात्काल त्या वीराने आपला भाला काठावरच्या एका सदाहरित झुडपाला टेकून ठेवला व एखाद्या देवासारखा हातात केवळ खड्ग घेऊन त्याने नदीत उडी घेतली. भीषण हेतू मनात धरून प्रत्येक बाजूस त्रोजनांची तो लांडगेतोड करीत होता. तलवारीचे वार अंगावर बसत असता मरणाऱ्यांचे विव्हळण्याचे भेसूर आवाज उठले आणि नदीचा वाहता प्रवाह रक्ताने लाल झाला. एखाद्या प्रचंड डॉल्फिन (गादा) नामक जलाचरापुढे घाबरलेले मासे पळत पळत एखाद्या चांगल्याशा आश्रयस्थानाचा सांदीकोपराही जसा व्यापून टाकतात—कारण तो प्राणी पकडता येतील ते सगळे मासे नक्कीच खाणार असतो—अगदी तसेच त्या प्रचंड नदीच्या तटाखाली त्रोजन्स दबून लपले, आणि जेव्हा त्याना मारून मारून ॲकिलिझचे बाहू थकले, तेव्हा त्याने मेनिशिअसपुत्र पॅत्रोक्लसच्या मरणाचा सूड उगविण्यासाठी बळी देण्यास बारा तरुण जिवंत ओढून पाण्याबाहेर काढले. गोंधळलेल्या हरिणशावकांसारखे त्यांना बाहेर ओढून काढून त्याने त्यांचे हात त्यांच्यामागे त्यांच्याच अंगरख्यांच्या कमरपट्ट्यांनी बांधले आणि त्याना परत

नौकांकडे घेऊन जाण्यासाठी आपल्या लोकांच्या स्वाधीन केले. मग आणखी रक्त सांडण्याच्या पिपासेने त्याने नदीत उडी घेतली.

तेथे त्याला दार्दानसच्या बीजाचा प्रॲमपुत्र लायकॲऑन पाण्यातून बाहेर निसटताना सापडला ; पूर्वी एकदा रथाच्या बाजूचे भाग विणण्यासाठी आपल्या बापाच्या द्राक्षमळचात जंगली अंजिराच्या झाडाचे कोवळे धुमारे लायकॲऑन तोडीत असता त्याच्यावर रात्री छापा घालून ॲकिलिझने त्याला बंदीवान केले होते. त्यावेळी बेसावध असता पकडला गेल्याने कष्टी झालेल्या लायकॲऑनला ॲकिलिझने समुद्रमार्गे लेम्नॉसला धाडले असता जेसनपुत्राने त्याला विकत घेतले होते. पण इम्ब्रॉसच्या एईशन नावाच्या पाहुणा आलेल्या मित्राने मोठी रक्कम भरून सोडवून त्याला ॲरिस्बीला पाठवले होते, व तेथून निसटून तो पितृगृही परतला होता. लेम्नॉसहून आल्यानंतर मित्रांच्या सहवासात त्याने अकरा दिवस सुखात काढले होते, पण बाराव्या दिवशी स्वर्गस्थ शक्तींनी त्याला पुन्हा ॲकिलिझच्या स्वाधीन केले व आता ॲकिलिझ त्याला त्याच्या अगदी इच्छे-विरुद्ध हेदिझच्या घरी पाठवणार होता. तो ॲकिलिझला दिसला तेव्हा तो निःशस्त्र होता, शिरस्त्राण, ढाल किंवा भालादेखील त्याच्यापाशी नव्हता, कारण त्याने आपला सारा शस्त्रसंभार काढून काठावर फेकून दिला होता, आणि नदीतून बाहेर येण्याच्या धडपडीने तो घामाघूम झाला होता, व त्यामुळे त्याची शक्ती आता काम देत नव्हती.

तेव्हा ॲकिलिझ आश्चर्याने स्वगत बोलला, "हे काय आश्चर्य पाहतो आहे मी येथे ? जर हा मनुष्य लेम्नॉसमध्ये विकल्या गेल्यानंतरही जिवंत परत येऊ शकतो, तर मग मी ठार केलेले त्रोजन्सही अधोलोकातून उठून कदाचित् माझ्यापुढे येतील ! त्यांची इच्छा असो वा नसो, पुष्कळांना धूसर सागराचा जलनिधी बंदीवान करतो ; पण तोही याला कसा बंदीवान करू शकला नाही ? यावेळी माझ्या भाल्याची चुणूक त्याला चाखू दे, म्हणजे मला निश्चित कळेल की वळकट माणसालाही खाली बंद करून ठेवणारी भूमाता त्याला अडवून ठेवू शकते, की तिच्याखालूनही तो परत येतो."

असा त्याने थांबून विचार केला. पण भयचकित झालेला लायकॲऑन त्याच्यापाशी येऊन त्याचे गुडघे कवटाळण्याचा कसून प्रयत्न करू लागला. कारण त्याला मरण नको होते व जगायची फार इच्छा होती. ॲकिलिझने त्याला मारण्यासाठी त्याच्याकडे नेम धरून भाला सरसावला, पण लायकॲऑन खाली वाकून दबकत त्याच्याकडे धावला व भाला त्याच्या पाठीवरून जाऊन, तो जरी रक्तासाठी भुकेला होता, तरी भूमीतच रुतला. एका हाताने ॲकिलिझचे

गुडघे धरून विनवणी करीत असता दुसऱ्या हाताने तो भाला लायकॲऑनने घट्ट धरला व त्याच्यावरची पकड न सोडता तो म्हणाला, " ॲकिलिझ, माझ्यावर दया कर व मला सोडून दे, कारण मी तुझ्यापुढे याचक म्हणून उभा आहे. मला द्राक्षमळ्यात तू धरून बंदी केलेस, त्या दिवशी मी पहिल्याने भाकरी खाल्ली ती तुझ्याच तंबूत; त्यानंतर तू मला माझ्या बापापासून व मित्रांपासून दूर लेम्नॉसला विकलेस, आणि माझ्याबद्दल तुला शंभर बैलांची कमाई झाली. माझे स्वातंत्र्य मिळवायला त्याच्या तिप्पट किमत मी मोजली आहे; पुष्कळ हाल भोगल्यानंतर इलिअमला आल्याला मला केवळ बाराच दिवस झाले आहेत, आणि आता दुष्ट दैवाने मला तुझ्या हातात फेकले आहे. निश्चितच तात जव्ह माझा द्वेष करीत असावा--ज्याअर्थी दुसऱ्या खेपेस त्याने मला तुझ्या स्वाधीन केले आहे. खरोखर मला माझ्या लॅओथोई नामक मातेने अल्पजीवीच जन्माला घातले असावे. ती वृद्ध ॲल्तीझची कन्या, जो लढाऊ वृत्तीच्या लेलेजींवर राज्य करतो व सॅत्नीओइस नदीवर उभ्या चढणीच्या टेकडीवर वसलेल्या पेडॅसस नगरीचा स्वामी आहे, त्याची. त्याच्या मुलीशी इतर कित्येक स्त्रियांबरोबर प्राॲमने लग्न केले व तिला त्याच्यापासून दोन मुलगे झाले, जे दोघे तुझ्या हाताने मारले जाणार आहेत. पुरोभागीच्या श्रेणीत लढत असलेल्या थोर पॉलिदोरसला तुझ्या भाल्याने ठार केले आणि आता येथे माझा नाश होणार आहे कारण ज्याअर्थी स्वर्गस्थ शक्तींनी मला तुझ्या स्वाधीन केले आहे त्याअर्थी मी तुझ्या हातून निसटणे शक्य नाही, अशी भीती मला वाटते. तरीपण पुढे मी असेही म्हणतो व माझे शब्द नीट मनावर घे, की मला जिवंत सोड; कारण तुझ्या शूर व उदात्त सोबत्याला मारणाऱ्या हेक्तरच्या आईच्या-पोटी मी जन्म घेतलेला नाही."

अशा शब्दांनी प्राॲमच्या त्या राजबिंड्या पुत्राने ॲकिलिझची आळवणी केली. पण ॲकिलिझने त्याला कठोरपणे उत्तर दिले, " मूढा, खंडणी घेऊन तुला सोडून देण्याची गोष्ट माझ्यापुढे काढू नको. पॅत्रोक्लस पडेपर्यंत त्रोजनाना दया दाखवणे मी अधिक पसंत करीत असे आणि जिवंतपणी पकडलेले पुष्कळ जण मी समुद्रपार विकले, पण आता इलिअम नगरीपुढे, स्वर्गस्थ देव माझ्या स्वाधीन करणार असलेल्यापैकी एकही माणूस जिवंत राहणार नाही---आणि समस्त त्रोजनात सर्वात खडतर भोग वाट्याला येईल तो प्राॲमपुत्रांच्या; म्हणून माझ्या मित्रा, तूही आता मरणारच. तू अशी गळा काढून कुरकुर का करावीस? पॅत्रोक्लससुद्धा पडला व तो तुझ्यापेक्षा श्रेष्ठ माणूस होता. मीही---तुला दिसत नाही का मी किती थोर व सज्जन आहे? मी उच्चकुलीन पित्याचा पुत्र आहे

व एक देवी माझी माता आहे ; पण दुर्गतीहस्त व मृत्यू यांची छाया माझ्यावर तुझ्याइतक्याच निश्चितपणे आहे. अखेर तो दिवस येईल,––उजाडताना किंवा मावळताना, किंवा मध्यान्ही, की जेव्हा कोणी एकादा आपल्या भाल्याने किंवा धनुष्यातून सोडलेल्या बाणाने लढाईत माझाही प्राण घेईल."

असे तो बोलला आणि लायकॅऑनचे हृदय अंतर्यामी खचले. त्याने भाल्यावरची पकड सोडली, आणि आपले दोन्ही हात विनवणी करीत पुढे पसरले, पण ॲकिलिझने आपले धारदार पाते उपसले व त्याच्या मानेवर खांद्याच्या हाडाच्या जागी घाव घातला; आपली दुधारी तलवार त्याने त्या देहात मुठीपर्यंत खुपसली, तेव्हा लायकॅऑन भूमीवर हातपाय पसरून पडला व त्याच्या देहातून उफाळणाऱ्या रक्ताने भूमी भिजून चिंब झाली. मग ॲकिलिझने त्याचे पाय धरून त्याला नदीत प्रवाहात दूरवर वाहून जावा म्हणून फेकून दिले आणि त्यावेळी त्याच्यावर प्रौढी मिरविली, तो म्हणाला, "पड तेथे माशांच्यामध्ये ; ते तुझ्या जखमेतले रक्त आकंठ चाटून मिटक्या मारतील ; तुझ्याभोवती शोक करण्यासाठी तुझी आई तुला शववाहिकेवर ठेवणार नाही, तर स्कमॅन्दरचे भोवरे तुला वाहून नेत समुद्राच्या विशाल हृदयात घेऊन जातील. तेथे पाण्याच्या काळ्या तरंगांखाली मासे लायकॅऑनच्या वसेवर ताव मारतील–– आम्ही बळकट इलिअमच्या बालेकिल्ल्याला पोहोचेपर्यंत असेच मरा तुम्ही सगळे––तुम्ही पुढे पळा व मी मागून पाठलाग करीत येत तुमचा नाश करीन. रुंद रूपेरी प्रवाहाचा हा नद तुमच्या काही कामी येणार नाही––मग तुम्ही त्याला कितीही बैल बळी दिलेले असोत व कितीही घोडे त्याच्या पाण्यात जिवंत फेकले असोत ! ते काहीही असले तरी मी युद्धापासून दूर राहिलेला असताना ॲकिअन्समध्ये तुम्ही उडविलेला कहर व पॅत्रोक्लसचा मृत्यू यांचे पुरे मोल तुमच्यातला प्रत्येक माणूस देईपर्यंत तुमच्या सर्वांच्या वाटेला दुर्धर नाश आहे."

ॲकिलिझ असे बोलला पण तो नद अधिकाधिकच कुपित होऊ लागला आणि ॲकिलिझच्या हाताला आवर घालून त्रोजन्सना दुर्घटनेतून कसे वाचवावे याचा मनात विचार करू लागला. दरम्यान पेलिअसपुत्राने भाला हाती घेऊन पेलेगॉनपुत्र ॲस्तेरोपिअस याला ठार मारण्यासाठी त्याच्यावर झडप घातली. विशाल नद ॲक्सिअस व ॲसेसॅमेनसची सर्वात थोरली मुलगी पेरिबिआ यांचा तो पुत्र ; कारण नदाने तिच्याशी समागम केला होता. ॲकिलिझला तोंड देण्यास ॲस्तेरोपिअस दोन्ही हातात भाले घेऊन नदीतून उठून उभा राहिला व झॅन्थस नदाने त्याला विपुल धैर्य दिले : कारण ॲकिलिझ निघृणपणे आपल्या पाण्यात मारीत असलेल्या तरुणांच्या मृत्यूमुळे तो नद रागावला होता. ते

दोघे एकमेकांजवळ आले तेव्हा प्रथम ॲकिलिझ बोलला, "मला तोंड देण्याचे धाडस करणारा तू कोण व कुठून आलास? ज्यांचा पुत्र माझ्याविरुद्ध उभा राहतो त्याचे आईबाप हतभागीच ठरणार!" आणि पेलेगॉनपुत्राने उत्तर दिले, "थोर पेलिअसपुत्रा, तू माझ्या वंशाची चौकशी कशाला करतोस? दूर असलेल्या पिओनिआच्या सुपीक भूमीतला मी आहे, पिओनिअनांचा नायक, आणि इलिअममध्ये आल्याला मला अकरा दिवस झाले आहेत. मी ॲक्सिअस नदाच्या रक्ताचा आहे—वाहणाऱ्या नदात जो नद सर्वांत देखणा आहे त्याचा मी वंशज. त्याच्या वीर्यापासून विख्यात योद्धा पेलेगॉन जन्मला. त्याचा मुलगा म्हणून लोक मला ओळखतात. आता आपण लढू या ॲकिलिझ."

याप्रमाणे त्याने ॲकिलिझपुढे दर्पोक्ति केली, आणि ॲकिलिझने आपला पेलिअन ॲशकाष्ठाचा भाला उंचावला. दोन्ही हातांचा सारखाच उपयोग करू शकणाऱ्या ॲस्तेरोपिअसचे दोन्ही भाले फुकट गेले; एका भाल्याने त्याने ॲकिलिझच्या ढालीवर घाव घातला, पण देवाची देणगी असलेल्या ढालीतल्या सोन्याच्या थराने त्याचे टोक रोखले; दुसऱ्या भाल्याने ॲकिलिझच्या उजव्या कोपराला खरचटल्यासारखी जखम करून काळे रक्त काढले, पण त्या भाल्याची रक्ताची मेजवानी हुकली व तो बाजूने जाऊन भूमीत रुतला. मग प्रतिपक्ष्याला मारण्याच्या तीव्र इच्छेने ॲस्तेरॉपिअसकडे ॲकिलिझने भाला फेकला, पण तो त्याला न लागता नदीच्या उभ्या काठाला लागून त्यात अर्ध्यापर्यंत घुसून रुतून बसला, नंतर पेलिअसपुत्राने खड्ग उपसून त्वेषाने त्याच्यावर उडी घेतली. नदीकाठात रुतलेला ॲकिलिझचा भाला खूप जोराने उपटून काढण्याचा ॲस्तेरॉपिअसचा यत्न व्यर्थ झाला; तीनदा त्याने साऱ्या बळानिशी तो ओढून काढण्याची पराकाष्ठा केली आणि तिन्ही वेळा त्याला प्रयत्न सोडून द्यावा लागला; चौथ्या खेपेला भाला वाकवून मोडण्याची खटपट त्याने केली, पण तो ते करण्याच्या आधीच ॲकिलिझने तलवारीचा वार करून त्याला ठार केले. त्याने त्याच्या पोटात बेंबीपाशी घाव घातल्यामुळे त्याची सारी आतडी उसळत बाहेर येऊन भूमीवर येऊन पडली, आणि तो धापा टाकीत पडला असता मरणाची कृष्णछाया त्याच्यावर पसरली. मग ॲकिलिझने त्याच्या छातीवर पाय देऊन त्याचे चिलखत काढून घेताना दर्पोक्ती उच्चारली, "पड तेथेच, जरी तू नदाच्या वीर्यापासून जन्मला असलास तरी सॅटर्नपुत्राच्या मुलाशी झगडणे तुला कठीण आहे. विशाल नदाच्या रक्तापासून आपण उपजल्याचे तू घोषित करतोस, पण मी बलाढ्य जव्हच्या बीजाचा आहे. अनेक मिर्मिदॉन्सवर राज्य करणाऱ्या ईकसचा पुत्र पेलिअस माझा पिता, आणि ईकस होता जव्हचा पुत्र. म्हणून

जसा सागराला मिळणाऱ्या कोणत्याही नदापेक्षा जव्ह जास्त बलाढ्य आहे, तसेच कुठल्याही नदाच्या संतानांपेक्षा जव्हची मुले अधिक बलशाली आहेत. शिवाय तुझ्या काही उपयोगी पडण्याजोगा असेल तर एक महान नद जवळच आहे, पण सॅटर्नपुत्र जव्हविरुद्ध लढणे त्यालाही अशक्यच आहे. त्याच्याशी ॲकेलस या नदांच्या राजाची, किंवा ज्याच्यापासून सर्व नद्या, समुद्र, झरे व खोल विहीरी निघतात त्या खोलातून वाहणाऱ्या ओशिॲनसच्या प्रचंड प्रवाहाची देखील तुलना होऊ शकणार नाही. प्रत्यक्ष ओशिॲनसला देखील थोर जव्हच्या विद्युत्पातांची व स्वर्गातून धडधडत येणाऱ्या त्याच्या मेघगर्जनेची भीती वाटते."

असे बोलून त्याने नदीकाठातून आपला ब्राँझचा भाला उपसून काढला, आणि आता ॲस्तेरॉपिअसला मारल्यानंतर त्याला तो वाळूवर पडला होता तेथेच, त्याच्यावरून काळे पाणी वाहात असता आणि ईल व इतर जातींचे मासे त्याच्या मूत्रपिंडाभोवतीची वसा कुरतडीत व चघळीत असता पडून राहू दिले. मग पेलिअसपुत्राच्या हातून आपला नेता मारला गेल्याचे पाहून धावरून नदी-काठाने पळत सुटलेल्या पिओनिअनांचा पाठलाग करीत तो गेला. त्यांच्यापैकी त्याने थर्सिलॉकस, मायदॉन, ॲस्तिपिलस, नेसस, थ्रसिअस, ईनिअस व ऑफेले-स्तिझ यांना मारले ; आणि आणखीही दुसरे त्याने मारले असते, पण नदाने संतप्त होऊन मानवी रूप घेऊन खोल पाण्यातून त्याला म्हटले, "ॲकिलिझ, बळात जर तू सर्वांपेक्षा वरचढ असलास तर दुष्टपणातही तसाच आहेस ; कारण तुझे रक्षण करण्यास देव सदा तुझ्यावरोबर असतात ; मग जर सॅटर्न-पुत्राने सर्व त्रोजनांचा नाश करण्याचे काम तुला प्रदान केले असेल, तर निदान माझ्या प्रवाहातून त्यांना बाहेर हाकलून काढ व तुझे भीषण काम भूमीवर कर. माझा प्रसन्न जलप्रवाह आता प्रेतांनी भरून गेला आहे ; व माझे पाणी समुद्रात ओतण्यास मला कुठे खुले पाटही सापडत नाहीत, कारण मृत देहांनी मी तुंबून गेलो आहे, आणि तरीही तू निर्दयपणे हत्या करणे चालूच ठेवले आहेस. मी आता हताश झालो आहे, तेव्हा हे सेनानायका, मला आता आणखी जास्त उपद्रव देऊ नकोस."

ॲकिलिझने उत्तर दिले, "बरे तसेच होवो, जव्हवंशजा स्कॅमॅन्दर ; पण त्रोजन्समध्ये मरणाचे वाटप करायचा मी कधीही थांबणार नाही ; मी त्यांना त्यांच्या नगरीत कोंडून, हेक्तरशी समोरासमोर बरोबरीचा सामना करून, तो मला पराभूत करणार की मी त्याला, हे समजून घेईपर्यंत मी संहार बंद करणार नाही."

असे बोलत असता देवांसमान त्वेषाने तो त्रोजनांवर तुटून पडला. पण नद अॅपॉलोला म्हणाला, "जव्हपुत्रा, रौप्यधनुप्रभो, संधिप्रकाश लुप्त होऊन साऱ्या पृथ्वीवर अंधःकार पसरेपर्यंत त्रोजनांच्या बाजूला उभा राहून त्यांचे रक्षण करण्याबद्दलच्या जव्हच्या खरमरीत आज्ञा तू खचितच पाळीत नाहीस."

दरम्यान अॅकिलिझने काठावरून प्रवाहाच्या मध्यावर उडी घेतली, त्यावर नदाने एक उंच लाट उभारून त्याच्यावर हल्ला केला. त्याने आपला प्रवाह फुगवून जोराचा पूर निर्माण केला व अॅकिलिझने मारून त्याच्या पाण्यात टाकलेले अनेक मृत देह लोटून दिले; ते त्याने भूमीवर टाकले व ते करताना तो बैलासारखा डरकाळ्या फोडीत होता ; पण जे जिवंत होते त्यांना त्याने आपल्या प्रचंड भोवऱ्यात लपवून वाचवले. ती प्रचंड व भयंकर लाट अॅकिलिझभोवती गोळा झाली, त्याच्यावर कोसळून त्याच्या ढालीवर तिने आघात केला. त्यामुळे त्याचे पाय एका जागी ठरेनात ; त्याने एक मोठा एल्मवृक्ष आधारासाठी पकडला, पण तो मुळासकट उपटला गेला व त्याने नदीकाठ फोडून काढला. त्याच्या जाड फांद्यांचा प्रवाहाला बांध पडून दोन्ही तीरांना जोडणारा सेतु तयार झाला, त्याच्या साह्याने धडपडत बाहेर येऊन अॅकिलिझ मैदानावरून जोरात पळाला, कारण तो भिऊन गेला होता.

पण त्याचा पाठलाग त्या बलाढ्य नददेवाने थांबवला नाही व काळ्या माथ्याच्या लाटेने, त्याच्यावर, त्याचा हात आवरुन ठेवण्यासाठी व त्रोजनांना नाशापासून बचावण्यासाठी त्याने झडप घातली. पेलिअसपुत्र तीरासारखा त्या लाटेपासून भालाफेकीच्या टप्प्याइतका दूर पळाला ; सर्व पक्ष्यांत बलवान व वेगवान अशा काळ्या शिकारी गरुडासारखी त्याने पुढे वेगाने झेप घेतली, आणि त्याच्या छातीभोवती त्याचे चिलखत खणखणले. तो पुढे पळत राहिला, पण एक मोठी गर्जना करीत नद त्याच्यामागे दात ओठ चावून धावला. ज्याप्रमाणे आपल्या बागेला पाणी देण्यासाठी कोणी मनुष्य एखाद्या झऱ्याचा प्रवाह आपल्या रोपट्यांवर व साऱ्या भूमीवर वळवून आणतो—हातातल्या फावड्याने बांध बाजूला करून तो पाट मोकळे करतो आणि पाण्याबरोबर बारीक दगडधोंडे गरगरत फिरत जात असता पाणी मजेत उताराला इतक्या त्वरेने जाते की त्याच्यामागे धावणारा माणूस मागेच राहतो—अगदी तसाच तो नद, अॅकिलिझ जरी जलद पळणारा होता तरी त्याच्या जास्त जास्त जवळच येत राहिला, कारण देव माणसांपेक्षा बलवान असतात. जितक्यावेळा अॅकिलिझ आपली जागा ठाम धरून राहण्याचा प्रयत्न करी व सारे स्वर्गस्थ देव आपल्याविरुद्ध एकवटले आहेत की काय याचा अंदाज घेई, तितक्या वेळा ती प्रचंड लाट त्याच्या

खाद्यांना धडका देत धावून येई, आणि त्याला मोठ्या अगतिकतेने पुढे पुढे पळत राहावेच लागे, कारण त्याच्याबाजूने वाहत राहून त्याच्या पायाखालची भूमी गिळंकृत करणारा तो संतप्त पूर त्याला दमवून टाकीत होता.

मग पेलिअसपुत्राने स्वर्गस्थ देवाना उद्देशून बोलण्यासाठी आपला आवाज उचावला, तो म्हणाला, "तात जव्ह, माझी दया येऊन मला या नदापासून बचावणारा देवांपैकी कोणीच नाही का ? यानंतर माझी गत काय होईल याची मी फिकीर करीत नाही. ज्या माझ्या प्रिय मातेने मला भुलवून फसवले तिला मी जितक्या तीव्रतेने दोष देतो तितका इतर ऑलिम्पसनिवासीयातल्या कोणालाही देत नाही. तिने मला सांगितले होते की मी ट्रॉयच्या तटापुढे अपॉलोच्या धनुष्यातून उडालेल्या उडत्या बाणांनी पडणार आहे. ट्रोजनांमधला सर्वश्रेष्ठ पुरुष जो हेक्तर त्याने तेथे मला मारलेले पुरवले, मग मी वीराच्या हातून मारला गेलेला वीर तरी ठरेन ; पण आता पहावे तो असे दिसत आहे की वादळात वेगवान प्रवाह ओलांडण्याच्या प्रयत्नात वाहून जाणाऱ्या एकाद्या डुकरहांक्याच्या पोरासारखा या नदाच्या कोंडीत सापडून माझा मोठा केविलवाणा शेवट होणार आहे !"

याप्रमाणे तो बोलल्यावर नेपच्यून व मिनर्व्हा दोन मानवांच्या रूपांनी त्याच्यापाशी आले आणि त्याला धीर देण्यासाठी त्यांनी त्याचा हात धरला. प्रथम नेपच्यून बोलला, "पेलिअसपुत्रा, इतका अगदी भयभीत होऊन जाऊ नकोस ; आम्ही दोघे देव आहोत,—मी व पॅलास मिनर्व्हा,—जव्हच्या सम्मतीने तुझ्या साह्यास आलो आहोत. या नदात मरण हे तुझ्या नशिबात लिहिलेले नाही. नदाचा पूर लौकरच उतरेल हे तुला दिसेल ; शिवाय तू जर आमचे मार्गदर्शन मानणार असशील, तर आम्ही तुला आग्रहाचा सल्ला देतो की ट्रोजन्स सैन्यातले जितके लोक आता निसटतील तितक्यांना इलिअमच्या विख्यात तटांआड कोंडीपर्यंत तुझा लढणारा हात तू आवरु नकोस. मग हेक्तरचा वध कर व नौकांकड परत जा, कारण आम्ही कृपाळू होऊन त्याच्यावर तुला विजय मिळवून देणार आहोत."

असे बोलल्यानंतर ती दोघे परत इतर अमरांकडे गेली, पण ॲकिलिझ, देवांनी त्याच्यावर सोपवलेल्या कामगिरीमुळे उत्तेजित होऊन, मैदानावरून नेटाने पुढे जाऊ लागला. पुराच्या पाण्याने सगळा भूभाग आता झाकलेला होता, आणि ठार झालेल्या तरुणांचा बराचसा उत्तम शस्त्रसंभार, त्याचप्रमाणे प्रेतेही इतस्ततः तरंगत जात होती. पण त्याने प्रवाहाविरुद्ध खंबीरपणे पुढचा मार्ग काढून वेगाने पुढे चाल केली व विशाल प्रवाह त्याला अडवू शकला नाही,

कारण मिनर्व्हाने अॅकिलिझला खूप शक्तिसंपन्न केले होते. तरीही स्कमँन्दरने त्याच्या पाठलागात ढिलाई येऊ दिली नाही कारण तो नद पेलिअसपुत्रावर आता अधिकच क्रुद्ध झाला होता. आपले पाणी उंच टोकावर चढवून तो सिमॉइसला उद्देशून ओरडला, "प्रिय बंधो, या माणसाला अडवण्यासाठी आपण दोघे एकत्र येऊ या, नाहीतर तो प्राअॅम राजाची बलिष्ट नगरी लुटील व ट्रोजन्स त्याच्यापुढे टिकाव धरू शकणार नाहीत. मला तात्काल साह्य कर ; उगमापासून आणलेल्या पाण्याने तुझी पात्रे भरून घे, तुझ्या प्रवाहांना वेगाने खवळून उठव, तुझी लाट उंच उचल, आणि तुझ्या पात्रातून अडथळे व दगड धडधडत वाहत येऊ देत, म्हणजे जणू एकादा देवच असल्यासारखा दिमाख दाखवीत असलेल्या या रानटी प्राण्याचा आपल्याला शेवट करता येईल. यापुढे त्याला कशाचाही उपयोग होणार नाही, ना शक्तीचा, ना रूपाचा, ना त्याच्या उत्तम कवचाचा ; ते निश्चितपणे लौकरच खोल पाण्यात चिखलाने झाकून खितपत पडणार आहे. मी त्याला वाळूत गुंडाळीन व त्याच्याभोवती खंडीच्याखंडी खडे ओतीन म्हणजे मी गाळात लपवणार असलेल्या त्याच्या अस्थी कशा वेचून गोळा करायच्या हे अॅकिअन्सना कळणार नाही, आणि त्याची उत्तरक्रिया ते करतील तेव्हा मातीचा ढिगाराही त्याना रचावा लागणार नाही."

असे म्हणून त्याने आपला फेस व रक्त व मृतदेह यांनी खदखदणारा आपला कल्लोळकारी पूर अॅकिलिझविरुद्ध उंच चढवला. नदाचे काळे पाणी सरळ ताठ उभे राहिले आणि त्याने पेलिअसपुत्राला ग्रासूनच टाकले असते, पण त्या प्रबळ प्रवाहात अॅकिलिझ वाहून जाईल या धास्तीने थरथर कापणाऱ्या ज्यूनोने आपला आवाज उंच चढवून तिचा पुत्र व्हल्कन याला हाक दिली, "वक्रपदा, माझ्या मुला, ऊठ व कामाला लाग, कारण मला वाटते की झॅन्थसला लढण्याची हौस आहे ती तुझ्याशी ; आम्हाला त्वरित साह्य कर, एक भयानक आग पेटव ; मग मी सागरावरून पश्चिम वायु व शुभ्र दक्षिण वायु यांना प्रचंड वादळाने आणीन ; ते वारे आगीच्या ज्वाळा ट्रोजनांच्या डोक्यावर व शस्त्रास्त्रांवर नेऊन त्याना भस्मसात करतील ; दरम्यान तू झॅन्थसच्या काठांनी जाऊन त्याची झाडे जाळून त्याला ज्वाळात गुंडाळून टाक. गोड शब्दांनी किंवा शिव्यागाळींनी त्याला तुला परत फिरवू देऊ नको, व मी ओरडून सांगेपर्यंत आपला जोर कमी करू नको ; मी सांगितल्यानंतर तुला आपल्या ज्वाळा आवरता येतील."

हे ऐकून व्हल्कनने एक भीषण आग पेटवली ; प्रथम ती मैदानावर पेटली आणि तिच्यात अॅकिलिझने मारलेल्यांची मोठ्या संख्येने इतस्ततः पडलेली प्रेते

जळून गेली ; त्यामुळे मैदान कोरडे होऊन पुराला अटकाव झाला. हेमंत ऋतुतल्या पावसाने भिजून चिंब झालेल्या फळबागेवर उत्तरवायू वाहून तिला जशी लौकरच सुकवतो व मग धन्याचे हृदय प्रमुदित होते—अगदी तशीच ती सबंध सपाटी सुकली व प्रेते जळून गेली. मग व्हल्कनने आगीच्या जिभा नदाकडे वळवल्या. त्याने एल्म, विलो व सदाहरित झाडेझुडपे, तसेच कमळवेलही जाळले ; त्याचप्रमाणे लव्हाळे व नदीकाठी विपुलपणे उगवलेल्या दलदलीतल्या वनस्पतीही भस्मसात केल्या. पाण्यात सर्वत्र तीरांसारखे संचार करणारे ईल व इतर मासेही चाणाक्ष व्हल्कनने पेटवलेल्या आगीने अत्यंत त्रस्त झाले, आणि स्वतः नदही होरपळला. त्यामुळे तो म्हणाला, "व्हल्कन, तुझ्याविरुद्ध कोणत्याही देवाचे चालणार नाही ; तू अशाप्रकारे तुझ्या ज्वाळा भडकवल्यास म्हणजे मला तुझ्याशी लढता येत नाही ; माझ्याशी अधिक संघर्ष आता करू नकोस. ॲकिलिझला त्रोजन्सना त्यांच्या नगरीबाहेर तात्काल हाकलून काढू दे. भांडून व लोकांना साह्य करून मला काय कारायचे आहे ?"

याप्रमाणे तो बोलत असता त्याचा प्रवाह उकळत होता व त्याचे सारे पाणी खदखदत होते. एकाद्या पोसून लठ्ठ केलेल्या डुकराचा मेद वितळवीत असता मोठ्या जाळावरची कढई जशी उकळते, व कोरडे सर्पण तिच्याखाली जोरात जळताना फुगे येणारा मेद कढईभर जसा वरवर येतो—अगदी तसाच झॅन्थसचा नामी जलसंचय उकळेपर्यंत आगीने तापला. आता नदाला वहात रहाणे अशक्य झाले, त्याचा प्रवाह थांबला, इतका परिणाम त्याच्यावर युक्तीबाज व्हल्कनने सोडलेल्या आगीच्या प्रचंड झोतांचा झाला. मग त्याने ज्यूनोची प्रार्थना केली, आणि तिला विनवले, "ज्यूनो, तुझ्या पुत्राने माझ्या प्रवाहाला इतक्या तीव्र त्वेषाने पीडा का द्यावी ? त्रोजन्सना साह्य करणारे इतर सगळे जितके दोषार्ह आहेत तितका काही मी नाही. तुझी इच्छा आहे म्हणून मी झगडा सोडून देतो व तुझ्या पुत्रालाही तो सोडून देऊ दे. आणखी शिवाय मी शपथ घेतो की त्रोजन्सना विनाशापासून वाचवण्यासाठी पुन्हा कधीही,—ॲकिअन्स लावणार असलेल्या आगीच्या ज्वाळात जरी सारी ट्रॉयनगरी जळत असली तरीसुद्धा, मी काही करणार नाही."

हे ऐकताच ज्यूनो आपल्या पुत्राला म्हणाली, "पुत्रा व्हल्कन, आता तू आपल्या ज्वाळा आवरून घे ; मर्त्य मानवांखातर एका देवाविरुद्ध आपण अशा हिंसाचाराचा वापर करू नये."

ती असे बोलल्यावर व्हल्कनने आपल्या ज्वाळा विझवल्या व तो नदही पुन्हा एकदा परत आपल्या शोभीवन्त पात्रात गेला.

झॅन्थसचा आता पराभव झाला होता, तेव्हा त्या दोघांनी लढणे सोडून दिले, कारण ज्यूनो जरी अजूनही रागातच होती तरी तिने त्यांना थांबवले ; पण इतर देवात हिरिरीचे भांडण सुरू झाले, कारण ते भिन्न भिन्न मतांचे होते. प्रचण्ड हलकल्लोळात ते एकमेकांवर तुटून पडले—पृथ्वी विवळली आणि विशाल नभांगण तुताऱ्यांच्या फैरी वाजल्यासारखे निनादले. ऑलिम्पसवर बसला असता जव्हने ते ऐकले व देव आपापसात मारामारी करीत असलेले पाहून तो हर्षाने हसला. झगडा सुरू करण्यास त्यांनी विलंब लावला नाही, आणि ढालींचा भेद करणाऱ्या मार्सने युद्धास आरंभ केला. हाती खड्ग घेऊन त्याने तात्काळ मिनर्व्हावर उडी घेतली आणि तिची निर्भत्सना केली, "काय ग कोल्ह्ये ! तुझ्या हृदयातल्या गर्वाने व ताठ्याने प्रेरित होऊन तू देवांमध्ये कलह पेटवून दिलास ना ? तायदिअसपुत्र दायोमिदला माझ्यावर सोडून त्याच्या-हातून मला जखमी तू कसे केलेस व स्वतः धडधडीत भाला घेऊन तो खुपसून माझ्या गोजिऱ्या अंगाला कसे दुखवलेस ते तू विसरलीस का ? तेव्हा तू मला जे केलेस त्याचे फळ तू आता भोगशील."

असे बोलत असता त्याने तिच्या भयंकर गोंडेदार ढालीवर प्रहार केला—ती ढाल इतकी भयंकर की जव्हच्या विद्युत्पातानेही तिचा भेद होत नाही. तिच्यावरच प्राणघातक मार्सने आपला प्रचंड भाला मारला. ती जरा मागे झाली व आपल्या बळकट हाताने तिने मैदानावर पडलेला एक मोठा धोंडा—भला थोरला, खडबडीत व काळा—जो पूर्वीच्याकाळी लोकांनी शेताच्या सीमे-साठी बसवला होता, तो उचलला. त्याने मार्सच्या मानेवर घाव घालून तिने त्याला खाली पाडले. पडल्यावर त्याने बिघेच्या विघे भूमी व्यापली, व धुळीत त्याचे सारे केस मलिन झाले, त्याचे चिलखतही अंगाभोवती खडखडले. पण मिनर्व्हाने हसून त्याच्यावरून दर्पोक्ति उच्चारली, "खुळचटा, मी तुझ्यापेक्षा कितीतरी प्रबळ आहे हे तू अजूनही शिकला नाहीस का ? अजूनही माझ्या-विरुद्ध तू बरोबरीने उभा राहतो आहेस ! असे तुझ्या आईचे शाप तुझ्यावर अखेर फळास येताहेत, कारण ती संतप्त झाली आहे व तू ॲकिअन्सची बाजू सोडून त्रोजनांना साह्य करतोस म्हणून तुला ती चांगलीच शिक्षा करणार आहे."

मग तिने आपले दोन भेदक नेत्र दुसरीकडे फिरवले, तेव्हा जव्ह कन्या व्हीनसने मार्सचा हात धरून त्याला दूर नेले ; सगळा वेळ तो कण्हत होता कारण बऱ्याच त्रासानंतर आता तो भानावर आलेला होता. राणी ज्यूनोने तिला पाहिले तेव्हा ती मिनर्व्हाला म्हणाली, "ढाल धारण करणाऱ्या जव्हच्या

कन्ये, कधीही न थकणाऱ्या मुली, बघ ती कोल्ही व्हीनस पुन्हा गर्दीमधून मार्सला लढाईबाहेर काढून नेते आहे. तात्काल तिच्यामागे जा.”

असे ती बोलली. मिनर्व्हा निर्धारपूर्वक व्हीनसच्या मागे धावली व तिच्यावर चालून गेली. आपल्या मजबुत हाताने व्हीनसच्या वक्षावर तिने असा प्रहार केला की व्हीनस घेरी येऊन भूमीवर पडली, व तेथे ती दोघेही हातपाय लांबवर पसरुन पडून राहिली. मग मिनर्व्हाने त्यांना उद्देशून प्रौढी मिरविली, “मार्सला साह्य करताना मला आडवी येणारी व्हीनस जितकी पराक्रमी व प्रबळ ठरली, तितकेच आर्गाइव्हज्‌विरुद्ध त्रोजन्सना साह्य करणारे सगळे ठरोत ! असेच घडत गेले असते तर आम्ही इलिअमची भक्कम नगरी लुटून केव्हाच युद्ध समाप्त केले असते !”

हे ऐकताना ज्यूनोने स्मित केले. दरम्यान राजा नेपच्यून अॅपॉलोकडे वळून म्हणाला, “फीबस, आपण एकमेकाना हातभर दूर कशाला ठेवायचे ? आता इतरानी झगडा सुरू केल्यानंतर हे बरे नव्हे ; एकमेकाशी न लढताच ऑलिम्पसवरील ब्रॉंझची भूमी असणाऱ्या जव्हच्या प्रासादाप्रत आपण तसे परत गेलो तर ती आपणाला मानहानीची गोष्ट होईल. म्हणून चल, पुढे ये ! दोघात वयाने तू लहान आहेस आणि मी तुझ्यावर हल्ला करणे योग्य नव्हे, कारण मी वयाने मोठा व मला अनुभव जास्त ; वेडया, तुला अक्कल नाही, आणि जेव्हा आपण जव्हच्या घरुन येऊन एक सबंध वर्षभर एका ठरलेल्या शुल्कावर लॅओमेडॉनसाठी काम केले, व त्याने आपल्याला आज्ञा केल्या, तेव्हा इलिअमभोवती सर्व देवांमध्ये केवळ आपल्या दोघांचेच हाल झाले हे तू विसरतोस, त्रोजन्सची नगरी अभेद्य व्हावी म्हणून तिच्या भोवतींचा रुंद व नीटस तट मी त्यांच्यासाठी बांधला ; आणि फीबस तू, अनेक दऱ्यांच्या इदा पर्वताच्या कंदरात त्यांच्यासाठी गुरे वळलीस. तथापि जेव्हा सुखद क्षणांनी शुल्क देण्याची वेळ आणली, तेव्हा प्रबळ लॅओमेडॉनने आपल्या सेवेचे सारे शुल्क लुबाडून घेऊन शिव्यांखेरीज काही न देता आपल्याला सगळ्याना हाकून दिले. त्याने आपले हातपाय बांधून एकाद्या दूरच्या बेटात आपल्याला विकून टाकायची धमकी दिली. शिवाय त्याने आपल्या दोघांचेही कान कापून टाकण्याचा प्रयत्न केला ; तेव्हा त्याने कबूल करून न दिलेल्या शुल्कासाठी खवळून जाऊन आपण रागारागाने निघून गेलो. हे सगळे झालेले असूनही तू त्याच्या लोकांना आता अनुकूल होतो आहेस, व त्यांच्या बायकामुलांसह त्या गर्विष्ठ त्रोजन्सचा सर्वनाश साधण्याच्या कामात आमच्याशी सहभागी होत नाहीस.”

आणि राजा ॲपॉलोने उत्तर दिले, " भूकम्पाधिपते, ग्रीष्म ऋतूत पाने येतात तसे उत्पन्न होणाऱ्या, भूमीत उद्‌भवलेला फलभार खाणाऱ्या व थोड्याच काळात भूमीवर निष्प्राण पडणाऱ्या मूठभर क्षुद्र मर्त्य मानवांसाठी मी तुझ्याशी युद्ध केले, तर तुला माझ्याबद्दल आदर वाटेनासा होईल. आपण हा आपसातला झगडा तात्काल थांबवू या व त्या लोकाना आपला तंटा आपापसातच मिटवू देऊ या."

असे बोलताना तो दूरच झाला, कारण स्वतःच्या पित्याच्या भावावर तो हात उचलणार नव्हता. पण वन्य पशूंची आश्रयदात्री मृगयाप्रेमी दायाना, त्याची बहीण त्याच्यावर फार रागावली, व त्याला म्हणाली, " तर मग तू दूर पळून जाणार, दूरवर बाण फेकणाऱ्या, आणि विजय नेपच्यूनच्या स्वाधीन करणार, तोही त्याला सवड देऊन सवंग प्रौढी मारण्यास! बाळा, आपले धनुष्य असे निष्क्रिय का ठेवतोस? नेपच्यूनसमोर उभा ठाकून त्याच्याशी मी लढेन अशी जी फुशारकी असरांसमक्ष माझ्या पित्याच्या घरात तू पुष्कळदा मारलीस, ती पुन्हा कधीही मला ऐकवू नको."

ॲपॉलोने काही उत्तर दिले नाही, पण जव्हची महनीय राणी कोपली आणि दायानाची तिने कटुशब्दांनी कान उघाडणी केली, " असे माझ्याविरुद्ध बोलायचे धाडस कसे होते तुला? उद्धट कोल्ही कुठली ! " तुझ्यापाशी मोठे प्रतापी धनुष्य असले तरी माझ्याविरुद्ध टिकून राहणे तुला जड जाईल. जव्हने तुला बायकात सिंहासारखी पराक्रमी केली आणि तो तुला वाटेल तेव्हा सिंह मारू देतो. तुझ्याहून बलिष्ट असतील त्यांच्याशी लढण्यापेक्षा डोंगरावरचे वन्य पशू व हरीण यांचा पाठलाग करणे बरे असे तुला आढळून येईल. तुला युद्धच करायचे असेल तर कर, व माझ्याविरुद्ध झुंज देऊन बघ, तुझ्यापेक्षा मी कितीतरी जास्त प्रबळ आहे ते ! "

बोलता बोलता तिने दायानाची दोन्ही मनगटे आपल्या डाव्या हातान पकडली व उजव्या हाताने तिच्या खांद्यावरचे धनुष्य काढून घेऊन त्यानेच तिला कानाभोवती तडाके मारीत असता ज्यूनो हसू लागली आणि तिच्या तडाक्यांखाली दायाना वळवळू व चुळबुळू लागली. तिचे जलदगती बाण भूमीवर पडले व ससाण्याच्या पाठलागातून सुदैवाने निसटून एखाद्या पोकळ खडकाच्या फटीकडे उडून जाणाऱ्या कबुतराप्रमाणे ज्यूनोच्या हातून स्वतःला सोडवून घेऊन दायाना रडतरडत पळाली, व तिचे धनुष्यबाणही ती मागेच सोडून गेली.

मग आर्गसाचा अंतक आणि सर्वांचा मार्गदर्शक व पालक लीतोला म्हणाला, " लीतो, मी तुझ्याशी लढणार नाही ; जव्हच्या पत्नींपैकी कोणाशीही मारामारी

सुरू करणे अनिष्टकारक आहे. म्हणून अमरांमध्ये तुला हवी तशी बढाई मार की धर्मयुद्धात तू माझा पराभव केलास."

नंतर भिरभिरत्या धुळीत पडलेले दायानाचे धनुष्यबाण लीतोने गोळा केले, आणि ते घेतल्यावर ती त्वरेने कन्येमागे गेली. आतापावेतो दायाना जव्हच्या ब्राँझची भूमी असलेल्या प्रासादापर्यन्त पोहोचली होती, आणि सारखे अश्रू गाळीत पित्याच्या मांडीवर ती बसली असता तिची दिव्य वसने तिच्याभोवती थरथरत होती. सॅटर्नपुत्राने तिला आपल्याजवळ ओढून प्रसन्नपणे हसत तिला प्रश्न करण्यास सुरवात केली, "माझ्या प्रिय बाळे, जणू काही तू कोणालाही न जुमानता गैरवर्तन केलेस म्हणून तुझ्याशी असे क्रूर आचरण स्वर्गीय जीवांपैकी कोणी केले?" आणि सुंदर मुगुट घातलेल्या मृगयेच्या देवतेने उत्तर दिले, "बाबा, मला मारले ते तुमची पत्नी ज्यूनो हिने; जेव्हा जेव्हा अमरात भांडणे होतात तेव्हा तेव्हा नेहमी तीच त्याना कारणीभूत असते."

असा त्यांचा संवाद झाला, आणि दरम्यान फीवस ॲपॉलोने इलिअमच्या मजबूत नगरीत प्रवेश केला; कारण तिच्या तटाने प्रतिकार होणार नाही आणि दॅनाअन्स तेव्हा व तेथेच, तिची ठरलेली घटका भरण्यापूर्वीच नगरी सर करतील अशा आशंकेने ती अस्वस्थ होती; पण बाकीचे सदाजीवी देव, काही संतप्त व काही विजयोत्साहात आलिम्पसला परत गेले व तेथे बादळी मेघांचा स्वामी जव्ह याच्याजवळ आपापल्या स्थानी बसले; पण त्याचवेळी त्रोजन्सवर व त्यांच्या घोड्यांवरही मरणाचा मारा ॲकिलिझने चालू ठेवला. देवांच्या कोपाने पेटवल्या गेलेल्या नगराचा धूर आकाशात चढतो तेव्हा सर्वांच्या वाट्याला कष्ट व बऱ्याच जणांच्या नशिबी दुःख येते—अगदी तसेच कष्ट व दुःख ॲकिलिझने त्रोजनांवर ओढवून आणले.

महाकाय ॲकिलिझपुढे भयंकर भयभीत झालेले त्रोजन्स पळत होते व त्याच्या साह्याला कोणी नव्हता, हे तटाच्या एका उंच बुरुजावर उभा राहून वृद्ध प्राअॅम राजाने पाहिले. थोड्याच वेळात तो बुरुजावरून खाली उतरला, व सारखा विव्हळत तटाच्या कडेने शूर वेसकऱ्यांना आज्ञा देण्यास गेला. तो म्हणाला, "लोक पळत येऊन नगरात शिरेपर्यन्त वेशीची दारे सताड उघडी ठेवा, कारण ॲकिलिझ जवळच आहे व तो त्यांची दाणादाण उडवून त्यांना आपल्यापुढे हाकलीत आहे. मला दिसते आहे की आपण मोठ्या संकटात आहोत. आपले लोक आत येऊन सुरक्षित होताच आपले मजबूत दरवाजे बंद करा, कारण इतरांबरोबर उड्या ठोकीत तो भयंकर पुरुष आत येईल की काय याबद्दल मला धास्ती वाटते."

तो हे बोलत असता त्यांनी अर्गलादण्ड मागे सरकवून दरवाजे उघडले, आणि ते उघडताच त्रोजन्सना आश्रयस्थान मिळाले. मग नगरातून अॅपॉलो भरवेगात त्यांना भेटायला व सांभाळायला आला. त्वेषाने भाला चालवीत अॅकिलिझ त्यांच्यामागे लागला होता व ते लोक थेट नगराकडे व उंच तटाकडे तहानेने घसे कोरडे झालेले व धुळीने माखून गेलेले असे सारखे पळतच होते, कारण अॅकिलिझच्या जणु अंगात आले होते, व त्याला कीर्तीची तीव्र तृष्णा लागली होती. तेव्हाच जर अॅपॉलोने अॅन्तेनॉरचा शौर्यशाली व उदात्त पुत्र अॅगेनॉर याला चेतविले नसते तर, अॅकिअन्सच्या पुत्रांनी त्रॉयचे उत्तुंग दरवाजे काबीज केले असते. पण त्याने अॅगेनॉरच्या हृदयात धैर्य प्रविष्ट केले व त्याच्या रक्षणार्थ तो गडद अंधाराने वेष्टित, एका बीच वृक्षाला टेकून, त्याच्या बाजूला उभा राहिला. अॅगेनॉरने अॅकिलिझला पाहिले तेव्हा तो निश्चल उभा राहिला व त्याच्या हृदयावर चिंतेचे पटल आले. तो हताश होऊन स्वतःशी म्हणाला "अरेरे, बलाढ्य अॅकिलिझपुढे मी पळालो व दुसरे सगळे वाताहत होऊन जिकडे हाकलले जात आहेत तिकडे गेलो, तरीही तो मला धरीलच व भ्याड म्हणून ठार मारील. जर मी अॅकिलिझला इतरांचा पाठलाग करू दिला व मग तटापासून पळ काढून इलिअममागील मैदानावरून इदापर्वताच्या फाट्यापर्यन्त पोहोचलो, आणि त्यावर असलेल्या जाळझाडुपात लपू शकलो तर कसे काय होईल बरे? मग तेथे मला माझ्या अंगावरचा घाम नदीत धुवून काढता येईल व सायंकाळी इलिअमला परतता येईल. पण असा स्वतःशीच संवाद कशाला करीत बसू? बहुधा मी नगरातून मैदानावरून घाईघाईने जात असताना तो मला पाहील व मला धरीपर्यन्त माझ्यामागे वेगाने येईल. मला मग त्याच्याविरुद्ध बचाव करायला काही संधीच उरणार नाही, कारण सर्व मानव जातीत तो अत्यंत बलशाली आहे. मग बाहेर पडून नगरापुढे मी त्याला तोंड दिले तर? मला वाटते त्याचेही मांस ब्राँझच्या अग्राने भोसकले जाऊ शकतेच की! एका माणसात काय व दुसऱ्यात काय, सर्वात जीव सारखाच आहे, आणि लोक म्हणतात की सॅटर्नपुत्राने त्याला विजय प्रदान केला असला तरी तो केवळ मर्त्यच आहे." असे म्हणून तो स्वसंरक्षणाच्या पवित्र्यात उभा राहिला, आणि अॅकिलिझची वाट पाहू लागला. कारण आता त्याला लढण्याचा फार हुरुप आला होता. दाट जाळीमधील आश्रयस्थानातून चित्तीण शिकाऱ्यावर हल्ला करायला जशी झेप घेते--तिला भय ठाऊक नसते व शिकारी कुत्र्यांच्या भुंकण्याने ती डरत नाही; जरी तो माणूस तिच्यापेक्षाही चपळाई करून तिला तलवार खुपसून किंवा भाल्याने जखमी करतो, तरी, भाला अंगात

A-125—23-B.

रुतला असूनही ती शिकाऱ्यावर पकड घेईपर्यन्त किंवा स्वत: एकदम ठार होईपर्यन्त ती माघार घेत नाही--अगदी तशाच प्रकारे अँन्तेनॉरपुत्र उदात्त अँगेनॉरने अँकिलिझच्या बलाचा अंदाज घेतल्याखेरीज पळून जाण्याचे नाकारले, आणि आपली गोल ढाल पुढे धरून भाल्याने अँकिलिझवर नेम धरताना उच्च स्वराने ओरडून म्हटले, " कुलवान अँकिलिझ, तुला खरोखरीच वाटते आहे की आज तू अभिमानी त्रोजन्सची नगरी लुटणार आहेस! मूर्खा, तसे होण्यापूर्वी अजून तुझी भरपूर दुर्दशा होणार आहे, कारण अद्यापि नगरीत पुष्कळ शूर लोक आहेत, जे आमच्या प्रिय माता पित्यांपुढे व बायकामुलांपुढे इलिअमच्या रक्षणार्थ उभे राहतील. म्हणून इथेच, तू जरी मोठा धिप्पाड व बलिष्ट योद्धा असलास तरी, येथेच तू मरणार आहेस. "

हे बोलत असता त्याच्या बळकट हातांनी त्याने आपला शूल भिरकावला आणि तो भाला अँकिलिझला पायावर गुडघ्याखाली लागला. नव्याने घडवलेल्या कथलाचे नडगीवरचे कवच मोठ्याने खणखणले; पण ज्याला मारला होता त्याच्या अंगावर आपटून भाला उलटला; त्याने शरीराचा भेद केला नाही, कारण देवाच्या त्या देणगीने तो अडवला गेला. अँकिलिझने आपल्यापरीने उदात्त अँगेनॉरवर हल्ला केला, पण अँपॉलोने त्याला यश मिळू दिले नाही, कारण त्याने अँगेनॉरला उचलून दूर नेऊन दाट धुक्यात लपवले, व याप्रमाणे दुखापत होऊ न देता लढाईपासून लांब पाठवले. मग कपटीपणाने त्याने अँकिलिझला त्रोजन सैन्याच्या पाठलागापासून दूर नेले. कारण अँगेनॉरचे रूप घेऊन तो अँकिलिझसमोर उभा राहिला. त्याच्यावर धावून जाऊन अँकिलिझने त्याचा पाठलाग सुरू केला; तेव्हा मैदानावरच्या शेतातून त्याच्यामागे जाणाऱ्या अँकिलिझला त्याने स्कॅमॅन्दर नदीच्या खोल पाण्याकडे आणले. अँपॉलो त्याच्या थोडेसेच पुढे राहून त्याला हुलकावण्या देऊ लागला. अँकिलिझला सारखे वाटे की अँगेनॉर आता सापडणार--तोच अँपॉलो आणखी थोडा दूर जाई; सारा वेळ असेच चालू राहिले. दरम्यान दाणादाण उडालेल्या त्रोजनांचा बेशिस्त घोळका नगरीत गर्दी करून शिरत, स्वत:च्या सुटकेबद्दल आपणास धन्य मानीत होता. त्यांच्या विपुल संख्येने नगर शेवटी गजबजून गेले. नगराच्या तटाबाहेर एकमेकांची वाट पाहण्याचे धाडस त्यांना होत नव्हते; कोण निसटले व कोण रणात पडले हे जाणून घेण्यासाठी ते थांबत नव्हते, तर ज्यांचे पाय व गुडघे अजून त्यांना वाहून नेऊ शकत होते, ते सारे अस्ताव्यस्त धावपळीत शहरात लोटले.

● ● ●

## सर्ग २२

याप्रमाणे हरणासारखे भेदरलेले नगरीतले ट्रोजन्स अंगावरचा घाम पुसून उत्तम तटबंदीवर रेलून तृषाशमनार्थ पाणी प्याले, आणि खांद्यावर ढाली घेतलेले ॲकिअन्स तटाच्याजवळ आले. पण इलिअमसमोर व स्किॲन वेशीपुढे असलेल्या हेक्तरला कठोर दैवाने तो होता तेथेच राहण्यास भाग पाडले; मग फीबस ॲपॉलो पेलिअसपुत्राला म्हणाला, "पेलिअसपुत्रा, केवळ मर्त्य मानव असलेला तू अमर असणाऱ्या माझा का पाठलाग करीत आहेस? तू इतक्या त्वेषाने ज्याच्यामागे लागला आहेस तो देव आहे हे अजून तुझ्या लक्षात आले नाही का? ज्यांची दाणादाण तू उडवलीस त्या ट्रोजन्सना तू पुरे सतावले नाहीस! आणि आता तर ते तटांच्या आत आहेत, व तू हुलकावणीला बळी पडून इकडे त्यांच्यापासून दूर आला आहेस. माझा तू वध करू शकत नाहीस, कारण मृत्यूला मजवर मुळीच पकड घालता येणार नाही."

ॲकिलिझला फार राग आला आणि तो म्हणाला, "देवातल्या सर्वांत मत्सरी अशा, दूरवर बाण फेकणाऱ्या, तू मला फसवून तटापासून, जेथे कित्येक लोक इलिअममध्ये पोहोचण्यापूर्वी धूळ खात पडले असते तेथून दूर आणले आहेस. तू माझे थोर यश हिरावून घेतले आहेस व स्वत: कुठल्याही संकटात न सापडता ट्रोजन्सना वाचवले आहेस; कारण तुला कशाचेही भय नाही; पण माझ्या शक्तीच्या आटोक्यात असला तर मी खरोखर तुझ्यावर सूड घेईन."

असे म्हणून भीषण हेतूने तो नगरीकडे निघाला आणि रथस्पर्धेतला विजयी होणारा घोडा मैदानावरून धावताना शरीरातला कणन् कण वेचून जशी प्रयत्नांची पराकाष्ठा करतो, तशाच वेगाने व त्वेषाने ॲकिलिझच्या पायांनी त्याला पुढे पुढे वाहून नेले. लोक ज्याला ओरायनाचा शिकारी कुत्रा म्हणतात, व ज्याचे किरण कापणीच्या मोसमात रात्री चमकणाऱ्या कोणत्याही ताऱ्यापेक्षा अधिक तेजाने प्रकाश देतात, त्या ताऱ्यासारखा दैदीप्यमान ॲकिलिझ वेगाने मैदान पार करीत येत असता त्याला प्रथम प्राॲमने पाहिले; तो तारा जरी सर्वांत तेजस्वी असला तरी मर्त्य मानवांना तो अनिष्टसूचक असतो, कारण आपल्यामागून तो आगी व ज्वर आणतो—त्याच्यासारखेच पुढे धावणाऱ्या ॲकिलिझचे चिलखत त्याच्या छातीवर चकाकत होते. प्राॲमने मोठा ओरडा केला आणि हात उचलून ते डोक्यावर मारून घेत त्याने ओरडून आपल्या प्रिय

पुत्राला परत फिरण्यास विनविले; पण तरीही हेक्तर वेशीपुढेच उभा राहिला, कारण ॲकिलिझशी युद्ध करण्याचा त्याच्या मनाचा निर्धार झाला होता. वृद्ध पित्याने त्याच्याकडे हात पसरून 'माझ्यावरच्या दयेखातर तरी तटाच्या आत ये' म्हणून त्याला सांगितले. तो ओरडला, "माझ्या मुला, एकटा व कुणाचा पाठिंबा नसताना तू या पुरुषाला तोंड देण्यास तिथे राहू नको, नाहीतर पेलिअस-पुत्राच्या हातून तुला मरण येईल, कारण तो तुझ्याहून प्रबळ आहे. राक्षसच आहे तो; खरोखर माझ्या मनात त्याच्याबद्दल जेवढा द्वेष आहे, तितका देवांच्या मनात असता तर किती बरे झाले असते! कारण तसे झाले तर मग तो भूमीवर मृत्यूनंतर पसरला असता, कुत्र्या गिधाडांनी त्याला थोड्याच वेळात फाडून खाल्ले असते, आणि दुःखाचा मोठा भार माझ्या हृदयावरून दूर झाला असता. कारण माझे अनेक शूर पुत्र त्याने माझ्यापासून तोडले आहेत, ठार मारून किंवा समुद्रापलीकडच्या बेटात त्यांना विकून टाकून; आता देखील नगरीत गर्दी करून आलेल्या ट्रोजनात माझ्या पुत्रातले दोघेजण मला दिसत नाहीत, लायकॅऑन व पॉलिदॉरस, ज्यांना, स्त्रियांमध्ये जिला तोड नाही अशा लॅओथोई हिने माझ्या बीजापासून जन्माला घातले. ते अजूनही जिवंत व ॲकिअन्सच्या ताब्यात असतील, तर आमच्यापाशी विपुल प्रमाणात असलेल्या सोन्याने व ब्राँझने आम्ही त्यांच्यासाठी खंडणी भरू; कारण वृद्ध ॲल्तिझने त्या आपल्या कन्येला विपुल संपत्ती दिली आहे; पण ते दोघे जर आधीच मृत्यू पावून हेदिझच्या गृही गेले असतील, तर त्यांच्या आम्हा उभयता मातापितराना दुःखच होणार आहे. अर्थात इतरांबद्दलचे दुःख थोडावेळ टिकेल पण तू सुद्धा जर ॲकिलिझच्या हातून मरण पावलास तर त्या दुःखाला अंत रहाणार नाही. तेव्हा, माझ्या पुत्रा, नगरीत ये व ट्रोजन स्त्रीपुरुषांचा संरक्षक हो, नाहीतर तू आपला जीवही गमावशील व पेलिअसपुत्राला महान यशश्रीही मिळू देशील. तुझ्या दुःखी पित्याचे आयुष्य अजून जोवर उरले आहे तोवर त्याच्यावरही दया कर—माझ्यावर; पुत्र मारले गेलेले, कन्या बंदीवासात ओढून नेलेल्या, माझ्या राणीवशाची शय्यागारे लुटलेली, लढाईच्या प्रकोपात लहान बालके भूमीवर आपटून मारलेली, आणि ॲकिअन्सच्या क्रूर हातांनी माझ्या सुना फरफटत ओढून नेलेल्या, ही असली दृश्ये पाहिल्यानंतर वार्धक्याच्या उंबरठ्या-वर सॅटर्नपुत्र मला भयंकर कर्मभोगाने नष्ट करील. अखेरीस कोणीतरी तलवारीने किंवा भाल्याने मारून माझ्या देहातला जीव हुसकून लावल्यानंतर माझ्या स्वतःच्या महाद्वारीच कराल शिकारी कुत्रे माझे फाडून तुकडे करतील—माझ्या दरवाजांवर पहारा करण्यासाठी मी स्वतः वाढवून पोसलेले व माझ्या

स्वतःच्या भोजनाच्या मेजाशी खायला घातलेले माझेच कुत्रे; पण तरीही ते जिभांनी माझे रक्त चाटतील आणि मग अगदी व्याकुळ होऊन माझ्यादारी पडतील. जेव्हा एकादा तरुण पुरुष युद्धात तलवारीच्या घावाने धारातीर्थी पडतो तेव्हा तो तेथेच पडून राहिला तरी त्यात विशोभित असे काहीच नसते; जे काय दिसेल ते दिसो, मरणात सर्व काही माननीय असते, पण जेव्हा एकादा म्हातारा मनुष्य मारला जातो तेव्हा त्याचे पिकलेले केस व दाढी, आणि लोक लाजेखातर झाकतात ते सारे कुत्र्यांनी भ्रष्ट करावे या इतके दयनीय जगात दुसरे काहीही नाही."

असे बोलताना वृद्धाने आपले करडे केस शोकावेशात उपटले पण त्यामुळे हेक्तरचे हृदय द्रवले नाही. जवळच असलेल्या त्याच्या मातेने रडून व मोठ्याने विव्हळून जेथे त्याने स्तनपान केले होते ते आपले वक्षस्थळ उघडे केले व सारा वेळ ओक्साबोक्शी रडत ती म्हणाली, "हेक्तर माझ्या पोरा, या स्तनांचा अवमान करू नको, तर माझ्यावरही दया कर. जर कधी मी माझ्या स्वतःच्या हृदयातून तुला संतोष दिला असेल, तर त्याची आता आठवण कर, प्रिय पुत्रा, आणि या माणसापासून आमचे रक्षण करण्यास तटाच्या आत ये; त्याला युद्धात भिडण्यासाठी बाहेर उभा राहू नको. त्या नतद्रष्टाने जर तुझा प्राण घेतला तर, माझ्या स्वतःच्या अंकुरा, मी किंवा तुझी विपुल शुल्क बरोबर घेऊन आलेली पत्नी, तू पडलेल्या शय्येवर तुझ्यासाठी रडू सुद्धा शकणार नाही, कारण ॲकिअन्सच्या नौकांपाशी कुत्री तुला फाडून खातील."

याप्रमाणे त्या दोघांनी सतत आसवे ढाळीत आपल्या पुत्राला आळवले, पण त्यांच्या शब्दांनी हेक्तरचे हृदय हेलावले नाही, आणि महाकाय ॲकिलिझ त्याजवळ येत असता त्याची वाट पाहात तो आपल्या जागेवरच ठाम राहिला. प्राणघातक विषांनी परिपूर्ण असा सर्प पर्वतांवरच्या आपल्या वारुळात माणसाच्या आगमनाची जशी वाट पाहतो–तो प्रक्षुब्ध झालेला असतो व वारुळात वळवळत गोल फिरताना त्याची दृष्टी भयंकर उग्र असते–अगदी तसाच तटाच्या पुढे आलेल्या बुरुजाला आपली ढाल टेकून ठेवून हेक्तर आपल्या स्थानी निर्भयपणे उभा राहिला.

हृदय भरून आल्यामुळे तो स्वगत बोलला, "हाय! जर मी वेशीतून आत गेलो तर सर्वांच्याआधी पॉलिडॅमाज माझ्यावर दूषणे लादील, कारण ॲकिलिझ जेव्हा पुन्हा आमच्यावर चालून आला, त्या भयंकर रात्री 'ट्रोजन्सचे नेतृत्व करून त्यांना नगरीत परत ने' असा आग्रह करणारा तोच होता. तेव्हा मी त्याचे ऐकले नाही, पण ऐकले असते तर फार बरे झाले असते. आता माझ्य

मूर्खपणाने सैन्याचा नाश झाल्यावर, त्रोजन पुरुषांना व स्त्रियांना तोंड दाखवण्याचे मला धैर्य नाही कारण कोणी हलका माणूस सुद्धा म्हणेल की, 'हेक्तरने फाजील आत्मविश्वासाने आमचा घात केला.' ॲकिलिझशी लढून त्याला मारून परत जाणे किंवा येथे नगरीसमोर मानाने मरणे हेच खरोखर बरे. किंवा पुन्हा, मी येथे माझी ढाल व शिरस्त्राण खाली ठेवून भाला तटाला टेकून ठेवून उदात्त ॲकिलिझकडे थेट सरळ गेलो तर? मी जर हेलनला सोडून देण्याचे वचन दिले तर? कारण या साऱ्या युद्धाचे उगमस्थान तीच आहे—आणि ॲलेक्झँद्रसने आपल्या नौकातून त्रॉयला बरोबर आणलेली सारी संपत्ती परत करण्याचे कबूल केले तर? होय व नगरीत असलेल्या सर्व काही मालमत्तेपैकी अर्धी ॲकिअन्सना आपापसात, वाटून घेऊ दिली तर? त्रोजन्सना त्यांच्या राजवंशीयांच्या मुखांनी मी गंभीर शपथ घेण्यास लावू शकेन की ते मालमत्तेपैकी काही लपवून ठेवणार नाहीत; तर नगरीत असलेले सर्व धन दोन भागात वाटून ठेवतील—पण स्वतःशीच असा व्यर्थ वाद का घालतो आहे मी? मी त्याच्यापाशी गेलो तर तो मला कुठल्याही प्रकारची दया दाखवणार नाही; तेव्हा व तेथेच, मी माझे चिलखत काढून ठेवले असताना, एकाद्या स्त्रिला मारावे इतक्या सहज तो मला मारील. युवक नी युवती एकमेकांशी बालिश बडबड करतात तशी खडकावर किंवा ओकवृक्षाखाली बसून त्याच्याशी बोलणी करणे शक्य नाही. त्याच्याशी तात्काल युद्ध करून दोघांपैकी कोणाला जव्ह विजय प्रदान करतो हे जाणून घेणे अधिक बरे."

असा त्याने उभा राहून विचार केला, पण जणु तुऱ्याने मंडित युद्धदेव स्वतः मार्स याच्यासारखा दिसणारा ॲकिलिझ त्याच्यापाशी आला. आपल्या उजव्या खांद्यापासून त्याने आपला पेलिअन ॲशकाष्ठाचा भयानक भाला परजला, व ते ब्राँझ त्याच्याभोवती उगवत्या सूर्याच्या किरणांप्रमाणे किंवा पेटत्या अग्नीसारखे झळकले. त्याच्याकडे पाहताना हेक्तरवर भीतीची छाया पडली व जेथे तो उभा होता तेथे ठाम राहण्याचे धैर्य न होऊन तो अगतिकतेने वेशीपुढून पळाला, आणि ॲकिलिझ तीरासारखा त्याच्यामागे परम वेगाने धावला. जसा सर्व पक्ष्यात वेगवान असा पर्वतातला ससाणा एकाद्या भिऊन दबून राहिलेल्या कबुतरावर झेप घेतो—ते कबुतर त्याच्यापुढे उडत पळ काढते पण कर्कश किंकाळ्या फोडीत ससाणा त्याच्या अगदी पाठोपाठ त्याला धरण्याच्या निश्चयाने जातो—अगदी तसाच ॲकिलिझ थेट हेक्तरवर सर्व बळानिशी धावून गेला, आणि त्रोजनांच्या तटाखालून पाय जितक्या जोरात नेतील तितक्या वेगाने हेक्तर पळाला.

तटांखालून अगदी जवळून जाणाऱ्या मालवाहू गाड्यांच्या मार्गाने ते पळत राहिले, टेहळणीच्या ठाण्यापुढून व वाऱ्या पावसाचा मार खाल्लेल्या रानटी अंजिराच्या झाडांजवळून; अखेर स्कॅमॅन्दर नदीला पाणी पुरविणाऱ्या दोन सुंदर झऱ्यांपाशी ते पोहोचले. या दोघातला एक झरा उष्ण आहे व त्यातून पेटलेल्या आगीतून निघणाऱ्या धुरासारखी वाफ निघते; पण दुसरा झरा उन्हाळ्यात देखील गारा किंवा हिमासारखा किंवा थंडीत पाण्यावर गोठणाऱ्या बर्फासारखा गार आहे. येथे झऱ्यांच्या जवळच धुणे धुण्यासाठी छानदार दगडी डोणी आहेत; तेथे शांततेच्या काळात, ॲकिअन्स येण्याच्यापूर्वी, त्रोजनांच्या बायका व सुंदर मुली धुणी धूत असत. त्या डोणीजवळून, एक पुढे व त्याचा पाठलाग करणारा दुसरा मागे, असे ते पळाले. पुढे पळणारा मनुष्य चांगला धावणारा होता, पण त्याच्यामागून धावणारा त्याच्याहून फार वरचढ होता, आणि ते खरोखरच फार वेगाने पळत होते; कारण धावण्याच्या सर्वसाधारण स्पर्धेला असते तसे यज्ञासाठी पशू किंवा बैलाचे चामडे, असे क्षुल्लक पारितोषिक येथे नव्हते, तर ते हेक्तरच्या प्राणासाठी पळत होते. एखाद्या मृत वीराच्या सन्मानार्थ होणाऱ्या क्रीडोत्सवात, पवित्र तिवई किंवा स्त्री अशा मोठ्या पारितोषिकासाठीच्या रथस्पर्धेत वळण्याच्या खांबाभोवती घोडे जसे वेगाने धावतात, तसे हे दोघे भर वेगात प्राॲमच्या नगरीभोवती तीन वेळा पळाले. सर्व देव त्यांना पाहात होते, आणि देवांचा व मानवांचा पिता पहिल्याने बोलला.

तो म्हणाला, "अरेरे, मला प्रिय असलेल्या मनुष्याचा त्रॉयच्या तटांभोवती पाठलाग होत असलेला माझ्या डोळ्यांनी मी पाहात आहे. हेक्तरसाठी माझे हृदय दयेने व्याप्त झाले आहे; माझ्या सन्मानार्थ त्याने कित्येक कालवडींच्या मांड्यांची हाडे आहुती म्हणून अग्नीत वाहिली आहेत, एकदा अनेक दऱ्यांच्या इदा पर्वत शिखरांवर आणि पुन्हा त्रॉयच्या गढीवर; आणि आता त्याचा पाठलाग प्राॲमच्या नगरीभोवती उच्चकुलीन ॲकिलिझ भर वेगात करताना मी पाहात आहे. यावर तुमचे काय म्हणणे आहे? आपापसात विचार करा व ठरवा, की आपण हेक्तरला आता वाचवायचे, की तो शूर असला तरी पेलिअसपुत्र ॲकिलिझपुढे त्याला रणात पडू द्यायचे."

मग मिनर्व्हा म्हणाली, "तात, अशनि-क्षेपका, मेघ-झंझावातस्वामी, तुमच्या बोलण्याचा अर्थ काय? ज्याचा अन्त केव्हापासून तरी दैवाने तुला हवे तसे निर्णित केला आहे, त्याला मृत्यूच्या जबड्यातून तू ओढून काढणार? कर, पण आम्ही इतरपण तुझ्याशी सहमत होणार नाही."

आणि जव्हने उत्तर दिले, " माझ्या बाळे, त्रितो-पुत्री, धीर धर, मी काही अगदी मनापासून बोललो नाही, आणि तुला हवे तसे मी होऊ देईन. जे काही करायचे तुझ्या मनात आहे ते कुठलाही अडथळा व विलंब न जुमानता खुशाल कर. "

आधीच उत्सुक असलेल्या मिनर्व्हाला त्याने असे प्रोत्साहन दिले, आणि ती ऑलिम्पसच्या सर्वोच्च शिखरांवरून तीरासारखी निघाली.

पर्वतावरच्या लपण्याच्या जागेतून उठवलेल्या हरिणशावकाचा शिकारी कुत्रा जसा दरीतून व दाट झाडीतून पाठलाग करतो तसा हेक्तरचा पाठलाग ॲकिलिझ अद्यापि भर वेगाने करीत होता; झुडुपाखाली दबा धरून ते हरिण-बालक त्याला चुकवायचा प्रयत्न करते; पण वासाने त्याचा माग काढून कुत्रा त्याला धरीपर्यन्त त्याचा पाठलाग करतो---अगदी त्याप्रमाणेच द्रुतगती पेलिअस-पुत्रापासून निसटणे हेक्तरला अशक्य होते. जेव्हा जेव्हा त्याने दार्दानिअन वेशींजवळ व तटांखाली पोचण्याचा प्रयत्न केला, या हेतूने की त्याच्या लोकांनी वरून शस्त्रांचा मारा करून त्याला मदत करावी, तेव्हा तेव्हा ॲकिलिझने दोघांतले अंतर तोडून, स्वतः सदा नगरीच्या बाजूला राहून त्याला मैदानाकडे पिटाळले. जसा स्वप्नात असलेला माणूस दुसऱ्याचा पाठलाग करीत असता त्याची पकड हुकते–पुढे पळणारा निसटूही शकत नाही व मागून येणारा त्याला धरूही शकत नाही---अगदी तसाच ॲकिलिझ हेक्तरपर्यन्त पोहोचू शकत नव्हता, व हेक्तरही त्याच्या पाठलागापासून निसटून जाऊ शकत नव्हता; तरीसुद्धा, हेक्तर अजूनही मृत्यूपासून बचावला असता, पण ज्या ॲपॉलोने आतापर्यन्त त्याची शक्ती टिकवून धरून त्याचा पळण्याचा जोर कायम ठेवला होता तो आता यानंतर त्याच्याबाजूचा राहिला नाही. ॲकिलिझने ॲकिअन सैन्याला खुणा करून व मान हलवून सुचवले की दुसऱ्या कोणीही हेक्तरवर शूलाचा नेम धरायचा नाही; कारण तसे झाल्यास त्याच्यावर आघात करण्याचे यश दुसऱ्या कोणाला मिळून त्याला स्वतःला दुसरा क्रमांक घ्यावा लागला असता. तेव्हा, शेवटी चौथ्या खेपेला ते त्या झऱ्यांपाशी येत होते त्यावेळी, सर्वांच्या पित्याने आपला सोन्याचा तराजू समतोल धरून प्रत्येक पारड्यात एकेक प्राणांत ठेवला,–एकात ॲकिलिझचा व दुसऱ्यात हेक्तरचा; ताजवा त्याने मध्यभागी धरला तेव्हा हेक्तरच्या प्राणांताचे पारडे खाली खोल हेदिझच्या गृही गेले व मग त्याक्षणी फीबस ॲपॉलोने हेक्तरचा त्याग केला. तेव्हा मिनर्व्हा पेलिअसपुत्राजवळ जाऊन म्हणाली, " स्वर्गस्थ देवांच्या प्रिय, उदात्त ॲकिलिझ, हेक्तरची लढण्याची खुमखुमी कितीही असली तरी त्याला ठार मारून आपण

दोघे ॲकिअन्सचा एक विजय निश्चितपणे नौकांकडे परत घेऊन जाणार आहोत. आपला पिता, ढाल धारण करणारा जव्ह याच्यापुढे लोळण घेत ॲपॉलोला हव्या तेवढ्या गयावया करू दे, आपल्या हातून आता हेक्तर निसटू शकत नाही. येथे थांब, जरा दम खा, तोपर्यन्त मी हेक्तरपाशी जाऊन, तुझ्या-समोर उभा राहून लढाई देण्यासाठी त्याचे मन वळवते."

मिनर्व्हाने हे सांगितल्यावर ॲकिलिझने आनंदाने तिची आज्ञा मानली, आणि ब्राँझ-अग्राच्या आपल्या ॲशकाष्ठाच्या भाल्याला रेलून तो स्तब्ध उभा राहिला असता मिनर्व्हा दैफोबसचे रूप घेऊन हेक्तरकडे जाऊन त्याच्याच आवाजात म्हणाली, "प्रिय बन्धो, भरवेगात प्राॲमच्या नगरीभोवती तुझा पाठलाग करीत ॲकिलिझने तुला संकटात आणलेले मला दिसत आहे; त्याचा हल्ला येण्याची आपण वाट पाहू व बचावाला ठामपणे उभे राहू."

आणि हेक्तरने उत्तर दिले, "दैफोबस, माझ्या सर्व भावात, हेक्युबा व प्राॲमच्या मुलात, तू मला नेहमीच सर्वात प्रिय होतास; पण ज्याअर्थी बाकी सगळे तटाच्या आत राहिले असताना माझ्याखातर बाहेर येण्याचे धाडस तू केलेस त्याअर्थी यापुढे मी तुला अधिकच प्रिय मानीन."

मग मिनर्व्हा म्हणाली, "प्रिय बंधो, त्या सर्वावर भीतीचा इतका पगडा बसला आहे, की माझ्या पित्याने, मातेने व साऱ्या सोबत्यांनी आतच रहा म्हणून गुडघे टेकून मला विनवले, पण तुला पाहिल्यावर मी दुःखाने व्यथित झालो; म्हणून आता आपण दोघे ठाम जागा धरून लढाईला तोंड देऊ, आणि आता आपले भाले फिरवताना आपण मागेपुढे पहायचे नाही, किंवा पुढे उपयोगी पडेल म्हणून काही शस्त्रबळ शिलकीत ठेवायचे नाही, म्हणजे मग काय तो निकाल होईल—ॲकिलिझ आपल्याला मारून आपल्या शस्त्रास्त्रांची लूट नौकांकडे वाहून नेतो की तुझ्यापुढे तो रणात पडतो, तो!"

असे मिनर्व्हाने धूर्तपणे त्याला भुलवले, आणि जेव्हा ते दोघे प्रतिस्पर्धी आता एकमेकांच्याजवळ आले, तेव्हा प्रथम बोलला थोर हेक्तर; तो म्हणाला, "आतापर्यन्त मी तुझ्यापासून जसा पळ काढीत होतो तसा यापुढे पळणार नाही. तुला तोंड देण्याचे धैर्य न धरता तीन वेळा पळत पळत प्राॲमच्या प्रबळ नगरीभोवती मी प्रदक्षिणा घातली, पण आता मला एक तर मारू दे किंवा मरू दे, कारण तुला तोंड देण्याचे माझ्या मनाने आता घेतले आहे. तेव्हा आपण एकमेकांना आपापल्या देवांच्या नावाने प्रतिज्ञाबद्ध करू या, कारण तेच सर्व सम्मतिसंविधानांचे सर्वोत्तम साक्षी व पालक असतात; आपणा दोघात हे मान्य होऊ दे, की जव्हने मला जास्त वेळ तुझ्यापुढे टिकू दिले व मी तुझा

प्राण घेतला, तर मी तुझ्या देहाची कुठल्याही प्रकारे विटंबना करायची नाही, तर तुझे चिलखत काढून घेतल्यावर तुझा देह ॲकिअन्सच्या स्वाधीन करायचा, आणि तूही तुझ्यापरीने तसेच करायचेस."

ॲकिलिझने उग्र दृष्टीने त्याच्याकडे पाहून उत्तर दिले, "मूर्खा, सम्मत्ति संविधानांची बडबड माझ्यापुढे करू नकोस. माणसात व सिंहात कसलेही करार होऊ शकत नाहीत; लांडगे नी कोकरे यांचे कधीही एकमत होणे शक्य नाही, तर दोघे एकमेकांचा सर्वकाळ संपूर्णपणे द्वेषच करतात. म्हणून तुझ्यात व माझ्यात एकमेकांच्या मनाची ओळख होणे शक्य नाही. किंवा कोणतेही करार होऊ शकणार नाहीत--दोघातला एक किंवा दुसरा रणात पडून उग्र मार्सला आपल्या रक्ताने आकंठ तृप्त करीपर्यन्त हे होणे नाही. तेव्हा आता आपली सारी शक्ती पणाला लाव. धीट सैनिक व योद्धा म्हणून स्वतःची थोरवी सिद्ध करण्याची खरोखर आताच तुला गरज आहे. कारण तुला यापुढे आणखी संधी मिळणार नाही, आणि पॅलास मिनर्व्हा माझ्याच भाल्याने तुला तात्काळ पराजित करील; लढाईत माझे सोबती मारून मला जे परम दुःख दिलेस त्याची पुरी भरपाई आता तुला करावी लागेल."

याप्रमाणे बोलत असता त्याने आपल्या भाल्याने नेम धरला व तो भिरकावला; हेक्तरने तो येताना पाहून चुकवला; त्याने त्याच्यावर लक्ष ठेवले व तो खाली वाकला; त्यामुळे भाला त्याच्या डोक्यावरून जाऊन पलीकडे भूमीत रुतला. तेव्हा मिनर्व्हाने तो चटकन् उचलला व हेक्तरला दिसू न देता परत ॲकिलिझला दिला. त्यावर पेलिअसपुत्राला हेक्तर म्हणाला, "ॲकिलिझ, देवांसमान वीरा, तुझा नेम चुकला, आणि माझ्या अंताचा क्षण जव्हने तुला दाखवला अशी खात्री जरी तुला होती तरी जव्हने तो क्षण अजून तुला उघड करून सांगितलेला नाही. मला माझ्या शौर्याचा विसर पडून मी तुझ्यापुढे थरथरा कापेन असे तू स्वतःशी म्हणालास तेव्हा तू असत्यभाषी, मिथ्यावादी होतास. पळून जाणाऱ्या माणसाच्या पाठीत भाला खुपसायला तुला मिळणार नाही-- जर स्वर्गस्थ देवांनी तशी शक्ती तुला दिली तर मी थेट तुझ्याकडे येत असताना तो भाला माझ्यात खुपस; आणि आता तुझ्या स्वतःच्या परीने, तुला शक्य असेल तर माझा भाला चुकव--तो सबंधच तुझ्या देहात घुसेल तर फार बरे होईल; एकदा तू मेलास म्हणजे ट्रोजन्सना हे युद्ध सोपे काम वाटेल, कारण त्यांना सर्वांत जास्त अपाय तूच केला आहेस."

असे बोलताना आपला भाला पेलून त्याने तो भिरकावला. त्याचा नेम अचूक होता, कारण त्याने ॲकिलिझच्या ढालीच्या मध्यावर आघात केला,

पण भाला ढालीचा भेद न करता तिच्यावर उशी घेऊन वर उडाला. आपल्या हातातून वेगाने निघालेले शस्त्र फुकट गेले हे पाहून हेक्तर रागावला व जवळ दुसरा भाला नसल्याने अगतिक होऊन तेथे उभा राहिला. मोठ्याने ओरडून त्याने दैफोबसकडे दुसरा भाला मागितला, पण तेथे कोणीच माणूस नव्हता. तेव्हा त्याने खरे काय ते ओळखून स्वगत म्हटले, "अरेरे! देवांनी मला भुलवून माझ्या नाशाप्रत मला नेले आहे. मी समजलो की वीर दैफोबस माझ्या बाजूला खडा आहे, पण तो तटाच्या आतच आहे व मिनर्व्हाने मला फसवले आहे; मृत्यू खरोखर आता माझ्या फार समीप आहे आणि त्यातून सुटण्याचा काही मार्ग नाही–कारण जव्ह व त्याचा दूरवर बाण टाकणारा पुत्र अॅपॉलो यांची तशीच इच्छा आहे; आतापर्यन्त ते सदा माझ्या संरक्षणार्थ सिद्ध असत, पण आता माझा नाश ओढवला आहे; तेव्हा दुष्कीर्तीने कलंकित होऊन, धडपड न करता मला मरण यायला नको, तर आधी मला असे एकादे महत्कार्य करायला हवे की ज्याबद्दल लोक भविष्यकाळी एकमेकांमध्ये चर्चा करतील."

असे बोलत असता त्याच्या बाजूला लटकणारे ते एवढे मोठे व मजबूत धारदार पाते त्याने उपसले, आणि आपल्या अंगोपांगातील सारी शक्ती गोळा करुन अॅकिलिझवर झेप घेतली–एकादा उंच भराऱ्या मारणारा गरुड ढगांमधून एकाद्या कोकरावर किंवा भित्र्या सशावर झडप घालतो–अगदी त्याचप्रमाणे तलवार परजीत हेक्तरने अॅकिलिझवर उडी घेतली. क्रोधाने वेडचा झालेल्या अॅकिलिझनेही त्याच्यावर तीरासारखी चाल केली, त्यावेळी त्याने त्याची अद्भुत ढाल पुढे धरली होती व त्याचे धातूच्या चार थरांचे चमकणारे शिरस्त्राण पुढच्या बाजूला भीषणपणे डोलत होते. त्याच्यावर व्हल्कनने बसवलेले जाड सोनेरी धाग्यांचे तुरे त्या शिरस्त्राणाभोवती विहरत होते, आणि निःस्तब्ध रात्रीत इतर सर्वांपेक्षा जास्त तेजाने चमकणाऱ्या सायंताऱ्याप्रमाणे अॅकिलिझने नेम धरण्यास उजव्या हाताने उचललेला, उदात्त हेक्तरचा मृत्यू अंतरगात बाळगणारा त्याचा भाला चकाकत होता. जखमी करण्यास सर्वात उत्तम भाग कोणता हे पाहण्यास हेक्तरच्या सुभग देहावरून तो पुनःपुन्हा दृष्टी फिरवीत होता, पण तो देह, पॅत्रोक्लसला मारून काढून घेतलेल्या त्याच्या उत्तम चिलखताने सर्वतोपरी सुरक्षित होता–फक्त कंठापाशी, जेथे आडवी पट्ट्यासारखी हाडे खांद्यापासून गळा विलग करतात, ती जागा असुरक्षित होती; आणि त्याच अत्यंत घातक मर्माच्याठिकाणी, पुढे येत असणाऱ्या हेक्तरवर अॅकिलिझने घाव घातला, व त्याच्या भाल्याचे टोक गळ्याच्या मांसल भागातून पार गेले, पण त्याने श्वासनलिका चिरली गेली नाही, त्यामुळे हेक्तरला अजूनही बोलणे

शक्य होते. तो उलटापालटा होऊन खाली पडला आणि त्याच्यावरून ॲकिलिझने बढाई मारली, "हेक्तर, जेव्हा तू पॅत्रोक्लसचे चिलखत काढून घेत होतास, तेव्हा तुला वाटले की काहीही दुखापत न होता आपण या कृत्यातून वचावून जाऊ; पण त्याच्यावरोबर तेव्हा मी नसल्यामुळे मला तू विचारातच घेतले नाहीस; असा मूर्खपणा तू केलास; कारण त्याच्याहून पुष्कळच प्रबळ असा त्याचा सोबती, मी, तेव्हा अजून नौकांकडे मागेच राहिलो होतो व आता तुला मी लोळवले आहे. त्याचे सर्व युक्त अत्यसंस्कार ॲकिअन्स पार पाडतील तर तुझ्यावर कुत्री व गिधाडे मनसोक्त ताव मारतील."

तेव्हा देहातून प्राण ओसरत चाललेला हेक्तर म्हणाला, "मी तुझ्या जीवाच्या, गुडघ्यांच्या व तुझ्या मातापितरांच्या नांवाने प्रार्थना करतो की, ॲकिअन्सच्या नौकांपाशी माझ्या देहाला कुत्र्यांना फाडून खाऊ देऊ नकोस, तर माझा पिता व माझी माता सोन्याची व ब्रॉझची जी भरपूर संपत्ती तुला देऊ करतील ती स्वीकार व माझा देह घरी पाठव; म्हणजे त्रोजन्स व त्यांच्या स्त्रिया मी मेल्यावर माझ्यावर उचित ते अग्निसंस्कार करू शकतील."

त्याच्याकडे ऋद्धपणे पाहून ॲकिलिझ बोलला, "श्वाना, पाया पडण्याच्या व मातापितरांच्या गोष्टी माझ्यापुढे करू नकोस. कुत्र्यांपासून तुला कोणीही वचावू शकणार नाही याबद्दल माझी जेवढी खात्री आहे तेवढीच खात्री माझे अनिष्ट केल्याबद्दल सूड म्हणून तुझ्या मांसाचे तुकडे तुकडे करून मलाच ते खाता येतील याबद्दल असती तर बरे झाले असते. कारण इतके वाईट तू माझे केले आहेस; ते शक्य नाही आणि त्यांनी जरी दसपट किंवा वीसपट खंडणी आणून इथल्याइथे माझ्यापुढे तोलून दिली व नंतर आणखी देण्याचे वचन दिले, तरीही तू म्हणतोस ते होणे नाही. जरी दार्दानसपुत्र प्रायॅम तुझ्या वजना-इतके सोनें मला देऊ करू लागला, तरीसुद्धा तुझी आई तुझा मृतदेह व्यवस्थित ठेवून आपल्या पोटच्या पुत्राबद्दल शोक कधीही करू शकणार नाही, तर कुत्री व गिधाडे तुला खाऊन तुझा चट्टामट्टा करतील."

तेव्हा मरणसमयी अखेरच्या श्वासाने हेक्तर म्हणाला, "तू कसा आहेस ते मला माहीत आहे, आणि तुझे मन द्रवणार नाही ही मला खात्री होती, कारण तुझे हृदय लोखंडासारखे कठिण आहे; एवढीच खबरदारी घे, की ज्यादिवशी पॅरिस व फीवस ॲपॉलो स्कीॲन वेशीपाशी, तू शूर असलास तरी तुझा जीव घेतील, तेव्हा माझ्याशी केलेल्या वर्तनामुळे स्वर्गस्थांचा कोप तुझ्यावर ओढवणार नाही."

असे तो बोलल्यानंतर मृत्यूच्या प्रेतवस्त्रांनी त्याला लपेटले, तेव्हा त्याचा जीव त्याला सोडून, अतःपर यौवन व बलशाली जीवन उपभोगता येणार नाही

या आपल्या दुःखी दुर्दैवाबद्दल शोक करीत उडत उडत खाली हेदिझच्या गृही गेला. पण अॅकिलिझ त्या मृतदेहाला उद्देशून म्हणाला, "तू मर आता; माझ्याबद्दल बोलायचे तर मी, जव्ह व इतर देव जी दैवगती माझ्यासाठी उचित ठरवतील ती स्वीकारीन."

बोलता बोलता त्या देहातून आपला भाला उपसून काढून त्याने बाजूला ठेवला; मग इतर अॅकिअन्स हेक्तरचे आश्चर्यकारक बलशाली व देखणे शरीर पाहण्यास धावत आले; तेवढ्यात अॅकिलिझने त्याच्या खांद्यावरचे रक्तबंबाळ चिलखत काढून घेतले. जो जो हेक्तरच्या मृतदेहाजवळ आला तो तो त्याला एक नवी जखम केल्याखेरीज राहिला नाही. मग कोणी एकजण शेजाऱ्याकडे वळून म्हणायचा, "हेक्तर आपल्या नौकांवर आग फेकित होता तेव्हापेक्षा आता त्याला हाताळणे सोपे आहे–" आणि असे बोलताना तो आपला भाला पुन्हा त्या मृतदेहात खुपसायचा.

हेक्तरच्या अंगातले चिलखत काढून झाल्यावर अॅकिलिझ आर्गाइव्हज्च्या-मध्ये उभा राहून म्हणाला, "माझ्या मित्रांनो, आर्गाइव्हजच्या राजवंशीयांनो व सल्लागारांनो, बाकी सर्वांनी मिळून केलेल्यापेक्षा अधिक अपाय आपल्याला करणाऱ्या या माणसावर मात करण्याचे यश स्वर्गस्थांनी आपल्याला आता प्रदान केल्यानंतर, आपण सर्व सैन्यानिशी नगरीवर आक्रमण करून त्रोजनांची मनःस्थिती काय आहे त्याचा पत्ता लावावा की नाही याचा विचार करा. असे केले म्हणजे आपल्याला कळून येईल की, आता हेक्तर पडल्यानंतर ते लोक नगरी सोडून देणार आहेत की तो जिवंत नसला तरी आपला प्रतिकार चालूच ठेवणार आहेत. पण अशारीतीने मी स्वतःशीच का युक्तायुक्ताचा विचार करीत बसावे! कारण तिकडे नौकांकडे पॅत्रोक्लस दफनविधी न होता, अजून तसाच पडला आहे. त्याच्याबद्दलचा शोकही अजून पुरा झालेला नाही; मी जिवंत असेपर्यन्त व माझी शक्ती कायम असेपर्यन्त मी ज्याला कधीच विसरू शकणार नाही असा तो पॅत्रोक्लस! माणसे एकदा मेली व हेदिझच्या गृहात गेली की त्यांना त्यांचे स्वकीय विसरतात, पण हेदिझच्यागृही असला तरीदेखील माझ्या त्या गमावलेल्या सोबत्याचे मला विस्मरण होणार नाही. म्हणून आता अॅकिअन तरुणांनो, आपण विजयगानाचा ध्वनी उठवू या व या माणसाला आपल्याबरोबर घेऊन परत नौकांकडे जाऊ या; कारण आपण आज एक महान विजय मिळवला आहे, आणि देव असल्यासारखी साऱ्या नगरीभर त्रोजन ज्याची प्रार्थना करीत होते त्या थोर हेक्तरला ठार केला आहे."

यानंतर त्याने हेक्तरच्या देहाला तिरस्काराने वागविले. त्याच्या पायां-मागील टांचेपासून घोटयापर्यंतचे स्नायू भोसकून काढून त्या फटीतून त्याने बैलाच्या चामडयाच्या वाद्या ओवल्या ; असा तो देह त्याने पायांकडून आपल्या रथाला बांधला व डोके भूमीवर फरपटू दिले. मग ते उत्तम चिलखत रथात घालून स्वतः रथारूढ झाल्यावर त्याने घोडयांवर चाबकाचे फटकारे ओढले, आणि तेही उत्साहाने पुढे धावले. हेक्तर रथामागे फरफटत असता त्याच्या देहापासून धूळ उडाली, त्याचे काळे केस चौफेर उडाले, व एकेकाळी इतके असणारे ते मस्तक भूमीवर नीच स्थितीत पडले. कारण त्याच्याच देशात त्याच्यावर अत्याचार करण्यास त्याला आता जव्हने त्याच्या शत्रूच्या स्वाधीन केले होते.

याप्रमाणे हेक्तरच्या मस्तकाची धुळीत अवहेलना होत होती. आपल्या मुलाकडे पाहून त्याच्या आईने आपले केस उपटले व मोठयाने आक्रोश करीत आपले अवगुंठन फेकून दिले. त्याचा बाप दीनपणे विवळला आणि नगरीभर लोक आक्रोश करून रडू लागले. जणु काय चिंताग्रस्त मुद्रेची सारी इलिअम नगरीच आगीने डागाळली जात होती. उतावीळ घाईने नगराच्या वेशीबाहेर धावणाऱ्या प्राअॅमला मागे खेचून ठेवणे लोकांना कठीण जात होते. चिखलात लोळण घेत तो त्यांना विनवीत होता, प्रत्येकाला नावाने हाक मारून म्हणत होता, "मला सोडा, माझ्या मित्रांनो, व तुम्हाला कितीही दुःख होत असले तरी मला एकटयाला अॅकिअन्सच्या नौकांकडे जाऊ द्या ; या क्रूर व भयंकर माणसाच्या मला विनवण्या करू द्या ; बघू या कदाचित आपल्या जोडीच्याच दुसऱ्या मानवाच्या भावनेला तो मान देईल व माझ्या म्हातारपणाची त्याला दया येईल. त्याचाही बाप अगदी असाच माझ्यासारखा एक वृद्ध आहे——तोच तो पेलिअस, ज्याने त्याला लहानाचा मोठा केला आणि आपणा त्रोजनांचा व इतर सर्वांपेक्षाही अधिक माझा, सर्वनाश होण्यासाठी पोसून वाढवला. यौव-नाच्या ऐन बहारातले माझे अनेक पुत्र त्याने मारले आहेत, आणि त्यांच्यासाठी मी कितीही शोक केला असला तरी, त्यांच्यातल्या एकासाठी,——हेक्तरसाठी त्या सर्वांपेक्षा अधिक शोक मी करतो आहे व माझ्या दुःखाची तीव्रता मला खाली हेदिझगृही पोचवणार आहे. किती बरे झाले असते, जर तो माझ्या बाहुपाशात असताना मरण पावला असता तर ! कारण मग त्याची दुर्दैवी जन्मदात्री माता व मी, दोघाना त्याच्या देहावर अश्रू गाळण्याचा व शोक करण्याचा दिलासा तरी मिळाला असता."

असे तो सतत आसवे ढाळीत बोलला व नगरीतले सारे लोक त्याच्या शोकात सहभागी झाले. मग हेक्युबानें त्रोजनात शोकाचा विव्हल सूर काढला.

"हाय, माझ्या मुला," ती रडत म्हणाली, "आता तू या जगात नाहीस, मग मी कशासाठी जगायचे आता? नगरीभर तू फिरत आहेस म्हणून रात्रंदिवस मी स्वत:ला धन्य मानीत होते ; कारण ट्रॉयमधल्या सर्वांना तू एखाद्या भक्कम आधारस्तंभासारखा वाटत होतास व पुरुष आणि स्त्रिया दोघेही तुला देव मानून हाक देत होती. तू जिवंत होतास तोवर त्यांच्या अभिमानाचे स्थान होतास पण आता तुझ्यावर मरण व विनाश ओढवला आहे."

अद्यापपर्यंत हेक्तरच्या पत्नीने त्याच्या मृत्यूबद्दल काहीच ऐकले नव्हते, कारण तिचा पती वेशीबाहेरच राहिला आहे हे तिला कोणीही येऊन सांगितले नव्हते. वाड्याच्या आतल्या भागात ती आपल्या मागापाशी एक दुहेरी जांभळे वस्त्र विणीत त्याच्यावर अनेक फुलांचे भरतकाम करीत होती. तिने आपल्या दासींना विस्तवावर एक मोठे तीन खुरांचे भांडे ठेवण्यास सांगितले. हेक्तर लढाईतून परत आल्यावर त्याच्या स्नानासाठी उष्णजल त्यात तयार होत होते. गरीब विचारी स्त्री! तिला माहीत नव्हते की तो आता स्नानाच्या हद्दीत उरलेला नाही व मिनर्व्हानें त्याला ॲकिलिझच्याहस्ते जमीनदोस्त केला आहे. तटावरून येत असल्यासारखा रडण्याचा आवाज तिने ऐकला व तिचे अंगप्रत्यंग थरथरा कापू लागले. तिच्या हातातून धोटा पडला व पुन्हा ती दासींना म्हणाली, "तुमच्यातल्या दोघींजणी माझ्याबरोबर चला म्हणजे झाले आहे तरी काय ते मला समजेल. माझ्या पतीच्या माननीय मातेचा आवाज मी ऐकला ; माझे काळीज इतक्या जोराने धडधडत आहे की ते तोंडावाटे बाहेर पडेल की काय असे वाटते व माझे पाय चालेनासे झाले आहेत. प्रायॅमच्या मुलावर काहीतरी मोठे दुर्दैव ओढवले असले पाहिजे. ते ऐकायला मी कधीही जिवंत न राहो, पण मला फार भीती वाटते की शूर हेक्तरच्या माघारीची वाट ॲकिलिझने तोडली आहे व त्याचा पाठलाग करीत त्याला मैदानावर एकाकी गाठले आहे. स्वत:च्या सैनिकसमूहाबरोबर कधीही न राहता एकटाच पुढे दूर धावणाऱ्या, शौर्यात सर्वांच्यापुढे असणाऱ्या माझ्या पतीला ज्या अविचारी साहसाने पछाडले होते त्याचा ॲकिलिझने शेवट करून टाकला असावा अशी मला भीती वाटते आहे."

तिचे हृदय जलद धडधडू लागले आणि बोलता बोलताच ती घरातून वेड लागल्यासारखी वेगाने बाहेर पडली व तिच्या दासी तिच्या मागे गेल्या. ती तटबंदीवर व तेथील गर्दीत जेव्हा पोहोचली, तेव्हा तटावरून दूरवर पाहात उभी राहिली, आणि नगरीसमोरच्या भूमीवरून, ॲकिअन्सच्या नौकांकडे, घोड्यांकडून बेपर्वाईने व बेदरकारपणे ओढला जात असलेला हेक्तर तिच्या

दृष्टीस पडला, तेव्हा रात्रीच्या अंधःकाराप्रमाणे तिच्या डोळ्यावर पटल आले व ती घेरी येऊन मागे पडली. तिने मस्तकावरील शिरोभूषण ओढून दूर फेकून दिले. ती विणलेली पट्टी असलेली बिंदी, व जाळी व मुखावगुंठनाची ओढणी, तिला व्हीनसने दिली होती ; जेव्हा एइशनच्या घरातून तिच्यासाठी प्रियाराधनार्थ असंख्य देणग्या दिल्यावर हेक्तर आपली वधू म्हणून तिला बरोबर घेऊन गेला होता तेव्हा व्हीनसने ती तिला दिली होती. तिच्या नणंदा व जावा तिच्याभोवती गोळा झाल्या आणि त्यांनी तिला सावरून धरले, कारण त्या दुःखवेगात ती स्वेच्छेने मरण्यास तयार झाली होती ; पुन्हा थोड्याच वेळात जेव्हा तिचा श्वासोच्छ्वास सुरू झाला व ती शुद्धीवर आली तेव्हा हुंदके देऊन तिने त्रोजनांसमोर आक्रोश केला, "हाय, खरोखर दुर्दैवीच मी! हे हेक्तर, हे खरोखर दुर्दैवच की आपण कर्मभोगाचे समान वाटेकरी होण्यास जन्मलो, तू प्राअॅमच्या घरात त्रॉयला, व मी प्लकसच्या वनाच्छादित पर्वताखाली थीब्स-मध्ये एइशनच्या घरात ; त्याने बाळपणी माझे संगोपन केले ; तो अभागिनी कन्येचा अभागी पिता——त्याने जर कधी मला जन्मालाच घातले नसते तर किती बरे झाले असते! तू आता पृथ्वीखालील गुप्तस्थळी हेदिझच्या घरी चालल्लास व मला तुझी दुःखी विधवा म्हणून तुझ्या घरी मागे ठेवलेस. तू व मी ज्याची दुःखीकष्टी मातापितरे, ते मूल तर अजून केवळ अर्भकच आहे. आता तू गेल्यावर त्याच्यासाठी तुला किंवा तुझ्यासाठी त्याला काहीच करता येणार नाही. अॅकिअन्सबरोबरच्या या दुःखद युद्धाच्या घोर प्रसंगातून तो जरी वाचला, तरी यापुढे त्याचे जीवन कष्टाचे व दुःखाचेच राहणार, कारण दुसरे लोक त्याची मालमत्ता बळकावणार. मुलाचे आईबाप हरपलेल्या दिवसापासून त्या मुलाची स्वजातीयांपासूनही ताटातूट होते ; त्या दिवसा-पासून त्या मुलाची मान सदा खाली राहते, त्याचे गाल आसवांनी भिजलेले असतात आणि बापांच्या मित्रांमध्ये, एकाचा झगा तर दुसऱ्याचा अंगरखा सहाय्यार्थ ओढीत निराधार असा फिरण्याची वेळ त्याच्यावर येते. बापाच्या मित्रांपैकी एकादा दुसरा फारतर एवढीशी दया दाखवून, त्याचे ओठ भिजण्या-पुरता पेला त्याच्या तोंडाशी धरतो, पण तोंडाची टाळू भिजण्याइतका घोट मात्र तो त्याला घेऊ देत नाही ; मग ज्याचे आईबाप जिवंत आहेत असा कोणी एकादा जेवणाच्या मेजावरून त्याला मारुन ओरडून घालवून देईल. तो म्हणेल, "चालता हो, इथे तुझा बाप बसलेला नाही!" आणि मूल मग आपल्या विधवा आईकडे रडत जाईल——हा, अॅस्तिअॅनॅक्स,——जो पूर्वी आपल्या वडलांच्या मांडीवर बसायचा, आणि सर्वांत नाजुकसाजुक व निवडक जिनसांशिवाय दुसरा

कुठलाही घास पानात पडू द्यायचा नाही, थकेपर्यंत खेळून झाले व झोपी गेला म्हणजे दाईच्या कुशीत मऊ शय्येवर पहुडायचा ; न्यून किंवा चिंता कशी ती त्याला ठाऊकच नव्हती, कधी काही न्यून असे त्याला पडले नाही—तोच आता पितृहीन झाल्यावर त्याचे नशीब खडतर होणार. त्रोजन्सनी त्याचे अॅस्तिॲनॅक्स हे नाव ठेवले, कारण हेक्तर, त्यांच्या वेशींचा व बुरुजांचा एकटा तूच रक्षक होतास. जरी तुझ्या घरात स्त्रियांनी स्वहस्ते विणलेली उत्तम सुंदर वसने आहेत तरी, आईबापांपासून दूर तू नग्न असा पडून राहिला असता नौकांपाशी आता तुझ्यावर ताव मारून कुत्री तृप्त झाली म्हणजे मग तुला वळवळणारे चुळबुळणारे किडे खातील. ती आता मी जाळून टाकते, तुझ्या ती काही कामाची नाहीत, कारण पुन्हा कधीही ती तू परिधान करणार नाहीस, आणि त्रोजन पुरुषांकडून व स्त्रियांकडूनही तुझ्याप्रीत्यर्थ आदर अशारीतीने व्यक्त होईल."

अशाप्रकारे तिने अश्रू ढाळीत मोठ्याने आक्रोश केला आणि तिच्या शोकात सर्व स्त्रिया सहभागी झाल्या.



## सर्ग २३

असा नगरीभर त्रोजनांनी आक्रोश केला; दरम्यान अॅकिअन्स जेव्हा हेलेस्पाँतला पोहोचले तेव्हा प्रत्येक मनुष्य आपापल्या नौकेवर गेला; पण अॅकिलिझ मिर्मिदाॅन्सना जाऊ देईना आणि तो आपल्या शूर सोबत्यांना म्हणाला, "मिर्मिदाॅनांनो, विख्यात घोडेस्वारांनो व माझ्या स्वतःच्या विश्वासू मित्रांनो, खरोखर आपण घोडे धुरेपासून इतक्यात सोडू नयेत, तर घोडे जोडलेले रथ पॅत्रोक्लसच्या देहाजवळ घेऊन जाऊन योग्य सन्मानासह त्या मृत वीराबद्दल शोक करू या. विलापानं आपल्याला पुरेसा दिलासा मिळाला म्हणजे मग आपले घोडे सोडवून आपण सर्वजण येथे रात्रीचे भोजन करू."

यावर ते सगळे आक्रोशपूर्ण शोकात सहभागी झाले आणि त्यांच्या विलापात अॅकिलिझने पुढाकार घेतला. सर्वांनी शोक करीत मृतदेहाला आपले रथ हाकीत तीन प्रदक्षिणा घातल्या आणि थेतिसने त्यांच्या हृदयातील व्याकुळतेचे भाव अधिकच तीव्र केले. त्यांच्या रडण्याने सागरतटीची रेती व लोकांची चिलखते भिजली, कारण शत्रूंना धाक घालणारा असा तो थोर वीर त्यांनी गमावला होता. त्या सर्वांच्या विलापात पेलिअसपुत्राने प्रमुख भाग घेतला होता. आपला रक्तलांछित हात मित्राच्या छातीवर ठेवून तो म्हणाला, "हेदिझगृहीसुद्धा सुखाने नांद पॅत्रोक्लस; तुला पूर्वी वचन दिल्याप्रमाणे सर्व काही मी करीन; हेक्तरला येथे ओढून आणून कच्चाच कुत्र्यांना खायला घालीन. तुझ्या सूडाखातर त्रोजन्सचे बारा उच्चकुलीन पुत्रही तुझ्या चितेपुढे मी ठार मारीन."

असे बोलत असता उदात्त हेक्तरचा देह त्यानं तिरस्कारपूर्णरीत्या वागवला, व पॅत्रोक्लसच्या शवशय्येपाशी धुळीत तो देह पसरून ठवला. मग इतरांपैकी प्रत्येकाने आपले चिलखत काढून ठेवले, रथांचे घोडे सोडवले, आणि वेगवान ईकस-वंशजाच्या नौकांपाशी मोठ्या संख्येने ते आसनस्थ झाल्यावर त्याने त्यांना विपुल औध्र्वदेहिक महाभोज दिला. कित्येक उत्तम बैल, तशीच अनेक मेंढरे व 'बेंबें' करणारे बकरे मारून कापून ठेवले होते; शिवाय लठ्ठ व पुष्ट असे अनेक सुळे असणारे वराह किंचित होरपळून व्हल्कनच्या ज्वाळात भाजायला ठेवले; आणि जेथे तो मृतदेह पडला होता त्याभोवती सर्वत्र रक्ताच्या छोट्या नद्याच वाहू लागल्या.

मग ॲकिअन्सच्या राजवंशीयांनी पेलिअसपुत्रास अॅगॅमेम्नॉनकडे नेले; पण त्यांच्याबरोबर जाण्यासाठी त्याचे मन वळविणे त्यांना फार कठिण पडले, इतका आपल्या सोबत्याच्या मरणाने तो क्षुब्ध झाला होता. अॅगॅमेम्नॉनच्या तंबूपाशी पोहोचताच पेलिअसपुत्र आपल्या शरीरावरचे वाळून गुठळचा झालेले रक्त धुऊन काढण्यास कबूल झाल्यास पाणी तयार असावे म्हणून परिचारकांना त्यांनी अग्नीवर मोठे तीन खुरांचे भांडे ठेवण्यास सांगितले, पण ॲकिलिझने निर्धाराने त्यांची विनंती नाकारली, आणि गंभीर प्रतिज्ञा केली की " नाही, आद्य व सर्व-प्रबळ जव्ह राजाच्याशपथ, पॅत्रोक्लसला अग्नी दिल्याशिवाय, त्याच्या प्रीत्यर्थ एक मातीचा ढीग बांधल्याशिवाय मी माझ्या मस्तकाचे मुंडण केल्याशिवाय पाण्याचा स्पर्श माझ्या शरीराला होणे उचित नाही--कारण मी जिवंत आहे तोवर असे दुसरे दुःख काही माझ्या समीप येणार नाही. म्हणून आता या दुःखी समारंभाला अवश्य ते सारे आपण करू या, पण दिवस उजाडताच, राजन् अॅगॅमेम्नॉन, तुझ्या लोकांना लाकडें आणायला सांग, व मृतांनी अंधःकाराच्या राज्यात जे जे काही रीतसर बरोबर न्यायचे असते ते इतर सारे पुरविण्याची व्यवस्था त्यांना करू दे; म्हणजे मग अग्नी तितक्याच लौकर त्याला भस्मीभूत करून आपल्या दृष्टीआड करील व लोकांना पुन्हा स्वतःच्या कामाकडे वळता येईल."

असे तो बोलला आणि त्यांनी तो म्हणाला होता तसेच सारे केले. त्यांनी भोजन सिद्ध करण्याची त्वरा केली, जेवण केले व प्रत्येक माणसाला त्याचा पुरा वाटा मिळाला, त्यामुळे सगळे संतुष्ट झाले. त्यांचे खाणेपिणे हवे तेवढे झाल्या-वर इतर आपापल्या तंबूत विश्रांतीसाठी गेले, पण पॅलिअसपुत्र मात्र गरजणाऱ्या सागराच्या किनारी, एका खुल्या जागेवर, जेथे लाटा उसळत एकामागून एक येत होत्या तेथे, आपल्या मिर्मिडॉन्समध्ये दुःख करीत पडला. तेथे त्याला अत्यंत गाढ झोप लागली व त्याच्या दुःखाचा भार हलका झाला; कारण सारखा वारा वहात असलेल्या इलिअमभोवती हेक्तरचा पाठलाग करून त्याचे हातपाय शिणले होते. लौकरच, जिवंतपणी उंची, आवाज व डोळ्यातली चमक, त्याचप्रमाणे वस्त्रेही जशी होती, तशाच स्वरूपात पॅत्रोक्लसचा खिन्न आत्मा ॲकिलिझजवळ आला व त्याच्या डोक्यावर तरंगत रहात म्हणाला,

" ॲकिलिझ, तू झोपला आहेस व मला विसरून गेला आहेस ; मी जिवंत असताना तू माझ्यावर प्रेम ठेवलेस ; पण आता मी मेल्यावर मात्र माझा काही विचारही तुझ्या मनात येत नाही. मला शक्य तितक्या त्वरेने मूठमाती दे म्हणजे मी हेदिझच्या वेशीतून पार होईन. ज्या माणसाना अतःपर क्रियाशील

रहाता येत नाही त्यांची भुते, त्यांच्या नगण्य छाया त्या वेशींपासून मला दूर घालवून देत आहेत; नदीपलीकडे असलेल्यांमध्ये मला जाऊ देत नाहीत, आणि हेदिझगृहाच्या त्या विस्तीर्ण वेशींपाशी सर्वस्वी अगतिक असा मी भटकतो आहे. मी तुला विनवतो की यावेळी तुझा हात माझ्या हाती दे, कारण एकदा मला उचित ते अग्निसंस्कार तू केलेस की पुन्हा कधीही हेदिझच्या गृहातून मी बाहेर येणार नाही. फिरून केव्हाही आपण दोघे जिवंत माणसात एका बाजूला बसून सुखद मंत्रणा करणार नाही ; माझे जन्मादारभ्य जे निष्ठुर दैव त्याने माझ्याभोवती आपला रुंद जबडा वासला आहे—नव्हे, तूही देवतुल्य ॲकिलिझ, उदात्त ट्रोजन्सच्या तटाखाली मरणार हे विधीलिखित आहे.

"तू जर मानणार असशील तर आणखी एक मागणे तुझ्याकडे मागायचे आहे ; माझ्या अस्थींचा निक्षेप तुझ्या अस्थींपासून दूर होऊ नये तर त्यांच्या समीपच व्हावा ; तुझ्या स्वतःच्या घरात आपण दोघे जसे एकत्र वाढविले गेलो तशाच प्रकारे त्याही एकत्र असाव्या. जेव्हा तुमच्याकडे मेनिशिअसने मला माझ्या बाल वयात ओपोईसहून आणले, तेव्हापासून आपण बरोबरीने लहानाचे मोठे झालो. कारण मी खेदकारक आकसाने, हेतुपूर्वक नव्हे, पण फासे खेळताना बालिश भांडणाच्याभरात ॲम्फिडॅमाजच्या मुलाचा जीव घेतला होता. उच्चकुलीन सरदार पेलिअस याने मला आपल्या घरात घेतले, दयाळूपणे वागवले व मला तुझा शिलेदार करण्याचे ठरवले ; म्हणून आपल्या दोघांच्या अस्थी एकाच कलशात, तुझ्या मातेने तुला दिलेल्या त्या दोन कानांच्या सुवर्णपुष्पपात्रात राहाव्या."

आणि ॲकिलिझने उत्तर दिले, "हे एकनिष्ठ जीवा, ही कामे मजवर सोपविण्यास तू इकडे कशाला आला आहेस ? तू सांगितलेस ते सगळे मी आपण होऊन करीन. माझ्या आणखी जवळ ये, आणखी एकदा आपण आपले बाहू एकमेकांभोवती गुंफू व एकमेकांच्या दुःखात वाटेकरी होण्याचा खिन्न दिलासा मिळवू."

बोलताना त्याच्या दिशेने त्याने हात पसरले, ॲकिलिझला आपल्या मित्राला मिठीत घ्यायचे होते, पण तेथे काहीच नव्हते ; पुटपुटत, कुरकुरत ते भूत वाफेसारखे भूमीत अदृश्य झाले. ॲकिलिझ उडी मारून उठून उभा राहिला, त्याने हातांवर हात आपटले आणि विलाप केला, "खरोखर हेदिझगृहीदेखील प्राण नसलेली भुते व पिशाच्चे असावीत. सारी रात्रभर, अगदी आश्चर्य वाटण्याइतका हुबेहूब त्याच्यासारखा दिसणारा पॅत्रोक्लसचा दुःखी प्रेतात्मा माझ्या डोक्यावर घोटाळत करुणपणे विव्हळून त्याच्यासाठी मी काय करावे ते मला सांगत होता."

तो असे बोलला आणि त्याच्या शब्दांनी त्या सर्वांनी रडत बिचाऱ्या मूक मृतासाठी अरुणांगुली प्रभात प्रगट होईपर्यंत शोक केला. मग ॲगॅमेम्नॉन राजाने छावणीच्या सर्व भागातून माणसे व खेचरे लाकडे आणण्यासाठी पाठविली आणि आयदोमिनिअसचा शिलेदार मेरिऑनिझ त्यांच्यावरचा अधिकारी होता. लाकुडतोडयांच्या कुऱ्हाडी व बळकट दोरखंड हाती घेऊन ते लोक बाहेर पडले आणि त्यांच्यापुढे खेचरे चालली. टेकडीवर चढत व खोऱ्यात उतरत, सरळ वा वाकडयातिकडचा मार्गांनी ते गेले आणि जेव्हा अनेक निर्झर असलेल्या इदा-पर्वताच्या उत्तुंग भागावर ते गेले व त्यांनी अनेक उंच फांद्याफांद्यांच्या ओक-वृक्षांच्या मुळांवर कुऱ्हाडी चालवून ते खाली आणले, तेव्हा मेघगर्जनेसारखा त्यांच्या पडण्याचा गडगडाट झाला. झाडांची लाकडे फोडून त्यांनी ती खेच-रांच्या मागे बांधली आणि ती खेचरे दाट ठेंगण्या झुडुपाजाळ्यातून जमेल तसा मार्ग काढीत मैदानाकडे गेली. आयदोमिनिअसचा शिलेदार मेरिऑनिझ याने दिलेल्या आज्ञेनुसार ज्यांनी ज्यांनी झाडे तोडली होती त्या सर्वांनी ओंडके वाहून नेले, आणि जेथे ॲकिलिझ पॅत्रोक्लससाठी व स्वत:साठी भव्य स्मारक उभारणार होता त्याठिकाणी सागरतीरावर ते ओळीने टाकले.

त्या सबंध भूमीवर त्यांनी ते प्रचंड ओडके टाकल्यानतर, ते होते त्या जागीच उभे राहिले; पण ॲकिलिझने आपल्या शूर मिर्मिदॉनांना चिलखते चढवून आपापल्या सारथ्यांसह रथारुढ होण्यास सांगितले. त्याप्रमाणे ते सारे उठले, त्यांनी आपली चिलखते चढवली व आपल्या सारथ्यांसह ते आपापल्या रथांवर चढले. रथ पुढे चालले व पायी चालणारे दशसहस्त्रांच्या संख्यांनी मेघांसारखे रथांमागे गेले. त्यांच्या मध्यभागी पॅत्रोक्लसला त्याच्या सोबत्यांनी वाहून नेले आणि त्यांनी आपल्या केसांची झुलपे कापून त्याच्या देहावर टाकली व देह आच्छादून टाकला. शेवटी ॲकिलिझ आला ; आपला इतका उदात्त सोबती हेदिझच्या घरी नेताना त्याने दु:खभाराने डोके खाली घातले होते.

ॲकिलिझने सांगितलेल्या ठिकाणी जेव्हा ते आले तेव्हा त्यांनी मृतदेह खाली ठेवला. लाकडाची चिता रचली. मग ॲकिलिझच्या मनात दुसरा एक विचार आला. चितेपासून थोडया अंतरावर जाऊन त्याने स्पर्केइअस नदाच्या नवसाप्रीत्यर्थ वाढू दिलेले आपल्या पिवळ्या केसांचे झुलुप कापले. कृष्णवर्ण सागराकडे अगदी खेदपूर्वक पाहून तो म्हणाला, "स्पर्केइअस, माझ्या प्रिय जन्म-भूमीला मी घरी परत येईन तेव्हा मी हे झुलुप कापून तुला ते एक पवित्र यज्ञाहुती म्हणून अर्पण करावी असा नवस तुला माझ्या पित्या पेलिअसने व्यर्थच केला म्हणायचा ! तेथे तुझ्या उगमापाशी मी तुला पन्नास बोकड यज्ञबळी म्हणून

द्यायचे होते—जेथे तुझी वृक्षवाटिका व अग्नीत टाकलेल्या आहुतींनी सुगंधित अशी तुझी वेदी आहे त्या ठिकाणी हा विधी व्हायचा होता. असा नवस माझ्या पित्याने केला, पण त्याच्या प्रार्थनेचे फळ तू दिले नाहीस ; तेव्हा आता ज्याअर्थी माझे घर मी पुन्हा पाहणार नाही त्याअर्थी हे झुलुपे वीर पॅत्रोक्लसला माझे स्मृतिचिन्ह म्हणून मी जतन करून ठेवण्यासाठी देतो."

असे बोलताना त्याने ते झुलुप आपल्या प्रिय सोबत्याच्या हातात ठेवले, व बाजूला उभे असणारे सगळे व्याकुळतेने व शोकाने भारावून गेले. त्या शोकाविष्ट स्थितीत ते दिवस मावळेपर्यंत राहिले असते, पण थोड्याच वेळाने ॲकिलिझ ॲगॅमेम्नॉनला म्हणाला, "ॲत्रिअसपुत्रा, शोक करण्याची वेळ असते तशीच शोक थांबवण्याचीही ; तुझे सांगणे हे लोक ऐकतील, म्हणून त्यांना आता चितेपासून दूर होऊन आपापल्या भोजनाच्या कामाला लागण्यास सांग ; येथे जे काय करायला हवे असेल ते, ज्यांना मृतवीर परमप्रिय होता ते आम्ही पाहू, व इतर राजवंशीयही माझ्याजवळ राहू देत."

हे ऐकून ॲगॅमेम्नॉन राजाने लोकांना आपापल्या नौकांकडे जाण्याची आज्ञा दिली ; पण मृतदेहाभोवती जे होते त्यांनी शंभर फूट लांबी-रुंदीची एक चिता रचली, मग त्यांनी अत्यंत दुःखित अंतःकरणाने तो देह चितेवर ठेवला. त्यांनी अनेक मेंढ्या व बैल सोलून त्यांचे मांस सिद्ध करून चितेपुढे ठेवले व त्या सर्व प्राण्यांची वसा घेऊन तिच्यात ॲकिलिझने तो देह आपादमस्तक लपटला आणि त्याभोवती मृतपशूंच्या सोललेल्या देहांचा ढीग रचला. शवशय्येला टेकून त्याने मधाने भरलेले दोन कानांचे कुम्भ व अभ्यंजने ठेवली. मग विव्हळ स्वर करीत त्याने चार उमदे घोडे चितेवर टाकले. मृतवीराचे नऊ पाळीव कुत्रे होते, त्यातले दोन ॲकिलिझने मारून चितेवर टाकले ; त्याचप्रमाणे उच्चकुलीन ट्रोजनांचे बारा शूर पुत्र खड्गाने मारून तेही इतर बळींसह चितेवर ठेवले, कारण त्याचे मन प्रक्षोभाने व कटुतेने व्याप्त झाले होते. मग सर्वांना त्याने अप्रतिकार्य व सर्वभक्षक अग्नीच्या स्वाधीन केले ; तो मोठ्याने विव्हळला व आपल्या मृत सोबत्याला नावाने हाक मारून म्हणाला, "पॅत्रोक्लस, हेदिझच्या गृहीदेखील सुखाने नांद ; तुला कबूल केलेले सर्व काही मी आता करीत आहे. तुझ्याबरोबर ट्रोजनांचे बारा उच्चकुलीन पुत्र अग्निज्वाळा दग्ध करतील, पण प्राॲमपुत्र हेक्तरचे मांस मात्र अग्नी नव्हे तर कुत्री फाडून खातील."

याप्रमाणे त्याने दर्पोक्ती केली, पण हेक्तरच्या देहाभोवती कुत्री फिरकली नाहीत, कारण ज्व्हकन्या व्हीनसने रात्रंदिवस त्यांना दूर ठेवले होते व त्याचा देह ॲकिलिझ फरफटत नेत असता तो छिन्नविछिन्न न व्हावा म्हणून त्याला

अमृतयुक्त गुलाबतेलानं विलेपित केले होते. शिवाय अॅपोलोने स्वर्गातून पृथ्वीवर एक कृष्णमेघ धाडून हेक्तरचा देह सूर्याच्या उष्णतेने सुकू नये म्हणून तो पडलेल्या सबंध जागेवर सावली केली होती.

पण आता मृत पॅत्रोक्लसच्या भोवतालची चिता पेट घेईना. तेव्हा अॅकिलिझला दुसरी एक गोष्ट सुचली ; एका बाजूला जाऊन त्यानं बोरिआज व झेफिरस या दोन वायुंची प्रार्थना करून, त्यांना उत्तम उपायनं वाहीन म्हणून नवस केला. आपल्या सोन्याच्या पेल्यातून त्याने त्यांना अनेक मद्याचे अर्घ्य दिले आणि लाकडे त्वरेने पेटून मृतदेह लौकर भस्म व्हावे यासाठी त्या वाऱ्यांनी येऊन मदत करावी असे विनविले. वेगवती आयरिसनं तो प्रार्थना करीत असता ऐकले व वाऱ्यांना घेऊन येण्यास ती निघाली. ते बंडखोर झेफिरसच्या घरी थाटात महाभोज करीत होते, तेथे दाराच्या दगडी उंबरठ्यावर आयरिस धावत येऊन उभी राहिली ; तिला पाहताच तात्काळ ते सगळे तिच्याकडे आले, आणि प्रत्येकानं तिला आपल्याजवळ बसण्यास बोलावले ; पण ती स्थानापन्न होईना, ती म्हणाली, "मला थांबता येत नाही, ओशिअॅनसच्या प्रवाहाकडे व इथिओपिअनांच्या भूमीकडे मला परत जायला हवे, कारण ते अमरांप्रीत्यर्थ यज्ञ करीत आहेत व माझा हविर्भाग मला घ्यायचा आहे ; पण अॅकिलिझची प्रार्थना आहे की बोरिआज व कर्कशस्वर झेफिरस यांनी त्याच्याकडे यावे, आणि त्यांना उत्तम उपायनं तो देऊ करीत आहे ; त्याची अशी इच्छा आहे की, सर्व अॅकिअन्स ज्याच्यासाठी शोक करीत आहेत त्या पॅत्रोक्लसच्या चितेवर तुम्ही फुंकर घालून ती चेतवावी."

असे सांगून ती त्यांच्यापासून निघून गेली, आणि ते वायू अंतरिक्ष फाडून ढगांना पुढे लोटणारा आवाज करीत वाहू लागले. समुद्रावर पोहोचेपर्यंत ते पुढेपुढे वाहातच राहिले, आणि त्यांच्याखाली समुद्राच्या लाटा उंचावल्या; पण जेव्हा ते त्रॉयला पोहोचले तेव्हा त्यांनी चितेवर मारा केला आणि त्यांनी सोडलेल्या प्रचंड झोताने प्रचंड ज्वाळा धडाडून पेटू लागल्या. साऱ्या रात्रभर जोरजोरात वाहून त्यांनी अग्नीवर भडिमार केला, आणि साऱ्या रात्रभर अॅकिलिझ सोन्याच्या मिश्रणपात्रातून मद्य काढून घेत, व मृत पॅत्रोक्लसच्या आत्म्याला आवाहन करीत आपला दुप्पट आकाराचा भरलेला पेला हाती धरून भूमी भिजून चिंब होईपर्यंत मद्याचे अर्घ्य देत होता. ज्याच्या मरणाने मातापितरांची हृदये पिळवटून निघाली आहेत, अशा नवपरिणीत पुत्राच्या अस्थींना अग्नी देताना बाप जसा शोक करतो, तसाच शोक अॅकिलिझने चितेभोवती प्रदक्षिणा घालीत दीनपणे विवळत व विलाप करीत केला.

अखेर केशरी झगा घातलेली उषा जो प्रकाश लौकरच सागरावर पसरणार होती, त्याची पूर्वसूचना देणारा प्रभाततारा जेव्हा उगवू लागला, तेव्हा ज्वाळा शांत झाल्या व अग्नी विझू लागला. मग ते वायू थेसिअन समुद्रावरून स्वगृही गेले तेव्हा ते वरून सोसाटयाने जात असता खाली तो समुद्र गर्जना करून उसळ्या घेऊ लागला. आता चितेपासून पेलिअसपुत्र दूर झाला आणि थकून भागून आडवा झाला व लौकरच त्याला शांत झोप लागली. थोडया वेळाने जे लोक अॅत्रिअसपुत्राच्या जवळपास होते ते एकत्र जमून समीप आले आणि त्यांच्या पायरवाने व गडबडीने अॅकिलिझ जागा झाला. तो उठून ताठ बसला व म्हणाला, "अॅत्रिअसपुत्रा व अॅकिअनांचे अन्य राजपुरुषहो, प्रथम चितेवर सर्वत्र लाल मदिरा ओतून अग्नी विझवून टाका, नंतर आपण मेनिशिअसपुत्र पॅत्रोक्लसच्या अस्थी काळजीपूर्वक वेचून काढून गोळा करू या ; त्या सहज सापडतील, कारण त्या चितेच्या मध्यभागीच पडल्या आहेत ; बाकी सगळ्या, माणसांच्या व घोडयांच्याही चितेच्या बाहेरच्या कडेला पूर्ण जळलेल्या अशा एका राशीत पडलेल्या आहेत. अस्थी आपण एका सुवर्णकुम्भात वसेच्या दोन थरांमध्ये ठेऊ ; त्या मी स्वत: खाली हेदिझगृही जाईपर्यंत तशाच राहू देत. मातीचा जो ढिगारा करायचा, तो आताच फार मोठा करण्याचे श्रम घेऊ नका, वाजवी आकाराचाच करा. नंतर, मी गेल्यावर मागे नौकांवर जे अॅकिअन्स शिल्लक उरतील त्यांनी तो ढिगारा रुंद व उंच असा बांधावा."

असे तो बोलला आणि पेलिअसपुत्राचा शब्द त्यांनी मानला. प्रथम त्यांनी राखेच्या जाड थरावर रक्त मदिरा ओतून अग्नी विझवला. नंतर सतत अश्रू गाळीत त्यांनी आपल्या आवडत्या सोबत्याच्या शुभ्र झालेल्या अस्थी निवडून सुवर्णकुम्भात वसेच्या दोन थरात ठेवल्या ; मग त्यांनी तागाच्या वस्त्राने तो कुंभ झाकून तंबूच्या आत नेला. मातीचा ढिगारा जेथे हवा तेथे त्यांनी खुणेचे वर्तुळ काढले; त्या ढिगाऱ्यासाठी चितेजवळ पाया खणला, आणि तात्काळ मातीचा ढीग रचला. असा ढिगारा उभारल्यावर ते निघून जात होते, पण अॅकिलिझने त्यांना थांबवून सभेसाठी बसविले. त्याने नौकांमधून पारितोषिकें आणली---कढया, तिवया, घोडे व खेचरे, उमदे बैल, सुरेख मेखला घातलेल्या स्त्रिया आणि काळेशार लोखंड अशा त्या वस्तू होत्या.

त्याने पहिले पारितोषिक देऊ केले ते रथ स्पर्धासाठी---सर्व उपयुक्त कलात प्रवीण अशी एक स्त्री, आणि बावीस मापे मावतील एवढी एक तीन पायांची व धरायला दोन कान असलेली कढई; पहिला येईल त्याच्यासाठी या वस्तू. दुसरा येणाऱ्यासाठी एक दौडीसाठी अद्यापी तयार न केलेली, व गर्दभ नरापासून

गाभण असलेली सहावर्षाची घोडी ; तिसऱ्याला मिळणार होती विस्तवावर अजून कधी न ठेवलेली, चार मापे मावतील एवढी एक उत्तम कढई ; ती घडविणाऱ्याकडून आल्याइतकीच अजून चकचकीत होती. चौथे पारितोषिक दोन तॅलेन्त भार सोने आणि पाचवे होते अद्यापि धुराने मलिन न झालेला एक दोन मुठींचा कुम्भ. मग ॲकिलिझ आर्गाइव्हज्‌मध्ये उभा राहून म्हणाला :

"ॲत्रिअसपुत्रा व इतर सर्व ॲकिअन्सहो, रथस्पर्धा जिंकणारांसाठी ही पारितोषिके येथे वाट पहात पडली आहेत. दुसऱ्या कोणत्याही प्रसंगी पहिले पारितोषिक मी जिंकून माझ्या स्वतःच्या तंबूत नेले असते---इतर सगळ्यांपेक्षा माझे घोडे कितीतरी वरचढ आहेत हे तुम्ही जाणताच---कारण ते अमर आहेत. ते नेपच्यूनने माझा पिता पेलिअस याला दिले व त्याने मग आपल्यापरीने ते मला दिले ; पण मी या स्पर्धेतून बाजूला राहीन, मी आणि माझे घोडेही, ज्याने पुष्कळदा स्वच्छ पाण्यात त्यांना धुवून त्यांच्या आयाळींना तेलविलेपन केले, तो शूर व ममताळू सारथी गमावून बसलो आहोत---बघा ते येथे कसे रडत उभे आहेत, दुःखातिशयाने माना झुकल्यामुळे त्यांच्या आयाळी भूमीवर लोळत आहेत. पण तुम्ही इतर सर्व सैन्यभर आपापली तयारी करा ; ज्याचा ज्याचा आपल्या घोड्यांवर भरवसा असेल व आपल्या रथांच्या बळकटीबद्दल खात्री असेल, ते ते सारे पण शिस्तवार पुढे या."

पेलिअसपुत्र असे बोलला व रथांच्या सारथ्यांनी हालचाल सुरू केली. त्यांच्यामधून पहिल्याने उठला अश्वारोहणपटु, ॲड्‌मेतसचा पुत्र नृपती युमेलस ; त्याच्यामागून तायदिअसपुत्र बलाढ्य दायोमिद उठला ; ॲपॉलोने ईनिआसला लढाईतून बाहेर काढून नेले त्यावेळी त्याचे जिंकून आणलेले त्रोजन घोडे दायोमिदने धुरेला जुंपले. त्याच्यानंतर पीतकेशी ॲत्रिअसपुत्र मेनेलॉस उठला व त्याने आपली वेगवान जोडी रथाला जोडली ; त्यापैकी एक होती ॲगॅमेम्नॉनची घोडी इथी व दुसरा त्याचा स्वतःचा घोडा पोदॅर्गस होता. ती घोडी ॲगॅमेम्नॉनला अँकायसिसपुत्र एकेपोलसने अशासाठी दिली होती की स्वतःला त्याच्यामागे इलिअमला जावे न लागता घरीच राहून आराम करण्यास मिळावा ; कारण जव्हने त्याला अपार संपत्ती प्रदान केली होती आणि तो विस्तीर्ण सिसिऑनमध्ये राहात होता. ही स्पर्धेसाठी अगदी उत्सुक असणारी घोडी मेनेलॉसने धुरेखाली जोडली.

चौथ्या क्रमांकाने नेलिअसपुत्र उदात्त नेस्तॉर याचा पुत्र ॲन्तिलॉकस याने आपले घोडे सिद्ध केले. ते पायलॉसमध्ये पैदा झाले होते आणि या स्पर्धकाचा पिता त्याला योग्य बोध करण्यासाठी त्याच्याजवळ आला, तथापि खरे म्हणजे

त्याला त्या बोधाची विशेष गरज नव्हती. नेस्तॉर म्हणाला, "ॲन्तिलॉकस, तू लहान आहेस, पण जव्ह व नेपच्यून यांनी तुझ्यावर फार लोभ ठेवून तुला उत्तम अश्वारोहक बनवला आहे. तेव्हा उपदेश म्हणून तुला जास्त काही मी सांगण्याची गरज नाही. खांबाभोवती तुझे घोडे वळविण्यात तू कुशल आहेस, पण घोडे स्वत: फार मंदगती आहेत, आणि हीच गोष्ट तुला यश मिळण्याच्या संधीत आड येईल अशी मला भीती वाटते. इतर सारथ्यांचे ज्ञान तुझ्यापेक्षा कमी आहे, पण त्यांचे घोडे जास्त बेगवान आहेत; म्हणून माझ्या प्रिय पुत्रा, तुझ्या हातातून पारितोषिक निसटू नये याची निश्चिती करण्यासाठी तुला काही क्लृप्ती वापरता येईल का बघ. लाकुडतोड्या पाशवी बळापेक्षा कौशल्याने काम अधिक साधतो; वादळाने हेलकावणारी आपली नौका कर्णधार, सागरातून नीट मार्गावरून नेतो ती कौशल्यानेच, आणि त्याचप्रमाणे आपल्या कौशल्याने एका सारथ्याला दुसऱ्यावर मात करता येते. एकाद्याने आपल्या घोड्यांवरच सारे सोपवले तर ते रंगणाच्या दोन्ही टोकांच्या खांबाला वळसा घालताना भलतीकडेच जातील; त्याचे त्यांच्यावर काही नियंत्रण राहणार नाही, ते एका किंवा दुसऱ्या वाटेकडे झुकू लागले तर तो त्यांना आवरू शकणार नाही. उलट आपण काय करतो आहो ते नीट ठाऊक असणाऱ्या माणसाचे घोडे निकृष्ट असले तरी वळणाचा खांब दिसताच तो त्यांना नीट ताब्यात ठेवील. लगाम केव्हा खेचायचा तो नेमका क्षण तो ओळखील, आणि आपल्या पुढच्या माणसावर पक्की नजर ठेवील. तुझ्या दृष्टीतून सुटणार नाही अशी ही एक नक्की खूण मी तुला सांगतो; तिकडे जमिनीवर आलेला सुमारे सहा फूट उंचीचा एक वठलेल्या झाडाचा--ओक किंवा पाइनचा असेल--खुंट आहे, तो अजून पावसाने कुजून गेलेला नाही. रस्त्याचे दोन फाटे फुटतात तेथे तो आहे; त्याच्या दोन्ही बाजूंना दोन पांढरे दगड बसवलेले आहेत व भोवती सर्वत्र स्वच्छ मार्ग आहे; फार पूर्वी मरण पावलेल्या कोणाचे तरी ते स्मारक असेल किंवा वळून परतण्यासाठी खुणेचा खांब म्हणून गतकालात तो वापरला गेला असेल; तथापि यावेळी रथांनी ज्याच्याभोवती वळण घ्यायचे तो खुणेचा खांब म्हणून ॲकिलिझने तोच खुंट निश्चित केला आहे; तू त्याच्या शक्य तेवढे जवळून जा, पण रथात उभा असताना डाव्या बाजूस थोडासा कल; तुझ्या उजवीकडच्या घोड्याला चाबकाने व आवाजातल्या जरबेने पुढे दौडव, लगाम सैल ठेव, पण डावीकडचा घोडा वळणाच्या आतल्या बाजूला इतका जवळ ठेव की तुझ्या चाकातल्या आंसाचे टोक खांबाला जवळजवळ घासून जावे; पण तिथल्या दगडापासून मात्र सावध रहा, नाहीतर तू घोड्यांना जखमी करून तुझ्या रथाचे

तुकडे करशील ; तसे झाले तर इतराना गंमत वाटेल पण तुझी मात्र फजिती होईल. म्हणून माझ्या प्रिय पुत्रा, काय करायचे त्याचे नीट अवधान ठेव, कारण खुंटाला वळसा घालणारा तू पहिला झालास तर नंतर दुसऱ्या कोणाला तुझ्यापुढे जाण्याची संधी मिळणार नाही––जरी अॅड्रेस्तसचा देवकुळातला घोडा ॲरिअन तुझ्यामागे असला, किंवा देशातले सर्वात उमदे लॅओमेदॉनचे घोडे पाठीमागे असले तरीसुद्धा ते पुढे जाऊ शकणार नाहीत."

पुत्राला मंत्रणा देणे संपविल्यावर नेस्तॉर आपल्या जागेवर बसला, आणि पाचव्या क्रमांकाच्या मेरिऑनिझने आपले घोडे सिद्ध केले. मग ते सगळे रथारूढ झाले व त्यांनी चिठ्ठ्या टाकल्या. ॲकिलिझने चिठ्ठ्या असलेले शिरस्त्राण हालवले व नेस्तॉरपुत्र ॲन्तिलॉकसचे नाव प्रथम बाहेर पडले ; नंतर आले युमेलस राजाचे आणि त्याच्यामागून ॲत्रिअसपुत्र मेनेलॉस व मेरिऑनिझ यांची नावे निघाली. शेवटची जागा तायदिअसपुत्र दायोमिद याच्या वाट्यास आली, तो त्या सर्वात उत्तम होता. त्यांनी ओळीत आपापल्या जागा घेतल्या ; ज्या खुंटाभोवती त्यांनी वळायचे तो परत वळण्याचा खांब ॲकिलिझने त्यांना दाखवला, तो मैदानावर काहीसा दूर होता ; तेथे पंच म्हणून आपल्या पित्याचा अनुयायी फीनिक्स याला त्याने उभे केले ; त्याने रथ कसे धावतात याचे निरीक्षण करून सत्य वृत्तांत कळवायचा होता.

एकाच क्षणी त्या सर्वांनी घोड्यांवर चाबकाचे फटके ओढले, लगामांनी त्यांच्या पाठीवर प्रहार केले व त्यांच्यावर सर्व बलानिशी ते एकदम ओरडले. नौकांपासून दूरवर भरवेगात मैदानावरून ते दौडले आणि त्यांच्या खालून ढगासारखा किंवा चक्रीवादळासारखा धुळीचा लोट उठला व वाऱ्यावर सर्व घोड्यांच्या आयाळी उडू लागल्या. एका क्षणाला ते रथ भूमीला स्पर्श करीत असलेले दिसत तर दुसऱ्याच क्षणी हवेत उडी घेत; सारथी रथावर ताठ उभे होते व विजयाच्या तीव्र लालसेने त्यांची हृदये जोरात धडधडत होती. प्रत्येकजण आपल्या घोड्याना हाका देत होता, आणि त्यांनी उडविलेल्या धुळीच्या लोटात घोडे भरवेगात मैदानावर अंतर तोडीत होते. ठरलेल्या पूर्ण अंतराच्या शेवटच्या भागावर, समुद्राकडे परतून येत असता जेव्हा ते पोचले तेव्हा त्यांच्या वेगावरचा ताण जास्तीत जास्त वाढला आणि प्रत्येकाचे प्रावीण्य प्रकट झाले. आता फेरिझच्या वंशजाच्या घोड्यांनी आघाडी मारली, आणि त्यांच्या अगदी मागोमाग दायोमिदचे ट्रॉयमधील खच्ची न केलेले घोडे आले. ते जणू युमेलसच्या रथावरच चढतात की काय असे दिसू लागले आणि त्याच्या पाठीवर व रुंद खांद्यांवर त्या घोड्यांचे उष्ण श्वास जाणवू लागले, कारण नेमून दिलेल्या

मार्गावर वायुवेगाने धावताना त्यांची डोकी त्याच्या अगदी जवळ आली होती. आता दायोमिद त्याला मागे टाकून पुढे गेला असता किंवा ते अगदी एका ओळीत आले असते पण फीबस ॲपॉलोने द्वेषबुद्धीने त्याचा चाबूक हातातून पाडायला लावला. पूर्वीपेक्षाही जास्त वेगाने त्या घोडचा जात असता स्वत:जवळ चाबूक नसल्याने आपले घोडे मात्र मागे राहात आहेत हे पाहून त्याच्या डोळचातून कोपाश्रू पडले. तायदिअसपुत्रावर ॲपॉलोने केलेला हा कपट प्रयोग मिनर्व्हाने पाहिला; म्हणून तिने त्याला त्याचा चाबुक आणून दिला व त्याच्या घोडचाना चेव आणला; शिवाय ॲदमेतस पुत्राचा रागाने पाठलाग करून तिने त्याच्या रथाची धुरा मोडली; घोडचा स्पर्धापथाच्या एका बाजूला एक व दुसऱ्या बाजूला दुसरी अशा गेल्या आणि रथाचा दांडा भूमीवर आदळून मोडला. युमेलस त्याच्या रथावरून चाकापाशी फेकला गेला; त्याची कोंपरे, तोंड व नाकपुडचा फुटल्या. भुवयांवरचा कपाळाचा भाग खरचटून निघाला, त्याचे डोळे अश्रूंनी भरले व त्याच्या तोंडून शब्द निघेनासा झाला. पण तायदिअसपुत्राने आपले घोडे बाजूला वळवले आणि तो बाणासारखा पार पुढे गेला, कारण मिनर्व्हाने त्या घोडचांना नवा जोम देऊन स्वत: दायोमिदला विजयश्रीने विभूषित केले.

त्याच्या मागे पाठोपाठ ॲत्रिअसपुत्र मेनेलॉस आला; पण ॲन्तिलॉकसने आपल्या पित्याच्या घोडचाना हाकारून म्हटले, "पुढे दौडा तुम्ही दोघे, आणि प्रयत्नांची शर्थ करा. तायदिअसपुत्राच्या घोडचांवर मात करायला मी तुम्हाला सांगत नाही, कारण मिनर्व्हाने त्यांना पळण्याची शक्ती दिली आहे व दायोमिदला यशाचे भाग्य मिळवून दिले आहे; पण तुम्ही ॲत्रिअसपुत्राच्या घोडचाना गाठले पाहिजे व मागे राहता कामा नये, नाहीतर अत्यंत द्रुतगती अशी ईथी तुम्हाला हिणवील. अरे, माझ्या भल्या गडचांनो, तुम्ही असे मागे का रेंगाळत आहा? मी तुम्हाला सांगतो व मी म्हणतो ते नक्कीच घडेल---तुमच्या हलगर्जीपणाने एकादे निकृष्टच पारितोषिक जर आपण जिंकले तर नेस्तॉर तुम्हा दोघांतल्या एकालाही जिवंत ठेवणार नाही तर दोघांनाही तरवारीने कापून टाकील. धावा त्यांच्यामागे तुमच्या जास्तीत जास्त वेगाने; वाटेवरच्या एका चिंचोळचा भागात त्यांच्यापुढे जायची युक्ति मी काढीन आणि ती मला फशी पाडणार नाही."

धनी रागावेल म्हणून ते घोडे भ्याले आणि थोडा वेळ जास्त जलदगतीने धावले. थोडचाच वेळात रस्ता जेथे खचला होता अशी एक अरुंद जागा ॲन्तिलोकसला दिसली. तेथे भूपृष्ठ उखळलेले होते कारण हिवाळचात

पडलेल्या पावसाचे पाणी साचून त्याने रस्ता झिजला गेला होता, त्यामुळे ती सबंध जागा खोलगट झाली होती. नियमभंग होऊ नये म्हणून तेथे प्रथम पोहोचण्यासाठी मेनेलॉस पुढे सरसावत होता, पण ॲन्तिलॉकसने वाटेतून आपले घोडे बाजूला वळवले आणि थोडा एका बाजूने तो मेनेलॉसच्या मागून जाऊ लागला. ॲत्रिअसपुत्र घाबरला व ओरडून म्हणाला, "ॲन्तिलॉकस तू अविचारीपणे घोडे हाकीत आहेस; लगाम खेचून तुझे घोडे आवर, मार्ग येथे फार अरुंद आहे, लौकरच पुढे तो रुंद होईल व मग माझ्यापुढे तुला जाता येईल. नियमभंग करून तू माझ्या रथाला धक्का दिलास तर दोघानाही तू नुकसान पोचवशील."

पण जणु त्याचे बोलणे ऐकू न आल्याप्रमाणे ॲन्तिलॉकसने चाबूक चालवून घोडे जास्तच वेगात हाकले. तरुण मनुष्य आपल्या शक्तीचा अंदाज घेताना स्पर्धेत थाळी जितकी दूर फेकू शकेल, तितक्या साधारण अंतरापर्यन्त दोघे शेजारी शेजारी धावत होते आणि मग मेनेलॉसने घोडे एकमेकात अडखळून रथ उलटे करतील आणि विजयासाठी नेटाने पुढे जाण्याच्या भरात दोघेही भूमीवर आपटतील या भयाने रथ पिटाळणे थांबवले व त्याच्या घोड्या मागे राहिल्या. मग मेनेलॉसने ॲन्तिलॉकसची कान उघाडणी केली, तो म्हणाला, "तुझ्यापेक्षा अधिक छद्मी ह्यात नसावा कोणी; जा व दुर्दैव तुझी साथ करो; तुला समज आहे असे ॲकिअन्स म्हणतात ते योग्य नाही, आणि काहीही होवो, माझ्या शपथपूर्वक नोंदवलेल्या निषेधाशिवाय तुला पारितोषिक घेऊन जाता येणार नाही."

मग त्याने आपल्या घोड्याना हाक देऊन म्हटले, "तुमची चाल तशीच ठेवा व ती संथ होऊ देऊ नका. त्या दुसऱ्या घोड्यांचे पाय तुमच्यापेक्षा लौकर थकतील, कारण त्या दोघातला एकही भर ज्वानीत नाही."

धनी रागे भरेल म्हणून घोड्याना भय वाटले व ते जास्त जलद धावू लागले. त्यामुळे ते लौकरच इतरांच्या जवळजवळ बरोबरीला आले.

दरम्यान घोडे मैदानावरचे अंतर स्वतःच उठविलेल्या धुळीच्या लोटात काटीत असता ते कसे धावतात हे ॲकिअन्स आपल्या जागांवरून पाहात होते. क्रीतन्सचा प्रमुख आयदोमिनिअस याने स्पर्धेची परिस्थिती पहिल्याने ओळखली, कारण तो दाट गर्दीत नसून, जेथून सर्वात संपूर्णपणे सगळे दिसेल अशा ठिकाणी उभा होता. सारथी पुष्कळ दूर अंतरावर होता, पण त्याचे ओरडणे आयदो-मेनसला ऐकू येत होते व सर्वात पुढचा घोडा स्पष्ट दिसत होता—तो होता कपाळावर चंद्रासारखी तेजस्वी गोल शुभ्र चांदणी असलेला, गडद तांबूस

वर्णाचा. त्याने उभे राहून आर्गाइव्हज्‌मध्ये म्हटले, " मन्मित्रहो, आर्गाइव्हज्‌चे राजवंशीय सल्लागारहो, मला स्पर्धा जितकी स्पष्ट दिसत आहे तितकी तुम्हाला दिसते का? आता दुसरीच जोडी व दुसराच सारथी पुढे आलेले दिसतात; सुरूवातीला जे सर्वांच्या पुढे होते त्यांना तिकडे मैदानावर काही दुखापत होऊन ते कामातून गेले असावे. पहिल्याने त्यांना परत वळणाच्या खुंटाभोवती जाताना मी पाहिले, पण आता जरी त्रॉयचे मैदान मी डोळ्याखाली घालतो आहे तरी मला ते दिसत नाहीत. कदाचित सारथ्याच्या हातून लगाम खाली पडल्यामुळे त्याचा घोड्यावरचा ताबा जाऊन तो वळणाच्या खुंटाभोवती फिरू शकला नसेल. मला वाटते तेथे तो बाहेर फेकला गेला असावा व त्याचा रथ मोडला असावा, आणि त्याच्या घोड्या आखीव मार्ग सोडून घाबरून सैरावैरा उधळल्या असाव्या. इकडे वर येऊन तुम्ही स्वतःच पहा, मला नक्की काय ते ओळखू येत नाही, पण हा सारथी ईतोलिअन वंशाचा दिसतो, आर्गाइव्हज्‌चा राज्यकर्ता, शूर तायदिअसपुत्र दायोमिद असावा हा."

ऑइलिअसपुत्र अॅजॅक्सने उद्धटपणे त्याच्याशी वाद काढीत म्हटले, "आयदोमिनिअस, मैदानावर घोड्या अजून इतक्या दूर असताना, आम्हाला त्याबद्दल सगळे सांगायची तुला इतकी घाई का व्हावी? तू काही सर्वात तरुणांपैकी नाहीस, किंवा तुझी दृष्टीही सर्वात तीक्ष्ण नाही, पण तू नेहमीच निर्णयाचा अधिकार आपल्याकडे घेत असतोस. तुला तसे करण्याचा काही अधिकार नाही, कारण इथे तुझ्यापेक्षा जास्त गुणवत्तेचे लोक आहेत. युमेलसचे घोडे आता पुढे आहेत, ते नेहमीच पुढे राहिलेले आहेत व तो रथावर लगाम धरून उभा आहे."

क्रीतन्सचा नायक रागावला व त्याने उत्तर दिले, " अॅजॅक्स, कुचेष्टा करण्यात तू तरबेज आहेस, पण तुला नीट पारख नाही, व तुझ्यात पुष्कळ इतर गोष्टींची उणीव आहे, कारण तुझ्या अंगी एक तिरस्करणीय चिडखोरपणा आहे. मी एका तिवईची किंवा कढईची तुझ्याशी पैज लावतो, व अॅत्रिअसपुत्र अॅगॅमेम्नॉन ठरवील कोणाचे घोडे पहिले आहेत ते. मग तुला चांगलीच अद्दल घडेल व काय ते कळेल."

त्याला संतापून उत्तर देण्याची ऑइलिअसपुत्र अॅजॅक्सची इच्छा होती व त्या दोघात आणखी बाचाबाची झाली असती, पण अॅकिलिझ आपल्या जागेवरून उठून म्हणाला, "तुमची बाचाबाची थांबवा, अॅजॅक्स व आयदोमिनिअस, तुम्हाला शोभत नाही हे. दुसऱ्या कोणी असे केले असते तर ते वावगे वाटून तुम्हाला धक्काच बसला असता. खाली बसा व घोड्यांवर तुमची दृष्टी

ठेवा; ते जयस्तंभाकडे वेगाने येत आहेत व थेट इकडेच आता येऊन पोचतील. मग तुम्हा दोघांनाही कळेल की कोणाचे घोडे पहिले आले व कोणाचे पाठीमागून आले ते."

तो बोलत असता तायदिअसपुत्र खांद्यापासून आवेशाने चाबूक चालवीत रथ हाकीत आला, त्याचे घोडे पाय उंच उचलीत स्पर्धापथावरून वायुवेगाने धावत होते. सारथ्यावर वाळूचा व खरीचा दाट वर्षाव होत होता, आणि सोने व कथील जडवलेला त्याचा रथ त्याच्या वेगवान घोडयांच्या मागे अगदी जवळून धावत होता. खालच्या अगदी बारीक धुळीत चाकांच्या खुणासुद्धा नीट उठत नव्हत्या आणि घोडे शक्य होईल तेवढ्या भर वेगाने पळत होते. दायोमिदने भरगर्दीमध्ये शिरल्यावर त्यांना थांबवले आणि घोडयांच्या आयाळी व छातीवरच्या घामाचे पाट भूमीवर वहाले. तात्काल त्याने आपल्या उत्तम रथावरून खाली उडी घेतली व आपला चाबुक घोडयांच्या धुरेला टेकून ठेवला; आता शूर स्थेनेलसने वेळ मुळीच न दवडता पारितोषिक पुढे आणले, आणि ती स्त्री व कानांची कढई घेऊन जाण्यासाठी त्याच्या सोबत्यांकडे दिली. मग त्याने धुरेखालून घोडे सोडले.

त्याच्यानंतर आला नेलिअसच्या वंशाचा अँन्तिलॉकस; त्याने कपट करून मेनेलॉसवर आघाडी मिळवली होती; घोडयांच्या वेगाने नव्हे; पण तरीही रथाचे चाक, रथ आणि त्याचा धनी या दोघांनाही ओढणाऱ्या घोडयाच्या जितके जवळ असते, तितक्या जवळ अँन्तिलॉकसच्या पाठोपाठ मेनेलॉस आला; अगोदर जरी थाळीच्या एका पूर्ण फेरी इतका तो मागे होता तरी आता तसा नव्हता. घोडयाच्या शेपटीच्या टोकाचे केस चाकाच्या धावेला स्पर्श करतात व रथ चालू असता घोडा व चाक यांच्यात फार अंतर कधीच नसते; या अंतरापेक्षा मेनेलॉस अँन्तिलॉकसच्या मागे फार दूर नव्हता. त्याने थोडयाच वेळात त्याला अंतर तोडून गाठले होते, कारण अँगॅमेम्नॉनची घोडी ईथी अधिकाधिक जोराने रथ ओढीत राहिली, त्यामुळे स्पर्धा पथ जर जास्त लांबीचा असता तर त्याला त्याने मागे टाकले असते व दोन्ही रथ नुसते बरोबर येऊन थांबले नसते. मेनेलॉसच्यामागे सुमारे एका भालाफेकीच्या अंतरावर आयदोमिनि-असचा शूर शिलेदार मेरिऑनिझ होता. त्याचे घोडे सर्वात मंदगती होते व तो सर्वात निकृष्ट सारथी होता. सर्वात शेवटी अॅद्मेतसपुत्र आपला रथ कसाबसा ओढून नेत घोडयाना पुढे हाकीत आला. त्याला अॅकिलिझने जेव्हा पाहिले तेव्हा वाईट वाटून आर्गाइव्हज्मध्ये उभा राहून तो म्हणाला, "सर्वात श्रेष्ठ मनुष्य सगळ्यात शेवटी येतो आहे. त्याला आपण पारितोषिक देऊ

या, कारण ते वाजवी होईल. त्याला दुसरे बक्षिस मिळेल, पण पहिले मात्र तायदिअसपुत्रालाच जायला पाहिजे."

असे तो म्हणाला व इतर सर्वांनी त्याच्या म्हणण्याची वाहवा केली आणि त्याच्या म्हणण्याप्रमाणे करावे असे सर्वांचे मत होते, पण नेस्तॉरपुत्र ॲन्तिलॉकस उभा राहिला व पेलिअसपुत्राकडून आपल्या हक्कांची बजावणी व्हावी म्हणून त्याने मागणी केली. तो म्हणाला, "ॲकिलिझ, ही गोष्ट जर तू केलीस तर मी ती वावगी मानीन; युमेलसचा रथ, घोडे आणि तो स्वतः कुशल माणूस असून देखील बाहेर फेकले गेले, म्हणून माझे पारितोषिक हिरावून घेऊन तू ते त्याला देणार; त्याने अमरांची प्रार्थना वेळेवारी करायची होती. तशी केली असती तर तो सर्वांच्या शेवटी आला नसता. तुला त्याच्यासाठी वाईट वाटत असेल व तुझी तशी इच्छा असेल तर तुझ्या तंबूत पुष्कळ सोने आहे, तसेच ब्राँझ, मेंढरे, गुरे व घोडेही आहेत. ॲकिअन्सनी तुझ्याबद्दल चांगले बोलावे असे तुला वाटत असेल, तर तुझ्या या भांडारातून काहीतरी काढ व आता देऊ केले आहेस त्यापेक्षाही चांगले पारितोषिक त्याला दे; पण ती बक्षिसाची घोडी मी सोडणार नाही, व जो तिच्यासाठी माझ्याशी लढू इच्छित असेल, त्याला येऊ दे पुढे."

हे ऐकताना ॲकिलिझने स्मित केले, आणि तो ॲन्तिलॉकसवर प्रसन्न झाला; तो त्याच्या प्रियतम सोबत्यांपैकी एक होता. म्हणून तो म्हणाला, "ॲन्तिलॉकस, युमेलससाठी दुसरे काही पारितोषिक मी शोधावे अशी तुझी इच्छा असेल, तर ॲस्तेरोपिअसकडून जिंकलेले, सभोवार सर्वत्र कथलाची कड असलेले ब्राँझचे वक्षकवच मी त्याला देईन. ते त्याला पुष्कळ द्रव्याच्या मोलाचे होईल."

आपला सोबती ऑतोमेदॉन याला आपल्या तंबूतून ते वक्षकवच आणण्यास त्याने सांगितले आणि त्याने ते आणले. ॲकिलिझने मग ते युमेलसच्या स्वाधीन केले; व त्याने ते सानन्द स्वीकारले.

पण ॲन्तिलॉकसवर अत्यंत संतापून मेनेलॉस रागात उभा राहिला. एका परिचारकाने त्याचा दण्ड त्याच्या हातात दिला व आर्गाइव्हज्ना स्तब्ध राहण्यास सांगितले. मग तो वीर त्यांना उद्देशून बोलला "ॲन्तिलॉकस, काय प्रकार आहे हा? आजपर्यन्त अदूषणीय वर्तन असणाऱ्या तुझ्याकडून आज हे आचरण का? आज तू चार लोकात माझी शोभा केलीस! शिवाय आपले घोडे माझ्या घोड्यांपुढे घालून त्यांची कुचंबणा केलीस. खरे म्हणजे माझ्या घोड्यांपेक्षा तुझे पुष्कळच निकृष्ट आहेत; म्हणून हे आर्गाइव्हज्च्या राजवंशीयांनो व सल्लागारांनो, आमच्या दोघांत न्याय करा व पक्षपात करू नका. नाहीतर

ॲकिअन्सपैकी कोणी असे म्हणाल की, "खोटे बोलून व भ्रष्टाचाराने मेनेलॉसने घोडी मिळवली; त्याचे घोडे ॲन्तिलॉकसच्या घोड्यांपेक्षा अगदी कमी प्रतीचे होते, पण त्याचे स्वतःचे वजन व वशिला जास्त आहे ना! पण तसे कशाला या प्रकरणाची शहानिशा मीच करतो, आणि कोणीही मनुष्य मला याबद्दल दोष देणार नाही, कारण न्याय्य असेल तेच मी करीन. इकडे ये ॲन्तिलॉकस आणि आपला रिवाज आहे त्यानुसार हातात चाबुक घेऊन तुझ्या रथाजवळ घोड्यांपाशी उभा रहा; घोड्यांच्या पाठींवर हात ठेव आणि पृथ्वी वेढणाऱ्या नेपच्यूनची शपथ घे, की तू मुद्दाम व कपटीपणे माझ्या घोड्यांच्या वाटेत आड आला नव्हतास."

आणि ॲन्तिलॉकसने उत्तर दिले, "मला क्षमा कर; मी तुझ्यापेक्षा पुष्कळ लहान आहे, राजा मेनेलॉस; तू माझ्यापेक्षा अधिक उच्चस्थानी आहेस व आपणा दोघांमध्ये श्रेष्ठ आहेस. तरुण माणसे किती सहजपणे चुकून अविचाराला प्रवृत्त होतात हे तू जाणतोस; त्यांचा स्वभाव अधिक उतावळा असतो व त्यांना विवेक कमी असतो; म्हणून उचित ती क्षमाशीलता दाखवून मला संभाळून घे. मी आपण होऊन मी जिंकलेली घोडी परत करतो, आणि याखेरीज माझ्या स्वतःच्या चीज वस्तूंपैकी आणखी काही वस्तू तू मागितल्यास तरी यापुढे तुझ्या मर्जीतून उतरण्यापेक्षा व स्वर्गस्थ शक्तींपुढे अपराधी ठरण्यापेक्षा ती वस्तु तात्काळ तुला देऊन टाकणे मी अधिक पसंत करीन."

नेस्तॉरपुत्राने मग ती घोडी घेऊन मेनेलॉसच्या स्वाधीन केली व याप्रमाणे त्याचा कोप शांत केला; ज्याप्रमाणे अगदी पिकत आलेल्या धान्याच्या शेतावर दव पडते आणि मग ती भूमी भरपूर पिकाने, फुलून उठते–अगदी त्याप्रमाणे हे मेनेलॉस, तुझे हृदय अंतर्यामी सुखावले. तो ॲन्तिलोकसकडे वळून म्हणाला, "हे बघ ॲन्तिलॉकस, जरी मी तुझ्यावर रागावलो होतो तरी आता मी स्वेच्छेने तुझ्यापुढे नमते घेतो; तू आडमुठा कधीच नव्हतास किंवा आतापर्यन्त दुष्ट-पणानेही कधी वागला नव्हतास, पण यावेळी तुझ्या यौवनाने तुझ्या विवेकावर मात केली. भविष्यकाळात स्वतःपेक्षा श्रेष्ठ लोकांवर कुरघोडी करण्याबाबत जपून रहा. दुसऱ्या कोणीही इतक्या सहज माझे मन वळवले नसते, पण तुझा सज्जन पिता, तुझा भाऊ व स्वतः तू, या सर्वांना माझ्याखातर अपार कष्ट पडले आहेत; म्हणून तुझ्या विनवणीला मी मान देतो. जरी ही घोडी खरोखर माझी असली तरी ती मी तुझ्यासाठी सोडून देतो; म्हणजे मग लोकाना दिसून येईल की मी कठोर वृत्तीचा किंवा खुनशी नाही."

असे म्हणून त्याने घोडी ॲन्तिलॉकसचा सोबती नॉइमॉन यांच्या स्वाधीन केली व मग ती कढई आपण घेतली. चौथ्या आलेल्या मेरिऑनिझने दोन तॅलेन्त (भार) सोने जिकले आणि दोन मुठींचा कुम्भ हे पाचवे पारितोषिक दिले न गेल्यामुळे, ते ॲकिलिझने जमलेल्या आर्गाइव्हज्‌मध्ये नेस्तॉरपाशी जाऊन त्याला दिले व म्हटले, "माझ्या जुन्या सन्मित्रा, पॅत्रोक्लसच्या उत्तर-क्रियेची आठवण व पिढ्यानपिढ्या जतन करावे असे स्मृतिचिन्ह म्हणून याचा स्वीकार कर–कारण तो पुन्हा कधी तुला आर्गाइव्हज्‌मध्ये दिसणार नाही. आता तुला जरी पारितोषिक जिकून घेता येत नाही तरी मी ते तुला देतो; आता तुला मल्लयुद्ध करता येत नाही किंवा लढणे ही शक्य नाही; भाला फेक किंवा धावण्याच्या स्पर्धात तुला प्रवेश करता येत नाही. कारण आता तुझ्यावर वार्धक्याचा जड हात पडला आहे."

असे बोलून त्याने ती कुम्भ नेस्तॉरच्या स्वाधीन केला; त्यानेही तो आनंदाने स्वीकारून म्हटले, "माझ्या मुला, तू जे म्हणालास ते सारे खरे आहे, माझ्या हातापायात आता काही शक्ती राहिलेली नाही, किंवा एकाही खांद्यापासून हात पुढे सर्वाहुन सरसावून मी प्रहार करू शकत नाही. ज्यावेळेला एपिअन्स ॲमॅरिन्सिअस राजाला मूठमाती देत होते व त्याच्या पुत्रांनी त्याच्या सन्मानार्थ क्रीडास्पर्धेत पारितोषिके लावली होती, तेव्हा जितका होतो तितका मी अजूनही तरुण व बलवान असतो तर किती बरे होते! त्यावेळी एपिअन्समध्ये किंवा स्वतःचे पेलिअन्समध्ये अथवा इतोलिअन्समध्येही माझ्याशी स्पर्धा करु शकणारा कोणीही नव्हता. मुष्टियुद्धात मी एनॉप्सपुत्र क्लितोमिदिझचा पाडाव केला व मल्लयुद्धात माझ्याविरुद्ध उभा राहिलेल्या प्लॅयूरॉनच्या ॲन्सिअसचा... इफिक्लस चांगला धावणारा होता, पण मी त्याला हरविले आणि फिलिअस किंवा पॉलिदॉरस यांच्यापेक्षा दूरवर भाला फेक केली. फक्त रथ स्पर्धेत मात्र ॲक्तॉरच्या दोन पुत्रांनी माझ्यापुढे आपल्या घोड्यांना घसवून माझ्यावर मात केली–कारण जय सारखा कोणाच्या बाजूला जात आहे हे पाहून ते रागावले होते. पारितोषिकातली बहुसंख्य पारितोषिके ती देऊ करणाऱ्यांच्याच स्थानी राहात आहेत याचे त्यांना वैषम्य वाटत होते. ते दोघे जुळे भाऊ होते; एकजण लगाम एक सारखा खेचीतच राही व दुसरा चाबूक चालवी. तेव्हा त्यावेळी मी अशा प्रकारचा होतो, पण आता या गोष्टी मी जास्त तरुण लोकांवर सोडल्या पाहिजेत. वाढत्या वर्षाच्या ओझ्याखाली मला वाकले पाहिजे; पण त्या दिवसात मी वीरामध्ये प्रमुख होतो. आणि आता महाशय, तुमच्या सोबत्याच्या

सन्मानार्थ अंत्यविधी प्रीत्यर्थच्या स्पर्धा चालू द्यात; या कुम्भाचा मी आनंदाने स्वीकार करतो, आणि माझ्या मनाला संतोष वाटतो की तुम्ही मला विसरत नाही, तर तुमच्याविषयींची माझी सद्‌भावना व ॲकिअन्सकडून राखला जाणे उचित आहे असा माझा मान——याविषयींची कदर सतत बाळगता."

त्यानंतर नेस्तॉरचे समग्र आभारप्रदर्शक वक्तव्य ऐकल्यावर पेलिअसपुत्र ॲकिअन्सच्या समूहात गेला व थोड्याच वेळात मुष्टियुद्धाच्या शरीराला कष्ट देणाऱ्या कलेसाठी त्याने पारितोषिके देऊ केली. त्याने एक बळकट खेचर बाहेर आणून गर्दीच्या मध्यभागी बांधले–ती अजून दौडीस न वापरलेली अशी मादी होती, केवळ सहा वर्षांची, या वयात जनावरांना दौडीसाठी तयार करणे सर्वात कठिण असते; हे पारितोषिक मुष्टीयुद्धात जिंकणारासाठी, आणि हरणारासाठी त्याने एक दुप्पट मापाचा पेला ठेवला. मग उभा राहून तो आर्गाइव्हज्‌मध्ये बोलला, "ॲत्रिअसपुत्रा व इतर ॲकिअन्सहो, या पारितोषिकांसाठी आपल्यातील दोन निपुण मुष्टियोद्ध्याना, चौफेर जबरदस्त ठोसे मारून स्पर्धेत भाग घेण्यासाठी मी आवाहन करतो. ॲपॉलो ज्याला जास्त टिकाव धरून रहाण्यास समर्थ करील व ॲकिअन्स जेता म्हणून मान्य करतील, तो हे खेचर आपल्याबरोबर आपल्या तंबूकडे घेऊन जाऊ शकेल, आणि जो हरेल त्याला हा दुप्पट मापाचा पेला मिळेल."

तो बोलत असता शूर तसाच महाकाय, निष्णात मुष्टियोद्धा पॅनोपिअसपुत्र एपिअस उठून उभा राहिला. त्याने त्या खेचरावर हात ठेवून म्हटले, "ज्याला पेला मिळायचा आहे त्याने इकडे यावे, कारण माझ्याखेरीज कोणीही हे खेचर जिंकून घेणार नाही. येथे उपस्थित असलेल्या सर्वात मी श्रेष्ठ मुष्टियोद्धा आहे आणि कोणीही मला हरवू शकणार नाही. प्रत्यक्ष लढाईत मी तुमच्यापेक्षा कमी ठरावा एवढे पुरे नाही काय? तथापि, प्रत्येक गोष्टीत तरबेज कोणीही असू शकत नाही. मी तुम्हाला स्पष्टपणे सांगत आहे–व ते खरेच होणार आहे——की जो कोणी मनुष्य माझ्याशी मुष्टियुद्ध करील त्याचे शरीर ओरबाडून काढून मी त्याची हाडे मोडीन. म्हणून त्याच्या मित्रांनी एका समूहात येथे रहावे. मी त्याची वाट लावल्यावर त्याला नेण्यास हाताशीच असावे."

ते सगळे गप्प राहिले आणि तॅलॅउसचा मुलगा मेसिस्तिअस याचा पुत्र युरिॲलस याच्याखेरीज कोणी उभा राहिला नाही. मेसिस्तिअस हा इडिपसच्या पतनानंतर त्याच्या उत्तरक्रियेला उपस्थित राहण्यासाठी एकदा थीब्सला गेला होता तेव्हा त्याने कॅडमसच्या सर्व लोकांचा पराभव केला होता. युरि-ॲलसचा सहाय्यक तायदिअसपुत्र होता, त्याने त्याला प्रोत्साहन दिले आणि

त्याने जिंकावे अशी दृढ आशा मनाशी बाळगली. प्रथम त्याच्याभोवती त्याने एक एक कमरपट्टा बांधला व मग त्याला व्यवस्थित कापलेल्या बैलाच्या चामड्याच्या काही वाद्या दिल्या; दोघेही स्पर्धक आता कंबर बांधून तयार झाल्यावर रिंगणाच्या मध्यावर गेले व तात्काल एकमेकाना भिडले; त्यांनी एकमेकाना खरोखर चांगलेच कठोर ताडन केले आणि आपल्या मजबूत मुठीनी चौफेर प्रहार चालवले. त्यांच्या जबड्यांवरच्या भयंकर आघातांचा आवाज ऐकू येत होता; त्यांच्या कातडीच्या प्रत्येक रंध्रातून घाम निथळत होता. लौकरच एपिअसने पुढे होऊन युरिॲलस सभोवताली पहात असता त्याच्या जबड्यावर ठोसा लगावला. तेव्हा युरिॲलसचे पाय भूमीवर ठरत ना; ते लटपटले व क्षणार्धात हवेत वर उडून तो खाली कोसळला. जेव्हा बोरिआस वारा लाटांच्या माथ्यावर खळबळ उडवतो तेव्हा सर्वत्र सागरी लव्हाळे पसरलेल्या एकाद्या किनाऱ्यापाशी मासा असाच हवेत उडी घेऊन परत खोल पाण्यात पडतो. पण उमद्या एपिअसने त्याला धरून उठवले. त्याचे सोबतीही त्याच्याभोवती जमा झाले व त्याला रिंगणाबाहेर घेऊन गेले. तेव्हा त्याचे झोकांडे जात होते, मान एका बाजूला कलली होती आणि तो रक्ताचे मोठाले गोळे थुंकीत होता. त्याला बेशुद्ध अवस्थेत त्यांनी खाली ठेवले आणि ते दुप्पट मापाचा पेला आणण्यास गेले.

पेलिअसपुत्राने आता तिसऱ्या स्पर्धेची पारितोषिके बाहेर आणली. आणि ती आर्गाइव्हज्‌ना दाखवली. ही होती मल्लयुद्धाच्या शरीराला कष्ट देणाऱ्या कलेसाठी; जिंकणारास विस्तवावर ठेवण्यासाठी तयार असे एक मोठे तीन खुरांचे भांडे होते व ॲकिअन्सनी त्याची किंमत आपापसात बारा बैलांइतकी केली. हरणारास त्याने सर्वप्रकारच्या कला कौशल्यात निपुण अशी एक स्त्री बाहेर आणली, व लोकांनी तिचे मोल चार बैलांइतके केले. तो उठून आर्गाइव्हज्‌समोर म्हणाला, "या स्पर्धेत उतरणारे जे कोण असतील ते पुढे या."

तात्काल तेलेमॉनपुत्र थोर ॲजॅक्स उभा राहिला व नाना क्लृप्त्या लढवण्यात कुशल असा युलिसिस उठला. दोघेही कमरा बांधून रंगणाच्या मध्यभागी गेले. वाऱ्यापासून निवारणार्थ उंच हवेलीच्या छपरासाठी एकादा निपुण गृहनिर्माता ज्यांची चौकट उभारतो, त्या वाशांसारख्या मजबूत हातानी त्यांनी एकमेकाना पकडले. बलशाली बाहूंनी ते एकमेकाना खेचीत असता त्यांच्या पाठीचे कणे कडकड वाजले आणि त्यांच्या अंगातून घामाचे पाट वाहले. त्यांच्या कुशीवर व खांद्यावर कित्येक रक्तबंबाळ वळ उठले, पण शक्तीची व प्रयत्नांची पराकाष्ठा करीत विजयासाठी व त्या तीन खुरांच्या भांड्यासाठी त्यांनी झगड

चालू ठेवला. युलिसिस ॲजॅक्सला पाडू शकत नव्हता, ना ॲजॅक्स युलिसिसला; ॲजॅक्सच्या मानाने युलिसिस फार बलवान होता; पण त्यांची लांबलेली कुस्ती पहाताना ॲकिअन्स जेव्हा कंटाळले, तेव्हा ॲजॅक्स युलिसिसला म्हणाला, "लेएर्तिझच्या उदात्त पुत्रा युलिसिस एकतर तू तरी मला उचल नाहीतर मी तरी तुला उचलतो, आणि मग आपल्यातला निर्णय काय तो जव्हला करू दे."

बोलताना त्याने प्रतिस्पर्ध्याला भूमीवरून वर उचलले पण युलिसिस आपली क्लुप्ती विसरला नाही; त्याने ॲजॅक्सच्या गुडघ्यामागील पोकळीत आघात केला त्यामुळे त्याचे पाय भूमीवर ठरले नाहीत व तो पाठीवर पडून त्याच्या छातीवर युलिसिस पडला आणि ते पाहून सर्वांनी आश्चर्य केले; मग युलिसिसने आपल्यापरीने ॲजॅक्सला उचलले व भूमीवरून थोडे उंच केले पण तो त्याला सर्वस्वी वर उचलू शकला नाही, त्याचे गुडघे मुडपू लागले, व दोघे भूमीवर शेजारी शेजारी पडून धुळीने अगदी माखून गेले. आता त्यांनी एकमेकांकडे झेप घेऊन तिसऱ्यांदा कुस्ती लढविण्याची तयारी केली पण ॲकिलिझने उठून त्यांना थांबवले. तो म्हणाला, "एकमेकांचे असे आणखी क्रूर हाल करू नका; दोघाना सारखाच जय मिळाला आहे, दोघेही समान पारितोषिके घ्या व आता इतर ॲकिअन्सना स्पर्धेत भाग घेऊ द्या."

तो असे बोलला, त्याच्या सांगण्याप्रमाणेच त्यांनी केले आणि आपापल्या शरीरांवरची धूळ पुसून टाकून आपले अंगरखे पुन्हा अंगात घातले.

मग पेलिअसपुत्राने धावण्यातील वेगाच्या स्पर्धेसाठी पारितोषिके देऊ केली– सुंदर कारागिरीचे शुद्ध चांदीचे एक मिश्रणपात्र; तो सहा मापे मावतील एवढा वाडगा होता, साऱ्या जगातल्या इतरांपेक्षा अधिक शोभीवंत; सिदॉनच्या चतुर कारागीरांची ती कृती असून फिनिसिअन्सनी समुद्रापलीकडून तो पेला नौकाश्रयात आणून थोआसला उपहार म्हणून दिला होता. प्राअॅमपुत्र लायकॅऑनसाठी खण्डणी म्हणून जेसनपुत्र युएनीअस याने तो पॅत्रोक्लसला दिला होता, आणि आता आपल्या त्या सोबत्याच्या सन्मानार्थ सर्वात जलद पळणारास पारितोषक म्हणून तो ॲकिलिझने देऊ केला होता. दुसऱ्या क्रमांकाला पारितोषक म्हणून त्याने एक मोठा पुष्ट बैल देऊ केला आणि अखेरच्या क्रमांकासाठी अर्धा तॅलेन्त (भार) सोने होते. मग तो उठून आर्गाइव्हज्‌मध्ये म्हणाला, "या स्पर्धेत भाग घेणारानी पुढे येऊन उभे राहावे."

तात्काल ऑइलिअसपुत्र वेगवान ॲजॅक्स उठला, तसाच धूर्त युलिसिस व त्याच्या समकालीन तरुणात सर्वात द्रुतगतीने धावणारा नेस्तारपुत्र ॲन्तिलॉकस.

ते ओळीने उभे राहिले व ॲकिलिझने त्यांना कोठपर्यन्त धावायचे ते दाखविले. निघण्याच्या खुंटापासून स्पर्धापथ ठरविण्यात आला, तात्काल ऑइलिअसपुत्र सर्वांच्यापुढे निघाला, त्याच्या पाठोपाठ अगदी जवळ युलिसिस होता–जितका मागावरच्या आडव्या ताण्यावर उभा धागा विणताना स्त्री धोटा आपल्या छातीच्या जितका जवळ धरते तितका–जवळ युलिसिस होता. पुढच्याच्या पावलांनी उडालेली धूळ वसण्याच्या आत तेथे तो आपली पावले टाकीत होता, आणि पुढे वेगाने धावणाऱ्या ॲजॅक्सला डोक्यामागे त्याचा श्वास जाणवत होता. तो प्रयत्नांची शर्थ करीत असलेला पाहून सर्व ॲकिअन्सनी ओरडून त्याची वाहवा केली व तो त्यांच्यापुढून तीरासारखा वेगाने जात असता त्याला प्रोत्साहन दिले; पण पळणारे स्पर्धापथाच्या शेवटाकडे जसे येऊ लागले तशी युलिसिसने मनात मिनर्व्हाची प्रार्थना केली, "हे देवी, माझी प्रार्थना ऐक, माझ्या पायाना साह्य कर." अशी त्याने केलेली प्रार्थना पॅलॅस मिनर्व्हाने ऐकली; तिने त्याचे हातपाय हलके केले, आणि पळणारे पारितोषिकावर झडप घालण्याच्या बेतात असता मिनर्व्हाने दुष्टपणाने ॲजॅक्सचा पाय घाणीत घसरायला लावला; पॅत्रोक्लसच्या सन्मानार्थ ॲकिलिझने जी गुरे कापली होती त्यांची तेथे पडलेली ती घाण होती; आणि तिच्यावर घसरल्यामुळे ॲजॅक्सच्या नाकातोंडात शेण भरून गेले. तेव्हा ॲजॅक्सच्या पुढे जाऊन पहिला आल्यामुळे युलिसिसने मिश्रणपात्र जिंकले. पण ॲजॅक्सने बैल घेतला व त्याच्या एका शिंगावर हात ठेवून उभा राहून तोंडातले शेण थुंकून टाकले. मग तो आर्गाइव्हज्‌ना म्हणाला, "अरेरे, देवीने माझ्या धावण्यात विघाड केला; ती युलिसिसवर लक्ष ठेवते व त्याची स्वतःची आई असल्यासारखी त्याच्या मदतीला तत्पर असते." तो असे म्हणाला व ते सगळे मनसोक्त हसले.

ॲन्तिलॉकसने शेवटचे पारितोषिक मिळवले, आणि बाजूला उभे असलेल्या लोकांना तो स्मितपूर्वक म्हणाला, "मित्रहो, तुम्ही सगळे बघताच आहा की आतादेखील देवांनी ज्येष्ठत्वालाच मान दिला आहे. ॲजॅक्स माझ्यापेक्षा थोडा वडील आहे; युलिसिसबद्दल म्हणाल तर तो आधीच्या पिढीचा आहे, पण वय झाले असूनही तो धडधाकट आहे, आणि ॲकिअन्सपैकी ॲकिलिझखेरीज कोणीही मनुष्य पळण्यात त्याच्याविरुद्ध टिकणार नाही."

हे तो पेलिअसपुत्राचा गौरव करण्यासाठी बोलला आणि ॲकिलिझने उत्तर दिले, "ॲन्तिलॉकस, तू माझी केलेली स्तुति व्यर्थ जाणार नाही. मी तुला आणखी अर्धा तॅलेन्त (भार) सोने देईन." मग त्याने तो अर्धा तॅलेन्त ॲन्तिलॉकसला दिला व त्यानेही तो आनंदाने स्वीकारला.

मग पेलिअसपुत्राने सार्पेदॉनने वापरलेल्या व पॅत्रोक्लसने त्याच्याकडून जिंकून घेतलेला भाला, शिरस्त्राण व ढाल या वस्तू बाहेर आणल्या. आर्गाइव्हज्‌मध्ये उभा राहून तो म्हणाला, "दोन प्रवीण योद्धयांनी आपापली चिलखते घालून आपली तीक्ष्ण पाती घेऊन सर्व लोकांसमक्ष एकमेकांच्या बलाची परीक्षा करावी असे आम्ही सांगतो. दोघांपैकी जो एक योद्धा दुसऱ्याच्या मांसाला आधी जखम करू शकेल, त्याच्या चिलखतातून शस्त्र घुसवून प्रथम रक्त काढील, त्याला ही चांदीची नक्षी भरलेली उत्तम थ्रेसिअन तलवार मी देईन; ती मी अॅस्तेरोपिअसकडून जिंकून घेतलेली आहे; पण चिलखत दोघांनीही भागीदारीत घ्यावे, आणि दोघांनाही माझ्या स्वतःच्या तंबूत मी आकंठ भोजन घालीन."

तात्काल तेलेमॉनपुत्र थोर अॅजॅक्स व तायदिअसपुत्र बलाढ्य दायोमिद हे दोघे उठले. रिंगणाच्या आपापल्या बाजूला दोघानीही चिलखत चढवून शस्त्रे धारण केल्यावर एकमेकांशी भिडण्याच्या आतुरतेने आगीसारख्या चमकत्या नेत्रानी दोघे रिंगणाच्या मध्यभागी गेले. त्यांना पाहून अॅकिअन्स चकित झाले, आणि ते दोघे जेव्हा आता एकमेकांजवळ आले तेव्हा तीनदा त्यांनी पुढे झेप घेतली व तीनदा हातघाईच्या लढाईत एकमेकांवर वार करण्याचा प्रयत्न केला. अॅजॅक्सने दायोमिदच्या गोल ढालीतून आरपार भोसकले, पण तो रक्त काढू शकला नाही, कारण ढालीखालच्या वक्षकवचाने दायोमिदचे संरक्षण केले; त्यानंतर तायदिअसपुत्र दायोमिदने आपल्या प्रचंड ढालीवरून भाल्याच्या टोकाने अॅजॅक्सच्या मानेवर एकसारखा नेम धरून ठेवला, आणि अॅजॅक्सच्या सुरक्षिततेसाठी चिंताग्रस्त झालेल्या अॅकिअन्सनी दोघांना लढाई थांबवून पारितोषिक आपसात वाटून घेण्यास सांगितले. मग अॅकिलिझने ती मोठी तलवार म्यानासह ती लटकावण्याच्या पट्ट्यासह तायदिअस पुत्राला दिली.

त्यानंतर अॅकिलिझने एक भारी वजनाचे लोहचक्र देण्यास काढले; ते बलशाली एइशन पूर्वी क्रीडेत फेकीत असे; त्याला ठार करून इतर लुटीसह ते चक्रही जिंकून अॅकिलिझने आपल्या नौकांत नेले होते. आर्गाइव्हज्‌मध्ये उभा राहून अॅकिलिझ म्हणाला, "या स्पर्धेत जिंकण्याचा प्रयत्न जे कोणी करणार असतील ते पुढे उभे रहा. स्पर्धा जिंकणारास पाच वर्षे लोटून जाईपर्यन्त पुरेल इतका लोखंडाचा साठा मिळेल, त्याची सुभग शेते नगरापासून दूर असली तरी त्याच्या मेंढपाळाला किंवा हलधराला लोखंड विकत घेण्यासाठी प्रवास करावा लागणार नाही कारण त्याच्या स्वतःच्याच परिसरात लोखंडाचा साठा राहील."

तेव्हा पॉलिपोएतिझ व लिऑन्तिअस हे दोन शक्तिशाली पुरुष उठले, त्याचप्रमाणे तेलॅमॉनपुत्र अॅजॅक्स व थोर एपिअसही. ते एकामागून एक उभे राहिले आणि एपिअसने ते चक्र घेऊन गरगरा फिरवून दूर फेकले त्यावर सर्व अॅकिअन्स हसू लागले. त्याच्यामागून मार्सवंशाच्या लिऑन्तिअसने ते चक्र फेकले. तिसऱ्या क्रमाच्या तेलेमॉनपुत्र अॅजॅक्सने ते आधीच्या दोघांनी गाठलेल्या स्थळापलीकडे फेकले, पण जेव्हा धिप्पाड पॉलिपोएतिझने ते चक्र घेतले व गुरे हाकीत असता त्यांच्यात जणु गुराख्याने आपली काठी भिरकावावी तसे ते चक्र दूरवर फेकले, इतके की ते इतरांच्या फेकीपलीकडे दूर जाऊन पडले. ते पाहणाऱ्या सर्वांनी प्रशंसेची गर्जना केली व त्याच्या सोबत्यांनी त्याचे पारितोषिक त्याच्यासाठी वाहून नेऊन त्याच्या नौकापृष्ठावर ठेवले.

त्यानंतर धनुर्विद्येसाठी अॅकिलिझने एक लोखंडाचे पारितोषिक देऊ केले— दहा दुधारी व दहा एकधारी कुऱ्हाडी; काही अंतरावर वाळूत त्याने एक डोलकाठी उभारली, तिला एका बारीक दोरीने एका कबुतराचा पाय बांधला. त्या कबुतरावर नेम धरायचा होता. तो म्हणाला, " जो कोणी कबुतरावर बाण मारू शकेल तो सर्व कुऱ्हाडी जिंकील व त्याला त्या घेऊन जाता येतील, पण पक्ष्याला न मारता दोरीलाच ज्याचा बाण लागेल त्याचा नेम कमी प्रतीचा ठरेल, त्याला एकधारी कुऱ्हाडी मिळतील."

तेव्हा राजा त्यूसर उठला व आयदोमिनिअसचा धिप्पाड शिलेदार मेरिऑनिझही उठला. एका ब्राँझच्या शिरस्त्राणात त्यांनी चिठ्ठ्या टाकल्या व त्यूसरच्या नावाची चिठ्ठी आधी निघाली. तात्काल त्याने बाण सोडला, पण त्याआधी अॅपॉलो राजाला त्याने त्या ऋतूत जन्मलेली पहिलीवहिली कोकरे यज्ञात बळी देण्याचा नवस केला नाही, त्यामुळे पक्ष्यावरील त्याचा नेम चुकला; कारण अॅपॉलोने तो मुद्दाम चुकवला; पण पक्ष्याच्या पायाला बांधलेल्या दोरीला त्याचा बाण लागला, ती आरपार तुटली त्यामुळे ती खाली खुट्टी लोंबू लागली व पक्षी वर आकाशात उडाला आणि अॅकिअन्सनी ओरडून वाहवा केली. त्यूसर नेम धरीत असता आपला बाण तयार ठेवलेल्या मेरिऑनिझने त्याच्या हातातून धनुष्य चटकन काढून घेतले व लगेच नवस केला की आपण त्याच ऋतूत जन्मलेली पहिलीवहिली कोकरे धनुष्याधिप अॅपॉलोला बळी देऊ; पण ते कबुतर उंचावर ढगांखाली असलेले पाहून ते गिरक्या घेत वर जात असता त्याच्या पंखाचा त्याने मध्यभागी वेध केला; बाण पंखातून आरपार जाऊन भूमीवर परत येऊन मेरिऑनिझच्या पायाशी पडला, पण पक्षी त्या जहाजाच्या डोलकाठीवर बसला त्याचे डोके खाली लोंबत होते व सगळी

पिसे निर्जीवपणे लडवडली होती; त्याचा प्राण गेला व तो जडपणे डोलकाठी-वरून खाली पडला. तेव्हा मेरिऑनिझने सर्व दहा दुधारी कुऱ्हाडी घेतल्या व त्यूसर एकधारी कुऱ्हाडी आपल्या नौकांवर घेऊन गेला.

मग पेलिअसपुत्राने एक भाला व बिस्तवावर आजपर्यन्त कधीही न ठेवलेली एक कढई आणली; तिचे मूल्य एका बैला इतके होते व तिच्यावर फुलांच्या आकृती कोरलेल्या होत्या; आणि भालाफेक करण्याची इच्छा असलेले उठले— ते होते अँत्रिअसपुत्र नृपती अँगॅमेम्नॉन व आयदोमिनिअसचा बलशाली शिलेदार मेरिऑनिझ. पण अँकिलिझ बोलला, "अँत्रिअसपुत्रा, बलाच्या बाबतीत व भाला फेकीतही तू इतर सर्वांपेक्षा किती श्रेष्ठ आहेस हे आम्हाला ठाऊक आहे, तरी कढई तू आपल्याबरोबर तुझ्या नौकांवर ने, पण तुला जर रुचत असेल, तर आपण भाला मेरिऑनिझला देऊ या; निदान माझी स्वतःची तरी तशी इच्छा आहे."

अँगॅमेम्नॉन राजाने संमती दिली. तेव्हा त्याने ब्राँझचा तो भाला मेरि-ऑनिझला दिला आणि ती सुबक कढई आपला शिलेदार तॅल्थिबिअस याच्या हाती दिली.



## सर्ग २४

आता क्रीडा सम्मेलन संपले व आपापल्या मार्गाने, जो तो आपल्या नौकेकडे गेला. तेथे त्यांनी रात्रीचे जेवण तयार केले आणि नंतर निद्रेच्या सुखद वरदानाच्या तयारीस लागले. पण ॲकिलिझ आपल्या मृत सोबत्यांची आठवण करीत अजून रुदन करीत होता, आणि जिला साऱ्या गोष्टी शरण येतात त्या निद्रेला त्याच्यावर पकड घेता आली नाही. पॅत्रोक्लसचे सामर्थ्य व पौरुष यांचा लाभ पुन्हा होणे नाही या जाणीवेने तळमळत तो एकदा या तर एकदा त्या कुशीवर वळत राहीला ; दोघानी जोडीने केलेले सारे कर्तृत्व आणि रण-क्षेत्रावर तसेच श्रांतसागराच्या लाटांवरही, दोघे ज्यातून पार पडले ते प्रसंगही त्याला आठवले. या गोष्टींचा एकसारखा विचार करीत तो ओक्साबोक्शी रडला व कधी कुशीवर तर कधी पाठीवर तर कधी पालथा पडून तळमळत राहिला. अखेरीस तो उठला व अत्यंत सैरभैर होऊन समुद्रकिनाऱ्यावर भटकावयास बाहेर पडला. मग जेव्हा रेतीच्या किनाऱ्यावर, समुद्रावर उषा उदयास आलेली त्याला दिसली, तेव्हा त्याने आपले घोडे रथाला जोडले व त्याच्यामागे फरफटत इतस्ततः ओढून नेण्यासाठी हेक्तरचे प्रेत बांधले. ते त्याने मेनिशिअसपुत्राच्या समाधीभोवती तीनदा फरफटत नेले, आणि ते भूमीवर पालथे तसेच पसरलेले राहू देऊन तो आपल्या तंबूत परत गेला. पण ॲपॉलो हेक्तरचे प्रेत विद्रूप होऊ देणार नव्हता, कारण आता तो जरी मृत झाला होता तरी ॲपॉलोला त्याची दया येत होती. म्हणून आपल्या सुवर्णाच्या ढालीने तो देव ॲकिलिझ ते प्रेत फरफटत नेत असता त्याला काही क्षति पोहोचू नये म्हणून ते एकसारखा संभाळीत होता.

ॲकिलिझने संतापाच्या भरात हेक्तरची अशी मानहानी केली ; पण स्वर्गातून धन्य देवानी दयाबुद्धीने खाली पाहिले आणि तो मृतदेह चोरण्यास आर्ग-सान्तक मक्युरीस प्रवृत्त केले. सर्व देव याच मताचे होते ; नव्हते केवळ ज्यूनो, नेपच्यून व जव्हची धूसरनयना कन्या. प्रॲम व त्याच्या लोकांसह इलिअम बद्दलचा त्यांचा कायमचा द्वेष त्यांनी चालूच ठेवला, कारण अलेक्झँड्रस आपल्या मेंढवाड्यात असताना ज्या देवी त्याच्याकडे आल्या होत्या, त्यांचा अवमान करून, त्याच्या नाशास कारणीभूत होणारी एक स्वैरिणी देऊ करणाऱ्या देवीचा पुरस्कार करण्यात त्याने जो अन्याय केला होता त्याची त्यांनी क्षमा केली नव्हती.

म्हणून जेव्हा आता बाराव्या दिवसाची सकाळ उजाडली, तेव्हा अमरांमध्ये फीवस अ‍ॅपॉलो बोलला, " तुम्हा देवाना स्वतःची लाज वाटली पाहिजे ; तुम्ही निष्ठुर व कठोरहृदयी आहात ; हेक्तरने तुमच्याप्रीत्यर्थ यज्ञात कालवडींच्या मांडयांची हाडे व दोषरहित बकरी यांची अग्नीत आहुती दिली नव्हती काय ? आणि आता त्याची पत्नी, माता, अपत्य, पिता प्राअ‍ॅम व त्याचे लोक यांनी त्याला पाहून घेऊन मग तात्काळ अग्नी द्यावा, उचित ते और्ध्वदैहिक संस्कार करावे, यासाठी त्याचे मृतशरीर सोडविण्याचे देखील तुम्हाला धैर्य नाही काय ? तर मग ज्याला न्याय किंवा दया माहित नाही, त्या पिसाट अ‍ॅकिलिझच्या बाजूला तुम्हा सर्वांना रहायचे आहे ? एखादा रानटी सिंह आपल्या महान बळाच्या व साहसी वृत्तीच्या गर्वात माणसांच्या ताब्यातल्या मेंढयांच्या कळपांवर उडी घेऊन ताव मारतो तसा तो आहे. अगदी तशीच अ‍ॅकिलिझने सारी दया झुगारून दिली आहे, आणि जी मानणाराला अत्यंत हानिकारक पण तरीही इतकी वरदायक होते ती सदसद्विवेक बुद्धीही त्याने झुगारून दिली आहे. अ‍ॅकिलिझने ज्याला गमावला त्याच्याहून फार प्रिय असा कोणी--पुत्र असो की स्वतःच्या आईच्यापोटी जन्मलेला सख्खा भाऊ--माणूस गमावील, पण त्याच्याबद्दल शोक करून रडून झाल्यावर तो मग त्याच्याबाबतीत आणखी काही करणार नाही. कारण माणसाचा जीव घेण्यासाठी प्रवृत्त होण्याला फार दुःख व्हावे लागते ; उलट अ‍ॅकिलिझने आता उदात्त हेक्तरला ठार मारल्यावर तो त्याला आपल्या रथामागे फरफटत आपल्या मित्राच्या समाधीभोवती ओढीत फिरवतो. त्याने असे न करणे जास्त भलेपणाचे व त्याच्या हिताचेही झाले असते, कारण जरी तो शूर असला तरी त्याने आपला राग जड मृत्तिकेवर काढावा ते आम्हा देवाना कधी रुचणार नाही."

ज्यूनो संतापून उसळून म्हणाली, " रौप्यधनुप्रभो, हेक्तरला व अ‍ॅकिलिझला तू सारखाच मान देऊ करीत असलास तर तुझे बोलणे योग्य ठरले असते. पण हेक्तर मर्त्य होता व त्याने मानवी स्त्रीचे स्तनपान केले होते, उलट मी स्वतः संगोपन करून वाढविलेल्या देवीचा अ‍ॅकिलिझ मुलगा आहे ; अमराना अमाप प्रिय असणाऱ्या पेलिअसशी मी तिचे लग्न लावून दिले ; तिच्या लग्नाला तुम्ही सारे देव आला होतात ; त्यांच्याबरोबर तू महाभोज घेतलास व तू आपले वीणा-वाद्यही बरोबर आणले होतेस. विश्वासघातकी व हलक्या लोकांशी संबंध ठेवणारा असा तू नेहमीच असतोस."

मग जव्ह म्हणाला, " ज्यूनो, इतकी तोडून बोलू नको ; त्या दोन वीरांचा मान बरोबरीचा राहणार नाही, पण इलिअममध्ये राहणाऱ्या सर्वांमध्ये हेक्तर

हाच देवांना प्रियतम होता, तसाच मलाही ; कारण मला त्याच्या यज्ञाहुती न चुकता मिळाल्या आहेत. माझ्या वेदीवर योग्य ती उपायने ठेवण्यात कधी हात आखडता घेण्यात आला नाही किंवा आम्ही ज्यावर हक्क सांगतो ती अर्घ्यदाने यज्ञाहुतिस्वाद कधी कमी पडले नाहीत. म्हणून प्रतापी हेक्तरचा मृतदेह चोरला जाण्यास मी अनुज्ञा देणार आहे ; आणि तरीही ॲकिलिझला कळल्याशिवाय ते होणे कठिण, कारण त्याची माता रात्रंदिवस त्याच्याजवळ असते. तेव्हा तुमच्यापैकी कोणीतरी थेतिसला माझ्याकडे पाठवावे, म्हणजे मी तिला माझी मंत्रणा सांगेन ; ती अशी की ॲकिलिझने प्राॲमकडून खंडणी घ्यावी व त्याला तो मृतदेह द्यावा."

हे ऐकून वाऱ्यासारखी वेगवती आयरिस त्याचा संदेश पोचवण्यास निघाली. सॅमॉस व खडकाळ इम्ब्रसच्या दरम्यान कृष्णछाय सागरात तिने बुडी मारली ; ती पृष्ठभागाखाली शिरताच तिला आच्छादणाऱ्या पाण्याने सीत्कार केला, आणि मासे मारण्यासाठी वेगाने पाण्यात फेकलेल्या बैलाच्या शिंगाच्या टोकावरील शिशाच्या गोळ्याप्रमाणे ती तळापर्यंत बुडाली. तिला थेतिस एका विस्तीर्ण गुहेत भोवती जमलेल्या इतर समुद्रदेवींसह बसलेली दिसली. त्यांच्यामध्ये बसून ती, स्वतःच्या देशापासून दूर ट्रॉयच्या संपन्न मैदानावर रणात पडणार असणाऱ्या आपल्या उदात्त पुत्रासाठी रडत होती. तिच्यापाशी जाऊन आयरिस म्हणाली, "थेतिस, ऊठ, ज्याच्या मंत्रणा विफल होत नाहीत त्या जव्हने तुला त्याच्याकडे येण्यास सांगितले आहे." आणि थेतिसने विचारले, "तो प्रबळ देव, मला अशी आज्ञा का करीत आहे ? मी फार दुःखात आहे, अमरांमध्ये वावरण्याचा मला संकोच वाटत आहे. तरीही मी जाते, आणि तो बोलेल तो शब्द खाली पडू देणार नाही."

त्यादेवीने आपले कृष्णवर्ण अवगुंठन, ज्याच्याहून अधिक उदास असे कोणतेच वस्त्र असणे शक्य नाही, ते घेतले आणि पुढे जाणाऱ्या द्रुतगती आयरिसच्या मागे ती गेली. समुद्राच्या लाटांनी दुभंगून त्यांना मार्ग दिला व जेव्हा त्या किनाऱ्यावर पोहोचल्या, तेव्हा त्यांनी वर स्वर्गाकडे उड्डाण केले, आणि तेथे त्यांना सभोवती जमलेल्या सदाजीवी पुण्यश्लोक देवांसह बसलेला सर्वसाक्षी सॅटर्नपुत्र दिसला. मिनर्व्हाने उठून आपली जागा थेतिसला दिली, ती स्वतः पिता जव्ह याच्या शेजारी बसली. मग ज्यूनोने एक सुरेख सुवर्णचषक तिच्या हाती दिला व सांत्वनपर भाषण केले ; तेव्हा थेतिसने पेल्यातून पेय प्राशन करून तो परत दिला ; आणि देवामाणसांचा पिता प्रथम बोलला.

" देवी, तुझ्या हृदयावर सध्या दुःखाचा सतत ताबा आहे, हे मला ठाऊक आहे. तुला इतके सारे दुःख झालेले असूनही तू इकडे ऑलिपसला आली आहेस तर ! मग आता मी तुला सांगतो मी तुला कशाला बोलावले ते. नगरे उध्वस्त करणारा ॲकिलिझ व हेक्तरचा देह याविषयी हे गेले नऊ दिवस अमर भांडत आहेत. देवांची अशी इच्छा आहे की, आर्गसांतक मर्क्युरीने तो देह पळवून आणावा ; पण आपल्यात शान्ती व सद्भाव यापुढेही वृद्धिगत होत रहावा म्हणून मी तुझ्या पुत्राला कमीपणा न येता त्याला कसा सन्मान मिळू देणार आहे ते आता सांगतो. तेव्हा सैन्यात जा व या आज्ञा त्याला कळव ; म्हणावे की देव त्याच्यावर रागावले आहेत आणि मी स्वतःतर त्या सर्वांपेक्षा अधिक रागावलो आहे, कारण तो हेक्तरचा देह नौकांपाशीच ठेवून घेत आहे व तो परत देण्यास तयार नाही. हे ऐकून माझ्या भयाने तो त्या देहाचा नाद सोडील व तो परत देईल. त्याचवेळी मी आयरिसला थोर प्रामकडे पाठवून त्याला आज्ञा करीन की त्याने ॲकिअन्सच्या नौकांकडे जाऊन पुत्रासाठी खंडणी द्यावी ; ॲकिलिझचे समाधान होईल अशा देणग्या त्यासाठी त्याने बरोबर घेऊन जाव्या."

देवाने सांगितल्याप्रमाणे रौप्यचरणा थेतिसने केले ; तात्काल ऑलिम्पसच्या अत्युच्च शिखरांवरून तीरासारखी निघून ती पुत्राच्या तंबूकडे गेली ; तेथे तो तीव्र शोक करीत असलेला तिला दिसला, आणि भोवतालचे त्याचे विश्वासू सोबती त्यांचे सकाळचे भोजन सिद्ध करताना आढळले ; त्यासाठी त्यांनी एक मोठे दाट लोकरीचे मेंढरु मारले होते. पुत्राशेजारी बसून त्याच्या मातेने हाताने त्याला कुरवाळून म्हटले, " माझ्या मुला, असा शोक करीत व आक्रंदत तू किती वेळ बसणार ? यामुळे तू स्वतःचे काळीज झिजवून घेत आहेस. खाण्यापिण्याचा किंवा स्त्रीशी प्रणयक्रीडेचा विचारही तुझ्या मनात येत नाही. आणि तसा विचार करतास तर बरे झाले असते ; कारण तुझे आयुष्य आता फार उरले नाही, व दुर्दैवाच्या बळकट हातासह मृत्यु तुझ्या अगदी जवळ येऊन ठेपला आहे. म्हणून आता मी सांगते त्याकडे लक्ष दे, कारण मी जव्हकडून दूती म्हणून तुझ्याकडे आले आहे. तो म्हणतो की देव तुझ्यावर रागावले आहेत व त्या सर्वांपेक्षा स्वतः तो अधिकच रागावला आहे, कारण तू हेक्तरचा देह नौकांपाशीच ठेऊन घेतला आहेस व तो परत करायला तयार नाहीस. म्हणून तो देह परत जाऊ दे व त्यासाठी खंडणी स्वीकार."

आणि ॲकिलिझने उत्तर दिले, " होऊ दे तसेच ; जर ऑलिम्पसनिवासी जव्ह आपल्या स्वतःच्या मनःप्रवृत्तीप्रमाणे मला अशा आज्ञा करीत आहे तर खंडणी घेऊन येणाराने प्रेत घेऊन जावे."

याप्रमाणे मायलेक नौकांजवळ एकमेकांशी झालेल्या दीर्घ संभाषणात बोलले. दरम्यान सॅटर्नपुत्राने मजबूत इलिअमनगरीस आयरिसला पाठवले. तो म्हणाला, "वेगवती आयरिस, ऑलिम्पसच्या प्रासादांमधून इलिअममध्ये जाऊन प्रॲम राजाला सांग की त्याने ॲकिअन्सच्या नौकांपाशी जावे व त्याच्या प्रिय पुत्राचा मृतदेह सोडवावा. ॲकिलिझ संतुष्ट होईल अशा देणग्या त्याने बरोबर घेऊन जावे, आणि फक्त एकाद्या, त्याची खेचरे व गाडी हाकणाऱ्या माननीय सेवकाखेरीज दुसऱ्या कोणाही ट्रोजनला सोबत न घेता एकट्याने जावे, व उदात्त ॲकिलिझने ज्याचा वध केला त्या आपल्या पुत्राचे प्रेत परत आणावे. त्याने मनात आपल्या मृत्यूचा विचार किंवा भयही धरु नये, कारण आम्ही त्याच्या संरक्षणाला व त्याला ॲकिलिझच्या तंबूत घेऊन जायला आर्गसान्तकास पाठवीत आहोत. त्याला ॲकिलिझ ठार मारणार नाही, किंवा दुसऱ्या कोणासही मारु देणार नाही, कारण तो आपल्या आचरणात दक्ष राहून पापी मार्ग स्वीकारणार नाही, आणि अभ्यर्थकाला सर्वतोपरी सन्मानपूर्वक दाक्षिण्याने वागवील."

हे ऐकून वायुवेगा आयरिस आपला संदेश पोचवण्यास त्वरित निघाली. ती प्रॲमच्या घरी गेली व तेथे तिला रुदन व आक्रोश चाललेला दिसला. बाहेरच्या अंगणात प्रॲमचे पुत्र पित्याभोवती बसले होते व आसवांनी त्यांची वस्त्रे भिजली होती. तो वृद्ध अंगाभोवती आपले प्रावरण घट्ट गुंडाळून बसला होता आणि तो चिखलात लोळण घेत होता. त्यावेळी त्याने मुठीत पकडलेल्या घाणीने त्याचे डोके व मान सारी माखून गेली होती. आर्गाइव्हज्नी ठार मारल्यामुळे रणात पडलेल्या बहुसंख्य व शूर पुरुषांची आठवण करीत राजाच्या लेकी व सुना आक्रंदत घरात फिरत होत्या. जव्हची दूती प्रॲमजवळ उभी राहून मृदु शब्दांनी बोलली, पण ती बोलू लागताच त्याला भीतीने घेरले. ती म्हणाली, "दार्दानसच्या संताना, प्रॲम, धीर धर, व भिऊ नको ; मी काही-एक दुष्ट वार्ता आणलेली नाही, तर तुला अनुकूल अशीच माझी वृत्ती आहे. मी जव्हची दूती म्हणून आले आहे, आणि तो जरी तुझ्याजवळ नसला तरी तुझ्याबद्दल तो काळजी वहातो व तुझ्याबद्दल त्याच्या मनात अनुकम्पा आहे. तो ऑलिम्पसचा स्वामी तुला आज्ञा करीत आहे की तू जाऊन उदात्त हेक्तरसाठी खंडणी द्यावीस, व ॲकिलिझ संतुष्ट होईल अशा देणग्या बरोबर न्याव्यास. तू एकट्याने जायचे आहेस. तुझी खेचरे व गाडी हाकणाऱ्या एकाद्या माननीय सेवकाखेरीज दुसरा कोणीही ट्रोजन सोबत म्हणून न्यायचा नाहीस, आणि थोर ॲकिलिझने ज्याचा वध केला त्याचे प्रेत नगरीला परत आणायचेस,

स्वतःच्या मरणाचा विचार किंवा भीतीही तू मनात ठेवायची नाहीस, कारण तुझ्या रक्षणाला आर्गसान्तकास जव्ह पाठवील. त्याने तुला ॲकिलिझच्या तंबूमध्ये नेल्यानंतर ॲकिलिझ स्वतः तुला मारणार नाहीच पण दुसऱ्या कोणासही मारु देणार नाही, कारण तो आचरणात दक्ष राहून पापी वर्तन करणार नाही आणि अभ्यर्थकाला सर्वतोपरी सन्मानपूर्वक दाक्षिण्याने वागवील."

असे बोलल्यानंतर आयरिस आपल्या मार्गाने गेली आणि प्राअॅमने आपल्या पुत्रांना एक खेचरांची गाडी तयार करण्यास सांगितले, व गाडीचा वरचा तट्टचा खालच्या बैठकीवर पक्का बांधण्याची सूचना केली. नंतर तो आपल्या सुगंधित, उंच घुमट असलेल्या सीडार लाकडाच्या बनवलेल्या भांडारात गेला, तेथे त्याच्या अनेक मूल्यवान वस्तू ठेवल्या होत्या. आणि आपली पत्नी हेक्युबा हिला बोलावून तो म्हणाला, "भार्ये, ऑलिम्पसहून एक दूती माझ्याकडे आली व तिने मला सांगितले की ॲकिलिझ संतुष्ट होईल अशा देणग्या घेऊन ॲकिअन्सच्या नौकांकडे जा, व आपल्या प्रिय पुत्राच्या देहासाठी खंडणी देऊन तो सोडव. याप्रकरणी तुला काय वाटते ? माझ्या बाबतीत म्हणशील तर माझ्या मनाने फार घेतले आहे की ॲकिअन्सच्या सेनेमधून त्यांच्या नौकांकडे जावे."

त्याचे ऐकून त्याची पत्नी मोठ्याने आक्रोश करीत म्हणाली, "हाय, ज्या निर्णयशक्तीबद्दल तू स्वतःच्या लोकात तसाच परक्यातही सदा विख्यात होतास तिचे आता काय झाले ? ॲकिअन्सच्या नौकांपर्यंत एकटा जाऊन, तुझ्या शूर पुत्रांपैकी इतके पुष्कळ ज्याने मारले त्याचे तोंड पाहण्याचे साहस तुझ्याच्याने कसे होते ? खरोखरी तुझ्या अंगामध्ये लोहासारखे कठीण धैर्य संचरले असले पाहिजे ! कारण जर त्या क्रूर रानटी माणसाने तुला पाहिले व पकडले तर तो मुळीमुद्धा तुला सन्मानाने वागवणार नाही. व तुला दयाही दाखवणार नाही. तेव्हा आपण दुरुनच येथे आपल्या स्वतःच्या घरात हेक्तरसाठी रुदन करू. कारण.जेव्हा मी त्याला जन्म दिला, तेव्हाच त्याच्या सर्वनियामक दैवाचे धागे कातले गेले, व असे ठरुन गेले की त्यांचे मांस आईबापांपासून दूर असताना कुत्र्यांनी फाडून खावे व तेही त्या भयंकर माणसाच्या घरात--मला तर असं फार फार वाटतं की त्याचे यकृत दातात पकडावं अन् चावून टाकावं--अगदी असाच माझ्या मुलाच्या मृत्यूचा सूड उगवावासा मला वाटतो. त्या माझ्या पुत्राने ॲकिलिझने त्याला मारले तेव्हा एवढाही भ्याडपणा दाखवला नाही, आणि ट्रोजन स्त्रीपुरुषांच्या रक्षणार्थ उभा राहिल्यावर पळून जाण्याचा किंवा लढाई चुकवण्याचा विचारही त्याने केला नाही."

तेव्हा प्राअॅम म्हणाला, "मी जाणारच ; तेव्हा मला अडवू नकोस किंवा माझ्या घरात अशुभसूचक पक्ष्यासारखे आवाज करू नकोस, कारण तू माझा विचार बदलू शकणार नाहीस. जर कोणी मर्त्य मानवाने---एकाद्या भविष्य-वाद्याने किंवा यज्ञातून शकुन पाहणाऱ्या पुरोहिताने---मला हा निरोप धाडला असता, तर त्याचे सांगणे खोटे मानून मी तिकडे दुर्लक्ष केले असते ; पण आता मी त्या देवीकडून सारे ऐकले आहे व तिला समोरासमोर प्रत्यक्ष पाहिली आहे ; तेव्हा मी जाईनच आणि तिचे सांगणे व्यर्थ होणार नाही. अॅकिअन्सच्या नौकांपाशी मरणे माझ्या नशिबी असले, तरीही ते मी स्वीकारीन ; जर प्रथम माझ्या पुत्राला बाहुपाशात घेऊन त्याच्यासाठी पोटभर रडून मला दिलासा लाभत असेल तर मग नंतर अॅकिलिझ मला खुशाल मारून टाकू दे."

असे म्हणून त्याने आपल्या पेट्यांची झाकणे वर उचलली व बारा उत्तम महावस्त्रे बाहेर काढली. त्याचप्रमाणे त्याने बारा एकपदरी झगे, बारा कांबळी, बारा सुरेख प्रावरणे व तितकेच अंगरखे काढले. त्याने दहा टॅलेन्तभार सोने तोलून घेतले, आणि शिवाय दोन चकचकीत तीन खुरांची भांडी, चार कढया व थेसिअन्सनी त्यांच्याकडे तो राजदौत्य करण्यास गेला असता त्याला दिलेला एक अतिसुंदर पेलाही आणवला ; तो फार मूल्यवान होता, पण तोही देण्यास तो मागेपुढे पाहणार नव्हता, कारण त्याला आपल्या पुत्राच्या देहासाठी खंडणी देण्याची अत्यंत उत्कंठा लागली होती. मग त्याने राजसभेतून साऱ्या त्रोजनांना हाकून लावीत संतप्त शब्दांनी त्यांची खरडपट्टी काढली. तो ओरडला, "चालते व्हा, मला लाज व मानहानी आणणार आहात तुम्ही ! तुम्हाला स्वतःच्या घरी तुमचे स्वतःचे दुःख नाही का, मला छळायला इथे आला आहात ते ! सॅटर्नपुत्राने हे दुःख, माझा सर्वात शूर पुत्र गमावून बसण्याची ही आपत्ती माझ्यावर आणली ही लहानसहान गोष्ट वाटते तुम्हाला ? नव्हे, आता तुम्ही स्वतः ती मोठी आपत्ती असल्याचे सिद्ध कराल, कारण तो आता गेल्यानंतर तुम्हाला मारून टाकणे हे अॅकिअन्सना सोपे काम होईल. माझ्या-पुरते म्हणाल तर नगरीची लूट होऊन ती उध्वस्त झालेली पाहण्याआधी मला खाली हेदिझगृही जाऊ द्या."

त्या लोकांना त्याने आपल्या दंडाने पिटाळून लावले व तो घालवू लागला तसे तेही त्वरेने चालते झाले. मग त्याने आपल्या पुत्रांना हाक दिली ; हेलेनस, पॅरिस, उदात्त अॅगॅथॉन, पॅमॉन, अॅन्तिफोनस, मोठमोठ्याने युद्धगर्जना करणारा पोलायतिझ, दैफोबस, हिप्पोथौस व दायस या नऊ जणांना रागे भरून वृद्धाने जवळ बोलावले ; तो ओरडला, "तात्काळ माझ्यापाशी या, मला

लाज आणणाऱ्या नालायक पोरांनो ; हेक्तरऐवजी तुम्ही सारे त्या नौकांपाशी मारले गेला असतात तर बरे झाले असते! दुर्दैवी माणूस मी ;—साऱ्या ट्रॉयमध्ये सर्वात शूर मुलगे मला होते—उमदा नेस्तॉर, निर्भयसारथी ट्रॉइलस व माणसात देवासारखा हेक्तर—एकाद्याला वाटले असते की तो एकाद्या अमराचाच पुत्र होता—पण त्यांच्यातला एकही आता उरला नाही. मार्सने त्या साऱ्याना मारून टाकले व ज्यांची मला लज्जा वाटते तेवढेच काय ते आता माझ्यापाशी उरले आहेत. खोटे बोलणारे, लटपटत्या पावलांचे, नृत्यामध्ये तेवढे वीर, तुमच्या स्वतःच्या लोकांचीच कोकरे व करडे चोरणारे ; तुम्ही माझ्यासाठी तात्काल एक गाडी का तयार करीत नाही व तिच्यावर या साऱ्या वस्तू का चढवीत नाही, म्हणजे मला माझ्या मार्गाला तरी लागता येईल ?"

असे तो बोलला व पित्याच्या दटावणीने ते भिऊन गेले. त्यांनी नवीनच घडवलेली एक मजबूत खेचरांची गाडी आणली व तिची तट्ट्यांची कमान गाडीच्या खालच्या बैठकीवर पक्की बांधली. खुंटीवर टांगलेले खेचरांचे जू त्यांनी काढले ; ते बॉक्स झाडाच्या लाकडाचे असून त्याच्या माथ्यावर एक उंचवटा होता व लगाम ओवण्यासाठी कड्या होत्या. नंतर जू दांड्याला बांधण्यासाठी त्यांनी अकरा हात लांबीचा एक त्याच कार्यासाठी बनवलेला पट्टा आणून त्याने जू दांड्याला बांधले. उभ्या खुंटीवर कडी अडकवून जू दांड्यांच्या अगदी दूरच्या टोकाला बांधले व मधल्या उंचवटाच्या दोन्ही बाजूला पट्ट्याचे तीन फेरे देऊन खुंटी पक्की केली व पट्टा तिच्याखाली वळवून घेतला. हे झाल्यावर त्यांनी भांडारातून हेक्तरचा देह विकत घेण्यासाठी द्यायची बहुमोल खंडणी बाहेर आणली व ती गाडीवर व्यवस्थित रचली ; नंतर एकदा मायसिअन्सनी प्राअॅमला उत्तम भेट म्हणून दिलेली गाडीला जोडण्याची वळकट खेचरे गाडीला जुंपली ; पण स्वतः प्राअॅमसाठी त्यांनी वृद्ध राजाने स्वतः पोसून वाढवलेले व आपल्या उपयोगासाठी ठेवलेले घोडे रथास जुंपले.

असे दक्षतापूर्वक प्राअॅमने व त्याच्या सेवकाने प्रासादापाशी त्यांची वाहने जोडण्याचे काम केले. मग हेक्युबा अत्यंत दुःखाने एक मद्याने भरलेला सोन्याचा पेला उजव्या हातात घेऊन त्यांच्याकडे आली, या हेतूने की त्यांनी निघण्यापूर्वी अर्घ्यदान करावे. घोड्यांपुढे उभी राहून ती म्हणाली, " हे घ्या, तात ज्व्हला अर्घ्य द्या, व माझ्या इच्छेविरुद्ध तुम्ही नौकांकडे जाऊ इच्छीत आहात, तर शत्रूच्या हातातून तुम्ही सुखरूप परत यावे अशी प्रार्थना करा. इडावर बसून खाली सर्व ट्रॉयवर दृष्टी ठेवणाऱ्या चक्री वादळाच्या स्वामीला, त्या सॅटर्नपुत्राला

आळवून सांगा की त्याने आपला वेगवान दूत तुमच्या उजव्या हाताला धाडावा ; तो शुभशकुन दाखवणारा पक्षी सर्व पक्ष्यात बलवान व देवराजाला सर्वात प्रिय पक्षी आहे ; तो उजवीकडे आला म्हणजे तुम्हाला स्वतःच्या डोळ्यांनी पाहून तो प्रत्यक्ष दिसेल, व दॅनाअन्सच्या नौकांकडे तुम्ही जात असता तुम्हाला त्यामुळे धीर येईल. जर सर्वसाक्षी जव्ह हा दूत पाठवणार नसेल, तर तुमचा कितीही दृढनिश्चय असला तरी मी तुम्हाला आर्गाइव्हज्च्या नौकांकडे जाऊ देणार नाही."

आणि प्राॲमने उत्तर दिले, " भार्ये, तू जसे म्हणशील तसे मी करीन. जव्हला प्रार्थना करण्यासाठी हात उंचावणे योग्यच आहे ; जर तसे केले तर तो माझ्यावर कृपा करण्याचा संभव आहे."

असे म्हणून वृद्धाने दासीला आपल्या हातांवर पवित्र पाणी ओतण्यास सांगितले, आणि एका वाडग्यात दासी पाणी घेऊन आली. त्याने आपले हात धुतले आणि पत्नीकडून तो पेला घेतला. मग त्याने अर्घ्यदान करून अंगणाच्या मध्यभागी उभे राहून दृष्टी स्वर्गाकडे लावून प्रार्थना केली. तो म्हणाला, "तात जव्ह, इदाहून राज्य करणाऱ्या महातेजस्वी महाश्रेष्ठा, एवढे मागणे मान्य कर की ॲकिलिझच्या तंबूत दयाबुद्धीने व सहानुभूतीने माझे स्वागत होईल ; आणि माझ्या उजव्या हाताला तुला सर्व पक्ष्यात प्रिय व सर्वात प्रबळ असा शुभशकुनसूचक पक्षी, तुझा वेगवान दूत धाड, म्हणजे तो माझ्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहून, मी दॅनाअन्सच्या नौकांकडे जात असता मला धीर येईल."

अशी प्रार्थना त्याने केली व मंत्रणास्वामी जव्हने ती ऐकली. तात्काल त्याने उडणाऱ्या पक्ष्यांतला सर्वात अचूक शकुन दर्शवणारा पक्षी, माणसे ज्याला काळा गरुडही म्हणतात तो कृष्णवर्ण शिकारी गरुड धाडला. श्रीमंत माणसाच्या महालाला बसवलेल्या उत्तम कारागिरीच्या व भक्कम अडसराच्या दरवाज्यांइतके त्याचे पंख दोन्ही बाजूंना दूरवर पसरले होते. तो नगरीवरून उडत त्यांच्या उजव्या हाताच्या बाजूस आला, आणि त्यांनी जेव्हा त्याला पाहिले तेव्हा त्यांना आनंद वाटून हृदयाला दिलासा लाभला. वृद्धाने रथावर चढण्याची त्वरा केली आणि आतील दरवाज्यातून बाहेर पडून बाहेरच्या प्रांगणातून आवाजाचे पडसाद उठवणाऱ्या वेसघराखालून रथ हाकला. त्याच्यापुढे, जाणत्या इदिअसने हाकलेली खेचरे चार चाकांची गाडी ओढीत निघाली. त्यांच्यामागे तो वृद्ध आपल्या चाबकाने फटकारीत नगरीतून वेगाने हाकीत नेत असलेले घोडे होते, आणि त्याच्यामागून, तो जणू मरणाच्या मार्गाने जात असल्यासारखे, आक्रंदत व आक्रोश करीत त्याचे मित्र गेले. तो नगरीतून

खाली येऊन मैदानावर पोहोचताच त्याच्या पाठीमागून गेलेले त्याचे पुत्र व जावई परत इलिअमला गेले.

पण मैदानावर प्राअॅम व इदिअस जेव्हा दिसू लागले तेव्हा ते सर्वसाक्षी जव्हच्या दृष्टिपथातून सुटले नाहीत ; खाली त्या वृद्ध मनुष्याकडे पाहून जव्हला त्याची दया आली ; मग तो आपला पुत्र मर्क्युरी यास म्हणाला, "मक्युरी, लोकांना मार्गावर सोबत करण्याची व जे तुला हाक घालतील त्यांच्या हाकेला मान देण्याची प्रवृत्ती तुझ्यामध्ये जास्त आहे, म्हणून म्हणतो जा, व प्राअॅमला अशातऱ्हेने अॅकिअन्सच्या नौकांपाशी ने की तो पेलिअसपुत्राजवळ पोहोचेपर्यंत इतर कोणत्याही दॅनॅअनला तो दिसू नये किंवा त्याची चाहूल लागू नये."

असे तो बोलला, आणि मार्गदर्शक व पालक, आर्गसान्तक मर्क्युरी याने सांगितल्याप्रमाणे केले. तात्काल त्याने आपल्या चकचकीत सुवर्णपादुका पावलांवर बांधल्या ; त्यांच्यामुळे त्याला भूमीवर किंवा सागरावर वाऱ्यासारखे उड्डाण करता येई ; आपल्या मर्जीप्रमाणे माणसांचे डोळे झोपेने मिटवायला किंवा झोपेतून उठवायला जिचा उपयोग होई ती, त्याची काठी त्याने घेतली व ती हाती धरून ट्रॉय व हेलेस्पॉंत समीप येईपर्यंत उड्डाण केले ; दिसायला तो एकादा उच्चकुलीन, यौवनाच्या व देखणेपणाच्या ऐन बहरातला, तोंडावर कोवळी लव नुकतीच फुटु लागलेला तरुण वाटत होता.

आता जेव्हा प्राअॅम व इदिअस यांनी आपली वाहने इलिअसच्या भव्य समाधी-पुढून हाकून नेली, तेव्हा त्यांनी आपले घोडे व खेचरे नदीवर पाणी पिण्यासाठी थांबविली, कारण रात्रीच्या अंधाराच्या छाया पडू लागल्या होत्या. म्हणून जेव्हा इदिअसने त्यांच्याजवळ मर्क्युरी उभा असलेला पाहिला तेव्हा तो प्राअॅमला म्हणाला, "दार्दानसच्या वंशजा, अवधान दे, विचार करायलाच हवा अशी एक परिस्थिती येथे उद्‌भवली आहे. मला एक मनुष्य दिसतो आहे तो लौकरच आपल्यावर हल्ला करील असे मला वाटते ; आपण आपले घोडे घेऊन पळून जाऊ या, किंवा निदान त्याचे गुडघे कवटाळून आपल्यावर दया करण्याची विनवणी त्याला करू या."

हे ऐकले तेव्हा वृद्ध मनात चरकून गेला व त्याला भयंकर भीतीने घेरले ; सुन्न झाल्यासारखा तो जागच्याजागीच उभा राहिला व त्याच्या सबंध शरीरावर काटा येऊन केस ताठ उभे राहिले ; पण माणसांच्या भाग्याला कारणीभूत होणारा तो देव त्याच्यापाशी आला व त्याचा हात धरून म्हणाला, "हे तात, दुसरी माणसे निजली असताना ऐन रात्री तुमची खेचरे व घोडे तुम्ही असे कुठे

हाकून नेत आहात ? जवळच असणाऱ्या क्रूर व निष्ठूर अशा भयंकर ॲकि-अन्सचे भय तुम्हाला वाटत नाही का ? जर त्यांच्यापैकी एकाद्याने प्रहरा-मागून प्रहर उलटत असलेल्या रात्रीच्या काळोखात इतकी संपत्ती वाहून नेताना तुम्हाला पाहिले तर तुमची गत काय होणार नाही ? तुम्ही आता तरुण राहिलेले नाही आहात, व तुमच्यावर हल्ला करू पाहणारांपासून तुमचे रक्षण तुमच्याबरोबरचा माणूस करू शकणार नाही, कारण तो फारच म्हातारा झालेला आहे. माझ्याबद्दल म्हणाल तर मी स्वतः तुम्हाला काही अपाय करणार नाही उलट दुसऱ्या कोणाविरुद्ध तुमचे संरक्षणच करीन, कारण तुमच्यावरून मला माझ्या स्वतःच्या वडिलांची आठवण येते."

आणि प्राॲमने उत्तर दिले, "माझ्या प्रिय पुत्रा, खरोखर तू म्हणतोस तशी परिस्थिती आहे खरीच ; तथापि कोणातरी देवाने आपला वरदहस्त माझ्यावर धरला आहे असे दिसते. कारण त्याने तुझ्यासारखा वाटसरू इतक्या समयोचित-पणे मला भेटायला पाठवला आहे ; तू रूपाने व अंगलटीने इतका देखणा आहेस आणि तुझा सारासारविवेक इतका उत्कृष्ट आहे की तू कुणा पुण्यश्लोक माता-पित्यांचाच पुत्र असला पाहिजेस."

तेव्हा आर्गसान्तक मार्गदर्शक पालनकर्ता म्हणाला, "महाराज, तुम्ही म्हणालात ते सारे खरे आहे ; पण मला सांगा व अगदी खरे सांगा की ही विपूल संपत्ती सुरक्षित रहावी म्हणून तुम्ही परदेशीयांकडे घेऊन जात आहात की जो तुम्हा सर्वांत शूर पुरुष होता व ॲकिअन्सशी लढण्यात कधीही उणा न पडणारा होता तो आपला पुत्र मारला गेल्यामुळे हताश होऊन तुम्ही सगळे मजबूत इलिअम सोडून जात आहात ?"

आणि प्राॲमने म्हटले, "माझ्या मित्रा तू कोण आहेस, आणि तुझे आईबाप कोण आहेत ? माझ्या मंदभाग्य पुत्राच्या दुर्दैवाबद्दल इतक्या अचूकपणे तू बोलत आहेस म्हणून विचारतो."

आर्गसान्तक, मार्गदर्शक पालनकर्ता उत्तरार्थी त्याला म्हणाला, "महाराज, उदात्त हेक्तरसंबंधी आपण मला विचारता आहात तेव्हा मी कोण याची खातर-जमा तुम्ही करू पहात आहात असे दिसते. लढाईत आर्गाइव्हजना त्यांच्या नौकांकडे पिटाळून नेत असताना व त्यांना खड्गाने ठार मारीत असताना त्याला मी अनेकवेळा पाहिले आहे. आम्ही निश्चल उभे राहून आश्चर्य करीत असू. कारण ॲत्रिअसपुत्रावरील रागामुळे ॲकिलिझ आम्हाला लढू देत नव्हता. मी त्याचाच शिलेदार आहे व त्याच्याच नौकेत त्याच्याबरोबर आलो. मी एक मिर्मिदॉन आहे व माझ्या पित्याचे नाव पॉलिक्टॉर आहे. तो सधन मनुष्य

आहे व साधारण तुमच्याच वयाचा आहे. माझ्याशिवाय त्याला आणखी सहा मुलगे आहेत व मी सातवा आहे. आम्ही चिठ्ठ्या टाकल्या व अॅकिलिझसह नौकेतून इकडे येणे माझ्या वाटयास आले. आता मी नौकांकडून मैदानावर आलो आहे, कारण दिवस उजाडताच अॅकिअन्स नगरीभोवती लढण्यासाठी युद्धव्यूह रचतील. निष्क्रियतेमुळे ते अस्वस्थ झाले आहेत व लढाईस इतके उत्सुक आहेत की त्यांचे राजवंशीय मुख्य त्यांना आवरून ठेवू शकत नाहीत."

तेव्हा प्रायॅमने उत्तर दिले, "जर तू खरोखरच पेलिअसपुत्राचा शिलेदार असलास तर आता मला संपूर्ण सत्य सांग. माझा पुत्र खरोखरच नौकांपाशी आहे की अॅकिलिझने त्याच्या अवयवांचे तुकडे तुकडे करून त्याला आपल्या शिकारी कुत्र्यांपुढे टाकले आहे ?"

आर्गसान्तक, मार्गदर्शक व पालनकर्ता बोलला, "महाशय, अजून कुत्र्यांनी किंवा गिधाडांनी त्याला फाडून खाल्लेले नाही ; तो अद्यापि अॅकिलिझच्या नौकेपाशी तंबूजवळ नुसता पडला आहे, आणि जरी आता तो तेथे पडल्याला बारा दिवस झाले, तरी त्याचे मांस झडले नाही किंवा वीरांना खाणाऱ्या किड्यां-नीही त्याला खाल्ले नाही. दिवस उजाडताच अॅकिलिझ निघृणपणे त्याला आपल्या प्रिय सोबत्याच्या समाधीभोवती फरफटत फिरवतो, पण त्यामुळे त्याला काही अपाय होत नाही. तुम्ही स्वत: येऊन पहा की तेथे पडलेला त्याचा देह कसा देवासारखा ताजातवाना दिसतो आहे. त्याच्यावरचे सारे रक्त धुवून गेले आहे व अनेकांनी त्याला आपल्या भाल्यांनी भोसकले असूनही त्याच्या देहावरची प्रत्येक जखम कशी भरून आली आहे. पुण्यश्लोक देवांनी तुमच्या शूर पुत्राची इतकी काळजी घेतली आहे, कारण त्यांचे त्याच्यावर अपरिमित प्रेम होते."

त्याचे बोलणे ऐकून वृद्धाचे सांत्वन झाले व तो म्हणाला, "माझ्या मुला, अमरांना उचित उपायने देत रहाणे किती हितकर असते पहा ! कारण तो जन्माला आला हे जितके निश्चित तितकेच हेही निश्चित आहे की ऑलिम्पस-धारक देवांना माझा पुत्र कधीही विसरला नाही, आणि आता तो मृत असूनही ते त्याची परतफेड करीत आहेत. म्हणून हे सुंदर पात्र माझ्याकडून स्वीकार, माझे रक्षण कर व स्वर्गस्थ शक्तींच्या सहाय्याने मी पेलिअसपुत्राच्या तंबूला पोहोचेपर्यंत मला मार्गदर्शन कर."

तेव्हा आर्गसान्तक, मार्गदर्शक व पालनकर्ता बोलला, "महाशय, तुम्ही मला लालूच दाखवीत आहात व माझ्या अननुभवी तरुणपणाचा आपल्या

मतलबासाठी उपयोग करून घेत आहात, पण तुम्ही माझे मन वळवू शकणार नाही, कारण ॲकिलिझच्या नकळत तुम्ही मला देणग्या देऊ करीत आहा ; त्याला मी फार भितो व त्याला फसविणे मोठा अपराध मानतो कारण तसे केल्यास माझ्यावर लौकरच काही संकट ओढवू शकेल व ते मी टाळू इच्छितो. तथापि तुमचा मार्गदर्शक म्हणून मी प्रत्यक्ष आरगॉसपयत सुद्धा जाईन आणि भूमीवरून किंवा समुद्रमार्गे तुमचे इतके काळजीपूर्वक संरक्षण करीन, की तुमच्या सोबत असणाऱ्याला कमी लेखून कोणीही तुमच्यावर हल्ला करू नये."

भाग्य भेटवणाऱ्या त्या देवाने मग रथावर उडी घेतली, आणि चाबूक व लगाम पकडून खेचरात व घोड्यात नवी तरतरी जागृत केली. नौकांपुढे असलेला खंदक व भित यांच्यापाशी ते जेव्हा पोहोचले तेव्हा पाहऱ्यावरच्या लोकांनी नुकतीच रात्रीची जेवणे केली होती; त्या सर्वांना आर्गसान्तकाने गाढ निद्रेच्या आधीन केले. मग त्याने दरवाजे उघडण्यासाठी अडसर सरकवले आणि गाडीतील संपत्तीसह प्राॲमला आत नेले. लौकरच मिर्मिदॉन्सनी पाइन वृक्षाची झाडे तोडून त्या कापलेल्या लाकडांनी आपल्या राजाकरिता जो भव्य उंच निवास बांधला होता त्याप्रत ते आले ; तो बांधून झाल्यावर त्यांनी मैदानावरून कापून आणलेल्या राठ झुबकेदार गवताचे त्याच्यावर छप्पर केले होते, व सर्व निवासाभोवती एक मोठे प्रांगण ठेवून त्याला दाटीने बसवलेल्या लाकडी खुंटांचे कुंपण केले होते. दरवाजा बंद ठेवण्यास पाइनच्या लाकडाचा जो एकच अडसर होता तो नेटाने लावण्यास, तसाच दरवाजा उघडण्यासाठी मागे घेण्यासही तीन माणसे लागत, पण ॲकिलिझला मात्र एकट्यालाच तो काढता येत होता. मर्क्युरीने वृद्धासाठी दरवाजा उघडला व पेलिअसपुत्रासाठी त्याने वाहून आणलेली बरोबरची संपत्ती आत आणली. मग रथावरून खाली उडी टाकून तो म्हणाला, "महाराज, तुमच्यासोबत आलेला मी, अमर मर्क्युरी आहे, कारण माझ्या पित्याने तुमच्याबरोबर जाण्यासाठी मला पाठवले. आता मी तुमचा निरोप घेतो व मी ॲकिलिझच्यासमोर येत नाही, कारण एका देवाने मर्त्यमानवांचे इतक्या उघडपणे मित्रत्व करणे त्याच्या कोपास कारण होईल. तुम्ही आत जाऊन पेलिअसपुत्राचे गुडघे कवटाळा ; त्याच्या पित्याच्या, त्याच्या रूपवती मातेच्या व त्याच्या पुत्राच्या नावांनी त्याची आळवणी करा ; अशा रीतीने त्याचे मन तुम्ही हेलावू शकाल."

हे शब्द बोलून मर्क्युरी परत उत्तुंग ऑलिम्पसला गेला. खेचरे व घोडे इदिअसकडे सोपवून, त्याला होता तेथेच उभा करून प्राॲमने रथावरून खाली उडी टाकली. तो थेट घरात देवांचा प्रिय ॲकिलिझ जेथे बसला होता तेथे

गेला. तेथे त्याला ॲकिलिझ व थोड्या अंतरावर बसलेले त्याचे लोक आढळले, केवळ वीर ऑतोमेदॉन व मार्सवंशीय ॲल्सिमस ॲकिलिझजवळ त्याच्यासेवेत तत्पर होते, कारण त्याचे खाणेपिणे नुकतेच उरकले होते व भोजनाचे मेज अजून तेथेच होते. त्यांच्या दृष्टीस न पडता प्रा‍ॲम राजाने आत प्रवेश केला, आणि सरळ ॲकिलिझपाशी जाऊन त्याचे गुडघे कवटाळून आपल्या पुत्रांपैकी अनेकांचे जीव घेणारे त्याचे भयंकर प्राणघातक हात चुंबिले.

ज्याप्रमाणे एकाद्या दुष्ट दैवदुर्विलासाने एकाद्या माणसाच्या हातून त्याच्याच देशातला कोणी मारला जाऊन, त्याला परकीयांच्या देशात पळ काढून एकाद्या थोर पुरुषाच्या आश्रयाला जावे लागावे, व त्याला पाहून सर्वांनी आश्चर्य करावे अगदी तसेच आश्चर्य प्रा‍ॲमला पाहून ॲकिलिझला वाटले. इतरांनीही एकमेकांकडे पाहून आश्चर्य केले, पण प्रा‍ॲमने ॲकिलिझची विनवणी केली, तो म्हणाला, "हे देवांसमान ॲकिलिझ, जो अगदी थेट माझ्यासारखाच, वार्धक्याच्या दुःखी देहलीवर आहे त्या तुझ्या पित्याचा विचार मनात आण; असे असू शकेल कदाचित की त्याच्याजवळ राहणारे त्याचा छळ करीत असतील व युद्ध व सर्वनाश यांच्यापासून त्याचे संरक्षण करायला कोणी नसेल. तरीही तू अजून जिवंत आहेस हे तो जेव्हा ऐकतो तेव्हा त्याला आनंद वाटतो व आपला प्रिय पुत्र ट्रॉयहून परत आपल्याकडे आलेला आपण पाहू या आशेने परिपूर्ण असे त्याचे दिवस व्यतीत होत असतात; पण मी पडलो कमनशिबी मनुष्य! साऱ्या ट्रॉयमध्ये सर्वांत शूर असे माझे पुत्र होते आणि त्यातला एक देखील आता उरला नाही. ॲकिअन्स येथे आले तेव्हा मला पन्नास मुलगे होते; त्यातले एकोणीस एकाच मातेने जन्म दिलेले व बाकीचे माझ्या परिवारातल्या बायकांना माझ्यापासून झालेले. त्यांच्यापैकी बहुसंख्य भयानक मार्सने मारून टाकले, आणि जो एकटाच शिल्लक राहिला होता—जो आमच्या नगरीचा व आमचा रक्षक होता, त्याला तू नुकताच मारला आहेस; म्हणून आता मी ॲकिअन्सच्या नौकांकडे त्याचा देह खंडणी भरून तुझ्याकडून सोडवून घेण्यासाठी, मोठी संपत्ती घेऊन आलो आहे. हे ॲकिलिझ स्वर्गाच्या प्रकोपाचे भय तुझ्या मनात असू दे; स्वतःच्या पित्याचा विचार कर व माझ्यावर दया कर, मी जास्तच दयास्पद आहे कारण आजपर्यंत माझ्याआधी कधीही कोण्या माणसाने केले नसेल इतके माझे हृदय मी निष्ठूर केले आहे व माझ्या पुत्राला मारणाऱ्याचा हात उचलून ओठांना लावला आहे."

प्रा‍ॲम असे बोलला व स्वतःच्या पित्याची आठवण होऊन ॲकिलिझचे हृदय कळवळले. वृद्धाचा हात धरून त्याला त्याने हळुवारपणे दूर केले, दोघेही

ओक्साबोक्शी रडले. ॲकिलिझच्या पायाशी पडलेला प्राअॅम हेक्तरसाठी रडत होता आणि ॲकिलिझ एकदा पित्यासाठी तर एकदा पॅत्रोक्लससाठी रडत होता. त्यांच्या विलापांनी घर व्यापून गेले. पण जेव्हा ॲकिलिझचे अगदी पोटभर रडून झाले व त्याच्या खेदाच्या कटुतेचा भार ओसरला, तेव्हा त्याने आसनावरून उठून वृद्धाच्या पांढऱ्या केसांची व दाढीची दया येऊन त्याला हात धरून उठवले. मग तो म्हणाला, "दुःखी पुरुषा, तू खरोखर फार मोठे साहस केले आहेस; एकटघाने ॲकिअन्सच्या नौकांपाशी येऊन, तुझे किती एक शूर पुत्र मारणाऱ्याच्या समोर प्रवेश करण्याचे धाडस तुला झाले तरी कसे? तुझे धैर्य खरोखर लोखंडीच असले पाहिजे. आता या आसनावर बैस, आणि आपल्याला कितीही दुःख झाले असले तरी आपण आपला शोकावेग आपल्या हृदयात लपवून ठेवू या. कारण रडून आपल्याला काही फायदा होणार नाही. अमरांना चिंता कशी ती ठाऊक नसते पण मर्त्य मानवांसाठी जो दैवगतीचा धागा ते काततात तो मात्र दुःखपूर्ण असतो. जव्हच्या प्रासादातील भूमीवर दोन कुंभ आहेत, एकात अनिष्टकारक देणग्या भरलेल्या असतात व दुसऱ्यात कल्याणकारक; मेघगर्जनाधिप जव्ह ज्याच्यासाठी मिश्र स्वरुपाच्या देणग्या तयार करतो, त्याला कधी सुदैवाचा तर कधी दुर्दैवाचा अनुभव येतो; पण जव्ह ज्याला अनिष्टकारक देणग्यांशिवाय दुसऱ्या कुठल्या पाठवीतच नाही, त्याच्याकडे लोक तिरस्काराने बोट दाखवतील, जगाच्या अंतापर्यंत दुष्काळ त्याचा पाठलाग करील, आणि देवांकडून किंवा मानवांकडून मान न मिळता पृथ्वीच्या पाठीवर तो इतस्ततः वणवण करीत भटकेल. पेलिअसवर अगदी असेच प्रसंग आले; जन्मापासून देवांनी त्याला सर्व उत्तम गोष्टी प्रदान केल्या; कारण इतर सर्व माणसांपेक्षा अधिक भरभराटीत व वैभवात त्याने मिर्मिदॉन्सवर राज्य केले, आणि जरी तो मर्त्यमानव होता तरी त्याला त्यांनी वधू म्हणून एक देवी दिली. पण त्याच्या वाटचाला देखील स्वर्गस्थ शक्तींनी दुर्दैव आणले, कारण त्याच्या घरात त्याच्यापासून जन्म घेतलेल्या राजबालकांचा वंश नाही, केवळ एकच पुत्र आहे व तो अगदी अकाली मरणार हे निश्चित झाले आहे; आणि आता माझा पिता वृद्ध होत चालला असताही त्याचा सांभाळ मला करता येणार नाही, कारण तुझा व तुझ्या मुलाबाळांचा नाशकर्ता होण्यास मला येथे ट्रॉयलाच राहिले पाहिजे आणि हे प्राअॅम, मी ऐकले आहे की पूर्वी एकेकाळी तूही सुखी होतास. लोक म्हणतात की संपत्ती व संतान वैपुल्य या बाबतीत लेस्पॉसमधील सर्वांपेक्षा उत्तरेकडील मॅकार राज्यापेक्षा, अधिक अंतर्भागातील फ्रिजिआपेक्षा, आणि विस्तीर्ण हेलेस्पॉंतवर राहणाऱ्यांपेक्षा तू अग्रेसर होतास;

पण स्वर्गवासीयांनी हे अरिष्ट तुझ्यावर टाकलेल्या दिवसापासून तुझ्या नगरी-भोवती एकसारखे युद्ध व हिंसा चालली आहे. या अरिष्टाला धीराने तोंड दे व तुझ्या दुःखात मधून मधून थोडे खंड पडू देत. तू तुझ्या शूर पुत्रासाठी कितीही शोक केलास तरी त्यापासून तुला काही लाभ होणार नाही. मृतावस्थे-तून त्याला तू उठवू शकणार नाहीस; तसे करण्याआधीच आणखी काहीतरी दुःख तुझ्यावर कोसळेल."

आणि प्राअॅमने उत्तर दिले, "हे राजा, हेक्तर तुझ्या तंबूत अजून दुर्लक्षित अवस्थेत पडला असताना मला बसायला सांगू नकोस, तर तुझ्यासाठी मी आणलेली भरपूर खंडणी स्वीकार व त्याला तात्काळ माझ्या स्वाधीन कर म्हणजे त्याला मी पाहू शकेन. या खडणीने तुझी समृद्धी होवो आणि तू आपल्या भूमीप्रत सुखरूप जाऊन पोहोचोस; कारण तू येथे माझ्या जिवाला धक्का न लावता सूर्यप्रकाश पहाण्यासाठी मला जिवंत ठेवले आहेस."

त्याच्याकडे कठोरपणे पाहून अॅकिलिझ म्हणाला, "महाशय, मला आणखी त्रास देऊ नका; हेक्तरचा देह आपण होऊन देऊन टाकण्याचा माझा विचार आहे. समुद्रनिवासी वृद्धाची कन्या जी माझी माता, तिने जव्हकडून येऊन मला तो देह तुमच्या स्वाधीन करण्यास सांगितले आहे. शिवाय, हे प्राअॅम, मला पुरते ठाऊक आहे, व तुलाही ते लपविता येणार नाही की, कोणी देव तुला अॅकिअन्सच्या नौकांकडे घेऊन आला आहे; कारण नाही तर, कितीही बलवान व जीवनाच्या ऐन बहरातला मनुष्य असला तरी देखील तो आमच्या सेनेकडे येण्यास धजणार नाही; आमच्या रक्षकांच्या नजरेस न पडता तो त्यांच्या पुढून येऊ शकणार नाही किंवा माझ्या दरवाजांच्या अर्गला इतक्या सहज काढू शकणार नाही; म्हणून मला आणखी जास्त चिथावू नको, नाही तर जव्हच्या आदेशाविरुद्ध माझ्या हातून पाप घडून तू अभ्यर्थक असलास तरी माझ्या तंबूत तुला मी राहू देणार नाही."

वृद्ध त्याला भ्याला व त्याने त्याची आज्ञा पाळली. मग पेलिअसपुत्राने आपल्या घराच्या दारातून सिंहासारखी बाहेर झडप घेतली; पण तो एकटा गेला नव्हता, त्याच्यासह त्याचे दोन शिलेदार ऑतोमेदॉन व अॅल्सिमस गेले, इतर सोबत्यांपेक्षा तेच आता त्याच्या अधिक निकटचे होते, कारण पॅत्रोक्लस आता नव्हता. त्यांनी घोड्याना व खेचराना धुरांखालून सोडवले आणि प्राअॅमच्या दूत असलेल्या सेवकाला घरात बसण्यास सांगितले. हेक्तरच्या देहासाठी आणलेली खंडणी त्यांनी गाडीतून उचलली, पण दोन प्रावरणे व एक उत्तम अंगरखा गाडीतच ठेवला, यासाठी की त्या कपड्यात गुंडाळून

घरी परत नेण्यासाठी तो देह ॲकिलिझला देता यावा. मग ऑतोमेदॉनने सेवकांना बोलावून त्या देहास स्नान घालून तैलमार्जन करण्यास सांगितले; पण त्याआधी त्याने तो देह प्राअॅमला दिसणार नाही अशा ठिकाणी नेला; कारण त्यांना भीती वाटली की प्राअॅमने तो पाहिला तर दुःखाचा आवेग अनावर होऊन तो आक्रंदत सुटेल व त्यामुळे ॲकिलिझ संतप्त होऊन त्याचा वध करील व जव्हचा आदेश मोडल्याचे पाप त्याला लागेल. सेवकांनी त्या देहाला स्नान घालून तैलमार्जन केल्यावर व एका उत्तम अंगरख्यात व प्रावरणात तो गुंडाळल्यावर स्वतः ॲकिलिझने तो उचलून एका शववाहिनीवर ठेवला आणि त्याने व त्याच्या लोकांनी तो गाडीवर चढवला. हे करताना तो मोठ्याने आक्रोश करीत आपल्या प्रिय सोबत्याचे नाव घेऊन त्याला हाकारीत म्हणाला, "पॅत्रोक्लस, हेदिझगृही देखील, जर तू ऐकलेस की मी खंडणी घेऊन हेक्तरला त्याच्या बापाच्या स्वाधीन केले, तर माझ्यावर रागावू नको. खंडणी काही न शोभेशी नाही व मी ती तुझ्याबरोबर यथान्याय वाटून घेईन."

मग ॲकिलिझ परत तंबूत गेला व ज्या भिंतीजवळील आसनावर प्राअॅम बसला होता तिच्याशी काटकोन करणाऱ्या भिंतीजवळील आपल्या पहिल्या, भरगच्च नक्षीकाम जडविलेल्या आसनावर बसला. तो म्हणाला, "महाशय, तुमचा पुत्र आता त्याच्या शववाहिनीवर ठेवलेला आहे व तुमच्या इच्छेनुसार त्याच्याप्रीत्यर्थ खंडणी स्वीकारण्यात आली आहे; दिवस उगवताना तुम्ही त्याला घेऊन जाल तेव्हा तो तुमच्या नजरेस पडेल. तूर्त आपण आपल्या रात्रीच्या भोजनाची तयारी करू द्या. जरी सुंदर नायोबीच्या घरात तिची बारा मुले—सहा मुली व सहा धष्टपुष्ट मुलगे—सर्व मारली गेली तरी तिलासुद्धा खाण्याचा विचार करावाच लागला. नायोबीला शिक्षा करण्यासाठी अॅपॉलोने आपल्या रौप्य धनुष्यातून बाण मारून ते पुत्र ठार केले आणि लीतोसमोर नायोबीन आपल्या मुलांबद्दल बढाई मारली म्हणून दायानाने त्या मुलींचे प्राण घेतले; नायोबी म्हणाली होती की लीतोला दोनच अपत्ये झाली, उलट तिला स्वतःला अनेक झाली—त्यावर त्या दोघांनी तिच्या अनेकांना मारून टाकले. नऊ दिवस ती प्रेते लोळत पडली होती व त्यांना मूठमाती द्यायला कोणी नव्हते, कारण सॅटर्नपुत्राने साऱ्या माणसांना दगड बनवून टाकले होते; परंतु दहाव्या दिवशी स्वर्गातल्या देवांनीच स्वतः त्या मृतांना मूठमाती दिली व नंतर रडून रडून क्लान्त झालेल्या नायोबीने अन्नग्रहण केले. लोक म्हणतात की अकेलौस नदीवर सतत संचार करणाऱ्या अप्सरा जेथे राहतात त्या सिपिलस डोंगरांवरील कुरणांमधील खडकांवर कोठेतरी ती शिलारुपात राहते, व अजूनही स्वर्गस्थ

देवांच्या हाताने तिच्यावर पाठवलेल्या दुःखांनी झुरत राहाते. म्हणून कुलवंत महाराज, आपण दोघे आता अन्नग्रहण करू या; यानंतर तुमच्या प्रिय पुत्रास परत इलिअमला वाहून नेताना तुम्हाला त्याच्यासाठी शोक करता येईल आणि त्याच्यासाठी तुम्हाला पुष्कळच अश्रूंचे मोल द्यावे लागणार आहे."

असे बोलून ॲकिलिझ आपल्या जागेवरून चटकन उठला व एक रौप्यधवल मेंढरू त्याने मारले; ते सोलून त्याच्या अनुयायांनी योग्य प्रकारे सिद्ध केले. ते मांस त्यांनी काळजीपूर्वक कापून त्याचे लहानलहान तुकडे केले व ते सळयांवर टोचून अग्नीवर चांगले भाजून पुन्हा बाहेर काढले. मग ऑतोमेदॉनने सुबक टोपल्यात रोट आणून भोजनाच्या मेजाभोवती सर्वांना वाढले, तसेच ॲकिलिझने मांसही वाटून वाढले, आणि त्यांनी पुढे ठेवलेल्या पदार्थांवर चांगला हात मारला. सर्वांचे पुरेसे खाणे पिणे होताच दार्दानस-वंशज प्राॲमने ॲकिलिझच्या शक्तीचे व शरीर सौष्ठवाचे कौतुक केले, कारण तो दिसायला एकाद्या देवासारखा होता, आणि प्राॲम बोलत असता त्याचे बोलणे ऐकून व त्याचे उदात्त व्यक्तिमत्त्व पाहून ॲकिलिझने त्याचे साश्चर्य कौतुक केले. त्यांचे एकमेकांकडे हवे तेवढे टक लावून पाहून झाल्यावर प्रथम प्राॲम बोलला, "हे राजा, आता मला माझ्या शय्येकडे घेऊन चल, म्हणजे आपल्याला आडवे होऊन झोपेच्या सुखद वरदानाचा उपभोग घेता येईल. तुझ्या हातानी माझ्या मुलाचा जीव घेतल्या दिवसापासून एकदाही माझा डोळ्याला डोळा लागला नाही; माझ्या तबेल्याच्या चौकातल्या चिखलात, विवळत व माझ्या असंख्य दुःखाचा सारखा ध्यास घेत, मी सतत लोळलो आहे. शिवाय आता मी रोटी खाऊन मद्य प्यालो आहे. पण आतापर्यंत मी कुठल्याच खाद्यपदार्थाला स्पर्श केला नव्हता."

त्याचे बोलणे होत असता ॲकिलिझने आपल्या लोकांना व सेविकांना वेस-घरातील खोलीत शय्या सज्ज करून त्यांच्यावर उत्तम लाल कांवळी व चादरी पसरून, प्राॲम व इदिअस यांना लोकरीचे झगे पेहरण्यासाठी देण्याची आज्ञा केली. तेव्हा दासी एक मशाल घेऊन बाहेर गेल्या व अगदी त्वरेने त्यांनी दोन शय्या तयार केल्या. मग ॲकिलिझ हसत हसत प्राॲमला म्हणाला, "प्रिय महाराज, तुम्ही बाहेर निजावे; नाही तर नित्यक्रमानुसार माझ्याशी विचार विनिमय करण्यास वारंवार येणारांपैकी एकादा सल्लागार प्रहरामागे प्रहर उलटणाऱ्या रात्रीच्या काळोखात तुम्हाला येथे पाहील व ती बातमी ॲगॅमेम्नॉनला देईल. मग तो देह तुमच्या स्वाधीन करण्यास विलंब लागण्याचा संभव आहे. आणि आता मला सांगा व अगदी खरे सांगा, की उदात्त हेक्तरचे और्ध्वदेहिक संस्कार आपण किती दिवस साजरे करणार आहात? यासाठी सांगा, की

त्या काळात मला युद्धापासून अलिप्त राहून सेनेलाही आवरून ठेवता यावे."

आणि प्राअॅमने उत्तर दिले, "तर मग ज्याअर्थी तू मला माझ्या उदात्त पुत्रास सर्व उचित संस्कारांसह मूठमाती देणे शक्य करीत आहेस, त्याअर्थी अॅकिलिझ, याप्रमाणे कर, म्हणजे मग मी तुझ्याशी कृतज्ञ राहीन. आम्ही आमच्या नगरीत कसे कोंडले गेलो आहोत हे तुला माहीत आहे; लाकडे आणण्यासाठी डोंगर फार दूर पडतो, आणि लोक भयग्रस्त अवस्थेत रहात आहेत. म्हणून माझ्या घरात हेक्तरसाठी आम्ही नऊ दिवस शोक मनावू; दहाव्या दिवशी आम्ही त्याला मूठमाती देऊ व त्याच्या सन्मानार्थ एक सार्वजनिक महाभोज होईल; अकराव्या दिवशी त्याच्या अस्थींवर आम्ही ढिगारा बांधू, आणि बाराव्या दिवशी जरूर पडलीच तर आम्ही लढू."

आणि अॅकिलिझ म्हणाला, "राजन प्राअॅम, तू म्हणालास तसे सर्व काही होईल. तू सांगितलेल्या अवधीपर्यंत मी आमचे लढणे थांबवून धरीन." असे बोलत असता त्याने आपला हात वृद्धाच्या उजव्या मनगटावर ठेवला, त्याने निर्भय व्हावे यासाठी ती खूण होती. मग या प्रमाणे प्राअॅम व त्याचा परिचारक नाना विचार मनात घोळवीत पुढल्या अंगणात झोपले आणि घराच्या एका आतल्या खोलीत सुंदर ब्रिसेइसला शेजारी घेऊन अॅकिलिझ निजला.

आणि आता साऱ्या रात्रभर देव व मर्त्यमानव दोघेही गाढ झोपलेले होते, पण एकट्या, भाग्य भेटवणाऱ्या मर्क्युरीवर मात्र झोपेची पकड बसत नव्हती, कारण पहारेकऱ्यांच्या प्रबळ सेनेची नजर चुकवून प्राअॅमला नौकांपासून कसे परत घेऊन जायचे याचा तो सर्ववेळ विचार करीत होता. म्हणून प्राअॅमच्या डोक्यावर घोटाळत तो म्हणाला, "महाराज, आता अॅकिलिझने तुमच्या जिवाला धक्का न लावल्यामुळे शत्रूंच्या ऐन गर्दीत झोपण्याविषयी तुम्हाला काहीच भीती वाटत नाहीसे दिसते. तुम्ही मोठी खंडणी दिली आहे व पुत्राचे शव मिळविले आहे; तुम्ही जिवंत राहून बंदीवान झालात तर, तुम्ही घरी ठेवलेल्या तुमच्या पुत्रांना तुम्हाला सोडविण्यासाठी तिप्पट खंडणी द्यावी लागेल; आणि जर अॅगॅमेम्नॉन व इतर अॅकिअन्स यांना तुम्ही येथे असल्याचे समजले तर तशीच वेळ येईल."

वृद्धाने हे जेव्हा ऐकले तेव्हा त्याला भय वाटले व त्याने आपल्या सेवकास उठवले. मग मर्क्युरीने त्यांचे घोडे व खेचरे धुरेस जोडली आणि त्यांना सैन्यामधून त्वरेने हाकून नेले, त्यामुळे कोणाही माणसाने त्यांना पाहिले नाही. ते जेव्हा अमर ज्व्हने जन्मास घातलेल्या झांथसच्या उतारापाशी आले तेव्हा मर्क्युरी परत उत्तुंग ऑलिम्पसला गेला, आणि केशरी वसन धारण केलेली

उषा अखिल भूभागावर उदयास येऊ लागली. मग प्राअॅम व इदिअस विलाप करीत व आक्रंदत रथ हाकीत नगरीकडे गेले आणि हेक्तरचा देह खेचरांनी ओढीत नेला. कोणाही पुरुषाने व स्त्रीने त्यांना पाहिले नाही; पण परगॅमसवर उभी असलेल्या सुवर्णा व्हीनससारख्या सुंदर कॅसँद्राने आपल्या प्रिय पित्याला त्याच्या रथात, त्याचा सेवक जो नगरघोषक होता त्याच्यासह पाहिले. मग खेचरे ओढीत असलेल्या शवशय्येवर जो होता त्याला तिने पाहिले, आणि मोठ्याने ओरडून ती नगरीत इतस्ततः फिरत सांगू लागली, "त्रोजन स्त्री-पुरुष हो, इकडे या, व हेक्तरचे दर्शन घ्या; जेव्हा तो जिवंत होता तेव्हा तो लढाईतून परत आल्यावर त्याला पाहून तुम्हाला कितीदा तरी आनंद झाला असेल; तर मग जो आपल्या नगरीचे व आपल्या सर्व लोकांचे यशद भूषण होता त्याला आताही पहायला या."

हे ऐकताच नगरीत एकही पुरुष किंवा स्त्री राहिली नाही. परम घोर दुःखाने ती ग्रस्त झाली. वेशीजवळच मृतदेह आत घेऊन येणाऱ्या प्राअॅमला त्यांनी गाठले. त्याच्यासाठी शोक करणाऱ्यात सर्वांत पुढे हेक्तरची पत्नी व माता या होत्या. गाडीकडे धावून जाऊन त्यांनी आपले हात त्याच्या मस्तकावर ठेवले, त्यावेळी त्यांच्याभोवती लोकसमुदाय रुदन करीत उभा राहिला. साऱ्या दिवसभर, सूर्य अस्ताला जाईपर्यंत ते वेशीपुढे रडत व आक्रोश करीत उभे राहिले असते, पण प्राअॅम रथावरून त्यांना म्हणाला, "खेचराना तुमच्यामधून जायला वाट द्या. नंतर मी तो देह घरी नेल्यावर तुम्हाला हवे तेवढे रडून घेता येईल."

यावर लोकांनी बाजूला होऊन गाडीला वाट करून दिली. मृतदेह वाहून घरात नेऊन एका शय्येवर ठेवल्यानंतर त्यांनी त्याच्या भोवताली शोकगीताचे पालुपद सुरू करण्यास भाट बसवले; तेव्हा मग त्यांच्या दुःखपूर्ण शोकगीतात स्त्रियांनी आपले सूर मिळवले. त्या सर्वांत मुख्य होती अन्द्रोमॅकी, तिने प्रथम शोकस्वर काढून बलाढ्य हेक्तरचे मस्तक आपल्या बाहुपाशात कवटाळून धरले. ती रडत म्हणाली, "नाथ, तू तरूणपणीच मरण पावलास व तुझ्या घरात मला गतभर्तृका म्हणून मागे ठेवलेस; ज्याची आपण अभागी मातापितरे, तो तर अजून केवळ बालक आहे, व तो बाल्यदशा संपवून यौवनदशेपर्यंत कदाचित पोहोचणार नाही असे मला भय वाटते. तो तेवढा मोठा होईपर्यंत आपली नगरी उद्ध्वस्त व पराजित होईल, कारण तिची राखण करणारा तू आता नाहीस--तूच तिचा त्राता व आमच्या बायकामुलांचा पालनकर्ता

होतास. आता आपल्या स्त्रियांना बंदीवान करून नौकांकडे उचलून नेण्यात येईल, व त्यांच्यातच मीही असेन, आणि माझ्या बाळा, तुही माझ्याबरोबर असशील व तुला कोणा निष्ठूर धन्याच्या हाताखाली एकाद्या न शोभणाऱ्या कामाला जुंपतील किंवा कदाचित एकादा ॲकिअन, हेक्तरने मारलेल्या कोणा भावाच्या मुलाच्या किंवा बापाच्या सूडापायी तुला आपल्या तटांवरून फेकून देईल. हाय, किती दुःखद मरण ते; अनेक ॲकिअनांना हेक्तरने खरोखरच धूळ चारली आहे; कारण लढाईत तुझ्या पित्याचा हात काही नरमाईने चालणारा नव्हता. म्हणून तर लोक त्याच्यासाठी शोक करीत आहेत. हे हेक्तर, तू आपल्या आईबापांसाठी जे दुःख मागे ठेवले आहेस ते शब्दांनी सांगता येत नाही; आणि माझी स्वतःची शोकव्यथा सर्वांत अधिक आहे, कारण तू मरणोन्मुख असताना हात पुढे लांब पसरून मला आलिंगन दिले नाहीस किंवा निरंतर का रात्रंदिवस माझ्या अश्रूं-बरोबर साथ करतील असे काही अमर शब्दही मला बोलला नाहीस."

सगळा वेळ ती अशी आक्रंदून रडली व तिच्या विलापात इतर बायका सहभागी झाल्या. हेक्युबानेही आपल्यापरीने शोक स्वर चालू ठेवले. ती स्फुंदत म्हणाली, "हेक्तर, माझ्या संतानातल्या सर्वांत प्रिय मुला, तू जिवंत होतास तोपर्यंत देवांनी तुझ्यावर फार माया केली, व मरणात देखील तुझ्याबद्दल ते सर्वस्वी बेफिकिर राहिले नाहीत; कारण माझ्या इतर पुत्रांपैकी जेव्हा कोणाला ॲकिलिझने धरले तेव्हा तो त्याला समुद्रपार सॅमॉज, इम्ब्रस किंवा खडबडीत लेम्नॉसमध्ये विकायचा आणि तुलाही त्याने आपल्या तलवारीने जेव्हा मारले तेव्हा त्याच्या सोबत्याच्या समाधीभोवती अनेकवेळा फरफटत ओढले—जरी असे करून त्याच्या सोबत्याचा प्राण परत मिळणार नव्हता—तरीही असे असूनही तू इथे अगदी देवांसारखा ताजातवाना व ॲपॉलोने आपल्या वेदनारहित बाणांनी मारलेल्या एकाद्यासारखा सुंदर दिसतो आहेस."

अश्रु गाळतागाळता विव्हल स्वराने आक्रंदत ती असे बोलली आणि तिसऱ्या खेपेस हेलनने विलापाचा सूर चालू ठेवला, "माझ्या साऱ्या दीरात तूच परमप्रिय आहेस हेक्तर—कारण मला इथे ट्रॉयला आणणाऱ्या ॲलेक्झँडरची मी आता बायको आहे. बरे झाले असते त्याने मला इथे आणण्यापूर्वी मेले असते तर—मी घर सोडून समुद्रावरून येथे आल्यानंतर वीस वर्षे आली व गेली, पण तुझ्याकडून अपमानाचा किंवा कठोर असा एक शब्दही कधी मी ऐकला नाही. तुझ्या भावांपैकी, वहिणींपैकी






किंवा भावजयांपैकी कोणी किंवा माझी सासू जर कधी मला रागाने बोलली--कारण प्राअॅम तर स्वतः माझा पिता असल्यासारखा दयाळूपणे माझ्याशी वागे--तर तू त्या बोलणाऱ्या माणसाला दोष देत होतास आणि सौम्य व सद्भावनायुक्त शब्दांनी आवरीत होतास. म्हणून माझे अश्रू तुझ्यासाठी व दुर्दैवी अशा माझ्यासाठी--दोघांसाठीही वाहत आहेत, कारण ट्रॉयमध्ये मला ममतेने वागवणारे दुसरे कोणीही नाही; उलट सारे माझ्या जवळून जाताना अंग चोरून घेतात व शहारतात."

बोलताना ती रडत होती व तिच्याभोवती जमलेला विस्तीर्ण जनसमुदाय तिच्याबरोबर शोक करीत होता. मग राजा प्राअॅम त्याला म्हणाला, "ट्रोजन्सहो, नगरात लाकडे घेऊन या, व आर्गाइव्हज् कधी दबा धरून एकदम हल्ला करतील ही भीती बाळगू नका, कारण नौकांजवळून मला परत फिरताना निरोप देतेवेळी अॅकिलिझने शब्द दिला आहे की बाराव्या दिवसाच्या सकाळपर्यंत ते आपल्यावर चढाई करणार नाहीत."

तात्काल लोकांनी बैल व खेचरे जुंपली व ते नगरीपुढे जमा झाले. नऊ दिवसपर्यंत त्यांनी लाकडांचे प्रचंड ढीग आणले व दहाव्या दिवशी सकाळी सतत अश्रू ढाळीत त्यांनी शूर हेक्तरला बाहेर काढून त्याचे शव काष्ठराशीच्या माथ्यावर ठेवून ती पेटवली. मग जेव्हा प्रभात कन्या आरक्तांगुली उषा अकराव्या दिवशी प्रकट झाली, तेव्हा बलाढ्य हेक्तरच्या चितेभोवती लोक पुन्हा गोळा झाले. सर्व एकत्र आल्यावर प्रथम त्यांनी अग्नि जेथे जेथे अजून प्रज्वलित होता तेथे तेथे तो मद्याने विझवला, मग त्याच्या भावांनी व सोबत्यांनी अनेक दुःखपूर्ण आसवे ढाळीत त्याच्या शुभ्र अस्थी गोळा केल्या, त्या मृदु जांभळ्या महावस्त्रात गुंडाळल्या व एका सुवर्ण कुंभात ठेवल्या. तो कुंभ त्यांनी एका समाधीत ठेवला व त्याच्यावर जवळजवळ बसविलेले मोठाले दगड आच्छादनार्थ रचले. मग त्यांनी घाईघाईने त्या दगडांवर मातीचा ढिगारा बांधला, त्यावेळी प्रत्येक बाजूला रक्षक ठेवले, कारण काम संपण्याआधी अॅकिअन्स त्यांच्यावर हल्ला करतील असे त्यांना भय वाटले. मातीचा ढिगारा पूर्ण झाल्यावर ते परत नगरीत गेल्यावर नीटपणे एकत्रित झाल्यावर त्यांचा राजा प्राअॅम याच्या प्रासादात महाभोज साजरा केला.

तेव्हा याप्रमाणे अश्वदमनकुशल हेक्तर याची उत्तरक्रिया त्यांनी विधीपूर्वक साजरी केली.

● ● ●

शामुना--ए-१२५--समरासांमंमुं--११-८५--१,१८०--पीए५*.